फॅ. रे. मुंबई, भा. १ पृ. ६-७ (द्वि. सं.) इ.

(१३२२)
मुंबई कन्सल्टेशन.

श. १५९२ श्रावण व. १३
इ. १६७० ऑगष्ट ३

३० जुले रोजीं, खोजा अलादीनच्या हातीं, औरंगाबादेहून, **सुलतान मुअइझमचें** एक निशाण (=पत्र) आणि कल्याणचा माजी व दिवाण हल्लींचा सुलतानाचा दुय्यम बक्षी [ पुढचें पत्र पहा ] **सैद महमद** याचें दुसरें, अशीं दोन पत्रें आलीं. "**शिवाजीनें** थोड्या दिवसांपूर्वी आपल्या एका किल्याला [ कुईगड, कुवारीदुर्ग, Kerridrug ? पुढचें पत्र पहा ] वेढा दिला त्याची इंग्रजांनीं कुमक करावी, तेथील लोकांना दारूगोळा पुरवावा, आणि हरएक प्रसंगीं आमचे सैन्याला मदत करावी. पण उलट शिवाजीच्या लोकांना युद्धसामुग्री अगदीं पुरवूं नये" असा वरचढपणाचा मजकूर त्यांत होता. विचाराकरतां तीं पत्रें सुरतेला रवाना करावीं.

फॅ. रे. मुंबई, भा. ६ पृ. ४०-४२ इ.

(१३२३)
मुंबई-सुरत

श. १५९२ श्रावण व. ३०
इ. १६७० ऑगस्ट ५

[ मागील उताऱ्यांत असलेला मजकूर या उताऱ्यांत दिला नाहीं. ]

**सुलतान मुअइझमच्या** पत्राचें **स्वागत** करण्याकरितां प्रसंगाला योग्य अशा समारंभानें ससैन्य जकात-घराशीं गेलों. **पोर्तुगीज भार्पेत भाषांतर** करून पाहतां तें पत्र प्रेसिडेंटचे नांवाचें असल्याचें कळलें...[त्यांतील मजकूर-] त्यांनीं ज्या किल्याला मदत देण्यास लिहिलें तो **शिवाजीनें** जिंकल्याला बरेच महिने झाले. पत्राचें उत्तर पाठवावें.

खोजा अलादिन **दंडाराजपुरीला** जात आहे. तेथून तो लवकरच परत येईल. त्यावेळीं उत्तराची त्याला अपेक्षा आहे....पाऊस कमी पडल्यामुळें दुष्काळ सर्मोवार आहे.........

फॅ. रे. सुरत, भा. ३ पृ. ७९ इ.

(१३२४)
सुरत कन्सल्टेशन

श. १५९२ भाद्र. शु. १०
इ. १६७० ऑगस्ट १६

मुंबईचे ५ ऑगस्टचे पत्राचें उत्तर. पत्राचें उत्तर आम्हीं देणें सोईचें नाहीं. मुंबईकरांनींच संधि पाहून द्यावें. मोठा नजराणा बरोबर पाठविणें जरूर असल्यामुळें उत्तर देणें शक्य तों लांबणीवर टाकावें. खोजाला आपलासा करून घ्यावा. त्याच्या मदतीनें नजराणा देणें टळेल किंवा निदान आपली गलबतें येउन नजराण्यायोग्य जिन्नस हातीं येण्याइतकी फुरसत राहील. शिवाय **शहाजादा औरंगजेब** आणि **शिवाजी** यांच्या युद्धाच्या निकालाची वाटहि पहातां येईल. कारण, कोणतीहि एक बाजू घरणें बरें नाहीं. उत्तर द्यावेंच लागलें तर जपून द्यावें. किल्याला मदत देण्याचे बाबतींत नक्की कांहींच न लिहितां शक्य तितक्या गोड भाषेत लिहावें.

फॅ. रे. मुंबई.
भा. १९ पृ. ४४-४५ इ.
(१३२५)
सुरत-मुंबई
श. १५९२ भाद्र. शु. १०
इ. १६७० ऑगस्ट १६

[*मागील सुरत कन्सल्टेशनमध्यें आलेला मजकूर यांत त्रोटक दिला आहे.* शहाजाद्याला मिळून **शिवाजीशीं तुम्हीं युद्ध करावें** असाच त्यांच्या पत्राचा मथितार्थ दिसतो. तसें करणें आपल्याला अशक्य असल्यामुळें उत्तर सावधगिरीनेंच द्यावें. मध्यंतरीं खोजा अलादिनला खूष ठेवावें. कारण त्याच्या जातवाल्यांच्या स्वभावानुसार आपल्या धन्याचा फायदा पाहण्याऐवजीं तो स्वतःचाच लाभ इच्छित असावा असें आमचें मत आहे. म्हणून सुलतान **मुअज्झमकडून** कायम स्वरूपाच्या तो कोणत्या सवलती मिळवून देतो तें पाहून त्याप्रमाणें नजराण्याचें ठरविणें जरूर आहे.

(से.) फॅ. रे. सुरत
भा. २ पृ. ८१ इ.
(१३२६)
सुरत कन्सल्टेशन.
श. १५९२ भाद्र. शु. १३
इ. १६७० ऑगस्ट १८

**शहाजाद्यानें औरंगजेबाविरुद्ध** बंड केल्यामुळें आणि सुरत काबीज करण्याकरितां शहाजाद्याचें सैन्य येत आहे अशी हूल उठल्यामुळें भावी संकटाचा बंदोबस्त करण्याबद्दल विचार झाला. शहाजाद्याच्या **तोफखान्यावर जॉन ट्रॅलर** नांवाचा मुख्याधिकारी आहे. त्याच्याकडून मध्यस्थी करवून कंपनीचे मालमत्तेला हात लावला जाऊं नये अशी तजवीज करवावी.

फॅ. रे. मुंबई भा. ६
पृ. ४७-४९ इ.
(१३२७)
मुंबई-सुरत.
श. १५९२ भाद्र. शु. १५
इ. १६७० ऑगस्ट २०

घोड्याकरितां धान्य आणि कांहीं सोरा मागण्याकरितां **दंडा-राजपुरीहून** एक नोकर आला त्याला आम्ही नकार दिला. आणि प्रवासापुरतें धान्य आणि कांहीं औषधें घेऊन तो गेला. **दंडा-राजपुरीला** दारूळ पुरविण्याची दोन तीन व्यापाऱ्यांची तयारी होती. परंतु युद्धांत गुंतलेल्या कोणत्याहि पक्षाला मदत करणें म्हणजे आपल्यावर शत्रू ओढवून घेण्यासारखें असल्याचें सांगून त्यांना बंदी केली. आपला शेजारी जो **शिवाजी त्याचे गुप्त हेर** या बेटांत सर्वत्र असून त्यांना आपल्या शत्रूला पुरवठा कोठून होतो याचा सुगावा लागल्यास काय अनर्थ ओढवेल हें सांगितल्यावर त्यांनीं माघार घेतली.

**कारवारच्या** जासूदांच्या सांगण्याप्रमाणें शि०नें कारवारला वेढा दिला नाहीं असें दिसतें. तथापि ५००० लोक तिकडे पाठविले आहेत अशी सिद्दीनें खबर दिली. ' आपण माहुली वगैरे सर्व किल्ले घेतले असतांना तूं माझ्यासमोर टिकाव कसा धरणार ? किंवा माझ्या ताब्यांत देशील तर मी तुला सर्व सैन्याचा मुख्य सेनापती करीन' असें **शिवाजीनें सिद्दीला** लिहिलें आहे. *'आपल्याला जोंपर्यंत जमीन आणि पाणी यांपैकीं कोठून तरी रसद मिळत आहे तोंपर्यंत आपण दुर्जय आहोंत' अशा जाणिवेनें सिद्दीहि त्याचा तिरस्कार*

करितो. प्रत्यहीं रात्रीं चकमकी होऊन बहुधा पुष्कळ सैनिक दगावतात.......मुंबई शेजारीं औरंगजेब व शिवाजी यांचें युद्ध चालू आहे. यामुळें व्यापारी येत नाहींत.

फॅ. रे. मुंबई भा. ६ } पृ. ५७ इ. (१३२८) मुंबई-सुरत. { श. १५९२ भाद्र. व. १२ { इ. १६७० सप्टें. १

औरंगाबादेहून अगदीं गोंधळाची अशी अस्पष्ट खबर येते. खोजा अल्लादीन चेटावर आला आहे. लौकरच उत्तराकरितां सताबूं लागेल. शिवाजी जोरावर असून कल्याण-भिवंडीचे सर्व मार्ग त्याच्या स्वाधीन असतांना औरंगाबाद ते कल्याण-भिवंडी-मार्गाच्या सवलती औरंगाबादेहून मिळवूनहि कांहीं फायदा होईलसें वाटत नाहीं. शिवाय औरंगजेब व मुअज्जम यांचे परस्पर संबंधांत फरक होण्याचा संभव असेपर्यंत असल्या गोष्टींचा निर्णय लांबणीवर टाकलेला बरा.

खं. ८ ले. १० } सु. १०७१ रबर } (१३२९) { श. १५९२ भाद्रपद { इ. १६७० आगस्ट-सेप्टें.

राजश्री निळोपंत मजमूदार यास वतनीचा कारभार करावयास ठेविलें. माहोलीपासून भीमगड पावेतों व इंदापूर, पुणें, चाकण कदीम वतनीचा कारभार करावा. यासी, पंडित माहाइलेनें साहेबासी अर्ज केला कीं:- आजी कामाचे दिवस आहेत. वतनीचा कारभार आणिक कोण्हास सांगावा. आपण बराबरी येऊन दाहा लोक कामें करितील तैसी करून देऊन; गड घेणें पडिले तरी घेऊन देऊन; ऐसा अर्ज केला. त्यास साहेबी उत्तर दिघलें कीं; वतनी राहाणें हेंहि काम थोर आहे. वतनी राहाणें. येथें तुम्हां बक्षीस इमारती पैके पावतील त्यास दर सदे होन २ दोनीप्रमाणें पावती. ऐसे साहेब बोलिलियावरी पंडित माहाले बोलिले कीं:—जरी वतनीचेहि काम थोर आहे तरी बहुत बरें. एकानें सिद्ध संरक्षण करावें. एकानें साध्य करावें. दोन्ही कामे साहेब बराबरीनें मानितात. तरी आपण वतनीं राहीन. परंतु इमारतीचे पैके पाववून बक्षीस घेणार नाहीं. मोरोपंत त्रिंबक व शिवनेर येथें पाठविले आहेत ते गड घेतील व मुल्क घेतील, कामें करितील. साहेब थोर कामास जातात तें काम श्रीचें कृपेनें होऊन येईल. त्यास राजश्री मोरोपंतास मेहेरबानीनें पंचवीस फुलें दिधली तरी आम्हासहि वीस फुलें द्यावीं. ऐसा साहेबीं निश्चय केला पाहिजे. त्यावरी साहेबीं ऐसाच तह दिधला कीं: वतनी राहोन कारभार करावा. इमारतीचे पैके पाववून बक्षीस न घ्यावें. राजश्री मोरोपंत काम करितील, गड घेतील, पैके मिळवितील. मुल्कगिरीचा प्रयत्न करून घेतील. त्यास मेहेरबान होऊन, पेशवे आहेत याकरितां पंचवीस फुलें दिधलीं तरी, तुम्हास मजमूच्या काइदियानें वतनीचें काम तें काम बराबरी ऐसें समजोन, त्यास द्यावीं तेच बरोबरी तुम्हासहि वीस २० फुलें पाठवावी. या हिसेबानें जैसें त्यास पावेल तैसे तुम्हास

देऊन; ऐसा साहेबी निश्चय करून पंडित माइलेस वतनीचा कारभार करावयास ठेविले असे. पंडित माइलेनेहि सदरहू प्रमाणें मान्य केलें असे. मोर्तब सूद (मर्यादेयं विराजते)

किता एक. रदबदल राजश्री निळोपंती केली कीं; साहेब वतनी कारभारास ठेवीत आहेत. यास कोण्ही कैसा वर्तेल, कोण्ही कैसा वर्तेल. यास आपणास जे कोणी दखल होईल ते गोष्टीची वाजीपुसी करून. जे दखल न व्हे आणि साहेबास कळेल तें तें आपणास सांगावी. आपण वाजीपुसी करून. परंतु लोक गैरमाकूल आम्हास न कळत वर्तले तरी त्याची बदलामी आपणावरी न ठेवावी. आपण खुतूत गैरमाकूल सहसा वर्तणार नाहीं. कारभारमुळें दाहा लोकासीं बरेंवाईट बोलावे लागत आहे. एकादियानें लटकेंच कांहीं सांगितले तरी ते गोष्टीची बरी चौकशी करावी. सांगितलियावरूनच मनांत गैरमेहेरवानी न धरावी. वाजीपुसी करिता नेमस्त खुतूत तमा आढळली. मग जे नामेहेरवानी करणे ते करावी. लोक गैरमाकूल वर्तले तरी जो जैसे करील तो तैसा पावेल. त्याची बदलामी आपणावरी नाहीं. येणेंप्रमाणें साहेबी मान्य केलें असें. मोर्तब सूद (मर्यादेयं विराजते)

किता एक. रदबदल कीं, वतनीचा कारभार साहेबी आपणास सांगितला आहे. यासी, काय गैरमाकूल कारभार होईल त्याची मुनसिफी साहेबीं करावी, किंवा आमची आम्हावरी टाकावी. अनाजी पंताचें सांभाळी न करावी. ऐसे बोलिलियावरी साहेबी मान्य केले असे. मोर्तब सूद (मर्यादेयं विराजते)

किता एक. कलम पंडित माइलेनें अर्ज केला कीं, आपण कारभार करणे तो ऐसा करू कीं जैसा आपले घरींचा खुतूत कारभार. त्यानें फाइदा समजोन जे करीत आहेत तैसा करून साहेबीं मेहेरवानी मात्र असो द्यावी. मोर्तब सूद (मर्यादेयं विराजते)

येणेप्रमाणें सदरहू कलमांचा तह साहेबीं दिधला असे. मोर्तब सूद (मर्यादेयं वि.)

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. मुंबई<br>मा. ६ पृ. ६० इ. | (१२३०)<br>मुंबई–सुरत. | श. १५९२ आश्वीन शु. १<br>इ. १६७० सप्टें. ५ |

सर्व रस्ते **शिवाजीनें** बंद केले आहेत....आम्हीं शिशाचीं पिंपें उतरून घेतलीं आहेत. आतां औरंगाबादचा **सुलतान मुअइझम** हा दंडाराजपुरकराचा मित्र आहे आणि बापाशीं युद्ध करण्याकरितां **शिवाजीशीं संबद्ध झाला** आहे; ही वस्तुस्थिति लक्षांत घेतां, या उभयतांपैकीं कोणीं एकानें हें शिसें खरेदी करण्याकरितां मनुष्य पाठविला तर (जगांत चालतें त्याप्रमाणें) हा एक व्यापारी माल म्हणून विकावयाला आम्हांला **शहाजाद्याचें निशाण** आड येतें किंवा कसें हा प्रश्न आहे. आमच्या दृष्टीनें विकण्याला हरकत कांहींच दिसत नाहीं. शिवाय हें आम्हांला पक्कें माहीत आहे कीं, **शिवाजीला** शिसें किंवा तोफा पाहिजे असतील त्या त्याला **राजापूरच्या फ्रेंच वखारींतून**

खास मिळतील. परंतु आम्हीं मुद्दाम कोणत्याहि मानगडींत न पडतां आपल्या हुकमाचे बाहेर जाणार नाहीं.

सं. १७ ले. ८ } (१३३१) { श. १५९२ आश्वीन शु. ३
जु. १५१ जवल २ मु. १ } फर्मान { इ. १६७० सप्टें. ७

?—विठोजी हैवतराव देसाई किले मुरंबगड यास

सैद अबदुला बिन सैद महमद देसाई किले रोहिडे यानें बादशाही दरबारांत कळविलें कीं 'सिवा मलाउनानें (दुष्टानें ?) निजामशाही मुलूख व बाजे विलायत आपल्या कबज्यांत आणिली आहे; व तो आपला अंमल वाढवीत आहे. तर देसायास कौल मिळाल्यास तो जमाव करून सिवा मलउनानें मुलूख काबीज केला आहे तो पादशाहीच्या कबजेत आणील.' त्यावरून हा कौल दिला आहे. तर जमीयत पैदा करून मलउनानें कबज केलेली विलायत पादशाही दौलतींत आणणें. (सन १५ जुलूस अली आदिलशहाचा असावा.)

फॅ. रे. सुरत } (१३३२) { श. १५९२ आश्वीन शु. ८
भा. ३ पृ. ८८ इ. } सुरत कन्सल्टेशन. { इ. १६७० सप्टें. १२

आमच्या हक्कांची माहिती नसलेला नवीन सुभेदार आला आहे. त्याचेशीं बाचाबाची होईल अशी भीती वाटते. शिवाय **इंग्रजांनीं** पूर्ववत् ३½ **टक्के** जकात द्यावी असा मोगली हुकूम फिरल्याची बातमी आहे....त्यामुळें आपत्ति येईल. शिवाय **शिवाजी** कल्याणला मोठें सैन्य उभारून गुजराथवर स्वारी करणार अशी मुंबईहून सूचना आली. तेव्हां **प्रथम सुरत** घेतली जाईल. या दोन्हीं कारणांनीं सुरक्षिततेच्या दृष्टीनें सर्व माल स्वालीला नेऊन भरावा.

राम. अं. ६५-६६ ले. १४ } (१३३३) { श. १५९२ आश्वीन शु.११
सु. १०७१ जवल १० } फा. मु. व सी. { इ. १६७० सप्टें. १५

अजर. त्रिंबकजी राजे भोसले—कारकून पा। आकोट.

वेलूरच्या देवाच्या अभिषेकाबद्दल वर्षासन दोन वर्षांबद्दल १२१॥ रुपये वरातेनें दिले होते. त्यापैकीं बाकी ३६॥= मौजे मोसडे पा। आकोट यावर आदा करणें.

फॅ. रे. सुरत } (१३३४) { श. १५९२ आश्वीन शु. १२
भा. ३, पृ. ८९ इ. } सुरत कन्सल्टेशन { इ. १६७० सप्टें. १६

**शिवाजीचे** हल्ल्याची भीती वाटून सर्व मालाची रोकड करण्यासाठीं सर्व व्यापारी आपला माल स्वस्त भावानें विकावयास तयार झाले आहेत.

(से.) फॅ. रे. सुरत मा. ३ पृ. ९० इ. (१३३५) स्वालीमरीन कन्सल्टेशन श. १५९२ आश्वीन व. ६ इ. १६७० सप्टें. २४

**शिवाजी** सुरतेवर येण्याची भीती असल्यामुळें दिवाळी होऊन जाईपर्यंत व्यापारी लोक माल आपल्या ताब्यांत घेऊं इच्छित नाहींत.

डच रेकार्डस मा. २९ नं. ७६२, आक्टो. ८ न्यू. (१३३६) वेंगुर्ला डि.-डच गव्ह. जन. श. १५९२ आश्वीन व. १० इ. १६७० सप्टें. २८

**शिवाजीच्या** स्थितींत बदल झाला नाहीं. त्याच्यावर चालून आलेलें **मोगली सैन्य** अकस्मात परत बोलाविलें गेलें. **शिवाजी, आदिलशहा आणि सुलतान मुअझ्झम** यांचें संगनमत आहे आणि यामुळें कित्येक गोष्टींचा उलगडा होत नाहीं. परंतु ४००० घोडदळ घेऊन कोणी एक **नबाब बहलोलखान** विजापुराहून निघाला एवढें खास. तो 'आपल्या गांवीं विश्रांति घेण्याकरितां जात आहे.' आणि 'शिवाजीवर जात आहे' अशा दोन्ही वदंता आहेत. **शिवाजी** मात्र किनाऱ्यावरील सर्व किल्यांवर रसद आणि दारूगोळ्याचा पुरवठा करीत आहे.

फॅ. रे. सुरत मा. ३ पृ. ९४ इ. (१३३७) स्वालीमरीन कन्सल्टेशन. श. १५९२ आश्वीन व. १४ इ. १६७० आक्टो. २

**शिवाजी सुरतेपासून २० मैलांवर** आल्याची बातमी आल्यामुळें सुरतेचें रक्षण कसें करावें ह्याबद्दल विचार झाला.

ओ. कॉ. मा ३१ नं. ३४८९ इ. (१३३८) मुंबई–सुरत श. १५९२ आश्वीन व. १४ इ. १६७० आक्टो. २

**सुलतान मुअझ्झमनें शिवाजी** आणि इतर राजांच्या मदतीनें बापाशीं लढण्याकरितां मोठें सैन्य उभारलें. कित्येकांचे मतें तो औरंगजेबावर स्वारी करण्याकरितां निघून आग्र्याजवळ गेला. दुसरे कित्येक असें म्हणतात कीं, **बापानें तह** करून त्याला दख्खनचें राज्य आणि गुजराथ प्रांत दिल्यामुळें तो परत फिरला.

फॅ. रे. सुरत मा. ३ पृ. ९४ इ. (१३३९) स्वालीमरीन. डायरी. श. १५९२ आश्वीन व. ३० इ. १६७० आक्टो. ३

'**शिवाजीनें सुरतेंत** शिरून जाळपोळ व लूट केली. कोणीं विरोध केला नाहीं.' अशी बातमी आज आली. आसपासचीं खेडीं आणि तेथें पळून गेलेल्या सावकार लोकांना लुटण्याकरितां नदीच्या बाजूकडे तो ५०० घोडदळ पाठविणार हें ऐकून माल किनाऱ्यावरून गलबतांवर चढविला.

**४ तारखेच्या नोंदींत, शिवाजीनें** सैन्य पाठविलें असें लिहिलें आहे.

(से.) फॅ. रे. सुरत मा. ३ पृ. १४ इ. } (१३४०) सुरत (स्वाली ?) कन्सल्टेशन { श. १५९२ कार्तिक शु. २ इ. १६७० आक्टो. ५

१० आक्टोबरपर्यंत शिवाजीचें भय कमी होईल असा अंदाज आहे. तोंपर्यंत मलबार किनाऱ्याकडे जावयाची आपली गलबतें तयार असली तथापि (येथील संरक्षणाचे दृष्टीनें) त्यांना जाऊं देऊं नये.

खं. १५ ले. १२४–२५ सु. १०७१ जखर ५ } (१३४१) ताकीद सु. व सी. { श. १५९२ कार्तिक शु. ६ इ. १६७० आक्टो. १०

खान सिताबखान सरनाईकवाडी किले सातारा

ता हुदे. व मौक. मौ. चिंचणेर किले ताथोडा व मौजे वरिये

.जोगिंदगिरी वावा यास चिंचणारे व वरिये (५ बिघे) येथें सालाबादप्रमाणें मिळणारा गहू पाव कुडो देणें.

(से.) फॅ. रे. सुरत भा. ३ पृ. ११७ इ. } (१३४२) स्वाली मरीन कन्सल्टेशन { श. १५९२ कार्तीक शु. ८ इ. १६७० आक्टो. १२

शिवाजीचे परत येण्याबद्दल दुसरी हूल उठल्यामुळें टांकसाळ बंद झाली, सर्वत्र गोंधळ झाला, व ज्या सराफांनीं सोनें घेतलें होतें त्यांनीं तें परत आणून दिलें. परंतु नंतर तेच पुनः तें घेण्याकरितां आले. तरी त्यांना सवलतीनें वागवावें.

फॅ. रे. सुरत मा. १०५ पृ. ४ इ. } (१३४३) मुंबई–सुरत { श. १५९२ कार्तीक शु. ११ इ. १६७० आक्टो. १४

चुना करण्याकरितां लांकडें आणण्यासाठीं होड्या पाठविल्या त्या शिवाजीचे खास हुकमावरून त्याच्या लोकांनीं रिकाम्या परत पाठविल्या. आतां आम्हीं आमच्याच बेटांत लांकूड तोडावें कीं शिवाजीच्या मुलखांतून जबरदस्तीनें आणावें? शिवाजीचीं बेटें दूर दूर असून त्यांच्यावर वस्ती नाहीं. आणि किनाऱ्यापासूनहि तीं थोडीं लांबच असल्यामुळें शिवाजीशीं संबंध तोडून तेथून लांकूड आणणें शक्य आहे.

ओ. कॉ. मा. ३१ नं. ३४९६ इ. } (१३४४) सुरत–कारवार { श. १५९२ कार्तीक शु. ११ इ. १६७० आक्टो. १४

मुअझ्झम मोंगलाविरुद्ध शिवाजीला मिळाल्यामुळें, आणि शिवाजीनें आसपासच्या मुलखांत जाळपोळ करून मुलख वैराण केल्यामुळें, या प्रांतांत इतकी अंदाधुंदी माजली आहे कीं कित्येक वर्षें वसलेला व्यापार भरभराटीस येणार नाहीं. पुष्कळ वडे व्यापारी मालमत्तेसह सुरत सोडून जाण्याची गोष्ट बोलतात. सुरक्षितपणाबद्दल त्यांची खात्री झाल्यास ते मुंबईसहि येतील.

फॅ. रे. सुरत भा. ३ } (१३४५) { श. १५९२ कार्तीक शु. १४
पृ. ९६ इ. } स्वाली मरीन् कन्सल्टेशन. { इ. १६७० आक्टो. १७

सुरतेच्या संरक्षणाकरितां मास्टरबरोबर पाठविलेल्या लोकांनीं **तद्देशीय लोकांची मालमत्ता लुटून त्रास देऊं नये** म्हणून त्यांना बक्षिसाची लालूच दाखवून शांत राहण्यास सांगितलें. 'तेव्हां आतां त्यांना प्रत्येक अधिकाऱ्याला २० रु. व शिपायाला १० रु. याप्रमाणें द्यावे.

(से.) फॅ. रे. सुरत १०५ (२) } (१३४६) { श. १५९२ कार्तीक व. ८
पृ. ५४-५५ इ. } मुंबई-सुरत { इ. १६७० आक्टोबर २६

[शिवाजीचे सुभेदारानें लांकूड न दिल्यामुळें चुना झाला नाहीं. ] परंतु बांधकाम चालू राखिलें आहे.

[ **शिवाजीचें** सुरतेवरील दुसरे हल्ल्याचें धाडस वाचून फार वाईट वाटलें. परंतु बाजू वचावली हें बरें झालें. त्यानें येथेंहि **साठ सत्तर गलबतें** कांहीं बंदरांत व कांहीं बंदराचे मुखाशीं दोनतीन दिवस ठेवून आम्हांला भय दाखविलें. 'आपण मिठाच्या खरेदीकरितां आलों' या त्यांच्या म्हणण्यावर आमचा विश्वास बसेना. म्हणून सायंकाळीं ६ पासून सकाळीं ६ पर्यंत त्यांना किनारा सोडण्यास लावून शिवाय आमचेकडून आम्हीं बेटावरील बंदोबस्त अधिक वाढविला. ] **मुअझ्झम कल्याणला** लवकरच येईल. त्याचें व शिवाजीचें अलीकडे **बिघडलें आहे** असें म्हणतात. शिवाजीविरुद्ध **महाबतखानाला** नेमिलें आहे असेंहि ऐकतों. ( चौकटीच्या कंसांतील तेवढाच मजकूर **(प)** संग्रहामध्यें **ओ. कॉ. भा. ३१ नं. ३५०९** मधील उतारा म्हणून घेतला असून तो **ता. ३ नोवें. १६७० चा** असा दर्शविला आहे. )

फॅ. रे. सुरत भा. ३ } (१३४७) { श. १५९२ कार्तीक व. १०
पृ. ९८ इ. } स्वाली मरीन कन्सल्टेशन. { इ. १६७० ऑक्टो. २८

मुंबईकरांना उत्तरः—शिवाजीनें **लांकूड** आणण्यास **बंदी** केली तरी त्याचे लोकांशीं ताठपणानें न वागतां कल्याण-भिवंडीच्या सुभेदाराला सामोपचाराचें पत्र लिहावें कीं, ' आम्हीं आजपर्यंत तुमचेशीं फटकून वागलों नाहीं. शिवाजी आणि प्रेसिडेंट यांचेमध्यें **राजापूर येथील वखार** उघडण्याबद्दल आणि **कल्याणभिवंडीला** मोठा व्यापार सुरू करण्याबद्दल झालेलें बोलणें, असा विरोध करूं लागलां तर, पुरें करण्याची इच्छा आम्हांला होणार नाहीं. तरी नक्की उत्तर द्यावें. '

[से] मुंबई बेटांतील मुअझ्झमचा हस्तक **खोजा अल्लादीन** यानें उभारलेला मुसलमानांचा एक **कट** उघडकीस आल्यामुळें, मुसलमानांची एक यादी करून, त्यांनीं किंवा कोणीहि एकत्र जमूं नये असे कडक नियम केले.

ओ. कॉ. मा. ३१ } (१३४८) { श. १५९२ कार्तिक व. ११
नं. ३५०५ इ. } सुरत ( स्वाली )-मुंबई { इ. १६७० ऑक्टो. २९

**शिवाजीनें** लोकांबद्दल केलेली बंदी लवकरच उठेल असें वाटतें. म्हणून सामोपचारानें लिहा. 'शिवाजीच्या बंदरांत आपल्याला वखारी घालणें आहे. करितां त्यानें, सुरतेला पूर्वी आला होता तो **अंताजी पंडीत** किंवा दुसरा कोणी राजापूरच्या नुकसानीच्या भरपाईबद्दल बोलणें करण्यास पाठवावा.' असें शिवाजीला कळविण्यास सुचवा.

विस्तव किंवा लूट ह्यांच्या तावडींत सांपडलें नाहीं असें एकहि घर सुरतेंत नसून सुरतेचे लोक त्या गडबडींत आहेत. ( आम्हांलाहि अधिक लिहिण्यास सवड नाहीं. )

मास्टर पेपर्स, भा. १ } (१३४९) { श. १५९२ कार्तीक
पृ. १९२ नं. १० इ. } मास्टरची कामगिरी { इ. १६७० ऑक्टो. आरंभ

'**सुरतेची लूट दुसऱ्यानें करण्याकरितां शिवाजी आला.** प्रेसिडेंट व कौन्सिल स्वालीला जाऊन त्यांनीं मजबरोबर ३० लोक दिले. तेवढ्यांचे साह्याय्यानें मीं वखारीचें रक्षण केलें; त्या योगें राष्ट्राची मान्यता वाढली, व कंपनीच्या वर्षाच्या जकातीची बचत झाली. मी इंग्लंडांत परत गेल्यावर मला या कामगिरीबद्दल सुवर्णपदक देण्यांत आलें.'

फॅ. रे. सुरत भा. १०५ } (१३५०) { श. १५९२ कार्तीक
पृ. ३८ इ. } [ गॉम्ब्रून ]—सुरत { इ. १६७० [आक्टोबर]

**शिवाजी** पुनः तयार होऊन **सुरतेकडे** मोर्चा वळवून सुरतेला त्यानें इतकें भेदरवून सोडलें हें ऐकून खेद होतो. आपल्याबद्दल इतका गाजावाजा होत असतांना तो खात्रीनें हल्ला करणार नाहीं. तर खोट्या हुली उठवून शहरचे **लोक** थोडे **निर्धा-वले** म्हणजे पूर्वीप्रमाणें त्यांना तो अचानक चकवील ! ......... आपला माल **मुंबई बेटाकडे** सुरक्षिततेकरितां पाठवा.

डच रेकॉर्डस, मा. २९ } (१३५१) { श. १५९२ मार्ग. शु. २
नं. ७६३ नोवें. १४ न्यू. } सुरत. रेसि.—डच कंपनी. { इ. १६७० नोवें. ४

शिवाजीच्या मुलखांत फ्रेंचांनीं एक वखार घातली असल्यामुळें **शिवाजीनें स्वहस्तलेखानें** (by an *autograph letter*) 'आपण सुरतेवर हल्ला करणार आहों. परंतु तुमच्या रक्षणाची काळजी घेतली जाईल असें समजून स्वस्थ रहावें' असें (सुरतेच्या) **फ्रेंचांना** कळविलें होतें. नगरांत आल्यावर शिवाजीच्या शिपायांनीं त्यांच्या वखारीला गराडा दिला, व दंगा माजवला, परंतु इतर कोणताहि त्रास दिला नाहीं. व फ्रेंचां-

नींहि त्यांच्याजवळ भरपूर तयारी असतांना आणि मूल्यवान नजराणे देऊन स्वास्थ्याची हमी मिळविली असताना देखील कराराविरुद्ध, आपल्या दोन कृष्णवर्णी सेवकांना, मराठ्यांच्या हातून विनाप्रतिकार, आपल्या डोळ्यांदेखत मरूं दिलें !

इंग्रजांच्या गलबतांवर पुष्कळ श्वेतवर्णी सैनिक होते. **शिवाजीच्या** लोकांनीं इंग्रजांच्या वखारीवर हल्ला करून त्यांना टेकीस आणलें होतें. परंतु गलबतांवरून किनाऱ्यावर पाठविलेले ११० लोक व त्यांतील कर्नल यानें बाजू सांवरली. पुढें शिवाजी निघून जाण्यापूर्वी इंग्रजांची व त्याची आपसांत समजूत निघाली.

**काशरच्या राजा** शिवाजी येण्यापूर्वी थोडा वेळ जुन्या कारावानसराईच्या आश्रयाला आला होता. त्याचा सर्व विश्वास **समोरच्या फ्रेंचांवर** होता. ते मदतीला न आल्यामुळें त्याला सराई सोडून जावी लागून त्याची संपत्ति शिवाजीच्या हातीं लागली; याबद्दल फ्रेंचांना दोष देऊन त्याचा सूड उगविण्यासाठीं **बादशहा**कडे यांच्या गैरविश्वासनीयतेबद्दल त्यानें अर्ज केला आहे.

शिवाजी सुरतेंत येण्यापूर्वींच मालमत्ता आणि बायकापुलें खालीला पाठवून आम्हीं (डच) फक्त ३५ लोक घेऊन वखारींत राहिलों. परंतु शिवाजीनें आम्हांला **(डचांना)** त्रास दिलाच नाहीं. शिवाजीकडून 'तुम्हीं कोणतीहि हालचाल न केल्यास तुम्हांला त्रास होणार नाहीं. तरी तशी खात्री देण्याकरितां इसम पाठवा' असा निरोप आल्यावरून आम्हीं मनुष्य पाठविला. त्याला असें सांगण्यांत आलें कीं 'शहरांतील मुख्य व्यापाऱ्यांकडून द्रव्य उकळण्याचा उत्तम मार्ग कोणता? याचें उत्तर घेऊन उद्यां ये.' इंग्रजांकडून तशाच प्रश्नाचें उत्तर मागविलें होतें. तें त्याच दिवशीं यावयाचें होतें. परंतु दुसऱ्या दिवशीं हा इसम शिवाजीकडे जाणार तोंच **शिवाजी शहर सोडून गेल्याची** वातमी पसरली. आमचे इसमाबरोबर सुरक्षित पोंचविण्याकरितां आलेले शिवाजीचे दोन शिपाई अशा रीतीनें आमच्याकडेच राहिले! शहरांत सोडल्यास, (चिडलेल्या) लोकांनीं त्यांना ठारच केलें असतें! वखारींत ठेविल्यास, सुभेदाराच्या स्वाधीन करावें लागलें असतें. तेव्हां रात्रीं गुप्तपणें आम्हीं त्यांना नगराबाहेर सोडून दिलें आणि ते शिवाजीला जाऊन मिळाले.

या निघण्याच्या त्वरेचें कारण समजलें नाहीं. त्याला कोणाचाच विरोध झाला नाहीं व होण्याचा संभव नव्हता. त्यानें **सुरत ६ला सोडली** आणि १३ ला तो २५ मैलांवरील पेठ गांवीं ६००० घोडदळ व १०००० पायदळ घेऊन आला असून पुनः सुरतेवर येणार अशी बातमी आली लगेच सर्वत्र पळापळी होऊन शहर सामसूम झालें. **तुर्क, इंग्रज, फ्रेंच** सर्व पळाले. **डच वखारींत** तोफा व ५२ शिपायांचा बंदोबस्त करून बंदरापासून वखारीपर्यंत मिरवणूक काढली. त्या योगानें भयभीत होऊन पळालेल्या मुसलमानांवर चांगला परिणाम झाला. वारंवार खोट्या हुली उठून लोकांच्या मनोवृत्ति

संशयांत आणि गोंधळलेल्या राहतात. त्यांतून शिवाजी ३५ मैलांवरच तळ देऊन राहिल्यामुळें केव्हांहि ३।४ दिवसांत येऊन पोंचेल ही धास्ती असल्यानें व्यापार कायम बसला.

फॅ. रे. सुरत मा. ३ } (१३५२) { श. १५९२ मार्ग. शु. ३
पृ. १०० इ, } स्वाली मरीन कन्सल्टेशन. { इ. १६७० नोवें. ५

**कोशगर (Koshgur Cacer or Tartar King) चा राजा** मोंगल बादशहाचा नातेवाईक असून त्याचें बादशहावर वजन आहे. साला २०० रु. चा नजराणा दिल्यास तो बादशहापाशीं आपल्या उपयोगी पडेल.

**मास्टरच्या** मतें **सुरतेचा गोंधळ** अद्याप थांबला नसून तेथें सुभेदार आणि सरकार या उभयतांचा अभाव आहे. तेथें माल पाठवूं नये.

**१० नोवेंबरच्या सभेंत** शिवाजीच्या पुनरागमनाची भीती नाहींशी झाल्यामुळें सोनें सुरतेला पाठवावें असें ठरलें.

ओ. कॉ. भा. ३१ } (१३५३) { श. १५९२ मार्ग. शु. १०
नं. ३४८९ इ. } सुरत स्वाली-इराण { इ. १६७० नोवें. १२

[ पूर्वी येऊन गेलेली हकीकत येथें त्रोटक दिली आहे.]

ऑक्टोबरच्या पहिल्या तारखेपासून **शिवाजी** १५००० घोडदळ व पदाती घेऊन सुरतेजवळ आल्याची हूल उठली. अनुभवानें स्थानिक लोक भ्याड असल्याचें ठरल्यामुळें, राष्ट्राचें नांव व कंपनीची मालमत्ता राखण्याकरितां **मास्टरच्या** हाताखालीं कांहीं लोक सुरतेस पाठविले. कंपनीचा बहुतेक माल आधींच स्वालीला नेऊन ठेविला होता. मास्टर वखारींत शिरला असेल नसेल तोंच **शिवाजीनें** शहराच्या तटाला वेढा घातला आणि थोड्या **चकमकीनंतर** शहर ताब्यांत घेऊन लूट व जाळपोळ सुरू केली. भ्याड नगररक्षक किल्ल्यावरील तोफांच्या आश्रयाला गेले! पहिला बहुतेक सबंध दिवस शिवाजीनें इंग्रजांच्या वखारीवर गोळी चालवून कांहीं उपाय चालत नाहीं असें पाहून **जुन्या सराईत** तार्तरीचा राजा होता त्यावर हल्ला केला. तेथील लोकांनीं प्रथम जोराचा प्रतिकार केला परंतु शेजारच्या **फ्रेंचांकडून** त्यांना मदत होण्याऐवजीं उलट शिवाजीलाच दारूगोळा दिला गेल्यामुळें तार्तारांचा नाइलाज होऊन त्यांनीं रात्रीं आपल्या राजाला किल्ल्यांत नेऊन ठेविलें व सराई सोडून दिली. तेथें शिवाजीला पुष्कळ संपत्ति मिळाली. **नव्या सराईंतील** तुर्की व इराणी रक्षकांपुढें त्याची डाळ शिजली नाहीं. जुन्या सराईंतून इंग्रजांच्या वखारीवर सुरक्षितपणें हल्ला करण्याचा केलेला प्रयत्न तसाच फसल्यावर त्याचे लोकांनीं इंग्रजांशीं बोलणें लावलें. मुंबईला सख्य असून सुरतेंत वैर करणाऱ्या शिवाजीच्या विसंगत वर्तनाबद्दल मास्टर थोडें रागानें बोलल्यावर मराठा सेनापतीच्या सूचनेवरून मास्टरनें जाणता इसम शिवाजीकडे पाठविल्यामुळे शिवाजीनें **इंग्रजांना**

कौल देऊन पुढें त्रास दिला नाहीं. व समोंवारचे शहराची संथपणें अपार लूट करून मिळालें तेवढें बस आहे असें समजून अर्धे शहर जाळून शिवाजी निघून गेला. या सर्व दिवसांत मोंगलांचें सैन्य जवळ कोठेंच आलें नव्हतें. आज मितीलाहि फक्त ३०० च घोडेस्वार आले आहेत !

शिवाजीनें नगरांत प्रवेश करण्यापूर्वीच फ्रेंचांनीं त्याच्याशीं स्नेह केला याबद्दल त्यांना लोक दोष देत आहेत. **तार्तार राजा** तर फारच संतप्त होऊन सर्व नुकसानीचा दोष त्याच्यावर घालीत आहे. औरंगजेबाकडे त्याचें वजन असल्यामुळें फ्रेंचांना नुकसान पोंचेल असें म्हणतात. **डच वखार** शहराच्या गरीब भागांत व्यापाऱ्यांच्या घरांच्या मध्यें असल्यानें शत्रूशीं कांहीं चकमक झाल्याशिवाय वांचली. फ्रेंचांनीं तह केला असतां हि त्यांचे सशस्त्र लोक सज्जावर दिसले, त्यांना मराठ्यांनीं गोळ्यांनीं ठार केलें. **भ्याड फ्रेंचांनीं** प्रतिकार न केल्यामुळें त्यांची नाचक्की होत आहे.

सुरतेच्या बंदोबस्ताची अधिक व्यवस्था न होईल तर व्यापारी शहर सोडून जातील आणि सुरत ओसाड पडेल ! या मानगडीमुळें मलबार किनाऱ्याकडे जाणारीं गलबतें उशीरां सुटलीं.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. सुरत भा. १०५<br>पृ. ६ इ. | (१३५४)<br>मास्टर—प्रेसिडेंट | श. १५९२ मार्ग. व. १<br>इ. १६७० नोव्हें. १७ |

हें पत्र लिहीत असतांना **शिवाजीची** हूल उठली. दक्षिणेच्या बाजूला धूळ उडाली ती त्याच्या सैन्यामुळेंच अशी समजूत झाली. परंतु तार्तार राजाला औरंग०कडे नेण्याकरितां आलेलें **पेनायतखानाचे** सैन्यामुळें किंवा आपसांत भांडणाऱ्या वणजाऱ्यांच्यामुळें ती धूळ उडाली अशी बातमी आल्यामुळें भीती ओसरली.

पळयांना घेऊन जाणाऱ्या होड्या थांबवून 'कोणीं पळून जाऊं नये' म्हणून दंवडी पिटविली. परंतु उपयोग झाला नाहीं.

आम्हीं झटून रक्षण करूं. **शिवाजीनें** आपण होऊन बोलणें केल्याशिवाय आम्हींहि बोलणार नाहीं.

तार्तार राजा कालच्या हुलीमुळें पाण्यांतून (होडींतून) 'राण्याले'स (?) गेला.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. सुरत भा. १०५<br>पृ. ७२ इ. | (१३५५)<br>मुंबई—सुरत | श. १५९२ मार्ग. व. १<br>इ. १६७० नोव्हें. १७ |

आम्हांला अशी खात्रीलायक बातमी आहे कीं, येथून ५१ मैलांवर **नागांवला,** वेढा व हल्ला करण्याला लागणारें सर्व सामान, निदान ४० दिवसांची रसद, खोरीं, टिकावें इत्यादि खणण्याचीं हत्यारें, व एका क्षणाची सूचना देतांच निघावयास तयार असणारे ३००० लोक इत्यादि साधनांनीं जय्यत तयार असलेलें **मोठें आरमार** शिवाजीनें

सज्ज केलें आहे. तो कोठें जाणार हें नक्की माहीत नसल्यामुळें आम्हांला त्याच्या पाळतीवर राहिलें पाहिजे. त्याचा एक ब्राह्मण हस्तक ७८ जांगांचें नांव घेऊन कांहीं जोखमीची कामगिरी आहे असें सांगतो. तो मुंबईचेंहि एक नांव घेतो. तो येथें कांहीं चाटाल्ये घेऊन जाण्याकरितां आला आहे. तो फक्त २ च तास बेटावर होता.

सं. २० ले. १२९ } (१३५६) { श. १५९२ मार्ग. व. ३
सु. १०७१ रजब १५ } मिसेली मु. मज. व सी. { इ. १६७० नोवें. १९

अज दिवा. पर. वाई— ता मोक. मौ. पसर्णी, एकसर, बोझर्डे

नारायणभट बिन गोपिनाथभट चित्राव यांची वरील गांवीं १ चावर ३२ बिघे जमीन पूर्वीप्रमाणें त्यांचकडे चालू ठेवणें. (मु. श्री गिरमाजी गणेश पंडित. वाटोला शिक्का.)

ओ फॉ. मा. ३१ } (१३५७) { श. १५९२ मार्ग. व. ४
नं. ३५१५ इ. } सुरत (स्वाली)—कंपनी. { इ. १६७० नोवें. २०

[ मागील लेखांकांत आलेली हकीकत त्रोटक दिली आहे.]

**ऑक्टोबरच्या पहिल्या दुसऱ्या** तारखेला शिवाजीची हूल उठली तेव्हां त्याच्या १५००० घोडदळाला व पायदळाला तोंड देण्याला शहरांत पुरते ३०० लोकहि नव्हते ! **मुअझ्झमचें** बंड आणि **शिवाजीचा** हल्ला दोन्ही आपत्तींकडे लक्ष देऊन आम्हीं बांधलेला सर्वच माल स्वालीला नेला होता. सुटा माल सुरतेंत होता त्याचा बंदोबस्त करण्याकरितां मास्टरला पाठविलें. मास्टर **२ ऑक्टोबर** रोजीं रात्रीं सुरतेकडे चालत गेला. त्यांना वेळ पडल्यास पळून येतां यावें म्हणून बंदरांत एक गलबत तयार ठेविलें होतें. **३ ऑक्टोबरला** शिवाजीचें सैन्य आलें.......**पहिल्याच दिवशीं** तार्तारांच्या जुन्या सराईवर व इंग्रजांच्या वखारीवर हल्ला झाला.......जुनी सराई सोडून तार्तार लोक गेल्यावर **शिवाजीला** तेथें सोनें, रुपें, मूल्यवान् पदकें, सोन्याचा पलंग वगैरे मिळालें.......तेथून इंग्रजांवर हल्ला; [मास्टरशीं बोलणें......] अखेरीला **किल्ल्यावर हल्ला** करण्याचा **आव** आणून तशी तयारी नसल्यामुळें ते परत फिरले. तहाचें मध्यंतरींचें बोलणें फुकट जाऊन **तिसऱ्या दिवशीं** पुनः शिवाजीचे लोक आले. परंतु मास्टरचा निश्चय पाहून त्याच्या हवालदारानें मास्टरकडे आपला मनुष्य पाठविला. त्यानें असें सांगितलें कीं 'शिवाजी, तुम्हीं लोक मारल्यामुळें चिडून गेला आहे. तरी हलकासा नजराणा घेऊन तुम्हीं कोणाला तरी पाठवावें.' मास्टरनेंहि मालमत्ता व इतक्यांचें जीवित वाचविण्याला ही थोडी किंमत आहे असें पाहून नजराण्याची तयारी चालविली. आलेला व्यापारी राजापूरचा असल्यामुळें त्यानें इंग्रज राजापूरला पूर्वीप्रमाणें व्यापार कां करीत नाहींत ? असें विचारलें. मास्टरनें राजापूरच्या लुटीचें व भरपाईच्या दिरंगाईचें कारण सांगितल्यावर इंग्रजांनीं यावें अशी शिवाजीची फार इच्छा असल्याचें त्यानें सांगितलें. पुढें दोन

माणसें नजराणा घेऊन गेलीं त्यांचें गोडीनें स्वागत करून 'आपण व इंग्रज मित्र आहोंत.' असें तो म्हणाला. आणि त्यांच्या हातांत हात घालून 'माझा हात हाच कौलापेक्षां ज्यास्त आहे' असें त्यानें सांगितलें. हे आपले शब्द खरे करण्याकरितां नोकर वखारींत परत येण्यापूर्वीच शिवाजी निघून गेल्याचें समजलें. कोणीहि शत्रु जवळ नसतांना केवळ झालें तितकें पुरे असें समजून तो गेला. जातांना मुख्य अधिकारी आणि प्रमुख व्यापाऱ्यांकडे **पत्र** पाठवून '**दरसाल** १२ लाख रुपये न घाल तर पुनः पुढच्या वर्षी येऊन राहिलेला शहराचा भाग जाळून टाकीन' असें त्यानें कळविलें. शिवाजी निघून जातांच **गरीब** लोकांनी **लूट** करण्यास सुरवात केली.......स्वालीलाहि शाबंदर, काजी व मोठे व्यापारी येऊन राहिल्यामुळें शिवाजीची भीती कमी नव्हती. परंतु मोठी भरती असून उतारा- करितां बोटी न मिळाल्यामुळें नदीच्या पलीकडे शिवाजीचें सैन्य येऊं शकलें नाहीं. [विलायतेंत पाठवावयाचीं गलबतें शिवाजीच्या या लुटीमुळें वेळेवर पाठवितां आलीं नाहींत असें या पत्रांत व पुढें ता. ६ डिसेंबर ( स्वाली कन्सल्टेशन ) व १९ डिसेंबर (सुरत-कंपनी) वगैरे प संग्रहांतील पत्रांत उल्लेख आहेत. ]

[दि.] अहमदाबादचा सुभेदार महाबतखान ३०० सैन्य घेऊन आला. सुमारें १० हजारांचा नजराणा घेऊन **फ्रेंचांच्या राजाकरितां** म्हणून महाबतखानानें एक हिरेजडीत मुठीचा खंजीर व नऊ **शिरपाव** अशीं 'वस्त्रें' दिलीं. या देशच्या रिवाजाप्रमाणें **शिरपाव हे फक्त राजे किंवा मोठे उमराव यांनीं कमी दर्जाच्या लोकांना द्यावयाचे असतात !**......[लुटीची हकीकत]...प्रथम **शिवाजी** निघून गेला हें खरेंच वाटेना. कित्येक वेळां हुलीं उठल्या. **आतां साधारण शांतता आहे.**

फॅ. रे. सुरत भा. १०५ पृ. ७८ इ. — (१३५८) मुंबई—सुरत. — श. १५९२ मार्ग. व. ५ इ. १६७० नोवें. २१

मीं पाठविलेल्या हेरानें शिवाजीचे आरमारांत १६० छोटीं गलबतें स्वतः मोजलीं. त्याचा सेनापती **चंटाजी सारंगी** ( याला सामान्यतः **दर्यासारंग** म्हणतात ) आहे. *तो इसम खरा आणि चांगला असल्याचें गेल्या ७८ वर्षांच्या अनुभवानें माहीत असल्या*मुळें त्याला मित्रत्वाचें पत्र लिहिलें. त्याचीं तीन गलबतें मीठ भरण्याकरितां येथें आलीं आहेत. 'तीं भरण्यास शक्य ती मदत करीन' असें आश्वासन देऊन 'हें आरमार कोठें जाणार' असें विचारलें. 'विश्वासू मनुष्य आल्यास तोंडी सांगेन' असें त्यानें कळविल्यावरून मोदीच्या मुलाला पाठविलें. *त्याच्याकडून शपथ घेववून* '**ब्राह्मणांनीं** २९ व्या तारखेस **सुरतेचा किल्ला** शिवाजीच्या हातीं येईल असें **भविष्य** वर्तविल्यामुळें, तो घेऊन पुढें **भडोचकडे** जाण्यासाठीं १० हजार घोडदळ, २० हजार पायदळ यांसह शिवाजी तिकडे जात आहे. मा ३००० शिपाई घेऊन त्याला समुद्र मार्गानें जाऊन मिळणार' असें

त्यानें सांगितलें. 'क्रिश्चन आडवे न येतील तर शिवाजी त्यांच्या वाटेस जाणार नाहीं, असेंहि तो म्हणाला.

फॅ. रे. सुरत मा. ३ पृ. ११० इ. (१३५९) स्वाली मरीन कन्सल्टेशन श. १५९२ मार्ग व. ६ इ. १६७० नोव्हें. २२

देशावरील वखारींतून किनाऱ्यावर पाठवावयाचा माल पूर्वीप्रमाणें अर्ध्या किंमतीचाच विमा न उतरतां भरकिंमतीचा विमा उतरून पाठवावा असें ठरलें. कारण सरदारांमध्यें मतभेद आणि दुही असून रजपुतांकडून (शिपाई) वारंवार दरोडे पडतात.

फॅ. रे. सुरत मा. ३, पृ. ११२ इ. (१३६०) स्वाली मरीन कन्सल्टेशन श. १५९२ मार्ग. व. ८ इ. १६७० नोव्हें. २४

शिवाजीच्या १६० गलबतांच्या आरमाराबद्दलची माहिती मुंबईहून आली. मुंबईच्या रक्षणाबद्दल काळजी घेणें योग्य असल्यामुळें २०० मण दारू पाठवून त्यांना जरूर तेवढे सैनिक नवीन ठेविण्यास परवानगी द्यावी.. त्यांचे सुरतेला आलेले लोक सुरतेलाच जरूर असल्यामुळें पाठवूं नयेत.

फॅ. रे. सुरत मा. १०५ पृ. ८०-८१ इ. (१३६१) सुरत-स्वाली मरीन श. १५९२ मार्ग. व. ११ इ. १६७० नोव्हें. २८

शिवाजी एवढें मोठें सैन्य घेऊन समुद्रांतून येईल तर तीनहि युरपियन राष्ट्रांनीं एकी व स्नेहाचा तह करून विरोध करावा. स्वालीकडे त्याला प्रवेश मिळूं देऊं नये. कारण स्वाली हें सर्वस्वी ख्रिश्चनांचें आहे; अशी प्रसिद्धि असल्यामुळें तें त्याच्या हातीं जाऊं देण्यानें आपली अब्रू जाईल. जर त्यानें आम्हांला चुकवून प्रवेश केला तर तुम्हीं त्याचे गलबतांवर तेथें बदला घ्यावा. + + + +

जलमार्गानें व खुष्कीनें उभय बाजूंनीं शिवाजी येत आहे अशी दाट बातमी आहे. ...पूर्वीप्रमाणेंच बंदराचें रक्षण करून शत्रूंचा नाश करण्याची कामगिरी सुभेदार आम्हांला सांगेल असें वाटतें.

फॅ. रे. सुरत मा. १०५ पृ. ८६ इ. (१३६२) मुंबई—सुरत श. १५९२ मार्ग. व. ११ इ. १६७० नोव्हें. २८

गुरुवारीं सकाळीं शिवाजीचें आरमार तळ जवळील नागांवपासून उत्तरेकडे निघालें. शुक्रवारीं मुंबईवरून व शनिवारीं माहीमवरून गेलें. यावरून सामान्य माहितीप्रमाणें सुरतेलाच चाललें असें वाटलें. परंतु शनिवारीं सकाळीं ८ वाजतां पुष्कळ वल्हीं असलेलीं २ छोटीं गलबतें, आरमार परत फिरविण्याकरितां गेलीं. शिवाजी स्वतः ३ दिवसांचे मुक्कामावर जाऊन परत फिरला. कारण काय तें समजलें नाहीं.

फॅ. रे. सुरत मा. ३ } (१३६३) { श. १५९२ मार्ग. व. १२
पृ. १११ इ. } स्वाली मरीन कन्सल्टेशन. { इ. १६७० नोव्हें २९

शिवाजीच्या जंगी तयारीमुळें **मुंबईला धोका** असल्याबद्दल मुंबईहून पुनः पत्र आल्यामुळें दारूगोळा घेऊन गलबत पाठवावें. **शिवाजीचीं** कांहीं गलबतें **मुंबई बंदरांत नांगरावयाचीं** आहेत अशी बातमी असल्यामुळें आणि मलबारी लोकांनीं मच्छमारी बोटी धरून नेल्या या उर्मटपणाचा बंदोबस्त करणें जरूर असल्यामुळें मुंबईत व्यवस्था ठेवणें आवश्यक आहे.

फॅ. रे. सुरत मा. १०५ } (१३६४) { श. १५९२ मार्ग. व. १२
पृ. ८१ इ. } सुरत-स्वाली मरीन { इ. १६८० नोव्हें. २९ (?)

**शिवाजीचें सैन्य** येत आहे अशी बातमी **फत्तेखानाच्या** एका माणसानें आणिली. तो म्हणतो 'शिवाजी **पेठेहून** येत होता. आतां तो चिखलीला असेल. उद्यां येथें **(सुरतेस)** येईल....

फॅ. रे. सुरत मा. ३ } (१३६५) { श. १५९२ मार्ग. व. १२
पृ. ११३ इ. } स्वाली मरीन कन्सल्टेशन { इ. १६७० नोव्हें. २९

सुरत दुसऱ्यानें लुटण्याकरितां **शिवाजीनें** जमिनीवर आणि पाण्यावर एवढी मोठी तयारी केल्याची विश्वसनीय बातमी ऐकून स्वाली, होल व मरीन येथील मालमत्तेचें रक्षण करण्याकरितां, **फ्रेंच** व **डच** यांनीं सुचविल्याप्रमाणें त्यांच्या जोडीला एक गलबत **स्वालीचें** प्रवेशद्वार संभाळण्याकरितां पाठवावें व स्वालीला एक भिंत बांधावी. प्रतापशाली सैन्य घेऊन **शिवाजी** सुरतेजवळ आल्याची मास्टरनें बातमी दिली.

फॅ. रे. सुरत मा. १०५ } (१३६६) { श. १५९२ मार्ग. व. १३
पृ. ८१ (द्वि. सं.) इ. } मास्टर (सुरत)-प्रेसिडेंट (स्वाली) { इ. १६७० नोव्हें, ३०

धोक्याचे वेळीं **शिवाजी**पासून स्वालीचें रक्षण करण्याचे कामीं डच, व इंग्रज यांनीं एकी व प्रत्येकानें आपल्या सामर्थ्यानुसार उचलावयाचा भाग. इंग्रज आपल्या वखारींत तेथेंच राहून रक्षण करितील तर डचहि करितील. मास्टरनें डचांना २ तोफा व एक पिस्तुल आणि बाणांचें भाते, धनुर्ष्ये इत्यादि पुरविलीं.

फॅ. रे. सुरत मा. १०५ } (१३६७) { श. १५९२ पौष शु. ४
पृ. ९२ (द्वि. सं.) इ. } मुंबई-सुरत { इ. १६७० डिसें. ६

मुंबईच **शिवाजीचें** उद्दिष्ट असण्याचा संभव लक्षांत घेऊन **त्या व्यापार-शत्रू** ( Generall enemy of trade ) पासून बचाव होण्याची खबरदारी घेतली. परंतु परत बोलावणें पाठवूनहि त्याचें आरमार परत न आल्यामुळें तो **सुरतेवरच** गेला असें वाटलें.

सा. ले. ३५९ } (१३६८) { श. १५९२ पौष शु. १३
सु. १०७१ साबान ११ } कौलनामा मु. व सी. { इ. १६७० डिसें. १४

दादाजी व मेलगिरी पंडित हवाल० व मुजुम० सिदगौडा भूपति व सिदगौडा, लिंगौडा देसाई व पटेल व रामाजी आपाजी देसकु० पेठ अथणी

ता सेटी व समस्त माहाजन.

तुम्हासी व जैनासी कळसाचे कुसूर आला म्हणून दोघे जणासी कार्तासी पाठविले. तुम्हासी जयपत्र आलें कीं, जैनासी कळस करावया संबंध नाहीं. बडे साहेबीणींचेंहि तसेंच पत्र घेऊन आला. असें असतां जैनानीं नवी जिकीर केली पण अपराध कबूल केला व पुढें निवाड-पत्राप्रमाणें वागू म्हणून सांगितलें.

फॅ. रे. सुरत मा. १०५ } (१३६९) { श. १५९२ पौष व. १
पृ. ९६ इ. } मुंबई-सुरत { इ. १६७० डिसें. १७

**शिवाजी** आणि त्याला असा धिंगाणा घालूं देणारा **औरंगजेब** यांचें झालें, तरी काय, हें आपल्याकडून समजलें तर पाहिजे आहे. शिवाजीच्या **आरमारा**पैकीं **पोर्तुगीजां**नीं १२ गलबतें पकडलीं. तीं **वसई**ला ठेवून इतरांचा ते पाठलाग करीत आहेत. शिवाजी **दमण**वरून गेला तेव्हां त्यानें तेथें बांधलेलें १२००० रु. किंमतीचें मोठें गलबत सुरतेला जात असतांना पकडलें गेलें. यामुळें थोडी चकमक झाली...... आतां शिवाजीचें राहिलेलें आरमार **दाभोळला** आल्याची खात्रीलायक बातमी कळली.

फॅ. रे. सुरत मा. १०५ } (१३७०) { श. १५९२ पौष व. ३
पृ. ९० इ. } मास्टर, सुरत-स्वाली { इ. १६७० डिसें. १९

आजची बातमी अशी आहे कीं, **शिवाजी बऱ्हाणपुरा**वरून गेला. बादशाही खजिन्यांतील ३ लाख रुपये मिळाल्यामुळें **जसवंतसिंगानें** शिवाजीला शहरांत येण्यास बंदी केली म्हणून शिवाजी **कारिंजा**कडे वळला. कारंजा सधन आहे तें त्यानें *लुटलें व तेथील सर्व थोर लोकांना धरून नेलें. एक बराच मोठा इसम मात्र वेषांतर* करून पळून गेला. जातांना **शिवाजीनें** नंदुरबादचे व आसपासचे सर्वांकडून **वसुलाची चौथाई** आपल्याला भरण्याबद्दल लिहून घेतलें आहे.

फॅ. रे. सुरत मा. १०५ } (१३७१) { श. १५९२ पौष व. ४
पृ. १५० इ. } { इ. १६७० डिसें. २०

मोंगलांच्या दरबारचा गोलंदाज जॉन ट्रॅटर—सुरतेचा प्रेसिडेंट

येथील राजदरबारांतील वित्तबातमी एक बादशहा, दुसरा मुअज्झम आणि तिसरा शिवाजी यांशिवाय कोणाचीच नाहीं. परंतु शहाणे शहाणे राजे, व उमराव यांचें असें

मत आहे कीं, मुअज्झम शिवाय दुसरा कोणी लायक वारस नसल्यामुळें बादशहा त्यालाच गादीवर बसविणार आहे. शहाजादा दिलेलखानाचर चालून गेल्यावर आम्ही वऱ्हाणपुरास आलों. सर्व लष्करला एक महिन्याचा पगार देण्याचा शहाजाद्यानें हुकूम दिला. पण त्याच दिवशीं औरंगाबादेस परत फिरण्याचा बादशाही हुकूम आला तो त्यानें मानिला. त्या वेळीं बादशहाजवळ लष्कर पुरेसें नसल्यामुळें मुअज्झम परत गेल्याचें पाहून त्याला बरें वाटलें. नाहींतर मुअज्झम आज हिंदुस्थानचा सिंहासनाधीश झाला असता. भावी वारसा निश्चित झाला तथापि मुअज्झम राज्यारोहणार्थ उतावीळ झाला आहे. मात्र उघडपणें बंड न करितां शिवाजीशीं युद्ध चालू ठेवून त्याकरितां दक्षिणेकडे सैन्य न्यावें आणि उत्तरेस धाकट्या भावाच्या हातांशीं फार सैन्य राहूं देऊं नये अशी व्यवस्था तो करीत आहे.

६ महिन्यांपूर्वी शिवाजी व मुअज्झम यांचें परस्पर संबंधांविषयीं आणि राजपुत्रावर उठविलेल्या कुभांडाविषयीं चौकशी करण्याकरितां पाठविलेला खानसामा उभय बाजूंना लावालात्री करितो. 'दिलेरखान तुझा शत्रू आहे' असें मुअज्झमला सांगतो; तर उलटपक्षीं दिलेरखानाला जाऊन सांगतो कीं, 'तूं औरंगाबादेला येशील तर राजपुत्र तुला धरणार आहे.' यामुळें उभयतांत वैमनस्य माजलें आहे. खानसामा आग्ऱ्याला गेल्यावर राजपुत्र आणि दिलेरखान या दोघांच्या पत्रांवरून खानसामाचा नीचपणा उघडकीस आला. बादशहा त्याचा शिरच्छेदच करणार होता. परतु बड्या बेगमेच्या रदबदलीमुळें शेवटीं त्याला काबूलला पाठविण्यांत आलें.... शिवाजीनें वऱ्हाडचें मुख्य शहर कारंजा लुटलें. तेथून उत्तम कापड, सोनें, रुपें इत्यादि १ कोटीचा माल त्यानें ४००० बैल व गाढवें लादून नेला. इतरत्रहि पुष्कळ लूट केली. सर्वांत जास्त लुट त्यानें राजपुत्राच्या जहागिरींत केली. महाबतखान २० दिवसांत येईल व त्या वेळीं सर्व खरे प्रकार उघडकीस येतील.

| | | |
|---|---|---|
| खं. १५ ले. १२६<br>सु. १०७१ साबान २१ | (१३७२)<br>मिसिली मु. व सी. | श. १५९२ पौष व. ८<br>इ. १६७० डिसें. २४ |

अज. दि. पर. वाई—मौक मौ. निंब व गोवें.

मोहनगिरी मुरीद आनंदगिरी यांस नींब व गोवे येथें १ चावर जमीन इनाम आहे. २७ जबरचे खुर्दखत आहे. तरी ते इनाम चालविणें. ( श्री, तिमाजी गणेश पंडित.) (वा. शि.)

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. सुरत भा. १०५<br>पृ. १०० इ. | (१३७३)<br>सुरत, मास्टर-रसाली, प्रेसिडेंट. | श. १५९२ माघ शु. ३<br>इ. १६७१ जाने. ३ |

शिवाजी येथें आल्यावेळीं तिन्ही ख्रिश्चन राष्ट्रांनीं शिवाजीशीं संगनमत

केलें होतें की काय हा एक शहरांत आणि दरबारांत चर्चेचा विषय होऊन बसला आहे. त्यांपैकीं कोण या दोषास पात्र आहे अशाबद्दल तपास करावा म्हणून बादशहाकडून सुभेदारास हुकूम आला आहे.

ओ. कॉ. मा. ३१ } (१३७४) { श. १५९२ माघ शु. ९
नं. ३५३८ इ. } सुरत (स्वाली)-कंपनी { इ. १६७१ जाने. ९

शिवाजी व मोंगल सशस्त्र रणांगणांत उतरले असल्यामुळें, व शिवाजीचें मोठें सैन्य जवळपास असल्यामुळें, आमचे येथील (मुंबईची) तटबंदी शक्य तितक्या त्वरेनें केल्यानें केवळ आमच्याच रक्षणाची काळजी दूर होणार आहे असें नसून, किनाऱ्यावरील मुद्दाच्या त्रासाला कंटाळून आमच्या आश्रयास येतील त्यांचीहि सोय होणार आहे.

'[दि. व इं. फॅ. मा. १३ पृ. ८५ टीप ]-भीमजी पारख या नांवाच्या कंपनीच्या दलालानें कांहीं ब्राह्मणी लिखाण छापण्याकरितां इंग्लंडांतून एक छापणारा बोलावून त्याचा पगार देण्याचें कबूल केलें. (तीन वर्षांनीं ही मागणी पुरविण्यांत आली!)'

सात तारखेला जेराल्ड ऑंजिअर मुंबईला जाण्याकरितां निघाला असतां शहरचा सुभेदार व शहाबंदर या उभयतांनीं मुद्दाम निरोप पाठवून जाऊं नका असें कळविलें. वकिलाला गतसालीं आम्हीं नजराणा न दिल्यामुळें त्यानें बादशहाला असें सुचविलें कीं, इंग्रजांचें व शिवाजीचें सुरत जाळण्यांत संगनमत होतें; यामुळें शिवाजीचे मुलखाला नजीक असलेल्या मुंबई बेटाकडे जाण्यानें या खोटया बातमीला बळकटी येईल च बादशहा आम्हांला दिलेल्या सवलती काढून घेईल असेंहि त्यानें सुचविलें. यामुळें मुंबईला जाण्याचा बेत रहित केला.

शिवाजीचें सैन्य सुरतेपासून ४० मैलांवर आल्याची बातमी आली असून शहरांत भीती पसरली आहे.

ओ. कॉ. मा. ३१ } (१३७५) { श. १५९२ माघ शु. १४
नं. ३५४२ इ. } मुंबई-सुरत. { इ. १६७१ जाने. १४

प्रेसिडेंट व कौन्सिल मुंबईस येणार होते व त्यानंतर तेथील एकंदर वृत्तांत कंपनीला कळवावयाचा होता. परंतु शिवाजीनें अलीकडे (आवघे.) सुरतेला त्रास दिल्यामुळें तो बेत रद्द होऊन वचन दिल्याप्रमाणें हकीकत देतां येत नाहीं.

[दि]- सैन्याची हजेरी पाठविली आहे. त्यांत थोडे इंग्रज असून बाकीचे लोक हिंदी शत्रूशीं लढण्यास समर्थ असले तरी युरोपिअनांबरोबर लढतांना त्यांच्यावर विसंबतां येणार नाहीं असें वाटतें.

शि. घ. ले. ६२ }
सु. १०७१ रम १५ } (१३७६) तगादा फा. मु. व सी. { श. १५९२ माघ व. २ { इ. १६७१ जाने. १७

अज माहाल देसमुख पर० कऱ्हाड व सरदेसमू०– ता मोक० ता मसूर.

गारवडे, आइतवडे वगैरे गावी गिजरे यांस जो धर्मादाऊ इनाम आहे त्याचा पैका पाठविजे. मखुममाई अफराद पाठविला आहे.

ओ. कॉ. भा. ३१ }
नं. २५४७ इ. } (१३७७) सुरत–कंपनी { श. १५९२ माघ व. १३ { इ. १६७१ जाने. २८

**शिवाजीच्या नांवाचा दरारा अद्याप सुरतेंत भासतो.** दख्खनमध्यें त्यानें मुलूख उध्वस्त केला असून त्याचे सैन्य वेगानें इतस्ततः अप्रतिहत संचार करीत असते. त्याची येथें नेहमीं भीती वाटत असल्यामुळें आत्मसरक्षणार्थ खर्च आणि मेहनत करावी लागते!...परंतु बादशहाचा शिवाजीवर पाठविलेला **सेनापति महाबतखान** मोठें सैन्य घेऊन बऱ्हाणपूरपर्यंत आला असून लवकरच शिवाजीला पायबंद बसेल आणि आपला व्यापार सुरळीत चालेल.

सुरतेला **शिवाजीच्या सैन्याची** भीति पुढेंहि पुष्कळ दिवस वाटत होती. असे उल्लेख (१) ओ. कॉ. मा. ३२ नं. ३५६६; तारीख **१६७१ एप्रील** ७; सुरत–कंपनी (२) फॅ. रे. सुरत मा. १०५ पृ. १७३; **१६७१ जुलै १५**; जेम्स-प्रेसि०

फॅ. रे. सुरत भा. १०५ }
पृ. ११४ इ. } (१३७८) मुंबई–सुरत. { श. १५९२ फा शु. ८ { इ. १६७१ फेब्रु. ६

**महाबतखान** ४० हजार घोडेस्वार घेऊन औरंगाबादला आला. त्यानें राजा **जसवंतसिंगाला** बऱ्हाणपुराहून परत फिरविलें. तो तिकडे पैसे उभारावे नाहींतर बऱ्हाणपूर लुटावें अशा उद्देशानें गेला होता. त्यानें दाउदखानाचा मुलगा तेथें सुभेदार होता त्याजवळ ५ लाख रु. मागितले. 'औरंगजेबाचा हुकूम आणा व २० लाखहि घेऊन जा! परंतु त्याशिवाय एक पैसा मिळणार नाहीं' असा जबाब देऊन लगेच त्यानें आपल्या बापाला लिहिलें. **दाऊदखान** जवळच साल्हेरीला होता तो मुलाचे मदतीस निघाला. तेवढ्यांत शिवाजीनें **साल्हेर** घेतला. शिवाजी अजून **राजगडला** परत आलेला नाहीं. दाऊदखान १२००० फौज घेऊन **जुन्नरला** आला. करीम बेग **कल्याणचा** सुभेदार होणार. दिलेरखान व महमद अमीन (मीर जुमल्याचा मुलगा) यावयास निघाले. **मुअज्झम** अजून **महाबतखानाला** भेटला नाहीं. त्याचा खानावर विश्वास नाहीं. थोड्याच दिवसांत काय तें स्वरूप दिसेल.

लेटर बुक भाग ४ }
पृ. ४२६ इ. } (१३७९) कंपनी–सुरत. { श. १५९२ फा व. ८ { इ. १६७१ फेब्रु. २२

इतर हिंदी राजांप्रमाणेंच **शिवाजीशीं आतां तो प्रबळ झाल्यामुळें**

सलोख्याचे संबंध राखावे. मुंबईचे लोकांनीं स्नेह-संबंध ठेवावा. सुरतेहून पत्रव्यवहार ठेविल्यास (मोंगलांच्या) शत्रूंशीं संबंध ठेविल्याचा आरोप येऊन त्रास होईल ! सुरतेला सामर्थ्याच्या बाहेर त्रास होऊं लागेल तर सर्वच मालमत्ता मुंबईला उचलून न्या.

सं. ८ ले. २० } (१३८०) { श. १५९२
सु. १०७१ } { इ. १६७०

अज र० रा० जिजाआऊ साहेब

ता नारो त्रिमळ हुदे० व मोक० व रया० मौ० किवाड तर्फ खेडबारे

मौ० किवाड येथे हरी गोविंद यास १ चावर जमीन इनाम आहे. मधे मोगलाई सुटला होता. तरी तो पूर्वीप्रमाणें निळो सोनदेऊ याचे हवाली करून चालविणे.

शि. च. ले. ६३ } (१३८१) { श. १५९२
सु. १०७१ } खुर्दखत { इ. १६७०

अजर० सेदतसादात वलद सेदुल्लतीफ मोकाशी मौ० कोणेगाव पर० कऱ्हाड.

ता हुदे० व मोक० मौ० कोणेगाव

आपदेव बिन कृष्णभट सेकिन कोणेगाव याची कोणेगाव येथील नीम चावर जमीन पूर्वीप्रमाणें त्यांजकडे चालविणें. हाली साहेबासी मोकासा मिळाला आहे.

कौ. इ. सा. ले. ५५ } (१३८२) { श. १५९२ ?
{ इ. १६७०

चिटणीस ( कुडाळ देशकर ब्राह्मणसरदेसाई ) यांची वंशावळ.

सा. ले. ५० } (१३८३) {
?

वेकाजी बायदेऊ— महादाजीपंत गोसावी

३ वर्षे सात महिने झाले सिवाजी राजया करितां एक महिना रसदे पडला. हवालदारानें धांडोरा पिटिला. बकालपैकीं घाटाखालीं जाईल तो गुन्हेगार तेव्हां महिना पुचिला. तो कोण देईल वगैरे मजकूर.

सा. ले. ६१ } (१३८४) {
?

निळो सोनदेऊ— महादाजीपंत स्वामी गोसावी

आपल्या म्हणण्याप्रमाणें आम्ही इतके दिवस येथें होतो. आतां कांहीं कार्यनिमित्य आपल्या गांवास जातो. वगैरे.

निकोलस, पृ. ६१ } (१३८५) { श. १५९२
इ. } { इ. १६७०

अमरसिं(सिं)ग नांवाच्या हिंदू राजाचें बरेंच मोठें सैन्य आसाममधून निघून, **मोंगलांचें सैन्य शिवाजीवर** चालून जाणार होतें, त्याला मिळण्याकरितां दिल्लीआग्याच्या रोखानें चाललें होतें!

सा. ले. ३६० } (१३८६) { श. १५९३ चैत्र शु. ३
श. जिल्काद १ } क्रयपत्र { इ. १६७१ मार्च ३

शेखमाई बिन सैदमाई कोरबलें कस. अथणी
सिवाप्पा मुचडी कसबे अथणी
आम्ही आपलें घर तुम्हास दहा होनास विकत दिलें आहे.

राम. अं. ६५ ले. १५ } (१३८७) { श. १५९३ चैत्र शु. ११
सु. १०७१ जिल्काद ९ } फा. मु. व सी. { इ. १६७१ मार्च ११

अजर. त्रिंबकजी राजे [भोसले] — कारकून पा। आकोट

विश्वनाथभट येल्लूरकर याची साल ग्याची वरात फिरवून लावली. तर असें न करतां पैके देणें.

खं. ८ ले. १९ } (१३८८) { श. १५९३ चैत व. २
सु. १०७१ जिल्काद १५ } { इ. १६७१ मार्च १७

तह बाबाजी सावंत याणें तरतूद करून, चिंतामणीस व कुणबिणीस दिवाळ कोट पारखा करवून, कोटास दिवाळा व पारखा करवून, देववावा. येणेंप्रमाणें पारखा कोट करून आपणास कोट घेऊन द्या. म्हणजे सरंजाम करून येणेंप्रमाणे चालवावेः--

बाबाजी सावंत यास पाचशा घोडियाचे जितरब द्यावें.

चिंतामणीस दिवाळ व कुणमणीस दिवाळ यास इनाम अर्धा कोटांतील द्यावा व पर्चा गांव चालवावे.

येणेंप्रमाणें चालवावें. ऐसा तह केला असे. मोर्तब सूद. (मर्यादेयं विराजते)

(से.) फॅ. रे. सुरत भा. १०५ } (१३८९) { श. १५९३ अ. वै. ९
पृ. १६४ इ. } मुंबई-सुरत { इ. १६७१ एप्रील ७

डेप्युटी गव्ह. नें पूर्वी सांगितलेल्या २ तोफा एका फ्रेंच माणसाला विकल्या. त्यानें ठाण्याच्या एका व्यापाऱ्याला विकल्या. त्यानें त्या **शिवाजीकडे** पाठविल्या असें आम्हीं ऐकितों. [मुळांत हें पत्र इ. १६७३ मध्यें लागलें असून तें येथें १६७१ पैकीं घ्यावें; असें डॉ. सेन यांचें मत आहे.]

[ दि. ओ. कॉ. नं. ३५६६ ]—मोगल बादशहाचा स्वतःचा मुलगा आणि राज्यांतील मोठे उमराव यांना शिवाजीच्या बंडाला पाठिंबा आहे... ... ... ...

फॅ. रे. सुरत, मा. १०५ } (१३९०) {श. १५९३ अ. वैशा. शु. १०
पृ. १६६ (द्वि. सं.) इ. } मुंबई-सुरत {इ. १६७१ एप्रील ८

एवढें मोठें सैन्य शिवाजीविरुद्ध येत आहे, ह्याबद्दल आम्हांला आनंद वाटतो. मोहबतखान नासीक-त्रिंबकपर्यंत आला आणि हातगड ( Huturnt? ), साल्हेर इत्यादि ४ किल्ले त्यानें घेतले.

डाग रजि. १६७१ } (१३९१) {श. १५९३ बैशाख शु. ३
पृ. ३१८ इ. मे ११ न्यू. } {इ. १६७१ मे १

दरोडेखोर शिवाजी हा सुरतेस यथेच्छ चरत आहे. यामुळें ( डच ) कंपनीचा व्यापार बंद पडला आहे.

सं. ८ ले. २८ } (१३९२) {श. १५९३ वैशाख शु. १५
सु. १०७४ सफर १२ } श्रीभवानी शंकर {इ. १६७१ मे १३

रा. शिवाजी राजे—म. अ. जुमलेदारानी व हवालदारानी व कारकून दिमत पायगो मुकाम मौ. हलवर्ण ता चिपळूण मामले दाभोळ प्रतिः—कसबे चिपळुणी साहेबी लष्कराची विले केली आणि या उपरि घाटावरि कटक जावें ऐसा मान नाहीं. म्हणून ऐन्हां छावणीस रवाना केलें. ऐसियास, चिपळुणी कटकाचा मुक्काम होता. याकरितां दाभोळच्या सुबे यांत पावसाळ्याकारणें पागेस सामा व दाणा व वरकड केला होता तो कितेक खर्च होऊन गेला. व चिपळुणा आसपास विलातितील लष्कराची तसवीस व गवताची व वरकड हरएक बाब लागली. त्याकरितां हाल कांहींएक उरला नाहीं. ऐसें असतां, वैशाखाचे वीस दिवस उनाळा, हेहि पागेस अधिक बैठी पडली. परंतु जरूर जाले. त्याकरितां कारकुनाकडून व गडोगडीं गल्ला असेल तो देखून जैसीतैसी पागेची वेगमी केली आहे. त्यास तुम्हीं मनास ऐसा दाणा, रातीब, गवत मागाल, असेल तोंवरी धुंदी करून चाराल, नाहींसें जालें म्हणजे मग कांहीं पडत्या पावसांत मिळणार नाहीं, उपास पडतील, घोडी मरायास लागतील. म्हणजे घोडीं तुम्हींच मारिलीं ऐसें होईल, व विलातीस तसवीस देऊं लागाल. ऐशास लोक जातील, कोण्ही कुणब्याचे येथील दाणे आणील, कोण्ही भाकर, कोण्ही गवत, कोण्ही फाटे, कोण्ही भाजी, कोण्ही पाले; ऐसे करूं लागलेत म्हणजे जे कुणबी घर धरून जीवमात्र घेऊन राहिले आहेत तेहि जाऊं लागतील. कितेक उपाशीं मराया लागतील. म्हणजे त्याला ऐसें होईल कीं, मोगल मुलकांत आले त्याहूनहि अधिक तुम्ही! ऐसा तळतळाट होईल! तेन्हां रयतेची व घोडियांची सारी बदनामी तुम्हांवरी येईल.

हें तुम्ही बरें जाणून, सिपाही हो अगर पात्रखलक हो, बहुत यादी धरून वर्तणूक करणें. कोण्ही पागेस अगर मुलखांत गांवोगांव राहिले असाल त्यांणीं रयतेस काडीचा आजार धावया गरज नाहीं. 'आपल्या राहिला जागाहून बाहीर पाय घालाया गरज नाहीं. साहेबीं खजान्यातून वाटणिया पदरीं घातलिया आहेती. ज्याला जें पाहिजे, दाणा हो अगर गुरें-ढोरें वागवीत असाल त्यांस गवत हो, अगर फाटें, भाजीपाले व वरकड विकाया येईल, तें रास घ्यावें, बाजारास जावें, रास विकत आणावें. कोण्हावरी जुलूम अगर ज्याजती अगर कोण्हासी कलागती करावयाची गरज नाहीं. व पागेस सामा केला आहे तो पावसाळा पुरला पाहिजे. ऐसे तजविजीनें दाणा रातीब कारकून देत जातील तेणेंप्रमाणेंच घेत जाणें. की उपास न पडतां रोजबरोज खायाला सांपडे आणि होतहोत घोडी तवाना होत ऐसें करणें. नसतीच कारकुनासी धसपस कराया, अगर अमकेंच द्या, तमकेंच द्या, ऐसें म्हणाया, धुंदी करून खासदार कोठींत कोठारांत शिरून लुटाया गरज नाहीं. व हालीं उन्हाळ्याला आहे तइसें खलक पागेचे आहेत. खण धरून राहिले असतील व राहतील, कोण्ही आगट्या करितील, कोण्ही भलतेच जागा चुली, रंधनाळा करितील, कोण्ही तंबाकुला आगी घेतील, गवत पडिलें आहे ऐसें अगर वारें लागलें आहे ऐसें मनास ना आणितां म्हणजे अविस्वाच एखादा दगा होईल. एका खणास आगी लागली म्हणजे सारे खण जळोन जातील. गवताच्या लव्हाळ्यांस कोणीकडोन तरी विस्तो जाऊन पडला म्हणजे सारें गवत व लह्व्या आहेत तितक्या एकेएक जाळों जातील. तेव्हां मग कांहीं कुणबियांच्या गर्दना मारल्या अगर कारकुनांस ताकीद करावी तैसी केली, तऱ्ही कांहीं खण कराया एक लाकूड मिळणार नाहीं, एक खण होणार नाहीं. हें तों अवघियाला कळतें. या कारणें, बरी ताकीद करून खासे खासे असाल ते हमेसा फिरत जाऊन, रंधनें करितां, आगट्या जाळितां अगर रात्रीस दिवा घरांत असेल, अविस्वाच उंदीर वात नेईल, ते गोष्टी न हो. आगीचा दगा न हो. खण गवत वाचेल तें करणें. म्हणजे पावसाळा घोडीं वाचलीं. नाहीं तर मग घोडीं बांधावीं न लगेत, खायास घालावें न लगे. पागाच बुडाली. तुम्हीं निसूर जालेत ऐसे होईल. या कारणें तपशिलें तुम्हास लिहिले असे. जितके खासे खासे जुमलेवार, हवालदार, कारकून आहा तितके हा रोखा तपशिलें ऐकणें, आण हुषार राहणें. वरचेवरी रोजचारोज, खबर घेऊन, ताकीद करून, येणेंप्रमाणें वर्तणूक करितां, ज्यापासून अंतर पडेल, ज्याचा गुन्हा होईल, बदनामी ज्यावर येईल, त्यास मराठियांची तो इज्जत वाचणार नाहीं, मग रोजगार कैसा ? खळक समजों-जास्ती केल्यावेगळ सोडणार नाहीं. हें बरें म्हणून वर्तणूक करणें.

| | | |
|---|---|---|
| स. पृ. ८१<br>हि. १०८२ मोहर १७ | (१३९३)<br>फर्मान | श. १५९३ वैशाख व. ४<br>इ. १६७१ मे १७ |

बादशहा विजापूर— मुल्ला महंमद शरीफ पर. जाफराबाद उर्फ चांदवड सुभे औरंगाबाद

रोज अर्धा रुपया नक्त व २०० बिघे पड जमीन मुद्दा यांस दिली आहे. ते मशिदीची चाकरी वगैरे करितील तरी चालविणें.

फॅ. रे. सुरत भा. १०५ } (१३९४) { श. १५९३ वैशाख व. १४
पृ. १८० (द्वि. सं.) इ. } कारवार–सुरत { इ. १६७१ मे २७

वऱ्हाणपूरच्या व आसपासच्या व्यापाऱ्यांकडून दरबैली एक रुपया घेण्याचा करार करून शिवाजीनें त्यांना (दक्षिणेकडे) मोकळे सोडल्यामुळें हुबळीला (खरेदीदारांची) गर्दी होऊन वदाओढींत मिऱ्यांचा दर चढला आहे.

फॅ. रे. सुरत भा. १०५ } (१३९५) { श. १५९३ ज्येष्ठ शु. २
पृ. १६८ (द्वि. सं.) इ. } मुंबई–सुरत { इ. १६७१ मे २९

मो(ह)बतखानानें ५ किल्ले घेतले. मुअझ्झमला फक्त ७०० घोडेस्वारांनिशीं औरंगाबादेस सोडून जसवंतसिंगाला घेऊन तो (खाली) आला. मोहबतखानाचीं दंडाराजपुरीच्या सिद्याला पत्रें गेलीं. दिलेरखान व बहादरखान कोठपर्यंत आले हें कळलें नाहीं.

ओ. कॉ. भा. ३२ } (१३९६) { श. १५९३ ज्येष्ठ शु. ५
नं. ३५६७ इ. } सुरत–कंपनी { इ. १६७१ जून १

बादशहानें बहादरखान आणि दिलेरखान हे दोन उमराव शिवाजीच्या मुलुखावर पाठविले. ते सुरतेस आले. सुरतेशिवाय इकडील सर्व मुलखाचा कारभार बादशहानें दिलेरखानाच्या हवालीं केला आहे.

खं. १५ ले. १२७ } (१३९७) { श. १५९३ ज्येष्ठ व. १
सु. १०७२ सफर १५ } दुमालापत्र { इ. १६७१ जून १३

फत्तेखान व मिराखान किल्ले सातारा– मोक. मौ. निगडी
निगडी येथील सदानंद मठाचा इनाम त्याचे दुमाला केला असे.

त्रै. व. ६ ले. ११ व १२ } (१३९८) { श. १५९३ ज्येष्ठ व. ५
पृ. ७५ } कबूल-कतबा फा. मु. व सी. { इ. १६७१ जून १६

रा. जानराऊ मंबाजी व रा. नारोजी येसवंतराउ–वे. गणेश भट दीक्षित सौ वनी तुम्ही आमचे परंपरागत तीर्थपुरोहित. आम्ही व आमचे वंशज तुम्हाकडे चालवितील.

लेटर बुक भा. ४ } (१३९९) { श. १५९३ ज्येष्ठ व. १२
पृ. ४६०–६२ इ. } कंपनी–सुरत { इ. १६७१ जून २३

शिवाजी आणि त्याच्या रियासतींतील लोक यांपासून पुढें त्रास होत रहा-

णार याचा विचार करून तो टाळण्याकरितांहि **मुंबईला जाणें** कितपत श्रेयस्कर आहे हें ठरवावें. **तद्देशीय लोकांना विकत देण्यासाठींहि** तोफा मुंबईस पाठवूं. देशी गलबतांना चाचे आदिकरून शत्रूंशीं युद्ध करण्याचीं साधनें आपण पुरविल्यानें आपली कांहींच हानी नाहीं. ...... **राजापूरची** नुकसानी भरून घेण्याबद्दल तहाचें बोलणें झालें नसल्यास तेथें वखार पुनः स्थापण्याबद्दल बोलणें करावें. त्यामुळें व्यापाराशिवाय इतर दृष्टीनेंहि आपला फायदा होईल. तो ( शिवाजी ) इतक्या उत्सुकतेनें बोलावीत आहे त्या अर्थी सुरक्षितपणाबद्दल शंका घेण्याचें कारण नाहीं.

| | | |
|---|---|---|
| त्रै. व. ७ पृ. ४६<br>सु. १०७२ सफर२८ | (१४००) | श. १५९३ ज्येष्ठ व. ३०.<br>इ. १६७१ जून २६ |

तान्हाजी जनार्दन हवालदार व कारकून ता। निरथडी पा। पुणें प्रति राजश्री **शिवाजी राजे**:- परींचाचे पाटिलकीसी कान्होजी खराडे नसता कथला करून घर तेथें बांधतात. तरी कथला करू न देणे. वैकुंठवासी साहेबाचे व दादाजीपंताचे कारकीर्दीस चालिले आहे ते करार आहे. तेणेप्रमाणे चालवणे. नवा कथला करू न देणे. व परींच्या कान्होजी खराडे यास घर बांधो न देणे. मोर्तब सुद. (मर्यादेयं विराजते).

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. सुरत भा. १०५<br>पृ. १८४-८६ (द्वि. सं.) इ. | (१४०१)<br>मुंबई-सुरत | श. १५९३ आषाढ व. १.<br>इ. १६७१ जुलै १२ |

डेप्युटी गव्हर्नरनें पूर्वी पाठविलेल्या पत्राचें **शिवाजी** काय उत्तर देतो तें आल्यावर आपल्याकडे पाठवून, त्यावर आपल्या सूचना येतील तसें करूं. विजापूरचा आदिलशहा, रुस्तुमजमा, तिमाजी या सर्वांचे **कर्जाचा आंकडा** आम्हीं हिशेबांत दाखविला आहे; तो देखील शिवाजीनें घावा काय ? राजापूरचे व्यापाऱ्यांकडूनच जेवढें येणें असेल तें देण्याला अर्थात् त्यांना तो भाग पाडील....मुंबई बेटावर चोऱ्या बंद होत नाहींत; चोर इतके धीट झाले आहेत कीं कांहीं दिवसांपूर्वी एक भाव्याची होडी करून **शिवाजीच्या** मुलखांत जाऊन त्यांनीं एका ब्राह्मणाचें घर लुटलें व कानांतील दागिना घेण्याकरितां एका मुलीचे कानच तोडले !

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. सुरत भा. १०५<br>पृ. १७३ (द्वि. सं.) इ. | (१४०२)<br>चार्लस जेम्स-सु. प्रे. (स्वाली) | श. १५९३ आषाढ व. ४<br>इ. १६७१ जुलै १५ |

अशी बातमी आली कीं **शिवाजी** या बाजूला ५० मैल सरकला आहे. त्यामुळें शहरांत लोक भेदरून गेले आहेत.

| | | |
|---|---|---|
| खं. ८ ले. १८<br>सु. १०७२ रबल २७ | (१४०३) | श. १५९३ आषाढ व. १४<br>इ. १६७१ जुलै २४ |

विठ्ठल दत्तो सुभेदार व कारकून ता। जाउली प्रति **शिवाजी राजे** दंडवतः—

प्रतापराऊ सरनोबताकडे हुजरून दहा हजार रुपये ऐवज पाठविला आहे. तरी सदरहूस वोझीस इतबारी नफर १० दहा देणें. मजुरास मजुरी रास देऊन सिताब वरच्यावरी रवाना करणे. मोर्तब सूद

खं. १८ ले. १८ }
सु. १०७२ }
(१४०४)
निवाडा
{ श. १५९३ श्रावण शु. ७-
{ इ. १६७१ आगस्ट २

विहुजूर मजालसी गोत सासवड वगैरे सहा गांवे. जानोजी व एमाजी यांनीं गोत सांगेल त्याप्रमाणें वागू म्हटल्यावर गोतानें निवाडा केला कीं, मोकदमी जानोजीची. एमाजीची नव्हे.

खं. १८ ले. १८ }
सु. १०७२ रवल २६ }
(१४०५)
उल्लेख
{ श. १५९३ श्रावण शु. ७।
{ इ. १६७१ आगस्ट २

अज दि० ठाणे तर्फ कन्हेपठार—ता। मोक० सासवड वगैरे सहा गावः-जानोजी व एमाजी कुंभारकर मोक० मौ० वणपुरी ता। पुणे. यामध्यें बापभाउबीचें भांडण आहे. येसिगास जानोजी साहेबा (शिवाजी) कडे गेला. साहेबी हुकूम फेला कीं, दादाजी कोंडदेव व रा. साहेब यांचे कारकीर्दी चालल्याप्रमाणें वर्तणें. तरी गोतमुखें निवाडा करणें.-

फॅ. रे. सुरत मा. १०५ }
पृ. १९४ (द्वि. सं.) इ. }
(१४०६)
मुंबई-सुरत.
{ श. १५९३ श्रावण व. २
{ इ. १६७१ ऑगस्ट १२

**शिवाजीचें पत्र** व डे० ग० नें त्याला पाठविलेल्या पत्राची नकल यांचें पोर्तुगिज भाषांतर तुमच्याकडे पाठविलें आहे. त्यावरून **आमच्या मित्रत्वाची त्याला किंमत नाहीं** हें तुमच्या नजरेस येईल.

ऐ. व ६ पृ. ७५ले.१३ }
श. }
(१४०७)
कयूल-कतवा फा. मु. व सी.
{ श. १५९३ भाद्र. शु. ९
{ इ. १६७१ सप्टें. २

वेंकटराऊ नरसिंगराऊ देसपांडे पर० आवसे— वे. गणेश विठल दिक्षीत वणी

आम्ही व आमचे वंशज तुम्हास तीर्थोपाध्याय मानूं.

खं. ८ ले. २४ }
सु. १०७२ जवल १४ }
(१४०८)
{ श. १५९३ भाद्रपद शु. १५
{ इ. १६७१ सप्टेंबर ८

तुकोराम सुबेदार व कारकून सुभे मामले प्रभावळी प्रती राजश्री **शिवाजी राजे** दंडवत. उपरी सबनीस सुबे मजकूर यावरी वाद + + + + तगारा नाईकवाडी + + बापूजी नलवडा यांणें कल्हावती करून तरवारेचा हात टाकिला आणि अखेर आपलेच पोटांत सुरी मारून घेऊन जीव दिल्हा. हे वर्तमान होऊन गेलें. तुम्ही कांहीं हुजूर

लिहिलें नाहीं. मराठा होऊन ब्राह्मणावरी तरवार केली, याचा नतीजा तोच पावला. हालीं बापूजी नलवडा व कोंडाजी चांदरा व संताजी जामदार हरबकसा करून सबनिसास दटावितात कीं + + + + + + होतें तेंच तुमचे उपरी उचलो + + + + + + —— वर्तमान कळों आलें. तरी ब्राह्मणास + + + + तील त्याची खबर घेणें जरूर आहे. तुम्हीं + + + + घेत नाहींत. इतकियाउपरी त्यास ताकीद करून हालखुद ठेवणें कीं सबनिसाचे वाटे नच जात. जरी कांहीं सबनिसासी कथळा करायावरी ख + + + ल हालखुद माकुलपणें असतील तरी हुजूर लिहिणें. म्हणजे तहकीक आहे कीं सबनीस मायावरी आले होते. याबद्दल साहेब त्यास दस्त करून हुजूर आणवितील आणि खबर घेतील. तुम्हीं ऐसे बेकैद लोकांस होऊं न देणें. हालखुद ठेवून रवेशवार चाकरी घेत जाणें कीं कोण्ही बेढंग न वर्ते. मुलाहिजा न धरणें. मोर्तब सूद.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. सुरत<br>मा. १०६ पृ. ९ इ. | (१४०९)<br>मुंबई-सुरत. | श. १५९३ भाद्र. व. १<br>इ. १६७१ सेप्टें. ९ |

शिवाजीचा वकील येथें येऊन बसला आहे. त्यानें आमची मागणी काय आहे असें विचारल्यावर ३२००० होनांचा आंकडा आम्हीं सांगितला. ही रकम मोठी असली तथापि पुढें फायदा झाल्यास त्यांतून फेडता येईल असें त्यानें सांगितलें. त्याच्या मुलखांतून मुंबईशीं चालणाऱ्या व्यापाराच्या सुरक्षिततेकरितां, आमच्या नजीक परंतु त्याच्या मुलखांत (आम्हांला) वाटेल तेथें (आम्हीं) किल्ला बांधण्याला तो मदत करील. परंतु त्याचा मुख्य हेतु दंडाराजपुरीविरुद्ध (आमची) मदत मिळविण्याचा आहे. तशी मदत दिल्यास मोगलांना वैमनस्य वाटूं नये अशा गुप्तपणानें हें काम कसें करावें हें तोच सुचविणार आहे. इतर सर्व कलमें या एका गोष्टीच्या पुष्टयर्थच आहेत.

कांहीं मालाचे बाबतींत लांच घेतल्यानें आतां आलेला वकील शिवाजीच्या इतराजींत आल्यामुळें, त्याला खूष करण्याकरितां हा तह घडवून आणण्याचें त्यानें ठरविलें आहे. तेव्हां शक्य तितकें आमचे बाजूनेंहि तो ताणण्यास तयार आहे! मागण्या पाहून व दंडाराजपुरीकरितां आम्हीं मदत करीत नाहीं हें ऐकून, रामशेणव्याला आपल्या बरोबर पाठवावें असा त्या वकिलाचा आग्रह आहे. पाठविणें झाल्यास त्याच्याकरितां सूचना पाठवाव्या. एक एंजिनिअर, एक मोठी तोफ (morter peece), गोळे आणि दुसरी एक मोठी तोफ (a great gun) इतकें गुप्तपणें शिवाजीकडे पोंचतें करावें अशी त्याची अपेक्षा आहे. निकाल काय तो त्वरेनें केला पाहिजे नाहींतर एकदां मोगल दक्षिणेकडे आला म्हणजे शिवाजीला दुसरीकडे लक्ष घावें लागेल.

| | | |
|---|---|---|
| ब. ३ ले. ७<br>सु. १४ जवल १९<br>सयाजी —— ? | (१४१०)<br>फारसी भाषांतर | श. १५९३ भाद्र. व. ५<br>इ. १६७१ सप्टें. १३ |

माणिकचंदाचे पत्रावरून आपणास कळविण्यांत येतें कीं, आष्टी परगण्याचे लोक १०८० हि. ची बाकी वसूल देण्यास कबूल असतां जमांदार वसूल करीत नाहीं. तरी वसूल करून औरंगाबादेस पाठवून धावा.

खं. ८ ले. २५ } (१४११) { श. १५९३ माद. व १२
सु. १०७२ जवल २५ } { इ. १६७१ सप्टें. १९

रा. **शिवाजी राजे**— धारराव निंबाळकर सुबेदार यांसी

मा माहादाजी यमाजी यासी सु..........काम फर्मावून पाठविले..........
दरबार करीत जाणें.........ति सालीना होन पा १०० एकमे रास पादशाही मोकरर केले असेती. हापासून वजा वटाऊ रवेशप्रमाणें करीत जाऊन बाकी बेरीज माहे दर माहे आदा करीत जाणें. यारिदी व कागद वाहे लिहिणियामार्फिक व शाही सिरें देत जाणें. बारगीर घोडे व हवालगीर व दिवटीदार निसबत बाजे इजारी सुबाचे मजमदाराचे तहप्रमाणें चालवणें. मानइले हुजूर **चिरंजीव संभाजी राजे** याकडे वाकेनिवीसेचे मुतालिकीस होते. देणें फाजील कांहीं नाहीं. मोर्तबसूद.

ओ. कॉ. मा. ३२ } (१४१२) { श. १५९३ माद. व. १३
नं. ३५७८ इ. } कारवार–सुरत. { इ. १६७१ सप्टें. २०

अनपेक्षितपणें इकडे **रुस्तुमजमाचें बंड** उभें राहिलें आहे. रुस्तुमजमा पूर्वी या बाजूच्या शहरांचा अधिकारी होता. फितुरीनें आदिलशहाचा एक किल्ला त्यानें **शिवाजीचे** हवालीं केल्यामुळें आदिलशहानें त्याचेकडील मुलूख काढला. शिवाजीचा लोभ व स्वदेशांतील सरदारांचा पाठिंबा यांवर भिस्त ठेवून अजूनपर्यंत अनेक मित्रांचे मध्यस्थीनें झाली नाहीं ती गोष्ट—पूर्ववत् मुलूख मिळविणें—आतां तो मनगटाचे जोरावर करूं पहातो. **शिवाजीनें** गुप्तपणें मदत दिल्यामुळें आजपर्यंत रुस्तुमजमानें ३ लक्ष होनांचा मुलूख काबीज केला. व **रायबाग** लुटून कांहीं भाग जाळला. शिवाजीच्या आणि आतांच्या रुस्तुमजमाच्या जाळपोळीमुळें रायबाग फार नाश पावलें. **अथणीचे** वगैरे व्यापारी पळाले. हुबळीपर्यंतहि हा उपद्रव पोचेल असें समजून तिकडचेहि लोक पळून जातात. राजानें रुस्तुमजमावर सैन्य पाठविलें. तथापि दरबारांतील त्याचे मित्रांचे कारवाईनें तें अगदीं सावकाश कूच करितें. मध्यंतरीं **सलोख्याची खटपट** चालू आहे. अखेरीला आदिलशहा मिळून मिंडला बळी पडेल. तसें झालें तर या गोंधळांत लुबाडले गेलेल्या व्यापाऱ्यांना कांहींच भरपाई मिळणार नाहीं ! येथील ( राज्यकर्त्यांचा ) धर्म किंवा निदान व्यवहार तरी (अशा न्यायाच्या भरपाईला) अनुकूल नाहीं.

'(से.) फॅ. रे. सुरत
भा. १०६ पृ. ११ इ.

(१४१३)
मुंबई-सुरत.

श. १५९३ भाद्र. व. १४
इ. १६७१ सप्टें. २१

शिवाजीला मुंबईकरांनीं फार आशा किंवा निराशा दाखविली नाहीं. ३२००० होन मुद्दल व झाल्या मुदतीचें दरमहा दरशेंकडा १ टक्के प्रमाणें व्याज घावें असें म्हटल्याबरोबरच तो वकील दचकला. परंतु त्यानें ह्या मागणीची नोंद करून घेतली असून तो ती शिवाजीला दाखवील. शिवाजीकडून अनपेक्षित हुकूम आल्यामुळें तो शिवाजीकडे गेला आहे. १५।२० दिवसांनीं परत येईल.

शि. प. ले. ६४
सु. १०७२

(१४१४)
मिसेली-सी.

श. १५९३ भाद्र.
इ. १६७१ ऑग. सप्टें.

अज. दि. ठाणा कार्वे—मोक. मौ. वाघेरी

रखर १६ ची सनद आली आहे. नरहरिभट बिन अंतभट गिजरे सो कऱ्हाड यांस वाघेरी येथील १५ बिघे जमीन इनाम दिली आहे. ती चालविणें.

खं. ८ ले. २६
सु. १०७२ जवल ३०

(१४१५)

श. १५९३ आश्विन शु. २
इ. १६७१ सप्टें. २४

शिवाजी राजे—रा. तुकोराम सुबेदार व कारकून सुमे मामले प्रभावळी प्रति दंडवत.

मामले दामोल विलायतीस नारेळ दर सद्दे खारी ४ व रोठा देसील जकात दर खंडीस लारी १२५ सवाईं प्रमाणें विकत आहे. आणि नेवरे व वाजे तुम्हाकडील माहालीं ऐन जिन्नस बटाई दिवाणांत उसूल देताती. व रयत यांसा खरीदी करितात. ऐसें असतां, कमनिर्खें नारेळ सुपारी विकते, ऐसी खबर कळों आली आहे. तरी हा अमल कैसा आहे? ऐन जिनसांची गीर्दवरी कैसी करता? आणि कमनिर्खें कोण विकितात? हें खबर घेणें आणि ताकीद करणें. पेस्तर ऐसे न व्हे. ऐन जिनसाची गीर्दवरी बरी व्हो. आणि जो तह तुम्हाकडे आहे त्या निर्खें विक्री करणें. कमनिर्खें विकिलिया इकडे धका बसतो आणि अलग नुकसान येऊं पहाते. त्याची बदनामी तुम्हांस. ऐसे जाणून, खरी खबर घेऊन, चौकशी व गीर्दवरी करून ऐन जिनस तह प्रमाणेंच दिवाणांतून विकीत जाणें.

ओ. फॉ. मा. ३२
नं. ३५८५ इ.

(१४१६)

श. १५९३ आश्विन शु. २
इ. १६७१ सप्टें. २५

स्टीफन उस्टिक याजकरितां (शिवाजीच्या तहाच्या वेळीं पाळावयाच्या) सूचनाः—

पूर्वेकडील देशांतील अत्यंत धोरणी राजा शिवाजी याच्याशीं तुम्हांला तह करावयाचा असल्यामुळें, तुम्हीं काळजी व सावधगिरी ठेवावी म्हणून तुम्हांला खालील नियम घालून देतों.

मित्रत्वाचा देखावा करून तो स्वागत करील त्यावर 'मुंबईहून मी कंपनीच्या वतीनें न्याय्य मागणी करण्यास आलों आहें. ती पुरी केल्यास इंग्रज मित्रत्व राखतील' असें सांगावें. 'झाल्या नुकसानीची भरपाई आणि भावी कालांत तसा अत्याचार न करण्याची हमी' ह्या आपल्या मागण्या आहेत असें सांगावें.

नुकसान भरपाईच्या रकमेचा ३२००० होनांचा आंकडा खुलासेवार सांगावा. तो आढेवेढे घेऊं लागला तर 'इतरांची भरपाई तुम्हीं पुरती करून दिली आहे, आणि आमचीच देत नसाल तर आमचा दर्जा व मित्रत्व यांचें विशेष महत्त्व तुम्हांला वाटत नाहीं असें म्हटलें पाहिजे ! सयुक्तिक स्नेहाची त्याला इच्छा व्हावी म्हणून सुरत, कारवार, बिलिआपट्टण, कालिकत ह्या व इतर बंदरांना इंग्रजांच्या व्यापारामुळें झालेला फायदा व राजापूरचा त्याच्या अभावामुळें झालेला तोटा त्याच्या नजरेला आणून द्यावा. कंपनीची संपत्ति, सामर्थ्य, न्याय आणि सचोटी यांचा सर्व ठिकाणीं बोलबाला आहे; असें बोलावें. कंपनीच्या मनांत आलें असतें तर शिवाजीची गलबतें व प्रजा यांच्यावर सूड घेण्याचें सामर्थ्य असतांना त्यांनीं तसें केलें नाहीं, यांत दिसून आलेलें शहाणपण आणि नेमस्तपणा यांचें वर्णन करावें. नुकसानभरपाईचा अनुकूल निकाल होईपर्यंत कंपनी राजापूरला फिरून वखार चालणार नाहीं हा निश्चय राम शेणव्यानें स्पष्टपणें सांगावा.

इतकें बोलणें झाल्यावर कांहींतरी निष्पन्न होईल. एवढी मोठी रकम देण्यास तो कुरकूर करील तर तो स्वतः काय देण्यास तयार आहे याचा राम शेणव्यानें खासगी खुलासा काढावा. रोखीनें का जकातींत भागशः सूट देऊन तो भरपाई करूं इच्छितो याचाहि तलास काढावा व त्वरेनें इकडे कळवावें. आमच्याकडे कळविण्याची फार यातायात पडूं नये म्हणून [ कोरी जागा ] होनांवर तोड करावी असें आम्हीं सुचवितों.

भावी सुरक्षिततेबद्दल त्याचा विचार नक्की विचारावा. भरपाईचा निकाल झाला तरच व झाल्यानंतर सोबत पाठविलेलीं कलमें त्याला दाखवावीं. नाहीं तर दाखवूं नयेत.

दंडाराजपुरीचे बाबतींत सैन्य, तोफा व दारूगोळा यांची मदत कदाचित् तो मागेल. त्यास 'कंपनीची मोठी मालमत्ता आणि व्यापार सर्वच देशांत पसरला असल्यामुळें अशा तऱ्हेनें युद्धांत तुम्हांला मदत करणें अशक्य आहे. तथापि एकदां कायमचा तह झाल्यावर इंग्लंडमधील सर्व कांहीं तुम्हांला मिळेल' असेंहि अभिवचन द्यावें. मात्र नक्की वचन किंवा नकार कोणच्याहि बाबतींत देऊं नये. सामान्यतः मोंगलांना व इतरांना आमच्या व्यापारापासून फायदा होतो तितकाच होईल अशाबद्दल बोलावें.

सं. १५ ले १२८ } (१४१७) { श. १५९३ आश्वीन शु. ६
सु. १०७२ जखर ५ } ताकीद मु. व. सी. { इ. १६७१ सप्टें. २९

अजर. सितारखान सरनाईकवाडी किले सातारा–ता हुदे. व मोक. मौ. निगडी–निगडी येथें जोगींद्रगिरी बावा यांस १५ बिघे इनाम आहे. ते पूर्वीप्रमाणें चालविणें.

फॅ. रे. सुरत मा. ७७ } (१४१८) { श. १५९३ आश्वीन शु. ७
पृ. १ इ. } सुरत (स्वाली)– मुंबई { इ. १६७१ सप्टें. ३०

**शिवाजीकडून** तह करण्याकरितां वकील आला आहे. त्याला चांगल्या तऱ्हेनें वागवून तह त्वरेनें करण्याकरितां **स्टीफन उस्टिक व राम शेणवी** यांना पाठवावें. राजापूरच्या लुटीची नुकसान-भरपाई व राजापुरला पुनः वखार स्थापण्याबद्दल [मागील सप्टें. २५ च्या अनुक्रमांकाप्रमाणें] बोलणें करावें.... खरें पाहिलें तर **दंडाराजपूर** त्याचे ताब्यांत जाण्यानें आमचे मुंबई बंदरास संकट आहे. बरें आज थेट नकार घावा तरी तें आपल्या हिताचें नाहीं. म्हणून त्याला पाहिजेत त्या वस्तु मिळण्याच्या आशेवर त्याला मुग्धातच ठेवल्यानें बहुधा तो लवकर तह करण्यास तयार होईल. ह्या दोघांना पाठविण्याचा मुख्य उद्देश हाच आहे. शिवाजीकरितां सुंदर नजराणा व उस्टिक याच्या बरोबर कंपनीच्या लौकिकाला साजे असा लवाजमा देण्याची योग्य ती तजवीज करावी.

फॅ. रे. सुरत मा. १०६ } (१४१९) { श. १५९३ आश्वीन व. ६
पृ. २२ इ. } मुंबई–सुरत { इ. १६७१ आक्टो. १३

शिवाजीच्या वकीलानें **राम शेणव्यास** 'मी ५।६ दिवसांनीं तेथें आल्यानंतर आम्ही व तुम्ही बरोबरच शिवाजीकडे जाऊं' असें लिहिल्यामुळें पुनः त्याचेकडून कांहीं कळेपर्यंत उस्टिकचें जाणें लांबणीवर टाकणें जरूर आहे. तितक्या मुदतींत तुमचेकडून नजराण्याला उपयोगी वस्तु येऊं शकतील.

फॅ. रे. सुरत मा. १०६ } (१४२०) { श. १५९३ कार्तीक शु. १
पृ. २५–२७ इ. } मुंबई–सुरत. { इ. १६७१ आक्टो. २३

अजूनपर्यंत उस्टिकला पाठविला नाहीं, त्याला चार कारणें आहेत. (१), त्याची प्रकृति नादुरस्त आहे; (२), शिवाजी कोठें आहे हें समजत नाहीं; (३), शिवाजीचा वकील चौलपर्यंत पोंचला आहे असें कळलें; आणि (४) आमचेजवळ शोभेसा नजराणा नाहीं. ही नजराण्याची मुख्य अडचण दूर झाली म्हणजे इतर गोष्टी नडणार नाहींत.

समुद्रावर **शिवाजीची** विशेष **तयारी** चालली आहे असें आम्हांला अद्यापपर्यंत कळलेलें नाहीं. मात्र **दंडावर** एक लहान आरमार गेलें आहे. रणांगणावर त्याचें सैन्य कोठेंच उतरलेलें दिसत नाहीं. तेव्हां त्याच्याबद्दल वाटणारी भीति ही खोटी असून केवळ 'दुधानें जीभ पोळल्यामुळें ताक फुंकून पिण्यासारखी' आहे. आम्हीं त्याच्या तपासांत राहतों.

शिवाजीच्या मदतीनें **रुस्तुमजमानें** रायबाग लुटलें व उघडपणें बंड उभारलें. आमच्या कोल्यादेखत दंडाच्या **शिद्दीनें तळें** आदिकरून शिवाजीचीं ठाणीं **जाळलीं.** दोन दिवसांपूर्वी **दाभोळहून** शिवाजीचे आरमाराचा राहिलेला भाग येथें आला. समुद्रावर कोठेंच मोठी तयारी केली नाहीं आणि शिवाजी **रायरी** ह्या मोठ्या किल्ल्यावर आहे असें आरमारी सेनापतीनें सांगितलें.

इ. सू. १८३८ पृ. १५९ } (१४२१) { श. १५९३ कार्तिक शु. ३
सु. १०७२ रजब १ } नकल { इ. १६७१ आक्टो. २५

अजर रा. **सिवाजीराजे** साहेब दयाम दौलत हू बजानेब कारकून बानाचे दिमत देशमुखानी व देशपांडे व मोकदमानी व रयानी कसबे सासवड कर्यात मजकूर श्री सोपानदेव याची समाधी कसबे मजकुरी सालाबाद आहे. वितपसीलवार

नि॥ जमीन मुंजरी देवा भोवताली थळ माडळे पैकीं कास मण ८४॥ आहे. ते देवाचे देवास दिल्ही आसे. कुलबाब कुलकानू दुमाला केले असे. दुमाला कर्णे. थळ पौ ८४॥ साडेचार मण बाद देणें. देवाचे देवास चालवणें.

निसबत जकातीवर व बाजारपौ दर रोजीना मोईन सालाबादप्रो चालवणें नोरी नैविद्याकारणें केली मापी आधोली ८८॥० व तेलाबदल दिवाबतीस वजन टकबंदी ८८॥० आच्छेर

सदरहू देवास दिल्हे आसे. दर इसाल चालवणें. ताजा खुर्दखताचा उजूर न करणें. हिंदू होऊन इस्कील करील त्यास गाईची आण आसे व मुसलमान होऊन इस्कील करील त्यास सौराची आण आसे. येणेंप्रो चालवणें. तालीक घेऊन आसल पत्र गोसावी रामानंद याजपासी परतोन देणें. परवानगी हुजूर. मोर्तब.

फॅ. रे. सुरत, भा. १०५ } (१४२२) { श. १५९३ कार्तिक शु. ४
पृ. ५५ इ. } मुंबई—सुरत { इ. १६७१ आक्टो. २६

आमच्याकडील अगदीं कच्चीं माणसें आपल्याकडे बदलून घ्यावीं. प्रतिदिवशीं शहाजादा ससैन्य कल्याणला येण्याची अपेक्षा आहे. **शिवाजीशीं** त्याचा बेबनाव झाला अशी समजूत आहे. **शिवाजीवर** जाणाऱ्या सैन्याचें आधिपत्य **मोहबतखानाला** दिलें.

खं. ८ ले. १३ } (१४२३) { श. १५९३ कार्तिक शु. ५
१ रजब ३ } { इ. १६७१ आक्टो. २७

मोरो त्रिमळ व निळो सोनदेऊ जगन्नाथपर्यंत व त्रिंबक वेंकटेश गोसावी.

राजेसाहेब शिवापट्टणी मुकाम किती दिवस करणार. व लोहगडतर्फेनें इमारती पहावयास जाणार, तिकडे जातील किंवा नच जात, रोहेडियाकडून पांडवगड पाहोन

येणार होते ते तिकडे जातील किंवा नच जातील, हें कांहीं वर्तमान लिहिलें नाहीं. तरी सविस्तर वर्तमान लेहून पाठवणें व चिरंजीव राजश्री राजारामाचे........राजश्री साहेबास खबर लिहिली आहे ते श्रुत करून खबर सत्वर पाठवून देणें. बहुत लिहिणें नलगे. झुंबींचें वर्तमान लिहिणें. पा हुजूर. मो. सु.

फॅ.रे. सुरत भा. १०६ } पृ. ३० इ. (१४२४) कारवार-सुरत { श. १५९३ कार्तीक शु. ८ इ. १६७१ आक्टो. ३१

आदिलशाही सैन्यानें बंडखोरांचा पुरा मोड केला. मिरजनच्या बंडखोरांनीं मात्र मिरजनचा किल्ला अजून लढत ठेविला असून तो सुभेदाराच्या ताब्यांत आला नाहीं.

फॅ.रे. संकीर्ण भा. २ } पृ. ११८ इ. (१४२५) स्वाली मरीन कन्सल्टेशन. { श. १५९३ कार्तीक शु. ९ इ. १६७१ नोवें. १

**शिवाजीकरितां नजराणा:—शिवाजीशीं** तह करण्यांत आल्यावर त्याला खालीलप्रमाणें नजराणा देणें इष्ट आहे.

२ भडक रंगाचे ताके, ५ लांब तलवारी, २ आरसे, १ पायजमा, ६ मूल्यवान व ६ साध्या पामऱ्या.

सं. १५ ले. १२९ } सु. १०७२ रजब ८ } (१४२६) खुर्दखत { श. १५९३ कार्तीक शु. ९ इ. १६७१ नोवें. १

विठल दत्तो सुभेदार व कार० सुभा जाउली

रा. गोविंदराऊ नामजाद व कार० मौ० उब्रडें.

निंब येथील मठाचा आपल्या गांवीचा इनाम पूर्वीप्रमाणें चालविणें.

सं. २० ले. १३० } सु. १०७२ जखर १३ } (१४२७) मिसेर्ला फा. सु.मज. व सी. { श. १५९३ कार्तीक शु. १५ इ. १६७१ नोवें. ६

अज दि० पर० वाई——ता मोक० मौ० पसणी, एकसर, ओझर्डे.

नारायणभट बिन गोपिनाथभट चित्राव यांस वरील गांवीं १ चावर ३२ बिघे जमीन पूर्वीपासून इनाम आहे. ती त्यांजकडे चालविणें.

फॅ. रे. संकीर्ण भा.२ } पृ. १५८, १५९ इ. } (१४२८) सुरत-कंपनी. { श. १५९३ कार्तीक व. १ इ. १६७१ नोवें. ७

कारवारच्या बाजूला पोवळ्याच्या विक्रीचें मुख्य ठिकाण शिवाजीनें उध्वस्त केलें.

**मि. उस्टिक** आतां शिवाजीशीं तह करण्याच्या कामगिरीवर नेमिला आहे. त्याची आपण शिफारस करावी हें योग्य आहे.

ओ. कॉ. भा. ३२ } (१४२९) { श. १५९३ कार्तीक व. १
नं. ३५९४ इ. } सुरत–कंपनी { इ. १६७१ नोव्हें. ७

पोचळ्याचे मुख्य बाजार शिवाजीनें उध्वस्त केल्यामुळें धाऊक खरेदी थांबली. किरकोळीचाच व्यवहार वाढविला पाहिजे. शिवाजी राजापुरास पुनः बोलावीत आहे. लवकरच त्याच्याशीं तह होऊन त्याचें कर्ज वगैरे व्यवहारांचा उलगडा होईल.

[दि] शिवाजी सुरतेवर फिरून येणार आहे, या बातमीमुळें सुभेदारानें विशेष अडथळा न केल्यास प्रेसिडेंट मुंबईकडे जाऊं इच्छितो.

फॅ. रे. सुरत भा. ८७ } (१४३०) { श. १५९३ कार्तीक व. १
पृ. ४ इ. } स्वाली–मुंबई. { इ. १६७१ नोव्हें. ७

शिवाजीकरितां मूल्यवान नजराणा 'लंडन' गलबतांतून पाठविला आहे. त्यांपैकीं पसंत करून उस्टिकबरोबर पाठवून द्यावा. आपल्या कामाचा निकाल होईपर्यंत नजराणा देऊं नये....नजराणा घेऊन शिवाजीनें निकाल केला नाहीं; तर कंपनीचा तोटा होऊन कंपनीच्या नांवाला कमीपणा येतो तें निराळेंच.......

ओ. कॉ. भा. ३२ } (१४३१) { श. १५९३ कार्तीक व. २
नं. ३५९९ इ. } मुंबई–सुरत { इ. १६७१ नोव्हें. ८

शिवाजीचा वकील तह करण्यासाठीं आला असून कसेंहि करून, फकीर म्हणून का होईना, सुरतेला जाण्याला उत्सुक आहे. त्याच्याकडून शिवाजीचें म्हणणें समजून घेऊन त्याच्याच अत्याग्रहावरून हें पत्र घेऊन लेखक राम शेणवी यास पाठविला आहे. तह करण्यांत शिवाजीचा मुख्य हेतु दंडाराजपूर-प्रकरणीं गुप्त मदत मिळविणें हाच आहे. शिवाजीकरितां ३१४ मोठ्या तोफा देण्याचें तुम्हीं ठरविल्यास त्या पोर्तुगीजां-कडून विकत घेवविण्याची शिवाजीची तयारी आहे. तसें झाल्यानें आमचें नांवच निघणार नाहीं.

मुंबई बेटासमोरील शिवाजीच्या मुलुखातील (तो जें देऊं करतो) तें ठिकाण व्यापाराच्या दृष्टीनें फार किफायतशीर होईल, असें गिरिधर सांगतो. त्या मार्गानें दख्खनमधील सर्व माल हलक्या जकातीनें मिळेल. एक वर्ष इतर ठिकाणापेक्षां महागाईनें खरेदी करावी लागली तरी लवकरच त्या ठिकाणीं सर्व बाजूंनें माल येऊं लागल्यावर नफा राहील. राम शेणवी जरूर तो खुलासा करील. त्याला लवकर परत पाठवून द्यावा.

शिवाजीच्या मुलखांतून मिळणाऱ्या लांकडाची आपल्याला अत्यंत जरूर आहे. हें शिवाजीला समजत असल्यामुळें त्याचीं मिठाचीं गलबतें आम्हीं धरूं किंवा त्याच्याशीं असलेला सलोखा मोडूं, अशी त्याला भीतीच वाटत नाहीं. [फॅ. रे. सुरत, भा. १०६ पृ. ३२–३३ वर हेंच पत्र आलें आहे.]

फॅ. रे. सुरत मा. ८७
पृ. ७–९ इ.

(१४३२)
सुरत–मुंबई.

श. १५९३ मार्ग. शु. ९
इ. १६७१ नोवें. ३०

**राम शेणवी** ८ तारखेचें पत्र घेऊन आला. त्याचे मार्फत शिवाजीचे तहाबद्दल कळलेली माहिती इतकी संशयित आणि गोत्यांत पाडणारी आहे कीं, शिवाजीशीं तह करावा कीं नाहीं हा प्रश्न आम्हीं विचारांत घेतला. तेव्हां उस्टिक व राम शेणवी ह्यांनीं बोलणें करण्याकरितां जावें; परंतु **राजापूर-प्रकरणीं भरपाई** हा पाया समजून पुढें काय तें बोलावें; असें वाटतें. समुद्रकिनारीं जागा देऊन किल्ला बांधून देण्याचें त्याचें बोलणें म्हणजे केवळ पोकळ आशा दाखविणें आहे. मुंबईच्या इतक्या जवळ दुसरें बंदर उभारलें असतां मुंबईची वाढ होण्याची खुंटेल. किल्ला बांधून नवी वसाहत करणें ही बाब फार खर्चाची ठरून त्यामुळें मालहि महाग होईल. कांहीं कालांतरानें नफा राहील अशी कल्पना केली तथापि त्याच्या बंदराशिवायच इतकीं वर्षें गेलीं तशींच आणखी कित्येक वर्षें आम्हीं राहूं शकूं, असेंच त्याला आज भासविण्याची काळजी घेतली पाहिजे. तुमची दुसरी चूक म्हटली म्हणजे लाकडाबद्दल परस्वाधीनपणाची फार कल्पना घेऊन बसलां आहां ही होय. दुसरीकडे लाकूड सहज मिळेल. तात्पर्य, ह्या सर्व मुलखांत **अत्यंत धोरणी व सुतानें स्वर्गाला जाणाऱ्या लोकांशीं** तुम्हांला प्रसंग पडला आहे. तुमच्याच तोंडून ऐकलेल्या गोष्टींचा ते फायदा घेतात. करितां कोणतीहि गोष्ट सावधगिरीनें बोलण्याची विशेषतः उस्टिकनें खबरदारी घ्यावी.

पूर्वी शिवाजीचा नजराणा तह होण्यापूर्वी देऊं नये असें लिहिलें होतें. परंतु त्याचा मानी स्वभाव आणि अलीकडे त्याला येत असलेलें यश पाहिलें म्हणजे त्याला आधीं नजराणा न दिला तर आपला अपमान झाला असें त्याला वाटेल; म्हणून उस्टिकनें **नजराणा आधींच गेल्याबरोबर द्यावा.** त्या योगानें त्याला आमच्या प्रांजलपणाची व मित्रत्वाची कल्पना येईल. शिवाजी अनुकूल दिसला तर राजापूरच्या भरपाईचा प्रश्न एकदां कायमचा निकालांत काढल्याशिवाय उस्टिकनें तेथून हालूं नये. तसेंच २ टक्के जकात देऊन सर्व देशांत व बंदरांत मोकळेपणानें व्यापार करण्याचा कौल किंवा परवाना मिळवावा. इतर राजांनीं मान्य केलेल्या कलमांप्रमाणें त्याच्याकडूनहि व्यापाराबद्दल कलमें सही करून घ्यावीं. परंतु कांहींच न जमेल तर सलोख्यानें रजा घेऊन परत यावें. तुम्हींहि कांहीं झालें तरी सलोख्याची वागणूक सोडूं नये.

राम शेणव्यानें आणिलेल्या मालाच्या याद्या पाहिल्या. त्यांत सुरतेला लुटलेला माल आहे. त्याचा व्यापार कंपनीनें करूं नये. परंतु शिवाजीजवळ रोख पैसा नसेल तर भरपाईदाखल माल दिला तरी उस्टिकनें तो स्वीकारावा. मात्र किंमती फुगवून लावल्या न जातील याबद्दल जपावें.

सं. ८ ले. २७ } (१४३३) { श. १५९३ मार्ग. व. २
सु. १०७२ साबान १४ } { इ. १६७१ डिसें. ६

रा. शिवाजी राजे——नरहरी आनंदराऊ सरसुमेदार ता। कुडाळ प्रति दंडवत साहेबी प्रभावळी पासून तहद कल्याण–भिवंडी पावेतों मिठाचा जबर निरखाचा तह दिल्हा आहे. ऐसीयासी, बारदेशात मीठ बंदरें आहेत तेथून मीठ खरीद करून उदमी नेत आहेत. ऐसीयासी, हालीं आपणाकडे मिठाचा पाड जबर जाला, हे गोष्टी ऐकोन उदमी खळक कूल बारदेशाकडे जातील. तरी तुम्ही घाटीं जकाती जबर बैसवणें. बारदेशांत मीठ विकतें त्याचा हिशेबें, प्रभावळीकडे संगमेश्वराकडे मीठ विकतें, त्याणें कितेक जबर पडतें, तें मनास आणून त्या अजमासें जकाती जबर बैसवणें; कीं संगमेश्वरीं विकतें आणि घाट पावेतों जे बेरीज पडेल त्या हिशेबें बारदेशीच्या मिठास जकाती घेवणें. संगमेश्वराहून बारदेशींचें मीठ महागच पडे ऐसा जकातीचा तह देणें. जरी जबर जकातीचा तह नेदा, मुलाहिजा कराल, म्हणजे कुल उदमी बारदेशाकडे वोहडेल. आपली कुल बंदरें पडतील. ऐसी गोष्टी आहे. तरी रोखा पावेल तेच घटिकेस कुल घाटीं जकातीं जबर करणें. संगमेश्वराहून बारदेशीच्या मिठास जबर निरख पडे ती गोष्ट करणें. ये गोष्टीचा एक जरा उजूर न करणें.ये गोष्टींत साहेबाचा बहुत फायदा आहे.जरी जबर किंमती केली आहे त्या हिशेबें बारदेशीच्या मिठास जबरच पडे ती गोष्ट करणें, व तुम्हांकडे लहान मीठ आहे त्याचा तह आहे त्यालेरीज हाली जाजती दर मणें टंकसाळी रुके ·। बारा रास प्रमाणें तह देणें. मुलाहिजा न करणें. मिठाचा मामला हजराहीबदल कर्द लाख रुपये यावयाचा मामला आहे. तरी लिहिलेप्रमाणें अमल करणें. या कामाबदल पाठविले असती त्यासी मसाला होन नि॥ ४ रामाजी बांदे हरकारा रा होन; नि ॥ ३ संताजी गिरजोजी अपातप होन १ पाठवले असत यांसी मसाला होन नि॥ ४ होन पा॥ कुडाळपैकीं रास आदा करणें पा॥ हुजूर ( मर्यादेयं विराजते )

फॅ. रे. सुरत भा. १०६ } (१४३४) { श. १५९३ मार्ग. व. १०
पृ. ५६ इ. } मुंबई–सुरत. { इ. १६७१ डिसेंबर १५

शिवाजीचे तहाबद्दल आपल्या आज्ञेप्रमाणें वागावयाचें. परंतु शिवाजींचे वकिलानें येथें ६ हजार रु.चें कापड, तह चालू राखण्याचा बहाणा करून विक्रीकरितां आणिलें. आम्ही सामोपचारानें न वागल्यास शिवाजी त्याला परत पाठविणार नाहीं असें तो म्हणतो. शिवाय तो म्हणेल त्या किंमतीला आम्हीं कापड घेतलें नाहीं तर ' आपण उस्टिकबरोबर जाणारच नाहीं. ' असाहि रागानें आग्रह धरतो. आपला धनी कोठें गेला हें त्याला माहीत नाहीं, एवढेंच नव्हे तर आम्हांलाहि कांहीं तपास लागत नाहीं. तेव्हां उस्टिकला लवकर पाठवून फायदा नाहीं. 'आम्हीं तुमच्या इच्छेप्रमाणें वकील पाठवीत आहों' असें पूर्वी लिहिलें आहे त्याचें उत्तर आल्याशिवाय त्याला कशाला पाठवा ?

आम्हांला ( शिवाजीकडून न मिळाल्यास ) सर्पणाची अडचण पडेल असें त्यांचे वकिलानें ध्वनित केलें. त्यावरोवर आम्हीं तें कसें आणि कोठून आणूं तें सडेतोड उत्तर देऊन त्याला सांगितलें. मात्र किनाऱ्यावर बंदराकरितां जागा देतों असें तो बोलला. परंतु त्यावर आम्हीं कांहींच मत दिलें नाहीं. तुमचें लिहून येईल त्याप्रमाणें सांगूं. उस्टिक जाईल तेव्हां त्याचेबरोबर **शिवाजीकरितां चांगला नजराणा** ( तुम्हीं लंडन गलबतानें पाठविलेल्या जिन्नसांतून ) पाठवून देऊं.

रु. ३ ले. १७ } (१४३५) { श. १५९३ पौष शु. २
सु. १०७२ रम १ }        { इ. १६७१ डिसें. २३

काटकर मोक. मौ. सुपें खुर्द— रा. शंकराजी नीलकंठराऊ मोक. सुपे खुर्द

मोगलापासून मुलुख साहेबी घेतले. मोवताला मुलुख जाळिला. तुम्ही परागंदा जाला. तीन वरिसे गेलियावर तुम्ही ठाणियास गेलेस आपण तुमची तरफ तुमचे सांभाळी केली. तरी आपला इकलाजिमा घेणें.

फॅ. रे. सुरत भा. ८७ } (१४३६) { श. १५९३ पौष शु. १२
पृ. १४ इ. } सुरत–मुंबई { इ. १६७२ जाने. १

तुमचें गेल्या महिन्याच्या १५ तारखेचें पत्र २७ ला पोंचलें. त्यावरून **शिवाजीचे वकिलानें** आणिलेला ६००० रु. चा माल (कापड, पहा ले. १४३४ ) तुम्हीं घेणार नाहीं हें कळल्यानें त्याला विशेष खेद झाल्याचें समजलें. तो माल कंपनीनें वापरणें योग्य नसल्यामुळें विकत घेण्याची जबाबदारी आम्हीं घेऊं शकत नाहीं. आणि याकरितां, त्याच्या संतापाला न जुमानितां तुम्हीं तो घेण्याचें नाकारलें हें चांगलें केलें. वकील **उस्टीक** बरोबर जाण्याचें साफ नाकारीत असेल तर त्याला एकट्यालाच जाऊं दे. त्या निमित्तानें तरी **शिवाजी** आपल्या दौऱ्यावरून परतून कोणत्या तरी किल्यावर येऊन राहिल्याचें निश्चित कळेल.

रास. अं. ९८ } (१४३७) { श. १५९३ पौष व. ६ व माघ शु. १५
पृ. १३ } उल्लेख { इ. १६७२ जाने. १० व फेब्रु. २

रामराऊ सुभेदार नामजाद माहालानिहाय– कारकून मसूर

बरहुकूम मिसेली **शाहाजी राजे मरहुमी** व **येकोजी** राजे चालत आले आहे.

फॅ. रे. सुरत भा. ८७ } (१४३८) { श. १५९३ पौष व. ९
पृ. १६ इ. } सुरत (स्वाली)— मुंबई { इ. १६७२ जाने. १३

बादशहानें बंदराचे रक्षणाकरितां नव्या सुभेदारा(**घास्तीखान**) बरोबर कांहीं सैन्य पाठविलें आणि **शिवाजीचें** सैन्य इकडे येण्याची कांहीं गडबड नव्हती; यामुळें

आम्हीं या गलबतावर बहुतेक शिपाई रवाना करून फक्त एक तुकडी राखून ठेविली. सर्व संकटांतून पार पडल्याचें दिसूं लागतांच त्यांनाहि पाठवून देऊं. [परंतु थोड्याच दिवसांत शिवाजीचे आगमनाची हूल उठून बंदोबस्त करणें इष्ट वाटलें— पहा सुरत कन्सल्टेशन, फॅ. रे. संकीर्ण, भा. २ पृ. १२१ तारीख १६७२ जाने. २५]

फॅ. रे. सुरत भा. १०६ } (१४३९) { श. १५९३ पौष व. ९
पृ. ६२ इ. } मुंबई-सुरत { इ. १६७२ जाने. १३

[ऑर्म- भा.११४ पृ.'९] **उस्टीक** सोमवारीं सकाळीं मिघेल. शिवाजीच्या वकिलाला त्याच्या मालाच्या तारणावर ४० महिन्यांनीं देण्याच्या मुदतीनें १५०० रु. दिल्यामुळें तो अखेरीला खूष झाला. राम शेणव्यानें 'आपण प्रेसिडेंटजवळ ही गोष्ट बोलतांच प्रेसि०नें मान्यता दिली' असें सांगितल्यामुळें आम्हीं असें केलें.

**शिवाजी** चौलपासून ४० मैलांचे आंत **महाडास** असून त्याच्यापाशीं त्याच्या राज्यांतील, **कुडाळ, सिंहगड** इत्यादि सर्व लांबच्या ठिकाणांहूनहि सैन्य जमा झालें आहे. त्याचें कारण असें सांगतात कीं, **दिलेरखानानें** त्वरेनें स्वारी करून पुणें-चाकण घेतलें. व तेथें त्यानें ९ वर्षां वरील वयाच्या सर्वांची **कत्तल** केली !! डेप्युटी गव्हर्नरच्या माहितीप्रमाणें **पुणें चाकण** हें महत्वाचें ठाणें शिवाजीच्या मुलखाच्या मध्यमार्गी एका विस्तृत मैदानांत आहे.

खं. २० ले. १९९ } (१४४०) { श. १५९३ पौष
पृ. ३०३ सु. १०७२ } { इ. १६७१ डिसें.-७२ जाने.

अज. माहाल कल्याण व ता अंबरनाथ-

त्रिंबकजी राजे पाटेल देस.ख अधि. व. देसपां. वगैरे.

पंत पेशवे, मुजुमदार आणि सुम्याचे खुर्दखत याप्रमाणें उक्त महालाचे कुलकर्ण आपले हवाली केलें आहे.

फॅ. रे. सुरत भा. १०६ } (१४४१) { श. १५९३ माघ शु. १
पृ. ६५ इ. } मुंबई-सुरत { इ. १६७२ जानेवारी २०

मागच्या पत्रांत **उस्टिक** पुढच्या सोमवारीं (२३ जानेवारी) निघणार असें लिहिलें होतें. परंतु पर्वा **अण्णाजीकडून** पत्र आलें त्यावरून **शिवाजी** सध्या कार्यव्यग्र असून त्याचेकडून पुनः लिहून येईपर्यंत उस्टिकनें जाऊं नये असें दिसतें. झाडून सगळे किल्ल्यांवरील शिबंदी एकत्र करून त्यानें मोठें सैन्य जमा केलें आहे. **दिले-रखानाला** परतावून लावण्याचा तो प्रयत्न करून पहाणार आहे. दिलीरखान, बहादरखान व मोहबतखान यांनीं **पुणें, चाकण** घेतलें; शिवाजीचा सेनापती **कडतोजी** गुजर याचा वध केला[?] व सर्वत्र तरवार व आग चालविली. तेथून त्यांना हुसकून लावण्याचा त्याचा विचार आहे.

दुसरी अशी विश्वसनीय बातमी आहे, कीं, दख्खनकडून फाजल अबदलखान व खवासखान सैन्य घेऊन त्याचेवर येत आहेत. असें असेल तर शिवाजीचे घडे भरले असें म्हटलें पाहिजे. **फाजलखान** उत्तम सेनापती आहे. एवढेंच नव्हे तर तो शिवाजीचा कट्टा दुष्मन आहे! कारण बरेच वर्षांपूर्वी शिवाजीनें त्याच्या बापाला मारलें. [ ऑर्मे भा. ११४ पृ. १२ ].

फॅ. रे. सुरत, मा. ८७ पृ. १९ इ.

(१४४२) सुरत–मुंबई

श. १५९३ माघ शु. १० इ. १६७२ जाने. २९

तुमचें ११ तारखेचें पत्र २३ ला पोंचलें. त्यावरून **शिवाजीनें** आपलें सर्व सैन्य एकत्र जमा केलें हें समजलें. ह्या चार दिवसांत त्याचें कांहीं सैन्य **रामनगरला** आल्यामुळें आम्हीं भीतिग्रस्त झालों आहों. तें सैन्य अजून तेथेंच असून हाललें नाहीं. यापुढें कोठें जाणार हेंहि समजलें नाहीं. सुभेदार व सर्व नगरवासी लोक भेदरून गेले आहेत. तो आम्हांला त्रास देणार नाहीं असें जरी आम्हांला वाटत असलें, तथापि आमच्याकडून आम्हीं तयारी ठेविली आहे.

ओ. कॉ. मा. ३२ नं. ३६२४ इ.

(१४४३) सुरत–कंपनी

श. १५९३ माघ व. १ इ. १६७२ फेब्रु. ३

प्रेसिडेंटनें सुभेदाराची परवानगी घेऊन मुंबईस निघण्याची तयारी केली. इतक्यांत १५००० सैन्य घेऊन **शिवाजी जवळ आल्याची बातमी** आली. नव्या सुभेदारानें विशेष खबरदारी घेऊन कोटाचे बाहेरील घरें शत्रूला आश्रयस्थानासारखीं उपयोगी पडत तीं जमीनदोस्त करून शहरांतील पळ्यांनीं बाहेर जाऊ नये म्हणून दरवाज्यांवर पहारे ठेविले. या वेळच्या विशेष परिस्थितींत प्रेसिडेंटनें सुरत सोडल्यास आपल्यास त्याबद्दल जाब देणें कठीण जाईल आणि बादशहालाहि त्याचें वैषम्य वाटेल; असा सुभेदाराकडून सामोपचाराचा निरोप आल्यामुळें व कंपनीच्या मालमत्तेच्या रक्षणाची जबाबदारी जाणून प्रेसिडेंटनें त्याचें म्हणणें मान्य केलें. [दि]–ह्या कारणांनीं गेलीं दोन वर्षे मुंबईला जातां आलें नाहीं. करितां, एकंदरींत विचार करून पहातां, तुम्हीं कारभाराचें मुख्य ठिकाण तुमच्या मालकीच्या मुंबई बेटांत करावें असा आमचा सल्ला आहे.

ऑर्मे. भा. ११४ पृ. १४ इ.

(१४४४) मुंबई–सुरत.

श. १५९३ माघ व. ३ इ. १६७२ फेब्रु. ५

तुम्हीं एक ड्रम [ युध्दांतील नगारा ] व तें वाजविणारा मागितला आहे. परंतु तुम्हांला त्याची जरूर लागेल असें वाटत नाहीं. कारण **शिवाजीला ह्याच बाजूला भरपूर उद्योग आहेत.**

आम्हीं प्रेसिडेंटच्या आगमनाची वाट पहात आहोंत. सुभेदाराची नाखुषी किंवा शिवाजीच्या सैन्याची भीती, यांपैकीं कोणत्याहि कारणाकरितां तो (सुरतेसच) थांबणार नाहीं अशी उमेद आहे.

सा. ले. १३२
श. सु. १०७२
(१४४५)
श. १५९३ माघ व.१०
इ. १६७२ फेब्रु. १३

बालाजी त्रिमल व हरि विश्वनाथ कुल० व ज्यो. प्रा सिरवळ व वाइ

यमाजी रंगनाथ बोकील

आपली वायदेसची मिरासी बहुत दिवस गेली. त्यांपैकीं निमे आपण साधिली. पंताजीपंत यांस नेम केला होता कीं, निमेवरी साधिल्या निमे गाव देऊ. पंताजीपंत नाकबूल गेले. आपण मान्य केले. तरी आपणास येलके गावची अर्धी वृत्ती दिली आहे.

सा. ले. १३३
श.
(१४४६)
मान्यतापत्र
श. १५९३ माघ व १०
इ. १६७२ फेब्रु. १३

मल्हारजी येशवंतराऊ देशमु० व माहादाजी राम देसकु. प्रा सिरवळ

यमाजी रंगनाथ बोकील

ले. १४४५ चे पत्रांतील मजकूर आम्हास मान्य आहे.

फॅ. रे. सुरत मा. ८७
पृ. २१-२२ ई.
(१४४७)
मॅथ्यू ग्रे (स्वाली)-मुंबई
श. १५९३ माघ व. १२
इ. १६७२ फेब्रु. १५

सुरतेहून भीतीची बातमी आल्यामुळें प्रेसिडेंट सुरतेला गेला. स्वराज्यांतच **शिवाजीला** भरपूर व्यवधानें आहेत, असें जरी तुमच्या ५ तारखेच्या पत्रांत लिहिलें आहे; तथापि तो आपले हात दूरवर पसरतांना दिसतो. त्याच्या बरोबर एक आणि शिवाय बादशाही मुलखांत एक; अशीं त्याचीं दोन मोठीं सैन्यें संचार करीत आहेत. **सालेरीला** वेढा घालणाऱ्या **दिलीलखानाच्या** सैन्याचा मोड करून त्या किल्ल्याचा त्यानें चांगला बंदोबस्त केला. दुसऱ्या एका लढाईंत त्यानें **बहलोलखानाला** ठार मारून **सालेरींत** सुमारें ३० मोठे अमलदार कैदेंत ठेविले आहेत. आतां त्यानें **मुल्हेर** घेतलें हें निश्चित असून सुरतेचा मार्ग ताब्यांत असल्यामुळें तो केव्हांहि सुरतेला येऊं शकेल. मध्यरात्रींच तो सुरतेपासून २५ मैलांवर आल्याची बातमी आली. ती खरी असल्याचें दिसतें. कारण पूर्वी व्यापाऱ्यांना दरवाजांतून बाहेर न सोडणारा सुभेदार आतां त्यांना आपली बायकामुलें व संपत्ति सुरक्षित ठिकाणीं नेण्यास परवानगी देत आहे.

वरचेवर येणाऱ्या हुलींमुळें प्रेसिडेंट मुंबईला येऊं शकला नाहीं. पावसाळ्यापूर्वी बहुधा येईल.

ऑर्मे भा. ११४ } (१४४८) { श. १५९३ माघ व. १३
पृ. १५ इ. } मुंबई-सुरत ( गॅरी ? ) { इ. १६७२ फेब्रु. १६

इंग्रजांचें एक हॉय ( गलवत ) शिवाजीच्या **राजापूरच्या** सुभेदारांनीं धरून त्यावरील **स्पॅरी** आदिकरून लोकांना कैद करून ठेविलें. पुढें शिवाजीच्या हुकुमानें त्यांनीं कैदी मुक्त केले व गलबताबद्दल २५० होन दिले. यामुळें पूर्वीचा ( हल्लाचा ) बेत बदलून गलबताच्या किमती वगैरे ठरविण्याकरितां **राम शेणव्याच्या भावाला** (नारायण शेणवी) सुभेदाराकडे पाठविलें. आणि ॲडर्टननें आपल्या बोटी घेऊन पळालेल्या मलवान्यांचा पाठलाग करावा असा त्याला बदलून हुकूम दिला.

फॅ. रे. सुरत भा. १०६ } (१४४९) { श. १५९३ माघ व. १३
पृ. ७० इ. } मुंबई-सुरत. { इ. १६७२ फेब्रु. १६

साल्हेर-मुल्हेरमध्यें ताज्या दमाचें सैन्य व सामुग्री यांची भरती करून **शिवाजी** परत फिरला आहे. त्याच्या बरोबरच्या सैन्याचीच सुरतेला भीती बाटली असेल! [ ऑर्मे भा. ११४ पृ. १६ ]

फॅ. रे. संकीर्ण भा. २ } (१४५०) { श. १५९३ फाल्गुन शु. ४
पृ. १३८ इ. } मुंबई कन्सल्टेशन { इ. १६७२ फेब्रु. २२

**शिवाजीनें** वकील पाठवून राजापूरच्या नुकसानभरपाईच्या बाबतींत बोलणें करण्यासाठीं आम्हीं वकील पाठवावा अशी इच्छा दर्शविली. पूर्वीच विनंति केल्यावरून 'शिवाजीच्या नजराण्याकडे ७०० रु. खर्च व्हावे व **उस्टिकनें वकील** म्हणून जावें; शिवाजीला खुद्द ६०० रु. चा व अंमलदार, नोकर वगैरेकडे १५० रु. चा नजराणा उस्टिकनें सारासार विचार करून द्यावा; त्याचेबरोबर १० भंडारी, २ युरोपिअन लोक, घोड्यांची एक जोडी आणि पालखीचे भोई, इतका लवाजमा व रोकड २०० रुपये असा सरंजाम द्यावा' असा प्रेसिडेंटचा हुकूम आला. इ०

फॅ. रे. सुरत, भा. ८७ } (१४५१) { श. १५९३ फाल्गुन शु. १३
पृ. २३ इ. } सुरत-मुंबई. { इ. १६७२ मार्च १

**उस्टिक शिवाजीकडे** जाण्याबद्दल शक्य तितका गुप्तपणा राखावा. राजापूरच्या नुकसान-भरपाईबद्दल व गलबताच्या भरपाईबद्दल फक्त बोलणें करण्यास तो जात आहे एवढेंच उघड जाहीर करावें. नाहींतर बादशाही अमलदारांना संशय येऊन आमचें नुकसान होईल.

ऑर्म मा. ११४ } (१४५२) { श. १५९३ फाल्गुन व. २
पृ. १७ इ. } मुंबई-सुरत. { इ. १६७२ मार्च ५

शिवाजीच्या वकिलाबरोबर उस्टिक उद्यां निघणार. नजराणा व ह्या शिष्टाईचा एकंदर खर्च मिळून सुमारें १००० रुपये येईल.

मलबाऱ्यांचें ७० टनांचें एक मरलेलें गलबत ॲडर्टननें पकडलें. तें राजापूरच्या **बंदरांत धरलें**, या सबबीवर **राजापूरच्या** सुभेदारानें मागितलें. परंतु त्याची वाटणी केली पाहिजे असें ठरून त्याची (इंग्रजांची) वाटणी देण्याच्या मोबदल्यांत त्यांचें पूर्वी घेतलेलें हॉय (गलबत) व माल देण्यास सुभेदार कबूल झाला. परंतु दुरुस्तीकरितां नेल्यामुळें हॉय खराब होऊन गेलें आणि मालांपैकी बराचसा सुभे०नें लांबविला वगैरे कळल्यामुळें, मलबाऱ्यांचें ७० टनी गलबत (सुभेदारास न देतां) घेऊन येण्याचा हुकूम आम्हीं दिला....शिवाजी रायरीला (Recir ?) आहे. 'दिलीरखानाजवळ निदान ६० ह. घोडे असल्यामुळें शिवाजी त्याच्या वाटेस जाऊं शकत नाहीं !' असें शिवाजीचा वकील म्हणतो. हा वकील कालच **कल्याण**हून आला. परंतु **मुल्हेर**बद्दलची निश्चित बातमी कळली नाहीं.

फॅ. रे. सुरत मा. १०६ } (१४५३) { श. १५९३ फाल्गुन व. ९
पृ. ७३-७४ इ. } मुंबई-सुरत. { इ. १६७२ मार्च १३

कंपनीच्या नोकरांकरितां व इतरांकरितां घरें बांधावीत हें आपलें म्हणणें कळलें. परंतु **शिवाजीनें** आपल्या मुलखांत बांधकाम जबर रोज देऊन सुरू ठेविल्यामुळें आमचेकडील कामगार त्याचेकडे पळून जातात. **खंदकाचें चालू** असलेलें काम पावसाळ्याच्या आंत पुरें न झाल्यास पडून जाईल. **राम सेणवी** याचीं बाजारांत अकरा बारा सुंदर दुकानें आहेत, शिवाय **मोदीचें**, मोठ्या खोल्या असलेलें कौलारू घर आहे. हीं जरूरीचे वेळीं मिळतील. पावसाळ्यांत पूर्वतयारी करून ठेविल्यास सप्टेंबरमध्यें बांधण्याची तयारी होईल.

**शिवाजीचें खडें सैन्य कल्याणचे वर, खालीं, बाजूला, असें नेहमींच असतें.** याकरितां पुढची भिंत अगदीं ठेंगू आहे ती चढविली पाहिजे. यशामुळें त्याला उत्तेजन येऊन आमचे किल्ल्यावर त्याचा डोळा राहील....ले. उस्टिक १० तारखेला गेला. शिवाजीकडून आलेला इसम नेहमींच आपण वकिलाचें काम केलें असें म्हणतो; परंतु त्याला देखील उस्टिक झालेल्या नुकसानीची भरपाई मागण्याशिवाय दुसऱ्या कोणत्या कामाकरितां जात आहे हें समजणार नाहीं(!)... वसई व कल्याण-भिवंडी येथें आम्हीं चौकशी करूं. वसई येथें एकादें गलबत [पहा. ऑर्म ११४ पृ. २१] मिळालें किंवा कल्याण भिवंडीला बांधतां आलें तरी आपलें काम झालें ! [ऑर्म मा. ११४ पृ. १८-१९].

ओ. कॉ. भा. ३२ }
-नं. ३५९३ इ. }

(१४५४)
डच गव्ह. जन.—डच ई. इं. कंपनी

{ श. १५९३-९४
{ इ. १६७१

वार्षिक वृत्तांतातील अवतरण:——

मोंगलांची फौज रणांगणांत उतरल्यामुळें कांहीं अंशीं **शिवाजीचा** त्रास व दंगा थोडा थंडावला आहे. परंतु विश्वास येत नाहीं. याचें कारण असें कीं, तो अत्यंत लबाड असून, दरबारांतील सर्वांत बड्या राजपुत्राशीं त्याचें सूत असल्यामुळें त्यांचे विचार आणि बेत हे सर्व त्याला कळून त्याप्रमाणें तो वागणूक करतो.

इ. वृ. १८३५ पृ. ५५ }
-सु. १०७२ }

(१४५५)
सनद

{ श. १५९३
{ इ. १६७१-७२

सिवाजी राजे साहेब दाम दौलतहू × × ×

कारकून... देशमु. व देसपां. व मोक. क. रयानी प्रांत चाकण

श्री ज्ञानदेव याचे इनाम मौजे आलंदी प्रगणे मारी सालाबाद जिा जमीन मुऱ्ही सेत सवा दीडसे कारवे खंडी १।२॥ येक खंडी अडीच मण देवाचे देवास दिघले असे कुलबाब कुलकानु दुमाले केले असे. दुमाला करणे. यासी काडीचा तोसीस न लावणे. खलकरी अगर कोण्ही इस्की न करणे. सदरहू खलबाद + + वेणें. देवाचे देवास चालवणे. साल दर साल चालवीत जाणे ताजा खुर्दखताचा उजूर न करणें. श्री रामानंद गोसावी तपस्वी यापाशी खत देणें.

खंड ८ ले. २१ }
-सु. १०७२ }

(१४५६)
तह-'प्रतिपच्चंद्र लेखेव.'

{ श. १५९३
{ इ. १६७१-७२

जाविता तह. राजश्री साहेबी तह केला कीं:—जो आपला वतन मुल्क आहे त्यापैकीं माहालोमाहालींहून खजाना करावयास पैके आणावे. त्याचा खजानाच करून ठेवावा. जे वख्तीं मोंगलांशीं झगडा सुरू होईल आणि मोगल येऊन गडांस वेढा घालतील, त्याचे मदतीस जरूर; आणिकी करून ऐवज जुडेना तरीच खजानाचे पैके खर्च करावे. नाहीं तरी एन्हवीं राज्यभागास सर्वहि खर्च न करावा. ऐसा साहेबीं तह केला असे. आणि खजाना करावयाची मोईन केली होन:—

१,२५००० (पैकीं) मा। एक लाख पंचवीस हजार होन रास. २०००० प्रत्येकीं—कुडाळ, राजापूर, कोल्हें; १५००० दामोळ, १३००० पुणें, १०००, नागोजी गोविंद. ५००० प्रत्येकीं जाउली, कल्याण, भिवंडी, इंदापूर, व कृष्णाजी भास्कर; २००० सुपें, १,२५००० येणेंप्रमाणें एक लाख पंचवीस हजार होन खजाना करावयाचा तह केला असे. मोर्तब सूद. म. वि.

खं. १५ ले. १३० }
सु. १०७२ }
(१४५७)
दोषशुद्धि
{ श. १५९३
{ इ. १६७१-७२

दसनाम मानभावांची निंब येथें समा जाली. मठींचे कुणबीण बुद्धी हिनें जीव दिला म्हणून मठपती दोषी होते. भंडारा घेऊन मठपतीस मोकळीक केले.

खं. ८ ले. २३ }
सु. १०७२ }
(१४५८)
बक्षीसपत्र
{ श. १५९३
{ इ. १६७१-७२

शिवाजीराजे

साहेब अगराहून निघालेया उपरी चिरं. रा. संभाजी राजे यांस राजश्री कृष्णाजी विश्वासराऊ यांचे सांमाळी केले. मानइले चिरंजीवास सुखरूप किल्ले राजगडास घेऊन आले. मानइलेची मातुःश्री आईजी + बंदिली. मा। काशी त्रिमळ हेहि बरोबरी आलियाबद्दल मेहेरबानींनें बक्षीस द्यावयाचा तह मो। पंनास हजार रुपये रास मा। काशी त्रिमळ २५००० व मातुश्री आईजी २५००० येणेप्रमाणें पाववावे. मो. सू.

खं. ८ ले. २२ }
सु. १०७२ }
(१४५९)
तह 'प्रतिपच्चंद्र लेखेव.'
{ श. १५९३
{ इ. १६७१-७२

जाबिता तह इमारती करणें. सन इसन्नेकारणें इमारती करावयाचा तह केला असें कीं, गवाल हुलरवंद लावून पैका पावत नाहीं. हुलरवंद गवगवा करितां काम करीत नाहींत. याबद्दल तह केला कीं, नेमस्तच इमारती करावी—होन. १,७५००० मा। एकलाख पंचाहत्तर हजार होन रास. ५०००० रायगड, ३५००० दि॥ घेरें, २०००० तळीं २ प्रत्येकी १००००, गच्ची ५०००; —किल्ले, १५०००; तट १०००० प्रत्येकीं-- सिंहगड, सिंधुदुर्ग, विजयदुर्ग, सुवर्णदुर्ग, प्रतापगड, पुरंधर, राजगड. ५००० प्रत्येकीं प्रचंडगड = तोरणा, प्रसिद्धगड, विशाळगड, महिमतगड, सुधागड, लोहगड, सबळगड, श्रीवर्धनगड व मनरंजन. ३००० कोरीगड, २००० सारसगड व महिधरगड, १००० मनोहरगड, ७००० किरकोळ. एकूण १,७५०००.

येणेंप्रमाणें एक लाख पंचाहत्तर हजार होन खर्च करणें. मोर्तब सूद. दस्तुर राजश्री पंत म्हणून संग्रह केला. ( मर्यादेयं विराजते. )

सा. ले. २५३ }
सु. १०७२ }
(१४६०)
कौलनामा
{ श. १५९३
{ इ. १६७१-७२

अजर. रा. शिवाजीराजे साहेब दामदौलतहू — म. अ. हैबतराऊ सिलंबकर देशमुख त॥ गुंजणमावल दादे कौलनामा ऐसा जे, तुम्हीं पेश अर्जी साहेबासी रुजुवातीनें इमानें चाकरी करीत होतेस साहेबांची मेहेरबानी तुम्हांवरी होती. ऐसियासि पदाजी यशवंतराऊ सिवतरकर याणे कितियेक बेसंगपणाची वर्तणूक केली याबद्दल साहेबी त्यावरी

घनिकर करून डोले काढून गडावरी अदबखाना घातले. दादाजीचे लेक तुमच्या घरास गेले म्हणून बहिरा सिवदेव याणें नादानगी करून तुमच्या घरास दहा वीस प्यादे पाठविले. त्यावरून तुम्ही शक धरून बाहीर गेलेसी. ते आजीवरी बाहीर आहा. येसियासी हाली तुमचे भाऊ संबाजी येउनु मालूम केले कीं, हैबतराव यास साहेबी कौल मरहमत केलिया साहेबांचे पायापासी हाजीर होईल. म्हणून घराये मालमाती खातिरेस आणून तुम्हास कौल मरहमत केला आसे. आजी तागायेत जो काये गुन्हा तुम्हापासुनु जाहला असेली तो तमाम माफ केला असे. तुम्ही कोणे बाबे शक व अदेशा न करितां खातिरजमा करून बेशक होऊन येणें. साहेबांची भेटी घेणें. तुमच्या जिवास खता होणार नाहीं. ये बाबे श्री (साहेबा)ची व मातुश्री साहेबांची आण असे व श्री-वरील बेल व श्री-खंडाची भाक व रोटी व माल येसे पाठविले असे ते घेणे. व तुम्ही येथें आलियावरी तुमची देसमुखी पहिलेपासून वडिलपण चालत आलें आहे. तेणेंप्रमाणें व हमसाई दाहा देसमुखाचे वतनाचे तह देउनु तेणेंप्रमाणें तुमचाहि तह करून तुमचे चालउनु. ये बाबे कौल असे.

हि. रे. मा. ११ } (१४६१) { श. १५९३
पृ. ९० फसली ! } { इ. १६७१

औरंग०—अबदुल रसुल उर्फ इसुरजी राणा, दारवा परगण्याचा देशमुख.

उदेपूरच्या घराण्यांपैकीं कृष्णाजी व इसुरजी हे दोन भाऊ होते. पैकीं इसुरजी हा वतनाकरितां मुसलमान झाला. तो वतनाचा भाग आपल्याला देत नाहीं अशी कृष्णाजीनें तक्रार केल्यामुळें औरंगजे०नें कृष्णाजीला वाटा द्यावा अशी इसुरजीला आज्ञा केली. (इ. स. १६७३ मध्यें वरील हुकुमान्वयें वाटणी झाल्याचेंहि पत्रक आहे.)

फॅ. रे. सुरत मा. १०६ } (१४६२) { श. १५९४ चैत्र शु. ८
पृ. ७४ इ. } मुंबई-सुरत. { इ. १६७२ मार्च २६

ॲडर्टननें (मलबाऱ्यांचीं) नारळ व सुपारी हा माल भरलेलीं कांहीं गलबतें पकडलीं व मुंबईला आणिलीं. त्यांवरील माणसें, हत्यारें, आकाररचना इत्यादि स्वरूप पाहिलें म्हणजे तीं **लढाऊ गलबतें** होतीं यांत शंका रहात नाहीं. अशा बोटी एकाद्या दख्खनच्या बंदरांत माल नेऊन घालून मोकळ्या झाल्या कीं मग समुद्रांत बेलाशक **चांचेगिरीचा** मार्ग पत्करीत.... (पकडलेलें एक गलबत बालासोरचें होतें. कानब्याचा राजा यांच्या चांचेगिरीच्या प्राप्तींत भाग घेत असे.) ह्या गलबतांचें काय करावें तें कळवावें. तें छान चालतें. व पुढच्या वर्षीं इतर गलबतांना फसवावयास आमिषाचें उत्तम साधन decoy) म्हणून उपयोगी पडेल ! [ऑर्मे मा. ११४ पृ. १९].

ओ. फॉ. भा. ३३ } (१४६३) { श. १५९४ चैत्र व. ४
नं. ३६३३ इ. } सुरत-कंपनी. { इ. १६७२ एप्रील ६

**शिवाजीबद्दल वारंवार हुली उठल्यामुळें** आतां त्याची इतकी भीती वाटेनाशी झाली असली; तथापि **व्यापारावर** त्याचा **अनिष्ट परिणाम** झाला. एका किल्ल्याला वेढा देणाऱ्या **मोंगली** सैन्याचा शिवाजीनें पक्का मोड केला. त्याच्या देशांत घुसलेल्या **दोघां सरदारांची** [बहादुरखान व दिलीरखान] मानखंडणा होऊन मोठें नुकसान सोसून त्यांना परत जावें लागलें. त्यानंतर शिवाजीनें आम्हीं (इंग्रज) फ्रेंच व डच लोक, मोठमोठे मुसलमान व हिंदु व्यापारी व बादशहाचे अमलदार या सर्वांना पत्रें लिहून **जबर खंडणी** मागितली आहे. खंडणी देण्याचें नाकारल्यास सर्व सुरतेचा नाश करण्याची त्यानें दहशत घातली. आतां तो रणक्षेत्राचा जणुं स्वामीच झाल्यामुळें वाटेल तेव्हां येऊं शकेल; कारण त्याचा प्रतिकार करण्यास येथें सुरतेला सैन्यच नाहीं.

[दि]-सुभेदारानें उघडपणेंच '**मुंबईच्या मरमराटीमुळें सुरतेला धोका येईल**' अशी शंका प्रगट करून प्रेसिडेंटला मुंबईला जाऊं दिलें नाहीं.

फॅ. रे. सुरत भा. १०६ } (१४६४) { श. १५९४ चैत्र व. १३
पृ. ८६ इ. } मुंबई-सुरत { इ. १६७२ एप्रील १५

ले. उस्टिक अद्याप वरच्या **चौलला** आहे. तेथून निघून शिवाजीकडे गेल्याबद्दलच्या पत्राची आम्हीं वाट पहात आहों. त्यानें कसेंहि करून परिणामाकडे लक्ष न देतां **शिवाजीला** भेटावें असें आम्हांला वाटतें. नकार घेऊनहि तो वेळींच परत आला म्हणजे शिवाजीचीं गलबतें मे महिन्यांत मीठ घेऊन येतील तीं आपण पकडलीं तर त्याचें अपरिमित नुकसान करितां येईल. [ऑर्मे भा. ११४ पृ. २१]

सा. ले. ८९ } (१४६५) { श. १५९४ वैशाख शु. ४
हि. १०८३ मोहर ३ } शिलालेख फा. गोवळकोंडे { इ. १६७२ एप्रील २१

सुलतान महमदशहा याचा मुलगा सुलतान अब्दुल्ला कुतूबशहा याचा जन्म सन १०२३ सवाल २८ (श. १५३६ कार्तिक व. ३० ता. २१।११।१६१४) व मृत्यू १०८३ मोहरम ३ (श. १५९४ वैशाख शु. ४ ता. २१।४।१६७२) आणि स. १०३५ जमादिलावल १४ (श. १५४७ माघ शु. १५ ता१-२-१६२६) ला गादीवर बसला.

फॅ. रे. सुरत, भा. ८७ } (१४६६) { श. १५९४ वैशाख शु. ६
पृ. ३० इ. } सुरत-मुंबई. { इ. १६७२ एप्रील २२

शिवाजी **हेन्री केन्री** वर किल्ला बांधणार आहे अशी बातमी आहे. प्रेसिडेंट शिवाजीला मदत करील या सबबीवर सुभेदार त्याला जाऊं देत नाहीं ! खरें म्हटलें तर सुरत बंदरापेक्षां आमचेच हितसंबंध तेथें अधिक गुंतलेले आहेत.

खं. १५ ले. १३१
सु. १०७२ मोहर १　　(१४६७)　　श. १५९४ वैशाख शु. १०
मिसेली फा. मु० व सी०　　इ. १६७२ एप्रील २७

अजर० सिताबखान व मीराखान सरनाईक किले सातारा

हुदे० मोक० व रया मौ० वरिये किल्ले सातारा.

निंच येथील मठास वरिये येथें ५ बिघे जमीन आहे ती पूर्वीप्रमाणें चालू ठेवणें.

फॅ. रे. भा. १०६
पृ. ९४ इ.　　(१४६८)　　श. १५९४ वैशाख शु. १५
मुंबई-सुरत　　इ. १६७२ मे १

सुभेदार उर्मटपणें प्रेसिडेंटला येऊं देत नाहीं हें वाचून खेद होतो. शिवाजी हेन्री केन्रीवर किल्ला बांधूं इच्छितो हें अद्यापि आमच्या कानावर आलें नाहीं. तसा त्याचा प्रयत्न असेल तर आम्हीं खरा करून त्याला बंदी केली पाहिजे. [ऑर्मे भा. ११४ पृ. २४]

फॅ. रे. सुरत भा. १०६
पृ. १०५ इ.　　(१४६९)　　श. १५९४ वैशाख व. १४
मुंबई-सुरत　　इ. १६७२ मे १५

काल **उस्टिक शिवाजीकडून परत** आला. बराच वेळ तिष्ठत राहिल्यावर त्याच्याशीं व त्याच्या ब्राह्मणांशीं फक्त अर्धा तास बोलणें झालें तें निरर्थक झालें. पण अखेरीला नुकसानभरपाईबद्दल ५००० हजार होन देण्यास तो तयार झाला. राजापूरला वखार उघडली तर सर्वप्रकारें सहानुभूती मिळेल एवढें कायतें निष्पन्न झालें.

**शिवाजी** लगेच १० हजार सैन्य घेऊन गेला. **मोरोपंडितहि** तितकेंच सैन्य घेऊन दुसऱ्या बाजूला गेला. उभयतां पुनः सुरतेला येऊन मिळतील असा अंदाज आहे. ऋतुमान आतां फारच पुढें गेलेलें आहे हें आम्हांला दिसत आहे. परंतु व्यापारी वर्गाला सुभेदारानें नाखुष केल्याकारणानें त्यांनीं जाहीरपणें तक्रार केल्यामुळें दरबारला जाण्याचा त्याला धीर होणार नाहीं. तेव्हां सुभेदार कदाचित् आपण होऊन शिवाजीच्या हवालीं तें शहर करील ! [ ऑर्मे. भा. ११४ पृ. २५ ]

प. रे. ऑ. हस्त. भा. १२
सी. ओ. ७७, पृ.५३ इ.　　(१४७०)　　श. १५९४ ज्येष्ठ शु. ४
इ. १६७२ मे २०

फ्रेंच व्हाइसरॉय मॉशर डेला हे याचें डचांस उत्तरः-**मलबार व कॉरोमांडेल किनारा** आणि इतर ठाणीं तुम्हीं ( डचांनीं ) आपल्या अधिकारांत दडपून घेतलीं आहेत या कृत्याबद्दल मोगल बादशहा, पोर्तुगीज लोक, शिवाजी, झामोरिन किंवा इतर कोणींहि तुमच्या बाजूनें बोलतील असें वाटत नाहीं.

खं. २० ले. २१० } (१४७१) { श. १५९४।९५ ज्येष्ठ व. २
मु. १०७३ सफर १५ } फा. ह्य. मज. व सी. { इ. १६७२ जून २ किंवा १६७३ मे २२

१—धजा कार. व देस. तर्फ माहुल

नरसीभट बिन नारायणभट सा॓ पंढरपूर यांस देगाव येथें १ चावर जमीन इनाम आहे. ती पूर्वीप्रमाणें त्यांजकडे चालविणें.

(दि) ओ. कॉ. } (१४७२) { श. १५९४ ज्येष्ठ व. १४
नं. ३६४९ इ. } मुंबई–ई. इं. कंपनी. { इ. १६७२ जून १४

सुरतेचा आणि सर्व हिंदुस्थानचाच व्यापार अंतस्थ गोंधळामुळें पार बुडाला. विशेषतः खुद्द सुरत शहर नष्ट होण्याचीं चिन्हें स्पष्ट दिसूं लागलीं. यामुळें तुमची संपत्ति आणि व्यापार यांच्या रक्षणाकरितां स्वतःचें असें स्वतंत्र बंदर वसविण्याची वेळ आली आहे; असें प्रेसिडेंट व त्याचें सल्लागार मंडळ यांचें मत आहे. शत्रूबद्दल वारंवार हुली उठतात आणि शहरचा **सुभेदार** व **अंमलदार** हे लोभानें नगरवासीयांकडून **द्रव्य उकळतात**. यामुळें तुमचा माल किफायतशीर विकणें किंवा मालमत्ता किनाऱ्यावर नुसती सुरक्षित राखणें हेंहि अवघड झालें आहे. (सुभेदार आदिकरून अंमलदार) सर्वसाधारण अंदाधुंदीचा आणि बादशाही मुलुखांतील बेबंदशाहीचा फायदा घेऊन **बेतालपणें अत्याचार करितात**. जर त्यांना मूल्यवान **नजराण्यांचा** खुराक सतत दिला नाहीं तर प्रत्यहीं आमची मानखंडना करून तुमच्या व्यवहारांत व्यत्यय आणतात. या गोष्टींचा दूरवर विचार केला म्हणजे, ज्या बाबतींत आम्हीं प्रतिकार करण्यास असमर्थ आहोंत त्या संकटापासून दूर राहून, हळूहळू बराचसा व्यापार तुमच्याच स्वतःच्या बेटावर स्थिर करावा—आणि तेथेंच तो ठेवणें योग्य होईल—, असें वाटूं लागतें.

[ऑ. मा. ११४ पृ. ३६]–**शिवाजीशीं** तहाच्या बाबतींत बोलणें करण्याकरितां उस्टिक गेला. त्याचा **शिवाजीनें** चांगला सत्कार केला. आमची मागणी व राजापुरास काय मिळालें याबद्दल त्याचा अंदाज यांमध्यें कल्पनेच्या बाहेर तफावत आहे. त्याच्या अलीकडच्या भव्य **यशाच्या** योगानें **जगाच्या** व खुद्द त्याच्या स्वतःच्याहि दृष्टीनें तो **उच्च पदवीला चढला** आहे. तेव्हां तडजोडीकरितां तो किती खालीं उतरेल हा प्रश्नच आहे. तहानें जडणारा संबंध परस्परांना आवश्यक व हितकारी असाच आहे. मात्र नुकसानभरपाईचा आंकडा किती ठरवावा व त्याची भरपाई कोणत्या मार्गानें व्हावी एवढाच प्रश्न अद्यून राहिला आहे.

(से.) फॅ. रे. सुरत मा. १०६ } (१४७३) { श. १५९४ आषाढ शु ५
पृ. ११३ इ. } मुंबई (जेराल्ड ऑंजिअर)–कं. { इ. १६७२ जून १९

**मोरोपंडिताच्या** हाताखालच्या सैन्यानें **पोर्तुगीजांच्या** मुलखास उपद्रव

दिला; इतका की वसई (?) चौल व इतर सर्व ठिकाणीं भेदरून पळापळी झाली. सर्व मुलखाच्या वसुलाच्या ¼ [चौथाई] ची त्यांनीं मागणी केली. न दिल्यास मोरोपंत सर्व देश धुळीला मिळविणार. शिवाजीचें हें भांडण असेंच चालू राहिल्यास मुंबईला बराच फायदा होईल !

फॅ. रे. सुरत भा. ३ }
पृ. ४ (द्वि. सं.) इ. }
(१४७४)
सुरत कन्सल्टेशन
{ श. १५९४ आषाढ शु. ७
{ इ. १६७२ जून २१

**मोरोपंडितानें** कोळी राजापासून, (सुरतेपासून ४० कोसांच्या आंतील) **जव्हार घेतलें**. आणि त्याचा प्रतिकार करण्यास बादशाही सैन्यहि नव्हतें. यामुळें आधींच भेदरलेले सुरतेचे लोक, या दिवशीं त्यानें **रामनगर** घेऊन अधिक जवळ मजल मारल्यामुळें, अधिकच भयाकुल झाले. रामनगरचा राजा आपलें कुटुंब घेऊन **गणदेवी**पासून ४ कोसांवर **चिखलीस** पळाला. गणदेवीहून सर्व लोक पळाले. सुरतेचे दरवाजे बंद केले नसते तर येथीलहि व्यापारी पळून गेले असते ! सर्वांत अधिक भय वाढविणारी गोष्ट म्हटली म्हणजे सुभेदार व प्रमुख **नगरशेट मिर्झा मोसुम** यांना शिवाजीचें किंवा मोरोपंडिताचें आलेलें पत्र होय. पूर्वीप्रमाणेंच यांत सरकारी जमाबंदीची चौथाई (४ लक्ष रु.) मागितली असून, न दिल्यास पक्की दहशत घातली आहे. हें ऐकून बऱ्याच सुस्थितींतील लोकांनीं आपलीं मुलेंमाणसें सुरक्षित ठिकाणीं **भडोचकडे** वगैरे पाठवून देण्याबद्दल सुभेदाराकडे अर्ज केला. इंग्रजांनींहि आपला बंदोबस्त केला.

फॅ. रे. सुरत भा. ८७ }
पृ. ४५ इ. }
(१४७५)
सुरत-मुंबई
{ श. १५९४ आषाढ शु. ७
{ इ. १६७२ जून २१

**११ तारखेला शिवाजी** अगदीं जवळ आल्याची हूल उठली. **मोरोपंडिताची** फौज जवळ आली होती. त्यानें ५७ कोसांवरील कोळी राजाचें **जव्हार** घेतलें व तेथें शिबंदी ठेऊन तो परत गेला. येथील सुभेदारानें शिवाजीचा **बंदोबस्त** करण्याच्या सबबीवर **वर्गणी** जमविली. परंतु शिबंदीची काळजी न करितां **स्वतःची तुंबडी भरण्यांत** त्यानें मुळींच कसूर केली नाहीं. **हिंदूंवरच कराचा बोजा पडणार** हें नक्की माहिती असल्यामुळें मुसलमानांनींहि त्वरेनें मान्यता दिली. हिंदूंनीं थोडा वेळ ओढून धरलें. पण सर्वांनीं वर्गणी दिली ! बंदोबस्ताची कांहींच तरतूद चालू नसून हिंदू व्यापाऱ्यांची खानेसुमारी (आर्थिक पहाणी) करण्याकरितां अमलदार मात्र नेमिले आहेत!

फॅ. रे. संकीर्ण, भा. २ }
पृ. १३९ इ. }
(१४७६)
मुंबई कन्सल्टेशन
{ श. १५९४ आषाढ शु. ८
{ इ. १६७२ जून २२

**शिवाजीनें** कोळी राजाचा मुलूख काबीज केला असून मुंबईजवळ घोडबंदर

येण्याचे त्याचे प्रयत्न चालू असल्यामुळें माहीम, शीव(Siam) व मोएहूम (Moehum) यांची त्वरित तटबंदी करावी.

फॅ. रे. सुरत मा. ८७ } (१४७७) { श. १५९४ आषाढ शु. ११
पृ. ४७-४९ इ. } सुरत-मुंबई. { इ. १६७२ जून २५

२१ तारखेला शिवाजीच्या सैन्याबद्दल अवई उठली. जव्हारला १७ लाख रुपयाचा खजीना मिळाल्यावर शिवाजीनें रामनगर घेतलें; [ इत्यादि हकीकत २१ जूनच्या ले. १४७४ प्रमाणें ]...व तो अधिक जवळ आला. त्याच दिवशीं शिवाजीचें चौथाईच्या मागणीबद्दलचें तिसरें पत्र आलें. 'हेंच पत्र शेवटचें आहे' असेंहि शिवाजीनें लिहिलें. 'तुमच्या बादशहानेंच माझा देश आणि माझी प्रजा यांच्या रक्षणाकरितां मला सैन्य ठेवण्यास भाग पाडलें; त्या सैन्याचा पगार ( मला तुमच्याकडूनच घेऊन ) दिला पाहिजे ! जर तुम्हीं त्वरेनें पैसा पाठविणार नसाल तर माझ्या करितां एक मोठें घर तयार ठेवा. मी तेथेंच बसून कर व जकाती यांचा जातीनें वसूल करीन ' असें शिवाजीनें कळविलें. कारण, आतां त्याला अडविणारा कोणींच नव्हता ! या पत्रानें भेदरलेले लोकांना मध्यरात्र उलटल्यावर मुलेंमाणसें हालविण्यास सुभेदारानें परवानगी दिली; परन्तु सकाळीं पुनः बदलून दुसऱ्या दिवशीं शिवाजीची मागणी कशी पुरी करावी हें ठरविण्याकरितां सैय्यद महमदाचे घरीं सर्व व्यापाऱ्यांची सभा बोलाविली. व्यापाऱ्यांनीं ( आपसांतून ) एक लक्ष रुपये व देसाई वर्गानें निरनिराळ्या परगण्यांतील शेतकऱ्यांकडून दोन लक्ष रुपये उभे करावे असें सुभेदारानें सुचविलें. देसायांनीं, गतसालचा सर्व सारा आपण सरकारी खजिन्यांत भरला असून ( पुढील वर्षाची ) आगाऊ भरपाई करण्याचें आपल्याला त्राण नाहीं असें सांगितलें. व्यापाऱ्यांनाहि लाखाची उभारणी करतां येईना. शेवटीं व्यापाऱ्यांनीं २० इ. व शेतकऱ्यांनीं ४० इ. द्यावे अशी सुभेदारानें तोड केली. परन्तु स्वतःचीच तुंबडी भरण्याचा हा उद्योग आहे असें ओळखून सर्वांनींच नकार दिला !

२२ तारिखेला शनिवारीं आम्हीं आमचा बंदोबस्त केला. दुसरे दिवशीं सकाळीं दिलीलखान आपल्याला थोपविण्यासाठीं आपल्यावर चालून येत आहे असें कळल्यावरून मोरोपंडित रामनगर न घेतांच, परत फिरला असें कळलें. ह्या बातमीनें आणि कालरात्रीपासून सुरू झालेल्या ( व आतांहि पडत असलेल्या ) पावसामुळें सुरतेंत सर्वांना आनंद होऊन, आम्हांलाहि त्रासांतून सुटका झाल्यासारखें वाटत आहे. परन्तु एखादा पंधरवडा उघडीप पडल्यास पुनः शिवाजी येण्याची भीती उत्पन्न होईल.कारण (मोंगली) सैन्य पावसाळ्या करितां छावणी करून राहिल्यावर शिवाजीचें सैन्य दौड करील. आणि फार आधीं बाहेर नच पडलें तर निदान सप्टेंबरमध्यें तें ( सुरतेवर ) येईल असें मानण्यास हरकत नाहीं.

फॅ. रे. सुरत भाग ८७
पृ. ५१ इ.

(१४७८)
कारवार–सुरत

श. १५९४ आषा. शु. १२
इ. १६७२ जून २६

आमच्या नव्या सुभेदारानें **शिवेश्वर** व **कदेरा** येथील किल्ल्यांच्या नायकवा-डींशीं तह केला. परंतु त्यांच्या असंतोषामुळें हा तह फार वेळ टिकेल असें वाटत नाहीं. **अंकोला** आणि **मिरजन** हे किल्ले फार मजबूत असल्यामुळें मोठें सैन्य आल्याशिवाय ते हस्तगत होणार नाहींत. **शिवाजी इकडे** ( कारवारकडे ) **येणार आहे** अशी दाट वदंता आहे. तेव्हां तो आल्यास आम्हीं कसें वागावें व त्याच्या शब्दावर भरंवसा कितपत ठेवावा हें कळवावें.

फॅ. रे. सुरत भाग १०६
पृ. ११५ इ.

(१४७९)
मुंबई–सुरत.

श. १५९४ आषाढ व. ८
इ. १६७२ जुलै ८

**मोरोपंडीत** १५००० पर्यंत आपली फौज वाढवून तुमच्या तिकडेच जात आहे. **सुरतेहून** छोट्या गलबतांचें **आरमार शिवाजीवर पाठविलें** जाणार अशी बातमी आल्यामुळें त्याचा प्रतिकार करण्याची ही तयारी आहे. सुरतेबद्दल काळजी वाटते. कारण त्या शहरावर त्याचा डोळा असून तो तें घेतल्याशिवाय किंवा नाश केल्या शिवाय राहणार नाहीं. [ ऑर्मे भा. ११४ पृ. ४२ ]

ओ. कॉ.
नं. ३६४९ इ.

(१४८०)
मुंबई–ई. इं. कंपनी.

श. १५९४ आषाढ व. १३
इ. १६७२ जुलै १२

१५ जूनचें पत्र घेऊन जासूद निघाला त्यावेळीं एका बाजूनें **शिवाजीच्या** व दुसरीकडून **मोंगलांच्या** सैन्यानें रस्ते रोखून धरून इतका बारकाईनें शोध चाल-विला होता कीं एकहि पत्र सुद्धां जाणें मुष्किलीचें होतें. परंतु आतां सैन्यें छावणीस गेलीं असल्यामुळें हा त्या पत्राचा उतारा व नवा मजकूर लिहून पत्र पाठविलें आहे.

सर्व **पोर्तुगीज कायदे** रद्द करून आम्हीं इंग्रजी कायदे व न्यायकोर्ट १ ऑगस्ट पासून चालू करणार.

सुरतेच्या आसपासच्या देशांत आजतागायत चालू असलेल्या **शिवाजीच्या** स्वाऱ्यामुळें गोंधळ उत्पन्न झाला आहे. या कारणानें कांहीं काळ तरी तेथील व्यापार बंद करणें भाग आहे.

असल्या मर पावसाळ्यांत देखील **शिवाजी** शेजाऱ्यांना स्वस्थता देत नाहीं. पोर्तुगीजांच्या हद्दीला लागून असलेल्या **जव्हार** (Guar) व **रामनगरच्या** राज्यांवर छापा घालून त्यांच्यापासून व पोर्तुगीजांपासूनहि त्यानें धमकी देऊन खंडणी मागितली. **पोर्तुगीजांची** पूर्वीचीच हलाखीची स्थिति होती. परन्तु आतां ती फारच वाईट झाली आहे. ( कोळी राजांचीं राज्यें घेतल्यामुळें ) त्याला **सुरतेचा थेटचा**

च नजीकचा मार्ग खुला झाला आहे. आणि त्यानें आपलें यशस्वी सैन्य सुरतेवर पाठविलें आहे अशीहि विश्वसनीय बातमी आहे. परन्तु तहाची वाटाघाट चालू असल्यामुळें तो आमच्या वखारीला त्रास देणार नाहीं अशी आशा वाटते.

उत्तम तटबंदी व इतर बंदोबस्त करण्याचे खर्चाचें काम पुरें झाल्यावर, ( सर्वत्र अंदाधुंदी चालू असतांना ) आपलें बेट शांत व सुरक्षित राखिल्याचा खरा फायदा २ वर्षांनीं तुम्हाला दिसून येईल. आजच आपल्या येथील बिनधोकपणाची प्रसिद्धी होत असून शेजारचाच एक राजा आमचा प्रजाजन होऊन आमच्या रक्षणाखालीं येण्याची इच्छा करीत आहे. परन्तु आमचा प्रबळ शेजारी शिवाजी याला दुखविण्याची आमची इच्छा नसल्याकारणानें आम्हीं सावधपणेंच पाऊल पुढें टाकूं. [ ऑर्मे मा.११४ पृ. ३८–४० ]

खं. २० ले.५४ (१४८१) श. १५९४ श्रावण शु. १
सु. १०७३ श. महजर (न.) वाटणी इ. १६७२ जुलै १५

विठोजी गाखोजी, बापूजी बाजी, बरवाजी आपाजी, लखमाजी आपाजी निगडे. (पर. शिरवळचे देशमूख) हे वृत्तीबद्दल भांडत होते. रा. साहेब बंदगीस हकीकत सांगितली. आहालीचे कारकून व गोत यांनीं तक्सिमा व हक्क यांची वाटणी करून निवाडा केला आहे.

खं. १८ ले. १९ (१४८२) श. १५९४ श्रावण शु. ४
सु. १०७३रबर २ जाबिता इ. १६७२ जुलै १८

जाबिता मसलासी राघो बल्लाळ अत्रे सुभे. व. कार. सर. जुनर

मौजे चिखली पर. पुणें येथील माऊ माळी निस. मोक. याचा व विसाजी बाबजी कुळकर्णी यांचा गावगतीच्या हिसेबाबदलचा तटा होता. हिसेब करतां होन ५६॥ रुपये १२५॥ गहू ८॥ खंडी व गूळ ४ खंडी विसाजीस द्यावे असें ठरलें.

रु. ३ ले. १० (१४८३) श. १५९४ श्रावण शु. ६
हिं. १०८३ रबर ५ इ. १६७२ जुलै २०

दिलेरखान——— निमाजी गोमाजी

सयाजी भोसल्याचा वकील सांगतो कीं तुम्ही आपल्या शिपायासह चाकरी करूं इच्छितां; तरी भरंवसा धरून आमचेकडे यावे. योग्यतेनुरूप नोकरी देऊं.

फॅ. रे. सुरत मा. ८७ (१४८४) श. १५९४ श्रावण शु. ६
पृ. ५३ इ. सुरत–मुंबई इ. १६७२ जुलै २०

**शिवाजीमुळें** फक्त एकदांच नव्हे तर अनेक वेळां **सुरतकरांना भयाकुल व्हावयाची** पाळी आली. आतां (चौथाईच्या) पैशाकरितां आलेलें सैन्य परत जात असलें

तथापि तें पुनः केव्हां येईल याचा नियम नाहीं. कारण शिवाजीचें पुष्कळच सैन्य बाहेर पडलें आहे. **जाधवरावाच्या** हातून **मोरोपंडितानें नासिकत्रिंबक** घेतलें. त्याच्या ४०० लोकांपैकीं बरेचजण कामास आले व जाधवराव कैद झाला. हा जाधवराव कांहीं अंशीं शिवाजीच्या नात्यांतला असून, त्याच्याकडून फुटून मोंगलांना मिळाला होता.

ओ. कॉ. मा. ३३ } (१४८५) { श. १५९४ श्रावण शु. ७.
नं. ३६६१ जुलै २१ न्यू. } बटेव्हिया- डच ई. इं. कंपनी. { इ. १६७२ जुलै २१

वेंगुर्ल्याच्या आसपास अशांततेमुळें व असुरक्षिततेमुळें व्यापार बंद आहे. विजापूर-दरबारची सर्व खबर ठेवून **शिवाजीनें** सर्व **मुलखांत वर्चस्व** प्राप्त करून घेतलें आहे. **अब्राहम लेफर** हा एक पत्र व नजराणा घेऊन **राजेरी** (रायरी) शहरास, शिवाजीला भेटण्यासाठीं ( सलाम करण्यासाठीं ) गेला. शिवाजीनें त्याचा चांगला सत्कार केला. परंतु ४५० होनांपेक्षां नजराणा मोठा पाहिजे होता असें दिसलें. आतां त्याची मर्जी आमच्यावर कितपत प्रसन्न आहे हें वेळ आल्यावर समजेल.

श्री. सं. चा. ले. १० } (१४८६) { श. १५९४ श्रावण शु. ८
सु. १०७३ रखर ७ } { इ. १६७२ जुलै २२

**शिवाजी राजे——दत्ताजीपंत वाकेनिवीस**

चाफळ येथें यात्रा भरते महोत्छाह चालतो. तेथें कटकीचे सिपाही व बाजे लोक देवाची मर्यादा चालवीत नाहींत. यात्रेकरूस तसवीस देताती. दिवाणबले कलागती करताती. तरी तुम्हीं अंगे जातीनें जाऊन तसवीस उपद्रव होऊ नेदणें व रामदास गोसावी यांचाहि परामृश करीत जाणें.

श्री. सं. चा. ले. ११ } (१४८७) { श. १५९४ श्रावण शु. ८
सु. १०७३ रखर ७ } मु. व सी. { इ. १६७२ जुलै २२

रा. **शिवाजी राजे**—— गणेश गोजदेऊ सुबे. व कार. ता कोल.

मजकूर (ले. १४८६ प्रमाणें).

फॅ. रे. सुरत भा. ८७ } (१४८८) { श. १५९४ श्रावण शु. १३
पृ. २८ अ, इ. } कारवार-सुरत { इ. १६७२ जुलै २७

सुभेदारानें तह केल्यापासून येथें शांतता आहेच. माजी सुभेदार **महमदखान यानें** येथील कांहीं ठिकाणच्या नाइकवाडी लोकांच्या बोलावण्यावरून **बंड केलें.** परंतु त्याचा मोड झाला. गेले दहा दिवस किंवा अधिकच, विजापूरचा **आदिलशहा मेल्याची** बातमी आली. परंतु खुद्द विजापुराहून पक्केपणाचें पत्र वगैरे अद्याप आलेलें नाहीं.

फॅ. रे. सुरत, भा. ८७ } (१४८९) { श. १५९४ श्रावण व. ९
पृ. ५७ इ. } सुरत-मुंबई { इ. १६७२ जुलै ३०

सुरतेच्या लोकांना **नगरखानाच्या** सैन्याचा फार त्रास होता. तो आतां आपले, सैन्य घेऊन गेला. **शिवाजीच्या भीतीमुळें** तो पि प ळ वा डा मार्गानें (Pipp : Uwarra) गेला.

फॅ. रे. सुरत भा. ८७ } (१४९०) { श. १५९४ श्रावण व. १३
पृ. ५९ इ. } कारवार-सुरत. { इ. १६७२ आगस्ट १०

आदिलशहाचें दुखणें इतकें भयंकर होतें कीं, त्याच्या मरणाच्या **संशयामुळेंच** विजापूरचे दरवाजे व दुकानें ३ दिवसपर्यंत बंद होतीं. इतक्या दूर अंतरावर आम्हांला तो मेला अशीच बातमी कळली ! थोडासा शुद्धीवर येतांच त्यानें **खोजा जाफरखान** या आपल्या आवडत्या खोजाला ह्या बाजूचा प्रांत व ९ लक्ष होनांचा मुलूख दिला. गेल्या **कर्नाटकच्या युद्धांत** सेनापती असतांना जाफरखानानें विशेष यश मिळविल्यामुळें त्याची बढती होऊन तो आतां सर्व राज्याचाच कारभार करितो. त्याचा स्वभाव चांगला आहे असें ऐकतों. त्याचें सामर्थ्य मोठें असल्यामुळें बंडाचा मोड होऊन शांतता नांदेल अशी अपेक्षा आहे. त्याचे सुभेदार अद्याप आले नाहींत. लवकरच येतील असें वाटतें.

फॅ. रे. सुरत, भा. ८७ } (१४९१) { श. १५९४ भाद्र. शु. १०
पृ. ६३ अ इ. } सुरत-स्वाली. { इ. १६७२ आगस्ट २२

काल **घोग्याहून** बारा फ्रिगेटसचें आरमार नदींत शिरलें. उमरजी नांवाचा इसम मुख्य अधिकारी आहे व त्याचे बरोबर १००० लष्कर आहे. हे लोक येथें बंदोबस्ताकरितां आले आहेत कीं **शिवाजीवर** चालून जाण्याकरितां **दंडाराजापुरीस** जाणार आहेत हें अजून समजलें नाहीं.

**(से)** फॅ. रे. सुरत, भा. १०६ } (१४९२) { श. १५९४ भाद्र. शु. १३
पृ. १२६ इ. } फोर्ट सेंट जॉर्ज-सुरत. { इ. १६७२ आगस्ट २६

(ह्या मार्गातील शिवाजीचें धोरण निराळें दिसतें.) तो मुलूख लुटण्याऐवजीं जिंकण्याकडे अधिक लक्ष देऊं लागला आहे. (!)

फॅ. रे. सुरत, भा. ३ } (१४९३) { श. १५९४ भाद्र. व. १
पृ. १५ (द्वि. सं.) इ. } सुरत कन्सल्टेशन { इ. १६७२ आगस्ट २९

**सुरतेला धोका** असल्यामुळें व्यापार मंद व किंमती अनिश्चित आहेत. करितां आतां मुंबईला गलबतें येतील तीं सुरतेला न पाठवितां सुरक्षिततेकरितां **माल मुंबईलाच** उतरून घ्यावा.

फॅ. रे. सुरत भा. १०६ } (१४९४) { श. १५९४ आश्विन शु. १५
पृ. ११४ (द्वि. सं.) इ. } { इ. १६७२ सप्टें. २६

थॉमस रोच, मोंगलांकडील गोलंदाज, दिल्ली-सुरत.

गेल्या दोन महिन्यांतील दरबारचा **हकीकतवाका** लिहिला आहे. त्यांतील एका परिच्छेदांत असें लिहिलें आहे कीं 'सुरतेच्या कोणीं खुदा अहमद (Nocquadah Omed नाखुदा अहमद) नांवाच्या माणसानें बादशहाकडे अर्जदास्त पाठविली कीं, " बादशहा १ लक्ष २० हजार रुपये खर्च करण्यास तयार असेल तर **शिवाजी** इतके दिवस **हेन्री केन्रीच्या** किल्ल्याचें बांधकाम करीत आहे त्यांत मी अडथळा उत्पन्न करितों." त्यावर बादशहानें त्याचा सदर रकमेबद्दल जामीन घेऊन त्याला संमति दिली. हा उतारा पाहून याचा उपयोग तुमच्या अर्जदास्तींत करावा असें मला वाटलें. 'शिवाजीला विरोध करणारा बादशाही अंमलदार **दंडाराजपुरीचा** सिद्दी त्याला साहाय्य करावें म्हणून मी मुंबईला जात असतां सुभेदारानें मला जाऊं दिलें नाहीं' [ असें तुमच्या अर्जदास्तींत म्हणण्यास मला कांहींच हरकत दिसत नाहीं ].

(से) फॅ. रे. सुरत भा. ८७ } (१४९५) { श. १५९४ आश्विन व. ५
पृ. ८३-८४ इ. } स्वाली मरीन- { इ. १६७२ आक्टो. १

सुरतेच्या सुभेदारानें त्याच्या जुलमाविरुद्ध तक्रार करणाऱ्या एका व्यापाऱ्याला ठार केलें व इतरांना धमकी दिली.

फॅ. रे. सुरत भा. १०६ } (१४९६) { श. १५९४ कार्तिक शु. ७
पृ. १४४-४५ इ. } मुंबई-सुरत { इ. १६७२ ऑक्टो. १८

शिवाजी मोठें सैन्य उभारीत आहे. १६००० सैन्य खडें तयार असून ४ मोठीं घोडदळाचीं पथकें तो आणखी वाढवीत आहे. हीं पथकें मूळचीं मोंगलांकडील असून तीं आतां तिकडून फुटून **सिद्दी हिलाल, जाधवराव** ( Gadora ) आणखी इतर दोघेजण यांच्या नेतृत्वाखालीं शिवाजीला मिळालीं आहेत. आणखीहि पुष्कळ येणार आहेत अशी वंदता आहे. आतां **दिलीरखान एकटा पडला** आहे. त्याच्याशीं युद्ध करण्याचा त्याचा बेत आहे. त्याचा पराजय झाला तर शिवाजी केव्हांच **गुजराथचा** मालक बनेल ! शिवाजीचा एक हस्तक आतां येथें बेटावर तहाचें बोलणें पुरें करण्याकरितां आलेला असून, सुरतेवर त्यानें हल्ला केलाच तरी तो आमच्या वखारीला त्रास देईल असें वाटत नाहीं. परंतु त्याच्यावर फार विश्वास ठेवूं नये हें चांगलें. [ ऑर्म भा. ११४ पृ. ७८ ].

ओ. कॉ. भा. ३३ } (१४९७) { श. १५९४ कार्तिक शु.११
नं. ३६९२ इ. } सुरत-कंपनी { इ. १६७२ ऑक्टो. २२

ऑगस्ट व सप्टेंबर हे दोन महिने खेरीजकरून गेल्या सर्व वर्षभर **शिवाजीच्या**

सैन्याची आम्हाला भीती वाटत होती. शहराचे दरवाजे आणि सर्व रस्ते कित्येक महिने बंदच पडले. फारच थोड्या मोठ्या लोकांना आपली मुलेंमाणसें शहराबाहेर पाठविण्याची परवानगी मिळाली. आम्हीं कंपनीची मालमत्ता प्रथम स्वालीस व नंतर रानिआळ्याला हालविली.

(से.)फॅ. रे. सुरत मा. ८७ पृ. ८९ इ. } (१४९८) कारवार,फिलिपगिफर्ड–सुरत { श. १५९४ कार्तीक शु. १४ इ. १६७२ ऑक्टो. २५ नंतर

डचांनीं आपलें तारूं या बंदरांत आणण्याचें कारण शिवाजी आणि डच लोक यांच्या मध्यें दलालाच्या संबंधांत ( किंवा कमिशनच्या बाबतींत ! ) कांहीं वाद आहे.

फॅ. रे. सुरत मा. ३ पृ. २५ (द्वि. सं.) इ. } (१४९९) सुरत आणि शिवाजी { श. १५९४ कार्तीक शु. १५ इ. १६७२ ऑक्टो. २६

सुरत रोजनिशीः–शिवाजीचें मोठें सैन्य रामनगरपर्यंत आलें व बादशाही उमरावांपैकीं चौघे आणि ४ घोडदळाचीं पथकें यांनीं बादशाही चाकरी सोडून शिवाजीची धरली ही बातमी ऐकून लोकांना भय वाटलें.

[ सदर १६७२ ऑक्टो. २८ ]–शिवाजीच्या आगमनाची बातमी पक्की ठरली. शिवाजीचें सैन्य गणदेवीपासून ६ कोसांवर असून इकडच्याच रोखें येत आहे व उद्यां सकाळपर्यंत येऊन पोंचेल अशी बातमी रात्रीं ८ वाजतां आली. इंग्रजांनीं स्वसंरक्षणाचा बंदोबस्त केला.

[ फॅ. रे. सुरत,भा. ८७पृ. ८७ ऑक्टो. ३१] सुरत–मुंबईः–२८ तारखेची हूल दुसरे दिवशीं सकाळीं ओसरली. पुढें आलेली तुकडी नदीचा उतार पाहूनच, शिवाजीचा तळ रामनगरच्या अलीकडे पडला होता त्याला जाऊन मिळाली. आतां शिवाजी त्याच्या मर्जीस वाटेल तेव्हां येईल. अशा धामधुमीच्या काळांत मालांत कोणींच पैसा घालण्यास तयार नाहीं. यामुळें कंपनीचा माल पडून राहिला आहे.

[ फॅ. रे. सुरत मा. ३ पृ. २७ द्वि. सं. ]– सुरत कंन्सल्टेशनमध्यें २ नोव्हेंबरपर्यंत शिवाजीच्या भीतीमुळें कंपनीचें कापड घाऊकीनें खपलें नाहीं असें लिहिलें आहे.

हाच प्रतिध्वनि [फॅ. रे. सुरत मा. ३ पृ. ३२] नोव्हेंबर २० चे पत्रामध्यें आहे. 'सिरोंज, कारंजा, बऱ्हाणपूर, डमगांव, नंदरबाद व दख्खनमधील इतर शहरें इकडे पाठवावयाचा माल शिवाजीची धामधूम चालू असल्यामुळें कंपनीला थोडा अधिक खर्च आला तरी विमा उतरून पाठविण्यांत येई.' असा खुलासा सुरतच्या कौन्सिलनें वाढत्या विमा खर्चाबद्दल इलाख्याची पहाणी करण्याकरितां नेमलेल्या कमीटीला दिला.

फॅ. रे. सुरत मा. १०६ } (१५००) { श. १५९४ कार्तीक व. ६
(द्वि. सं.) पृ. १२ इ. } मुंबई-सुरत. { इ. १६७२ ऑक्टो. ३१

**दंडाराजपुरीच्या** कुमकेकरितां सुरतेहून आलेलें २० गलबतांचें आरमार मुंबईच्या आखाताच्या बाहेर राहिलें आहे. ह्या बंदरांत (शेजारच्या **शिवाजीच्या मुलखाला उपद्रव** देण्याला सवड मिळावी म्हणून ) प्रवेश मिळण्याबद्दल त्यांनीं विनंति केली. परन्तु तशी परवानगी देणें न्याय्य आहे किंवा तें मुत्सद्देगिरीचें होईल असें आम्हांला वाटलें नाहीं. त्यांच्या आगमनाची तुमच्या कडून आगाऊ सूचना असती तर बरें झालें असतें, आम्हीं त्यांच्याकरितां अधिक तयार राहिलों असतों. [ ऑर्म मा. ११४ पृ. ८१ ]

ऑर्म. मा. ११४ } (१५०१) { श. १५९४ कार्तीक व. ३०
पृ. ८४ इ. } मुंबई-सुरत. { इ. १६७२ नोव्हें. ९

सुरतेहून निघालेल्या आरमाराची **शिवाजीच्या** आरमाराशीं लहानशी चकमक झाली. परन्तु त्यांत सरशी कोणाची झाली हें समजलें नाहीं.

(सं.) फॅ. रे. सुरत मा. ८७ } (१५०२) { श. १५९४ मार्ग. शु. ३
पृ. ९१ इ. } सुरत-मुंबई. { इ. १६७२ नोव्हें. १२

गेल्या भीतीनंतर आतां सर्वत्र शांतता आहे. ( शिवाजीचें ? ) सैन्य पूर्वीच्याच ठिकाणीं आहे. **बहादरखान** (Bander) **व दिलीरखान** नजीकच असून अद्यापि एकहि चकमक झाली नाहीं.

फॅ. रे. सुरत मा. ८७ } (१५०३) { श. १५९४ मार्ग. शु. १४
पृ. ९४ इ. } सुरत-मुंबई. { इ. १६७२ नोव्हें. २३

मुंबईकरांना लांकूडसामान व सर्पणाची जरूर होती. **पोर्तुगीजांनीं** जबर जकाती घालून पुरवठा करण्यास **अडथळा केल्यामुळें** सुरतेहून माझ्याचें गलबत करून हा माल मुंबईला पाठविण्यांत आला. भाडें २४० रु.

खं. १५ ले. १३२ } (१५०४) { श. १५९४ मार्ग. व. १
सु. १०७३ साबान १४ } { इ. १६७२ नोव्हें. २५

विठ्ठल दत्तो सुभे० व कार० सुभा जाउली-रा. कार. कसबे हुमगाऊ

हुमगाव येथें रेवागीर गोसाव्याचे इनामाचीं झाडें आहेत तीं त्यांजकडे चालविणें.

फॅ. रे. सुरत मा. १०६ } (१५०५) { श. १५९४ मार्ग. व. ९
पृ. २४ इ. } मुंबई-सुरत. { इ. १६७२ डिसें. २

**शिवाजीचीं** लहान सहा गलबतें त्याच्याच **संमतीनें** ह्या ( मुंबई ) बंदरांत

ठेविलीं आहेत. तीं सर्व नवीं असून कल्याण-भिवंडीला बांधलेलीं आहेत. येथें आम्हीं असें जाहीर केलें आहे कीं आमच्या नुकसानभरपाईच्या मागणीच्या बदल्यांत आम्हीं तीं पकडलीं आहेत. सुरतेच्या आरमारावर त्या गलबतांनीं हल्ला करूं नये म्हणूनच तीं मुंबईला धरून ठेवलीं आहेत असें आपणहि प्रसिद्धपणें सांगावें. [ऑर्मे. भा. ११४पृ.८९].

शि. च. ले. ६५ } (१५०६) { श. १५९४ पौष शु. २
सु. १०७३ रम १ } ताकीद-फा. मु. व सी. { इ. १६७२ डिसें. ११

अज दि. फर्या. कासेगाऊ किले पनाला-ता मोक. मौ. तांदळे, रेटरे,

नरहरिभट बिन अंतांभट गिजरे मुकाम कऱ्हाड यांस २ होन दोन्ही गांवांत मिळून धर्मादाय चालत आहेत. तरी ते पूर्वीप्रमाणें चालविणें.

सा. ले. ३०२ } (१५०७) { श. १५९४ पौष शु. ७
श. } { इ. १६७२ डिसें. १६

सखोजी व जेतंजी राजे जव्हारकर-वेद. सोनभट धर्माधिकारी.

आम्हीं व आमचे वंशज तुम्हास तीर्थोपाध्ये मानितील.

ओ. कॉ. मा. ३३ } (१५०८) { श. १५९४ पौष शु. ७
नं. ३७२१ इ. } फोर्टसेंट जॉर्ज-कंपनी. { इ. १६७२ डिसें. १६

पश्चिम घांटाच्या बाजूला आणखी ढग गोळा होत आहेत. कर्नाटकचा वृद्ध राजा-ज्याला आपल्या पदरच्या मानकऱ्यांशीं कठोर वागणुकीमुळें राज्याला मुकावें लागलें होतें तो-मृत्यु पावल्यामुळें त्याच्या भावाचा मुलगा अधिकारावर आला. **शिवाजीच्या भावाला वारसा मिळावा (?)** अशी दीर्घ कालाची अपेक्षा होती. एका विजापुरी उमरावानें ( प्रजेनें ) त्याला आपली मुलगी दिली. मैसूर, मदुरा व तंजावर येथील बडे नायक हेंच काय ते पूर्वीच्या राजाचें संपूर्ण अवशेष आहेत. ते, संधि येईल तेव्हां, ह्या गोष्टीला आड येणार नाहींत, असें वाटतें. असें असेल तर संधीकरितां त्यांना फार वाट पहावी लागणर नाहीं. हा प्रांत आणि वरील तीन नायकांचा मुलूख यांच्या मध्येंच विजापूरनें नुकताच जिंकलेला मुलूख असल्यामुळें त्याच्या बंदोबस्ताबद्दल आदिलशहा बरीच काळजी घेतो [ हीच एक लहानशी अडचण आहे ]. नाहींतर, मोंगलापासूनचें भय, ( सर्वत्र पसरलेली ) अंदाधुंदी, कारभारामधील दुही आणि अव्यवस्था, आणि सरकारच्या गुन्हेगारांना शिक्षा करण्यास वाटणारें भय हीं ( राज्यांत दिसून येणाऱ्या ह्या गोष्टी ) विनाशकाल सूचित करणारीं दुश्चिन्हें आहेत. [ त्यांचा फायदा घेतां येण्यासारखा आहे. ] या प्रांताचा राजप्रतिनिधि, नवा नबाब, हा जन्मतः हिंदू होता व अगदीं लहानपणीं त्याची सुंता झाली. त्यानें सर्व कारभार **हिंदू व ब्राह्मण लोकांच्या हातांत देऊन** पूर्वापार अधिकार उपभोगणाऱ्या इराण्यांना काढून लावलें !

फॅ. रे.मुं. मा. ६ } (१५०९) { श. १५९४ पौष शु. ११
पृ. ५५ इ. } प्रेसि० ऑजिअर-सुरत { इ. १६७२ डिसें. २०

**शिवाजीच्या हालचालीमुळें** मालाच्या ने-आणींत घोटाळा होणार आहे हें खरें. शिवाय **डचांशीं** इतक्यांतच **तह** होण्याची आशा असल्यामुळें तह होईपर्यंत किनाऱ्यानें माल पाठवून तो धोक्यांत घालूं नये. तथापि विक्री करतांना मध्यंतरीं कांहीं अपघात झाला तर कंपनी त्याचा गैरफायदा घेईल असें गृहीत धरूं नये. प्रत्येक विक्रीच्या करारांचें असें एक कलम कायम समजावें कीं, 'शिवाजीच्या हल्ल्यापासून मालाचें रक्षण कंपनीनें करावें ?'

ओ. कॉ. मा. ३३ } (१५१०) { श. १५९४ पौष शु. १२
नं. ३७२२ इ. } मुंबई-कंपनी { इ. १६७२ डिसें. २१

सोनें, रुपें व तांबें या धातूंचीं नाणीं **सुरतेच्या नाण्यांप्रमाणेंच करण्याचें** आम्हीं ठरविलें आहे. तसें केलें म्हणजे तीं शेजारच्या पोर्तुगीजांच्या देशांत, **शिवाजीच्या मुलखांत** आणि दख्खनमध्येंहि अप्रतिबंध वापरलीं जाऊन बेटावरील व्यापाराला फार सोईचें होईल.

ऑर्मे भा. ११४ } (१५११) { श. १५९४ पौष शु. १२
विभाग २ इ. } मुंबई-इंग्लंड { इ. १६७२ डिसें. २१

पृ. २०—मोंगल व शिवाजी यांच्याविरुद्ध **पोर्तुगीजांशीं तह करण्याची** आमची सूचना बरीच अव्यवहार्य वाटण्याचा संभव आहे. जमीनीवर ते आमचें संरक्षण करूं शकतील व पाण्याची बाजू त्यांच्या शत्रूंविरुद्ध आम्हीं संभाळूं शकूं; असे आमचे संबंध परस्परांना पूरक आहेत. यदाकदाचित् मोंगलानीं किंवा शिवाजीनें त्यांच्यावर हल्ला केलाच तर, तह झाला नसला तरी, आत्मसंरक्षणाकरितां आपण त्यांना मदत केलीच पाहिजे. नाहीं तर पोर्तुगीजांना काढून त्यावरयावर लौकरच ते आमचा कोंडमारा व उपासमार करूं शकतील ! आमच्या बेटाची तटबंदी संपूर्ण झाली नसल्यामुळें आपल्याला शिवाजी किंवा मोंगल यांना आपल्या शेजारीं न भिडूं देतां पोर्तुगीजांनाच राखून ठेविलें पाहिजे.

पृ. ३५-उस्टिक शिवाजीशीं तह करण्याकरितां गेला. त्याचें चांगलें गोड भाषेनें स्वागत करून स्वदेशांत इंग्रजांनीं रहावें अशी आपली इच्छा असल्याचें तो बोलला. व एका प्रधानामार्फत पुढचें बोलणें करण्याची त्यानें आज्ञा केली. राजापूरच्या तपशीला-विषयीं तीव्र मतभेद झाला. आमची मागणी १ लक्ष रु० ची होती, तर त्यापैकीं बऱ्याच रकमांशीं आपला संबंध पोंचत नाहीं असे म्हणून शिवाजीच्या वतीनें २० ह. चाच आंकडा सुचविण्यांत आला. कांहीं व्यक्तींच्या पेव्या, टूंका आणि दुकानें यांतील माल कोणीं शिपायांनीं घेतला असल्यास त्याची जबाबदारी तो घेईना. खुद्द शिवाजीच्या

खजिन्यांत जमा झाला आणि त्याच्या हिशेबाला लागला तेवढाच माल तो भरून देण्यास बांधला होता. ५००० होनांच्यावर (२० ह. रु.) शिवाजी कबूल करीना. याच वेळीं शिवाजीची कोळ्यांच्या देशावर स्वारी होत होती. बोलणें करणाऱ्या प्रधानाला तिकडे जावें लागल्यामुळें हें तहाचें प्रकरण तेथेंच थांबून उस्टिक परत आला. यानंतर शिवाजीकडून दोन चार लोक आले. परंतु मोंगलांशीं त्याचें युद्ध चालू आहे; त्याचा कांहीं परिणाम होऊन आपल्याला अधिक फायदेशीर तह करितां येतो कीं काय हें पहाण्यासाठीं आम्ही थांबलों. औरंगजेबानें दंडाराजपुरीच्या शिद्दीला मदत करण्याकरितां ३० गलबतांचें आरमार पाठविलें आहे. त्यानें शिवाजीचीं किनाऱ्यावरील शहरें जाळून लुटून त्याचें पुष्कळ नुकसान केलें आणि ५० च्यावर त्याचीं गलबतें जाळलीं. जमिनीवरून बादशहाचा वडील मुलगा सुलतान महमूद (नुकताच कैदेंतून मुक्त होऊन) मोठें सैन्य घेऊन खालीं येण्यास निघाला आहे. आम्हांला फार नाजूक डाव खेळावयाचा आहे. कारण, जर बादशहाचा शत्रु शिवाजी याच्याशीं आमचें शांततेचे संबंध आहेत असें बादशहाला कळलें तर, या प्रांतांत आणि बंगाल्यांतहि आमच्या व्यवहाराला अडचण येईल. दुसऱ्या बाजूनें विचार केला तर, शिवाजीच्या मुलखावर आमचें अन्न व सर्पण अवलंबून असल्यामुळें, उघडपणें तह तहकूब ठेवणें (परंतु आतून फायद्याचें बोलणें होईल तितकें करीत रहाणें) याशिवाय अन्य मार्गच नाहीं. ... शिवाजी आपल्याशीं नीट वागतो, म्हणून त्याचीं ६ गलबतें मोंगलांपासून बचावण्याकरितां आम्हीं मुंबई बंदरांत ठेवून घेतलीं आहेत. परंतु त्यांबद्दल मोंगलांना आवडेल असेंच जाहीरपणें सांगतों [ पहा ले. १५०४]. खाजगी गृहस्थांची राजापुरास झालेली नुकसानी शिवाजीकडून मिळविणें कठीण दिसतें. कारण त्यानें राजापूरच्या व्यापाऱ्यांकडून कंपनीचा माल कोणता व इतरांचा कोणता याबद्दल बारीक माहिती मिळविली असून खाजगी मालाबद्दल जबाबदारी तो साफ नाकारतो. दख्खनमधील लढायांमुळें व्यापार हा शब्दच नाहींसा झाला !

फॅ. रे. मुंबई, भा. १, पृ. ९ इ. — (१५१२) मुंबई कन्सल्टेशन — श. १५९४ पौष शु. १४, इ. १६७२ डिसें. २३

शिवाजीवर जाणाऱ्या मोंगली आरमाराचा सेनापती, दंडाराजपुरीचा सिद्दी संबूल, ३२ छोटीं गलबतें घेऊन बंदरांत आला. त्याचा सुरतेच्या कामीं आम्हांला बराच उपयोग होईल असें वाटल्यावरून निकससला सामोरा पाठवून स्वागत व अभिनंदन करावें, रसद पोंचवावी आणि पद्धतीप्रमाणें नजराणा द्यावा, हें इष्ट वाटलें.

फॅ. रे. मुंबई, भा. १, पृ. १० इ. — (१५१३) मुंबई कन्सल्टेशन — श. १५९४ पौष व. १२, इ. १६७३ जाने. ४

शिवाजीकडून तहाचे बाबतींत बोलणें करण्याकरितां पूर्ण अधिकारी वकील आला. त्याचे आमहावरून असें ठरविलें कीं, त्याला बोलावणें पाठवून आज संध्याकाळीं त्याचें म्हणणें ऐकून घ्यावें. स्टीफन उस्टिननें हा ठराव त्याला कळवावा.

(दि) ओ. कॉ. नं. ३७३४ इ. } (१५१४) मुंबई, कौन्सिल–ई. इं. कंपनी { श. १५९४ पौष व. १४ इ. १६७३ जाने. ६

दंडाराजपुरीच्या सिद्याला शिवाजीविरुद्ध कुमक करण्याकरितां आलेल्या सुरत आरमारापैकीं सुमारें ३६ लहान मोठीं गलबतें हल्लीं या बंदरांत नांगरलीं आहेत. इंग्रजांनीं त्यांना मिळून शिवाजीशीं युद्ध करावें म्हणून त्या आरमाराचा सेनापती मोठ्या फायद्याचीं लालूच दाखवून प्रेसिडेंटला गळ घालतो. शिवाजीचाहि वकील येथें योग्य इतमामानिशीं आला असून, मोंगलाविरुद्ध प्रेसिडेंटची मदत मिळविण्याची खटपट करितो. प्रेसिडेंट उभयतांशींहि निःपक्षपातानें वागतो. [ऑर्म मा. ११४ वि. २ पृ. ७]

ओ. कॉ. नं. ३७४१, मुंबई कौन्सिल–ई. इं कंपनी; ता. **११ जाने. १६७३** च्या पत्रांत हें आरमार ता. २४ डिसेंबरला मुंबईच्या आखातांत येऊन पोंचलें असें लिहिलें आहे.

ओ. कॉ. मा. ३३ नं. ३६९२ इ. } (१५१५) सुरत स्वाली–कंपनी. { श. १५९४ माघ शु. २ इ. १६७३ जाने. १०

तुमची मालमत्ता सुरतेहून हालविण्याला येथील लोकांचा विरोध झाला नाहीं. तथापि सर्व वर्षभर **शिवाजीचें** भय वाटत असे आणि सुरक्षितपणाबद्दल एकसारखी काळजी वाटे. यामुळें माल हालविण्याचा व पहाऱ्यांचा वगैरे खर्च बेसुमार वाढला. (मालानें भरलेलीं) गलबतें निघून आतां एक महिना होऊन गेला. परंतु पुनःहि भय उत्पन्न होईल असा अंदाज आहे. कारण या बंदराचा **नाश** करण्याचा **शिवाजीनें** निश्चय केला आहे, असें आम्हांला समजलें. त्यांतून नुकतेंच त्याच्यावर (सुरतेहून) **एक आरमार** [ सिद्दी संबूलचें, ] पाठविलें गेलें. त्यानें त्याचीं कित्येक गलबतें पकडलीं आणि किनाऱ्यावरील शहरें जाळलीं यामुळें तो चिडून गेला.

फॅ. रे. मुंबई मा. १ पृ. २३ इ. } (१५१६) मुंबई कन्सल्टेशन { श. १५९४ फाल्गुन शु. ७ इ. १६७३ फेब्रु. १२

गव्हर्नरच्या हुकमावरून चाइल्ड व विलकॉक्स यांनीं शिवाजीकडील वकिलाची मुलाखत गेल्या रविवारीं रात्रीं घेतली. कोणतेंहि बोलणें करण्यापूर्वी **गव्हर्नरचें पत्र व नजराणा** अर्पण केला पाहिजे असा त्यानें आग्रह धरल्यावरून सोमवार तारीख १० रोजीं तोहि समारंभ झाला. **डचांच्या** आगमनाबद्दल अत्यावश्यक असा विचार होत असल्यामुळें त्याचेशीं पुढें बोलणें झालें नाहीं. त्यानंतर फिरून त्याच्या आग्रहावरून त्याच्याशीं बोलतांना बऱ्याच वादानंतर राजापूरच्या नुकसानभरपाईबद्दल रोखीनें अगर जकातींतून फेड होण्याच्या करारानें ७००० होनांपर्यंत आंकडा तो बोलला. या गोष्टीचा विचार करून आम्हीं असें ठरविलें कीं, 'आमचें **डचांशीं** युद्ध चालू आहे या परिस्थि-

त्यांचा फायदा घेण्याकरितां तो वकील घाई करितो. करितां ही वेळ तह्याला योग्य नाहीं.' त्याप्रमाणें तह्याचा प्रश्न तहकूब ठेवून शिवाजीला 'यावेळीं डचांच्या आरमाराचा शिलशिला आहे तो बंद झाल्यावर आम्हीं तह करूं' असें सामोपचाराचें पत्र लिहिण्याचें ठरलें. शिवाजीच्या वकिलाला या बाबतींत दोन खेपा पडल्या व थोडाफार खर्चहि आला; हें ध्यानांत घेऊन त्याची मर्जी प्रसन्न राखण्याकरितां व त्यानें अनुकूल तह घडवून आणण्यास मदत करावी म्हणून त्याला एक छोटासा नजराणा द्यावा असेंहि ठरलें.

फॅ. रे. सुरत मा. १०६ } (१५१७) { श. १५९४ फाल्गुन शु. ११
पृ. १०० (द्वि. सं.) इ. } कारवार-कंपनी. { इ. १६७३ फेब्रु. १७

**डचांनीं** शिवाजीच्या रागानें **वेंगुर्ल्याला**, आणि येथील सुभेदाराच्या प्रांतांत त्यांचे कांहीं पैसे बुडाले आणि त्यांचे नोकर मारले गेले म्हणून **कारवारला**, मुळींच माल उतरविला नाहीं. आणि जरी सुभेदारानें, चोर शोधून काढतां आला नाहीं तर, जकातींतून भरपाई करून देण्याबद्दल आपल्याला बांधून घेतलें तरी त्यांचें समाधान झालें नाहीं. आम्हांला एका बाजूनें डचांचें व दुसऱ्या बाजूनें कानडा व सोंदें येथील राजाचें भय आहे. परंतु तह्यानें पहिल्यांचें व विजापूरचें सैन्य आल्यावर दुसऱ्याचें भय कमी होईल. **कानड्याचा राजा** मिरजन घेऊन आपल्या राज्यांत गेला. **सोंद्याच्या** राजाचा सेनापति **गोविंदनायक** **अंकोल्याच्या** किल्ल्याला वेढा घालून बसला आहे. परंतु (विजापूरचें) सैन्य एकदां आल्यावर तो ढिला पडेल ! या प्रांताचा स्वामी **मुझफरखान** कानडा देशावर स्वारी करण्याकरितां विजापुरांतून निघाला असून वाटेंत **सोंद्यावरहि** हल्ला करण्याचा त्याचा विचार आहे. आपल्या मुलखांतील शहरें घेतल्याबद्दल तो खास त्या दोघांना प्रायश्चित्त देणार ! सोंदेकरांचें त्याच्या सैन्यापुढें कांहींच चालणार नाहीं.

सा. ले. २५४ } (१५१८) { श. १५९४ फाल्गुन शु. १४
सु. १०७३ जिल्काद १२ } मु. व सी. { इ. १६७३ फेब्रु. २०

?.—बजा० कार० ता गुंजनमावळ.

हैबतराऊ सिलिंबकर देस० हे (सु. १०६८ श. १५८९) सक धरनु पाहीर पडिले होते, ते कौल घेऊन साहेबास भेटले. साहेब मेहेरबान होऊन याचे देसमुखीचे वतन यास दिले आहे. तरी पूर्वीप्रमाणें वतन चालविणें.

सा. ले. २५५ } (१५१९) { श. १५९४ फाल्गुन शु. १४
सु. १०७३ जिल्काद १२ } मु. व सी. { इ. १६७३ फेब्रु. २०.

?—बजा० कार० ता गुंजनमावळ.

इतर मजकूर सा. ले. २५४ प्रमाणें. जास्त:—बदल बक्षिस तहाहयात दरसाल १००० टके खुर्दा घावयाची मोईन केली आहे.

सा. ले. २५६ ｝　(१५२०)　｛ श. १५९४ फाल्गुन शु. १४
सु. १०७३ जिल्काद १२ ｝　मु. व सी.　｛ इ. १६७३ फेब्रु. २०

!—नजा० कार० ता गुंजणमावळ.

पहिला मजकूर सा. ले. २५४ प्रमाणें असून जास्त मज०:—यासि खावयासि गला नाहीं. तरी १० ते १५ खंडी पावेतो देणे व शिरस्त्याप्रमाणें त्याच्या दरसालच्या बक्शीसातून नख्त कापून घेणें.

खं. ८ ले. ८ ｝　(१५२१)　｛ श.
१ ｝　｛ इ.

तापीदास——रा. शिवाजी राजे.

मुशादुरोस साहेब सरफराजनामा पाठविल्यामुळें संतोष जाहले. आम्ही बंदर राजापुरीं असतां रा. निळो सोमनाथपंतांनीं आम्हासी किफायती बाबे लिहिले. त्याचे तालीक सुरतासी पाठविले; त्याची जबाब आली नाहीं. आतांहि साहेबी लिहिलेचे तालीक सुरतेसी खाना करतो. तेथून रजा होईल त्याप्रमाणें केलें जाईल.

खं. २० ले. २७९ ｝　(१५२२)　｛ श. १५९४
सु. १०७३ ｝　｛ इ. १६७२-७३

रा. जिजाआऊ—विठल दत्तो सुभेदार सुभा जावली

चेपगीर गोसावी याची हुमगाव येथें इनाम झाडें आहेत. तरी ती पूर्वीप्रमाणें त्याजकडे चालवीत जाणें.

(दि) ओ. कॉ. ｝　(१५२३)　｛ श. १५९५ चैत्र. व. ६
नं. ३७६० इ. ｝　मुंबई— ई. इं. कंपनी.　｛ इ. १६७३ मार्च २८

बादशाही आरमाराचा सेनापती १५ (जानेवारी) रोजीं किनाऱ्यावर प्रेसिडेंटला येऊन भेटला. इंग्रजांबद्दल बादशहाचें मन साफ व्हावें आणि सुरतकरांच्या मनांतील मुंबई बेटाबद्दलची अढी कमी व्हावी म्हणून त्याचें मोठ्या थाटानें आम्हीं स्वागत केलें.... २५ तारखेला हें आरमार बंदरांतून बाहेर निघून गेलें. त्याच्या मुख्य सेनापतीला येथें झालेल्या स्वागतामुळें फार समाधान झालें.

२० फेब्रुवारीला डचांचीं ७ गलबतें बंदरांत किल्याच्या तोफांच्या माऱ्याच्या पलीकडे येऊन राहिलीं. त्यांच्या राहिलेल्या आरमाराची प्रत्यहीं मार्गप्रतीक्षा करीत होतो. कारण, शिवाजीशीं आमचा वाद आहे. त्याचा फायदा घेऊन, मुंबई जिंकून घेण्याच्या कामीं शिवाजीनें, ३००० सैन्य डचांना पुरवावें व त्याबद्दल डचांनीं त्याला दंडाराजपूर घेण्यास मदत करावी, असा रिक्लॉफनें शिवाजीशीं करार केल्याची आम्हांला पक्की बातमी होती.

या बातमीमुळें प्रेसिडेंटला मोठा विचार पडला. आणि विलंब न लावतां शिवाजीला या बेतापासून परावृत्त करण्याकरितां त्यानें पत्र लिहिलें. त्यांत सिद्दी व शिवाजी यांच्यामध्यें किफायतशीर तह करण्याचें वचन देऊन खुद्द शेजाराला येणें हें किती धोक्याचें आहे हें सांगितलें. शिवाजीच्या मनांत दंडाराजपुरी घेण्याचें फार असून त्यावर त्यानें अपार खजिना आणि जवळ जवळ १५००० माणसांचे प्राण खर्ची घातले. तथापि इंग्रजांवर त्याचा विश्वास न बसल्यामुळें त्यानें त्यांची मागणी नाकबूल केली असावी. आणि म्हणूनच इंग्रजांचें राहिलेलें आरमार आलें नसावें. परंतु तें वेंगुर्ल्यासच आहे कीं दुसरें कोठें गेलें हें समजलें नाहीं. [ऑर्म भा. ११६ वि. २ पृ. ४५ ते ४८]

फॅ. रे. सुरत भा. १०६ } (१५२४) { श. १५९५ वैशाख शु. १०
पृ. १४५-४६ (२ स.) इ. } कारवार-सुरत { इ. १६७३ एप्रील १६

हुबळीची लूटः— ही शिवाजीनें ईस्ट इंडिया कंपनीचा माल लुटला त्याची यादी व किंमतीची विस्तृतवारी आहे. यांत तांब्याची भांडीं, कापड, मोतीं, मिरीं, शिसें, कांच्या, कागदाची रिमें इत्यादि ७८९४ होनांचे किंमतीचीं सामानें व वस्तु आहेत. [ही यादी जून १८ चे पत्राबरोबर पाठविण्यांत आली. परंतु यावर लुटीची बरोबर तारीख नमूद असल्यामुळें ती येथें छापिली आहे. प्रो. सरकारनीं या तारखेचा उपयोग न करितां हुबळीची लूट मे आरंभीं झाली, असा निष्कारण तर्क लढविला आहे!]

फॅ. रे. मुंबई भा. १ } (१५२५) { श. १५९५ वैशाख शु. १२
पृ. ४२ इ. } मुंबई कन्सल्टेशन { इ. १६७३ एप्रील १८

लगतच्या शिवाजीच्या मुलखांत युरोपांतल्या कोणत्या मालाला मागणी आहे, युरोपांत पाठविण्याजोगा कोणता माल तेथें मिळूं शकेल, त्यांतील व्यापारी पेठांचीं नांवें व मुंबईपासून त्यांचीं अंतरें, वर दख्खनमधील शहरांशीं संबंध जोडण्याकरितां सोईचे मार्ग व दळणवळणाचीं साधनें, इत्यादि माहिती मिळविण्याकरितां टॉमस निकल्स याला ( हा स्वतंत्र खाजगी व्यापारी आहे म्हणून) निरनिराळ्या सुभेदारांना शिफारसपत्रें देऊन पाठवावा.

फॅ. रे. सुरत, भा. १०६ } (१५२६) { श. १५९५ वैशाख शु. ५
पृ. ९९ इ. } मुंबई-सुरत { इ. १६७३ एप्रील २६

सिद्दीचीं गलबतें हें पत्र पोंचण्यापूर्वी सुरतेहून निघालीं नसल्यास, तीं पावसाळ्यांत मुंबईला ठेवून घेण्यास येथील गव्हर्नर तयार नाहीं, असें त्याला कळवा. 'गेल्या खेपेला सिद्दीचीं गलबतें मुंबईला राहिलीं असतां त्यांनीं शेजारच्या बंदरांना पुष्कळ उपद्रव दिला आणि त्यामुळें व्यापारावर अनिष्ट परिणाम झाला. शिवाय इतर्की लढाऊ गलबतें बंदरांत

राहूं दिल्यास इंग्लंडचा राजा व कंपनी यांना त्या बाबतींत योग्य जबाब देणें गवर्नरला कठीण जाईल. यासाठीं सिद्दीच्या गलबतांनीं मुंबईस येऊं नये असा मुंबईच्या गव्हर्नराकडून निक्षून हुकूम आला' असें सांगा. [ऑर्मे मा. ११४ वि. २ पृ. ६१]

| | | |
|---|---|---|
| सा. ले. ३६१<br>सु. १०७३ मोहर १९ | (१५२७)<br>कौलनामा | श. १५९५ वैशाख व. ६<br>इ. १६७३ एप्रील २७ |

कार० पेठ आथणी—माहानाड का मज०मामले महमदपूर.

तुम्ही सिवाजी भोसलेचे फितरती करितां गाऊ सोडोन कोगटनुरासी आले. गलबला थांबलेवरी तुम्हासी समजाविसी करितां दोनी तीनी हजाराचे कतबे घेतले ते करितां कितीयेक रयत रंजोसी जाइले. तरी आतां पेठेस येऊन उदीम करून सुखे असणें.

| | | |
|---|---|---|
| ओ. कॉ. मा. ३४<br>नं. ३७८४ इ. | (१५२८)<br>टॉमस निकल्स याला सूचना. | श. १५९५ वैशाख व. १०<br>इ. १६७३ मे १ |

मुंबई बेटावर कंपनीची स्थापना झाल्यापासून आजतागायत मोंगल, शिवाजी व आम्हीं यांमध्यें सलोखा नसल्यामुळें लगतच्या शिवाजीच्या मुलखाची व्यापारी दृष्टया पहाणी करण्यास सवड झाली नव्हती. त्या कामीं तुमची योग्यता पाहून तुमची नेमणूक केली आहे. तरी प्रथम समोरच्या किनाऱ्यावर नागोठण्यास उतरून तेथील भौगोलिक परिस्थिति, नदीच्या पात्राची रुंदी व खोली, जाणाऱ्या होड्यांचा आकार, भरती ओहटीची कमाल व किमान मर्यादा, धक्क्याची सोय, यांची पहाणी करून शेजारींच पेण व भट्टी (Batty) आहेत. तेथलि माहिती मिळवून सर्वांचे नकाशे शक्य तर तयार करावे. लोकांना समजूं न देतां नदीची पहाणी झाल्यावर नागोठण्याला उतरून तेथून तीन चार दिवसांच्या अंतरावर असलेल्या जुन्नर (Junea) शहरीं जा. तेथें रचना, स्वाभाविक मजबूती आणि रक्षणाची व्यवस्था, मोंगलांची तेथें असणारी फौज, अधिकारी व कारभार यांचा दर्जा, शहराची बांधणी व लोकसंख्या, शहरचा व्यापार, आसपासच्या मुलखाशीं शहराचें असलेलें व्यापारी दळणवळण, इंग्रजांच्या मालाला तेथें असलेली मागणी या सर्व बाबतींत व विशेषतः व्यापाराचे विषयीं फार कसोशीनें आणि जबाबदारी समजून तुम्हीं चौकशी करावी. अरबस्तान, मक्का, बसरा, इराण इकडीलहि कोणता माल खपेल आणि जुन्नरमध्यें आसपासच्या मुलखांत कोणता विकाऊ माल पैदा करतां येईल याची बारकाईनें चौकशी करावी. बरोबर तज्ज्ञ वनिया दिला आहे त्याच्या मदतीनें मालाच्या किंमती, वर्णन वगैरे काळजीपूर्वक टिपून घ्यावें. व युरोपांत जो माल खपेल असें वाटेल त्या मालाचे नमुने आणावे; आणि तेथील व आसपासच्या मुलखांतील नाणीं, बाजार पेठा, अंतरें व दळणवळणाचीं साधनें यांची माहिती मिळवावी.

नित्यक्रम व झालेली पहाणी यांची रोजनिशी ठेवावी. वाटेंतील सुभेदार व अधिकारी यांची भेट घेऊन योग्यतेप्रमाणें नजराणे देऊन त्यांच्याशीं बोलतांना इंग्लंडचा राजा व राज्य यांचें महत्त्व, कंपनीचें सामर्थ्य, व त्यांचा शेजार व संबंध यांच्यापासून होणारा फायदा यांचें रसभरित वर्णन करावें. लोकांशीं बोलतांना आमच्या कौन्सिलनें किंवा मीं तुम्हाला पाठविल्याचें सांगूं नका. परंतु जुन्नरच्या सुभेदाराजवळ बोलतांना इंग्रजांनीं जुन्नरला वखार घालण्याच्या दृष्टीनें तुम्हांला कांहीं गोष्टी विचारण्यास हरकत नाहीं. जर तेथील सुभेदार किंवा मोठे अंमलदार यांनीं मुंबईच्या गवर्नराला 'इंग्रजांनीं व्यापाराकरतां जुन्नरला यावें' असें पत्र लिहिलें तर फार बरें होईल. आपल्या खर्चाचा योग्य हिशेब ठेवून वाटेंत मोंगल व **शिवाजी** यांच्या युद्धाबद्दल कळेल ती माहिती सांपडेल त्या मार्गानें अवश्य कळवावी. एकंदरींत सर्व प्रकारें **व्यापारी दृष्टि** ठेवून तपास करावा.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. मुंबई भा. १<br>पृ. ४६ इ. | (१५२९)<br>मुंबई कन्सल्टेशन. | श. १५९५ ज्येष्ठ शु. ४<br>इ. १६७३ मे १० |

**शिवाजीच्या** मुलखांत संचारार्थ गेलेल्या निकल्सचें पत्र आलें. **उभय सैन्यें अगदीं जवळ आल्यामुळें** प्रत्यहीं होणारा उपद्रव, निरनिराळ्या सुभेदारांच्या छपवाछपवीच्या कारवायांमुळें शहरोशहरीं प्रवासाचे वेळीं होणारी दगदग आणि **निकल्स हा सिद्दीचा गुप्त हेर** असावा अशा समजुतीमुळें त्याच्यावर केला जाणारा जुलूम, यांचें त्यानें त्यांत वर्णन केलें आहे. कौन्सिलपुढें पत्र ठेवल्यावर त्याला परत घेऊन येण्याकरितां होडी पाठविण्याचें सर्वांनुमतें ठरलें.

**शिवाजीशीं तहाचें बोलणें** सुरू करणें आतां सोईचें असून कोणा इंग्रजाला पाठविण्याचें म्हटलें तर नजराणा आदिकरून जबर खर्च येईल; यासाठीं सुरतेहून नुकताच आलेल्या **बाघजी** नांवाच्या बनियाला चालू असलेल्या तहाच्या वाटाघाटीच्या बाबतींत पुनः बोलणें करण्याकरितां पाठवावा.

| | | |
|---|---|---|
| ओ. कॉ. भा. ३४<br>नं. ३७७९ इ. | (१५३०)<br>मुंबईची हकीकत | श. १५९५ ज्येष्ठ शु. ४<br>इ. १६७३ मे १० |

**शिवाजीवर** चाल करून जाणारें ३० गलबतांचें आरमार, **सिद्दी संबूळ** सुरतेहून या बंदरांत (मुंबई) घेऊन आला [ले.१५१५]. बादशहाकडून सिद्दी संबूळनें प्रेसिडेंटकरितां **शिरपाव** (सन्मानाचीं वस्त्रें) आणला तो प्रेसिडेंटनें समारंभानें स्वीकारला. बादशाही आरमार पावसाळ्यांत मुंबईला ठेवावें अशी सुरतेच्या सुभेदाराचीं शिफारसपत्रें सिद्दी संबूळ घेऊन आला होता. परंतु तशी परवानगी न देतां फक्त ५ गलबतें माजगांवला ठेवण्याची परवानगी दिली. यामुळें सिद्दी संबूळ आपले सर्व लोक घेऊन मुख्य सिद्दीचा किल्ला जो **दंडाराजपूर** तिकडे निघून गेला.

[से. फॅ. रे. सुरत भा. १०६ पृ. १११ मे २६-मुंबई-सुरत.] सिद्दी संबूळ दंडाराजपूरला जातांना कांहींसा नाखुषीनें गेला. येथें राहिलेल्या मोंगलांच्या [५] गलबतां-बरोबर मिर्झा महमद हुसेन खानदानें राहिला. [ऑर्म ११४-२ पृ. ७८]

फॅ. रे. मुंबई, भा. १ पृ. ४७ इ. | (१५३१) मुंबई कन्सल्टेशन | श. १५९५ ज्येष्ठ शु. ९ इ. १६७३ मे १४

कारवारहून आलेल्या पत्रांत, त्या बाजूला किनाऱ्याच्या बाजूनें जाणाऱ्या **शिवाजीच्या** सैन्याकडून झालेल्या उपद्रवाबद्दल आणि **शिवाजीनें हुबळी लुटल्यामुळें** तेथें असलेल्या कंपनीच्या बऱ्याच मालमत्तेला संपर्क लागून बहुधा ती लुटली गेली असेल अशाबद्दल, लिहून आलें. याच दिवशीं, **राजापूर** नांवाच्या बंदरांतील एक गलबत **मस्कतहून** मरून येत असतां वादळी हवेमुळें मुंबई बंदरांत शिरलें. तेव्हां शिवाजीकडे आपण मागणी केली आहे त्याच्या हिशेबांत म्हणून हें गलबत धरून ठेवावें किंवा कसें असा प्रश्न विचारास निघून, मालाची कांहींच अफरातफर होऊं न देतां शिवाजीकडून समाधानकारक भरपाई होईपर्यंत गलबत धरून ठेवावें असें ठरलें. याच दिवसाच्या मुंबईच्या हकीकतींत [ओ. कॉ. भा. ३४ नं. ३७७९] राजापूरच्या लुटीच्या हिशेबांत म्हणून राजापूरचें वर उल्लखिलेलें गलबत धरून ठेविलें असा उल्लेख आहे.

(से.) फॅ. रे. सुरत, भा. १०६ पृ. १०९-१० इ. | (१५३२) मुंबई-सुरत. | श. १५९५ ज्येष्ठ शु. ९ इ. १६७३ मे १४

*कारवारची परिस्थिति काळजी उत्पन्न करण्यासारखी आहे. परंतु येथील सैन्याचे* तुटवड्यामुळें मागणीप्रमाणें तुकडी पाठवितां येत नाहीं. परंतु सरक्षणाची कांहीं तरतूद व्हावी म्हणून आमचा **दलाल बाघजी** याच्याबरोबर शिवाजीला पत्र देऊन पाठविण्याचें ठरविलें आहे. त्या पत्रांत हुबळीला त्यानें केलेल्या नुकसानीची भरपाई करून मागितली आहे. हें तो ताबडतोब न ऐकेल आणि यापुढें उपद्रव होणार नाहीं अशी खात्री देणार नाहीं तर, निष्कारण निकाल भिजत ठेवण्याऐवजीं आपल्याला त्यानें दिलेल्या त्रासाचा सूड उगविण्याचा त्वरेचा मार्ग शोधून काढला पाहिजे....सिद्दी संबूळच्या लोकांनीं मुंबई बंदरांत असतांना त्रास दिला.

**ऑर्म ११४ वि. २ पृ. ६४—सिद्दी संबूळ** मुंबई बंदरांत गेल्या गुरुवारी **(८ मे) आला** आणि निःसंकोच वृत्तीनें आरमार व सैन्य पावसाळ्यांत तेथेंच ठेवण्याचें बोलूं लागला! त्यानें आणिलेला **शिरपाव बादशहाकडून आला** आहे असें त्यानें लफाडीनेंच सांगितलें.

फॅ. रे. मुंबई भा. १ पृ. ४८ इ. | (१५३३) मुंबई कन्सल्टेशन | श. १५९५ ज्येष्ठ शु. ११ इ. १६७३ मे १६

शिवाजीनें **हुबळी लुटली ही बातमी** कारवारच्या **अनेक पत्रांवरून**

**कायम झाली.** या कारणानें गेल्या सभेंत शिवाजीशीं बोलणें करण्याकरितां एका बनियाला पाठविण्याचें ठरलें असलें तथापि एकाद्या इंग्रजाप्रमाणें आमच्या मनांतील गोष्ट एकादा हिंदू धिटाईनें सांगूं शकणार नाहीं किंवा सांगण्यास धजणार नाहीं; असा विचार येऊन शिवाजीशीं चालू बोलणें पुनः काढण्याकरितां, शिवाजीनें हुबळी लुटली असेल तर त्याबद्दल आणि पूर्वीच्या नुकसानीबद्दल भरपाई मागण्याकरितां, आणि राजापूरचें गलबत येथें धरून ठेविलें आहे त्याबद्दल त्याला कळवून 'यापुढें त्याच्याकडून फसविलें जाण्याची आमची तयारी नसून स्वतःची भरपाई जमेल त्या मार्गानें करून घेण्यास आम्हीं समर्थ आहोंत' असें त्याच्या प्रत्ययास आणण्याकरितां, **निकल्स** याला शिवाजीकडे पाठवावें असें ठरलें.

| | | |
|---|---|---|
| (से.) फॅ. रे. सुरत, मा. १०६<br>पृ. १०७-८ इ. | (१५३४)<br>मुंबई-सुरत | श. १५९५ ज्येष्ठ शु. १२<br>इ. १६७३ मे १७ |

हवा वादळी असल्यामुळें **सिद्दी** येथेंच राहिला. परंतु लवकरच वादळ ओसरून तो निघून जाईल अशी आशा आहे. त्याचे सानिध्यामुळें व्यापारीवर्ग अडचणींत सांपडला आहे. विशेषतः सुरतेचे व्यापारी त्याला फार दबकतात. [पृ. १०८]-काल वादळामुळें मुंबईंत शिरलेलें राजापूरचें गलबत धरून ठेवलें. यामुळें शिवाजीशीं तह थोडा जलदीनें होईल! **राजापूरच्या** लुटीबद्दल आणि नुकत्याच झालेल्या **हुबळीच्या** लुटीबद्दल बोलणें करून त्वरेनें निकाल व्हावा म्हणून **निकल्सला** आम्हीं शिवाजीकडे पाठविणार आहोंत (आर्म मा. ११४-२ पृ. ६७).

| | | |
|---|---|---|
| ओ. कॉ. मा. ३४<br>नं. ३७८६ इ. | (१५३५)<br>निकल्सला सूचना | श. १५९५ ज्येष्ठ शु. १२<br>इ. १६७३ मे १७ |

**शिवाजीशीं** करावयाच्या तहाचे बाबतींत **निकल्स** याला दिलेल्या सूचना—

तुमच्या प्रवासाचा उद्देश **शिवाजीशीं** तह करून त्याच्याकडून कित्येक महत्त्वाच्या मुद्यांचीं ठरवें मिळविणें हा आहे.

**राजापूरच्या** नुकसान भरपाईबद्दल बोलणें बहुतेक निकालांत आलें असून तें पुरें करण्याकरितां **पिलाजी** या नांवाचा त्याचा वकील आला होता. त्याच वेळीं **डचांचें आरमार** आल्यामुळें अधिक चांगली संधि येईपर्यंत तहाचें काम लांबणीवर पडून, ही गडबड बंद झाली म्हणजे आम्हीं सूचना द्यावी व पिलाजीनें येऊन राहिलेला तह पुरा करावा असें आमचें व त्याचें ठरलें. आतां आम्हीं पिलाजीला अनेक पत्रें पाठविलीं असतां तो आला नाहीं किंवा त्याचेकडून उत्तरहि आलें नाहीं. मात्र **शिवाजी** कडून स्नेहाचें पत्र आलें आहे त्यावरून तो तह करण्यास उत्सुक आहे आणि त्यानें **पिलाजीला हा तह पुरा करण्याबद्दल सर्व प्रकारचा अधिकार देऊन**

आज्ञा केली आहे असें दिसतें. मध्यंतरीं कारवारच्या पत्रावरून शिवाजीनें हुबळीवर अचानक छापा घालून कंपनीच्या मालमत्तेची लूट केली, असें कळलें. यावरून त्याचे खरे हेतु आमच्याशीं वैरभावाचे असावेत असा संशय येतो. त्याबद्दल तपास काढण्याकरितां व पूर्वोक्त नुकसानीची भरपाई मागण्याकरितां तुमची नेमणूक केली आहे. 'हुबळीचा अत्याचार त्याच्या हुकमानें झाला असें आपल्याला वाटत नाहीं. कारण त्याच्याबद्दल आमचें मत चांगलें आहे.' असें त्याला सांगा. परंतु तशीच वस्तुस्थिति असेल तर आमच्याशीं सलोखा राखण्याकरितां त्यानें तातडतीनें भरपाई केली पाहिजे असें निक्षून सांगा. परंतु सलोख्याची त्याची इच्छा नसेल तर तसें आम्हांला स्पष्ट कळूं द्या; म्हणजे कंपनी व आमचें राष्ट्र यांना न्याय मिळण्याचे दुसरे मार्ग आम्ही पत्करूं! या गोष्टीचा पक्का निकाल केल्याशिवाय पूर्वीच्या गोष्टींबद्दल तुम्ही बोलणें करतां कामा नये! हुबळीच्या बाबतींत ( समाधानकारक ) उत्तर मिळेपर्यंत मुंबईत आम्हीं पकडलेलें राजापूरचें गलबत व माल ताब्यांत ठेवूं असेंहि त्याला कळवा. जरूर पडल्यास, **त्याचा शत्रू सिद्दी** आमचे येथें आला असतांना आम्ही त्याला पावसाळ्यांत राहूं दिला नाहीं; त्याच्या व शिवाजीच्या भांडणांत आम्ही पडूं इच्छित नाहीं; किंवा आमचा **मोंगलांशीं असलेला** संबंध निष्कारण धोक्यांत न यावा इतकें धोरण राखून आम्हीं सिद्दीला फारशी मदत देत नाहीं; या गोष्टी त्याच्या नजरेला आणून **शिवाजीनेंच** आम्हांला मुद्दाम खिजविल्याशिवाय आम्हीं सिद्दीला अधिक मदत देणार नाहीं हें त्याला समजाऊन सांगावें.

पूर्वीच्या बाबतींत चांगल्या तऱ्हेनें तह होईल अशा भरवशावरच या बंदरच्या कित्येक व्यापाऱ्यांना शिवाजीच्या मुलखाला दुसऱ्या कोठून **न मिळणारें मीठ** आमच्या येथून नेण्याची परवानगी दिली ही मोठी सलोख्याची गोष्ट झाली; असें असतांना अर्धी रक्कम मुंबईमध्यें व राहिलेली रक्कम माल उतरतांच देण्याचा ठरलेला करार मोडून शिवाजीच्या बंदरांतील हवालदार व सुभेदार **किंमत देण्याचें नाकारतात** अशा तक्रारी आमच्याकडे आल्या आहेत! ही वागण्याची तऱ्हा कोणत्या प्रकारची समजावयाची? यानें सलोख्याचा भंग होतो असेंच आम्हांला वाटतें. तेव्हां आमच्याशीं स्नेह रहावा व पूर्वीप्रमाणें मिठाचा पुरवठा व्हावा अशी शिवाजीची इच्छा असल्यास शिवाजीनें आपले हवालदार व सुभेदार यांस किंमती त्वरेनें देण्याबद्दल हुकूम दिले पाहिजेत.

सरळपणें व धोरण राखून या गोष्टी त्याच्यापुढें ठेवून लवकर उत्तरें मागावीं आणि शिवाजीनें मित्रत्वाची इच्छा दर्शवून सर्व गोष्टींचीं सामोपचाराचीं उत्तरें दिलीं तर मग पिलाजीनें तह पुरा करण्याकरितां यावें असें पुढें बोलण्यास हरकत नाहीं. या बरोबरच **शिवाजी, अण्णाजी पंडीत व पिलाजी** यांना देण्याकरतां तुमचे बरोबर पत्रें दिलीं आहेत तीं जातीनें पोंचतीं करून जलदीनें उत्तरें मिळवा.

**शिवाजीची** तुमची भेट न झाल्यास **त्याचा मुलगा** किंवा जो कोणी मुख्य अधिकारी असेल त्याला भेटून येथें पावसापूर्वी परत येतां यावें अशा बेतानें आपली रवानगी होईल असें करा. वाटेंत तुम्हांला कळेल ती संपूर्ण हकीकत कळवा.

या वेटांत येणाऱ्या सर्पणावर **शिवाजीचे** जकातदार जकाती घेतात यामुळें निष्कारण त्रास होतो. सर्पण किंवा लांकूडनग याच्यावर **शिवाजीकडून** येथें आम्हीं जकाती घेत नाहीं. तेव्हां अशा मालावर जकात घेऊं नये असा त्यानें कौल अगर हुकूम द्यावा. त्यांनीं आमच्या लोकांकडून जकाती घेतल्यास आमच्याकडूनहि तशीच मागणी या च्या मालावर केली जाईल! त्याच्या देशांतून मोंगलांच्या किंवा दख्खनच्या मुलखांत आम्हीं माल पाठविला तर जकाती काय पडतील याचीहि चौकशी करा. आणि कमीत-कमी जकाती घेण्याबद्दल त्याच्या हवालदारांना त्याचे हुकूम घेऊन ठेवा.

| | | |
|---|---|---|
| ओ. कॉ. मा. ३४ नं. ३७८७ इ. | (१५३६) टॉंगस निकल्सची रोजनिशी | श. १५९५ जेष्ठ शु. १४ ते आ. शु. १३ इ. १६७३ मे १९ ते जून १७ |

**मुंबईचा गव्हर्नर व हिंदुस्तानचा प्रेसिडेंट** यांचा हुकूम मिळाल्यामुळें **१६७३ मे १९ सोमवार** रोजीं, **शामजी** या नांवाचा वेनिया घेऊन सुमारें ३७ लोकांसह मुंबईहून, शिवाजी सामान्यतः राहतो त्या **रायरी टेकडीकडे** (Rajery Hill) जाण्यासाठीं निघालों. मध्यरात्रीं **नागोठण्यास** उतरून तेथेंच रात्र घालविली. नागोठणें हें शिवाजीच्या मुलखांतील शहर एका सुंदर नदीच्या मुखाशीं वसलेलें आहे. [मे २०]– पुढें जातांना उजव्या हाताला **पाली** शहर व डाव्या हाताला पालीपासून जवळच **सरसगड** (Sier Gurr) सोडून २ वाजण्याच्या सुमारास नदीकिनाऱ्यावरील एका खेड्यांत आम्हीं उतरलों. त्याचें नांव कुल्क (**कोलाड** ? ता. रोहें, Cooluck). तेथून ६ मैलांवर काल्न [**कालवण** ? ता. माणगांव Callaone] येथें रात्रीं मुक्काम केला. (**सरसगड** हा शिवाजीच्या प्रांतांत मध्यें असूनहि सिद्दी संबूळ यानें त्याच्याविरुद्ध पुष्कळ दिवस लढविला. परंतु अखेरीस **दंडाराजपुरीच्या** सिद्दीकडून कुमक न पोंचल्यामुळें त्याला तो सोडावा लागला.) [मे २१]– पाऊस पडत होता. दोनप्रहरीं **पावणूसला** [**पाणास** ? ता. माणगांव] जेवण करून अस्तमान होतांना राजेरीच्या पायथ्याशीं असलेल्या त्याच नांवाच्या भिकार खेड्यांत पोंचलों. **शिवाजी** तेथून दोन दिवसांच्या मुक्कामावर असलेल्या क्षेत्रांत (?) स्नान करण्याकरितां गेला असून थोडे दिवसांत परत येईल असें समजलें. राजेरी नागोठण्यापासून तीस मैलांवर असावी असें वाटतें. [मे २२]–शिवाजी येथें नसल्यामुळें गडावर येऊन बोलण्याची संभाजीची परवानगी मागितली. ती त्यानें लगेच दिली. परंतु पाऊस फार असल्यामुळें आम्हीं गेलों नाहीं. [२३ मे]-सकाळीं त्या उंच टेकडीवर आम्हीं गेलों. वाटेंत पायऱ्या खोदल्या आहेत. दरवाज्यांतील पायऱ्या पक्क्या खडकांत खोदलेल्या आहेत. येथें टेकडीला निर्ग

अमेयता नाहीं तेथें २४ फूट उंचीचा तट बांधला आहे. ४० फुटांवर लगेच दुसरी भिंत बांधून हा किल्ला इतका दुर्भेद्य बनविला आहे कीं, अन्नाचा भरपूर पुरवठा झाल्यास हा किल्ला अगदीं अल्प शिबंदीच्या साहाय्यानें **सर्व जगाविरुद्ध लढूं शकेल !** पाण्याकरितां मोठे तलाव असून ते पावसाळ्यांत भरल्यावर पाणी पुरून उरेल इतकें होतें. टेकडीच्या माथ्यावर मोठें शहर वसलें आहे. घरें सामान्य प्रतीचींच खराब अशीं आहेत. अत्युच्च मार्गी **शिवाजीचा चौसोपी वाडा** आहे. त्याच्या मध्यभागीं मोठी इमारत आहे. तींत बसून तो कारभार पाहतो. मला येऊन कांहीं वेळ झाल्यावर **पिलाजी** येऊन भेटला. 'संभाजी अद्यापि लहान व अननुभवी असल्यामुळें त्याच्यावर महत्त्वाच्या गोष्टी सोंपविलेल्या नाहींत' वगैरे त्यानें सांगितलें. त्याचें पत्र देऊन झाल्यावर तह पुरा करण्याकरितां तो मुंबईला कां आला नाहीं असें मीं त्याला विचारलें. 'शिवाजीचा आपल्याला हुकूम मिळाला होता परंतु मुंबईचें एकहि पत्र न आल्यामुळें मीं आलों नाहीं' असें त्यानें उत्तर दिलें. सायंकाळीं **जेराजी** (Geragee) **राजा** मजकडे कापडाच्या खरेदीकरितां आला. शिवाजीचें मोठेपण व नुकतेच मिळालेले जय यांच्याबद्दल तो पुष्कळ बोलला. त्यानें खरेदी केलेल्या कापडाची मर किंमत मला अखेरपर्यंत मिळाली नाहीं. [मे २४]–संभाजीनें मला भेटीकरितां एका ठिकाणीं बोलाविलें. तेथें **शिवाजीचा चिटणीस** बसला होता. त्यानें अनेक इकडचे तिकडचे प्रश्न विचारिले. इंग्लंडच्या राजाजवळच्या माणसांची, घोड्यांची, शिपायांची संख्याहि त्यानें विचारली. 'समोरच्या झाडाला पानें किती आहेत ?' असा उलट प्रश्न मीं त्याला विचारला. आणि त्याचप्रमाणें मलाहि त्या प्रश्नाचें उत्तर देतां येत नाहीं असें मीं म्हणालों ! इतक्यांत संभाजी आला. त्यानें माझें काम काय आहे तें समजून घेण्याची इच्छा दर्शविल्यामुळें मीं त्याला क्रमानें कामें सांगितलीं. तीं त्यानें ऐकून घेतल्यावर 'मला या बाबतींत कांहीं करतां येत नाहीं. मीं फक्त तुमच्या आगमनाबद्दल शिवाजीला कळवितों. म्हणजे ते लवकरच येतील. तुमच्या प्रकृतीला ही उंचावरची हवा मानवणार नाहीं तेव्हां तुम्ही खालीं जाऊन रहा.' असें त्यानें सांगितलें व मीं गडाखालीं गेलों. [मे ३०]–शिवाजीनें आणखी कांहीं कपडे मागविले आहेत (म्हणजे तो आहे तेथेंच आणखी जास्त दिवस राहूं इच्छितो) अशी बातमी. [मे ३१]–हिंदोळ्यांतून गडावर जाऊन, मीं रहावें कां जावें अशाबद्दल पिलाजीचा सल्ला घेतला. त्याच्या मतें राजाचें येणें अनिश्चित असल्यामुळें मीं परत जावें असें होतें. त्यांतून भयंकर पाऊस व पूर आल्यास येथील पावसाळा मला असह्य होईल असेंच त्याचें मत पडलें. [जून १]–शिवाजीनें **गोव्याजवळील एक टेकडी घेतली** अशी बातमी. [जून २]– मठ व लांकूड या बाबतींत संभाजीचा हुकूम घेण्याकरिता मीं शामजीला संभाजीकडे पाठविलें. परंतु संध्याकाळीं **शिवाजी राजा** एक मैलावरील आपल्या मातोश्रीचे किल्ल्यावर आल्याची पक्की बातमी आली. रात्रीं टेकडीवर चढतांना आम्हीं त्याला पाहिलें. [जून ३]–बोलणें करण्याकरितां मीं टेकडीवर गेलों. ११ वाजतां तो मीं जाऊन बसलों होतों त्या

खोलींत आला. सर्व शिपायांना त्यानें काढून लाविलें. परंतु चांगली वेळ नसल्यामुळें तो माझ्याशीं बोलला नाहीं. ४ वाजतां शामजीच्या हातीं मीं प्रेसिडेंटचें पत्र पाठविलें. पांच वाजतां मला बोलावणें आल्यामुळें मीं जाऊन वसलों. परंतु शिवाजीला येण्यास थोडा अवकाश होता. तो येतांच मीं उभा राहून दारापर्यंत गेलों आणि प्रथम आल्यावेळीं मीं त्याला ओळखलें नाहीं म्हणून क्षमा मागितली. त्यानें माझा हात धरून आपल्या डाव्या अंगाला लोडापासून जवळच बसविलें व काम काय आहे असें विचारलें. 'तहाचें बोलणें चालू असतांनाच व ध्यानीं मनीं नसतांना हुबळीची लूट होऊन फार नुकसान झाल्यामुळें शिवाजीच्या मुलखांत वखार घालावी कीं न घालावी अशी प्रेसिडेंटला शंका उत्पन्न झाली आहे ! ही हुबळीची लूट तुमच्या संमतीनें झाली काय ?' असें विचारतांच 'इंग्रजांना त्रास देण्याबद्दल मीं केव्हांच हुकूम दिला नव्हता, व त्यांचा आमचा स्नेह आहे' असें तो म्हणाला. हें ऐकून नुकसानीच्या भरपाईबद्दल सामोपचारानें विचारलें. तेव्हां तो म्हणाला 'माझे तिकडले लोक अद्यापि त्याच बाजूला आहेत. तिकडील विशेष बातमी किंवा पत्रें मजपुढें नाहींत. कोणाच्या सैन्यानें लूट केली, किती लूट झाली ही सविस्तर माहिती मला आधीं मिळविली पाहिजे'. 'हा सर्व तपशील पुरविला तर भरपाई करून द्याल काय ?' असा प्रश्न नंतर मीं विचारला. तिकडे कानाडोळा करून त्यानें आमच्याकरितां पान मागविलें. व 'आणखी काय काम आहे ?' असें विचारलें. 'पहिल्या मागणीचा कांहींच निकाल झाला नाहीं' असें मीं म्हटल्यावर, 'मला दुसरें कांहीं उत्तर आज देतां येणार नाहीं' असें त्यानें उत्तर दिलें. मिठाच्या किंमतीबद्दल आमच्या इच्छेप्रमाणें सर्व केलें जाईल असें आश्वासन दिलें. लांकूड व सर्पण या बाबतींत त्यानें आमच्याकडून जकात न घेण्याबद्दल हुकूम देण्याचें कबूल केलें. त्याच्या मुलखांतून पलीकडे माल नेण्याचा असल्यास किती जकात द्यावी लागेल ? या प्रश्नाचा 'विचार करूं' असें तो म्हणाला. शेवटीं मला व शामजीला पानसुपारी व वस्त्रें देऊन त्यानें निरोप दिला. माझ्या ठिकाणीं मी जातों न जातों तोंच 'तुम्हीं खालीं गेलां तरी पत्रें घेऊन जाण्याकरितां शामजीला राहूं दे' असा त्याचा निरोप घेऊन पिलाजी आला. 'राजापूरबद्दल मला आणखी बोलावयाचें आहे. आणि पिलाजीला घेतल्याशिवाय मला मुंबईला जातां येणार नाहीं' असा माझा उलट निरोप घेऊन तो गेला व शामजीला पत्रांकरितां ठेवून मी खालीं गेलों.

शिवाजी सिद्दी प्रकरणीं मजपाशीं बोलेल असें मला वाटत होतें; परंतु त्या बाबतींत किंवा पकडलेल्या गलबताच्या बाबतींत त्याला आज पत्रें येऊन पोंचलीं होतीं; आणि त्याबद्दल संभाषणाचे वेळीं बोलणें काढण्याबद्दल त्याला स्मरणहि दिलें गेलें; असें असतांना त्यानें ते विषय अजिबात टाळले ! स्मरण देणाऱ्या माणसाला उलट तो असें म्हणाला कीं 'वाटेल तर इंग्रजांना माल सोडूं दे, पण मीं त्यांना तसें करण्यास भाग पाडूं

शकत नाहीं !' आम्हीं अशाच तऱ्हेनें भरपाई करून घेतली, तर त्याला स्वतः कांहीं द्यावें लागणार नाहीं या विचारानें, आनंदच होत असेल असें मला वाटतें. [जून ६]-शामजी दोन दिवस गडावर राहून फक्त मीठ व लांकूड सामानाच्या बाबतींत हुकूम घेऊन आला. प्रेसिडेंटच्या पत्राचें उत्तर घेऊन **भीमपंडित** या नांवाचा राजाचा दुसरा इसम जाईल असा त्यानें निरोप आणिला. **चौलला** मी जाऊन पोंचतों तों दोन दिवसांत तो येऊन मिळेल असें त्यानें कळविल्यामुळे भीमपंडिताबरोबर येण्याकरितां एक शिपाई ठेवून मीं चौलकडे निघालों. [जून ७]-**निजामपूरला** प्रेसिडेंटचें पत्र आलें. मेघांचा गडगडाट होऊन पाऊस कोसळल्यामुळें नदीला उतार नव्हता. रात्रभर राहिल्यावर [जून ८] पाणी ओसरलें. पलीकडे उतरून **अष्टमीला** २ वाजतां आलों. होडीनें रात्रीं **चौलला** पोंचलों. [जून ९]-चौलच्या सुभेदाराला भेटलों. मुसलमानाच्या घरांत मीं उतरल्याचें ऐकून त्यानें माझ्याकरितां एक घर शहरांत दिलें. **चौलचें शहर** किंवा गढी वर्तुळाकार असून त्याला अर्धचंद्राकृती ९ बुरुज आहेत. तोफा थोड्याच आहेत पण चांगल्या आहेत. शक्य त्या मर्यादेपर्यंत खंदक खणून समुद्रापासून बंदोबस्त केला आहे. इमारती चांगल्या आहेत. परंतु ⅔ भाग पडका असून बाकीच्या भागांत दर रस्त्याला सुमारें एक दोन कुटुंबें अशा तऱ्हेची पातळ वस्ती आहे. येथें शहरांत ६, बाहेर ४ व नदीकिनाऱ्याला १ अशीं ११ खिस्ती देवळें आहेत. [जून १४]-भट्टी (Batty) ला गेलों पण मला नेण्याला होडी आली नाहीं. [जून १५]-जुन्या चौलच्या हवालदाराकडून 'शिवाजीचा ब्राह्मण आला आहे त्याच्याकरितां एक दिवस थांबा' असा निरोप आल्यामुळें थांबलों. परंतु तो आला नाहीं. [जून १७]-होडींतून मुंबईला २ वाजतां पोंचलों.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. सुरत भा. ३<br>पृ. १६ (तृ. स.) इ. | (१५३७)<br>सुरत कन्सल्टेशन. | श. १५९५ ज्येष्ठ व. ४<br>इ. १६७३ मे २४ |

मुंबईकरांनीं १४ व १७ तारखेच्या पत्रांत उपस्थित केलेले प्रश्न. **१३ वर्षांपूर्वी शिवाजीनें राजापूर लुटलें** त्या बाबतींत अनेक वेळां बोलणें करूनहि अनुकूल निकाल न लागतांच त्याचे अत्याचार पूर्ववत् चालू आहेत. तहाचें बोलणें चालू असतांच नुकतीच **हुबळीची वखार** त्यानें लुटली. आमच्या सुस्वभावाचा असा गैर फायदा घेतला जातो आणि त्यामुळें मलबारी व इतर लोकांनाहि आमचे व्यापारांत त्रास देण्यास धीर चढतो. म्हणून एकदां **थॉमस निकल्स** व एक हिंदू व्यापारी पाठवून **राजापूरच्या** व नुकत्याच झालेल्या **हुबळीच्या** लुटीची नुकसानभरपाई निक्षून मागूनहि शिवाजी लक्ष न देईल तर बेलाशक दंडाचा प्रयोग करून आपल्या राष्ट्राचा लौकिक कां कमावूं नये ? असा मुंबईकरांचा प्रश्न. यावर विचार करतां, मुंबईचा किल्ला त्याच्या सैन्याला दाद न देण्याइतका मजबूत झाला आहे, बेटाच्या गरजा सर्वस्वी शिवाजीचे मुलखावर

अवलंबून न राहतां परभारें मागूं शकतात, आणि शिवाजीला मुंबईहून मीठ भरावें लागतें, तेव्हां त्या बाबतींत बंदी करतांच सला तह करणें भाग पडेल, इत्यादि गोष्टी लक्षांत घेऊन **शिवाजीचा सल्ला मोडणें अगदीं आवश्यक आहे;** असें आम्हीं ठरविलें. मात्र हल्लीं डचांचीं आपलें युद्ध चालू आहे तोंपर्यंत स्वस्थ राहून तें युद्ध संपतांच बिघाडाला सुरवात करावी. मध्यंतरीं त्यानें भरपाईदाखल समाधानकारक फेड केल्यास उत्तमच [ओ. कॉ. मा. २४ नं. ३७८८].

ऑर्म ११४–२ पृ. ६८ इ. — (१५३८) मुंबई-कारवार — श. १५९५ ज्येष्ठ व. ४ इ. १६७३ मे २४

शिवाजीनें **हुबळी लुटल्याची** हकीकत तुमच्या **२२ एप्रिलच्या पत्रांत** वाचून फार खेद झाला.

फॅ. रे. सुरत मा. १०६ पृ. ११२ इ. — (१५३९) मुंबई–सुरत — श. १५९५ ज्येष्ठ व. ६ इ. १६७३ मे २६

**पोर्तुगीजांनीं ठाण्याचा** मार्ग निर्दयपणानें **बंद केल्यामुळें** देशावर जाण्याचा अन्य मार्ग शोधून काढला पाहिजे. **नागोठण्यावरून** शिवाजीच्या मुलखांतून **औरंगाबादेचा** मार्ग तितकाच सोईचा होईल. **कल्याण-भिवंडीच्या** मार्गाप्रमाणेंच हा मार्गहि येथून ३१४ दिवसांपेक्षां अधिक लांबीच्या मुक्कामांचा नाहीं. **शिवाजीशीं** आमचा तह झाल्यावर हा तितकाच सुरक्षित मानतां येईल. आमची ही इच्छा पूर्ण व्हावी या दृष्टीनें खटपटीचा आरंभ करण्याकरितां, प्रेसिडेंटचीं पत्रें आणि **बहादूरखान व दिलेरखान** यांच्यासाठीं अल्प नजराणे घेऊन **सिद्दी लाहोरला (!)** औरंगाबादेस पाठवूं. [ऑर्म ११४–२ पृ. ७९]

फॅ. रे. मुंबई भाग १ पृ. ५५ इ. — (१५४०) मुंबई कन्सल्टेशन — श. १५९५ ज्येष्ठ व. १४ इ. १६७३ जून ३

समोरील किनाऱ्यावरच्या **शिवाजीच्या लोकांनीं** माजगांवला ओढून ठेविलेलीं बादशहाचीं गलबतें **जाळून** टाकण्याचा बेत केल्याविषयीं अनेक वेळां बातम्या आल्या. **मिर्झा महमद हसन** यानेंहि गव्हर्नरला याविषयीं कळविलें. म्हणून सभेंत असें ठरलें कीं, 'माजगांव बंदराच्या मुखाशीं रिव्हेंज गलबत व कित्येक लहान होड्या ठेवून कंपनीच्या व मोंगलांच्या गलबतांचें रक्षण करावें.'

फॅ. रे. सुरत भाग १०६ पृ. १२१ इ. — (१५४१) मुंबई–सुरत — श. १५९५ आषाढ शु. २ इ. १६७३ जून ६

**हुबळीच्या** लुटीच्याविषयीं बोलणें करण्याकरितां **निकल्स शिवाजीकडे गेला** आहे. परंतु शिवाजी ठिकाणीं नसल्यामुळें तो येईपर्यंत कांहीं करतां येणार नाहीं. तो आल्यावर समाधानकारक निकाल लागेल अशी आशा आहे. [ऑर्म ११४–२ पृ. ८२]

श्री. सं. चा. ले. १२ } (१५४२) { श. १५९५ आषाढ शु. ७
सु. १०७४ रवल ५ } खुर्देखत फा. मु. व सी. { इ. १६७३ जून ११

अजर० मोहीवखान-कार० देस० देसकु० मोक० पा सिराळाः-रघुनाथ गोसावी सो नाणे घोल यांस पा मा ॥. चावर इनाम दिधला आहे तो चालविणें.

ओ. कॉ. भा. ३४ } (१५४३) { श. १५९५ आषाढ शु. ११
नं. ३८०० इ. } कारवार-सुरत. { इ. १६७३ जून १४

तुमचें १० एप्रिलचें पत्र पोंचून बरेच दिवस झाले. परंतु मध्यंतरीचा काळ धालमेलीचा गेल्यामुळें अद्यापपर्यंत कांहीं लिहितां आलें नाहीं. शिवाय संकट अगदीं घरापाशीं येऊन ठेपल्यामुळें संरक्षणाची तजवीज करण्यामध्यें इतका वेळ गेला. **हुबळीच्या लुटीबद्दल** पूर्वी कळविलेंच आहे. आतां तपशील देत आहों. ७८९४ होनांचें नुकसान हिशेबांत **शिवाजीच्या** नांवानें खर्च लिहीत आहोंत. वसूल करून घ्यावें. ...नाहींतर तो आणि त्याच्याप्रमाणेंच इतर लोक धीट होऊन आम्हांला मोजीनातसे होतील. आतांच कंपनीच्या सामर्थ्याबद्दल कोणी बोलूं लागल्यास '**शिवाजीला** त्यांनीं काय केलें आहे!' असें लोक उपहासानें विचारतात! ...**शिवाजीच्या** लोकांनीं **हुबळीच्या वखारींत पुरुषभर खोल खणून** सांपडली ती लूट नेली...जेथें दारू ठेविली होती त्या ठिकाणाला **शिवाजीच्या** लोकांच्या हातून आग लागल्यामुळें त्यांचेच २० लोक त्या अपघातांत मेले. [ एप्रिल १६ चे यादींत ले. १५२४—मध्यें आलेल्या सामानाचें **वर्णन** येथें दिलें आहे. ]...शिवाय आम्हीं वखारवाले व इतर व्यापारी यांच्या खासगीपैकीं सुमारें ५२०० रुपयांचें नुकसान झालें.

चार-पांच हजार फौजेची कुमक घेऊन **मुजफरखान** हुबळीस आला नसता तर **शिवाजीनें** हुबळींत कांहींच शिल्लक ठेविलें नसतें. मुजफरखानाची बातमी लागतांच बांधून तयार होते तेवढेच बोजे घेऊन **शिवाजी** पळाला. त्यामुळें कितीतरी माल तसाच रस्त्यावर पडून राहिला. **शिवाजी** व **मुजफरखान** यांच्यामध्यें एक दिवसाचें अंतर पडून **मुजफरखानाला** कांहींच करतां आलें नाहीं. यामुळें त्याच्या पदरचे सेनापती व शिपाई नाखूष झाले आणि त्याला सोडून गेले. त्याच्याकडून त्याची जहागीर काढून घेण्यांत आली. असा अपमान सहन न होऊन त्यानें बंड उभारलें. त्याचें सैन्य थोडें असलें तरी त्याचा किल्ला **बेळगांव** हा फारच मजबूत आहे. शिवाय गोवा आणि कानडा यांच्यामध्यें असलेला कारवारचा मुलूख चांगला मजबूत असून सुरवातीलाच आपला एक विश्वासाचा सुभेदार पाठवून त्यानें तो आपल्या हाताखालीं घातला. त्यानें आम्हांला पकडण्याचा बेत केला होता. परंतु अगोदर या प्रांताच्या देसायाला सहकुटुंब कैद करून अंकोला किल्ल्यावर कैदेंत ठेवण्याच्या गडबडींत ते आम्हांला विसरले, व तितक्यांत आम्हीं आमच्या संरक्षणाची तजवीज करून बसलों!

इतक्यांत विजापूराहून बेळगांवावर सैन्य चालून येत आहे. तें येतांच सहि-नाभर चाललेलें हें बंड मोडेल असा भरंवसा वाटतो.

विजापुरी सेनापती बहलोलखान याच्या सैन्यापुढें शिवाजीचा टिकाव न लागून त्याचें सैन्य सर्व ठिकाणीं माघार घेत आहे. बहलोलखानाचें सैन्य कोल्हा-पूरचे आसपास छावणी करून आहे. तें पावसाळा संपतांच राजापूरकडे येणार आहे. शिवाजीनें मिळून जाऊन तहाचें बोलणें लाविलें आहे. परंतु बहलोलखान त्याच्या-विरुद्ध पक्का निश्चय करून बसल्यासारखा दिसतो.

व्यापाराच्या दृष्टीनें या वर्षी कांहीं करितां येईल असें दिसत नाहीं. तथापि विजापूरचे सैन्यास यश येऊन शिवाजीचा एकदां बंदोबस्त झाल्यास लहानसान बंडखोर सहजच गप्प बसतील.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. सुरत भाग १०६<br>पृ. १४२-४३ (द्वि. सं.) इ. | (१५४४)<br>कारवार–सुरत. | श. १५९५ आषाढ शु. १४<br>इ. १६७३ जून १८ |

तुमच्या २४ तारखेच्या पत्रांत शिवाजीला वठणीला आणण्याचा आपला निश्चय वाचून आनंद झाला. त्याच्या लोकांकडून त्यांनीं लुटलेला माल परत मिळवणें तितकें सोपें नाहीं. कारण, त्यांची आतां पांगापांग झाली आहे आणि ते जवळपास असते तरी त्यांना आपल्या धन्याचें औंद अवगत असल्यामुळें एकदां हातांत गेलेला माल ते केव्हांच परत न देते. त्यांनीं न कळत आमची वखार इतरांबरोबर लुटली असें म्हणावयास त्यांना तोंडच नाहीं. कारण, अगदीं प्रथम ते थेट वखारीवरच आले! सेनापती प्रतापराव याच्यापुढें आमचें कापड मर बाजारांत नेलें आणि ते आमच्या दलालाला शोधीतहि होते.... राजापूरचें गलबत पकडलें. तें कळलें. असाच कांहीं उपाय केल्याशिवाय गत्यं-तर नाहीं. राजापूरचीं गलबतें बहुतेक मक्केलाच जातात. तेव्हां तीं धरावयाचीं असतील तर आतां आमचीं गलबतें बाहेर पडलीं पाहिजेत. नाहींतर पुढें उशीर होईल... शिवाजीचें पांच सहा हजार लोक या प्रांतांत स्वारी करण्याच्या तयारीनें आले होते. बहलोलखान आला नसता तर ही स्वारी खास झाली असती. आतां तें सैन्य स्वतःच्या *त्याच्या मुलखाच्या रक्षणाकरितांच गुंतून राहिलें आहे. [याचे पुढें पृ. १४५ वर मागें* ले. १५२४ त उल्लेखिलेली लुटीबद्दलची तपशीलवार यादी आली आहे].

| | | |
|---|---|---|
| ऑर्म. ११४-२<br>पृ. ८७ इ. | (१५४५)<br>मुंबई— (चॅंबर्लेन) कारवार | श. १५९५ आषाढ व. २<br>इ. १६७३ जून २१ |

निकल्स शिवाजीकडून परत आला. आपल्या माणसांनीं लूट केली हें अमान्य करून, त्याबद्दल कांहींच माहिती नसल्यामुळें, लुटीचा आंकडा, लूट करणाऱ्यांचें नांव इत्यादि तपशील त्यानें विचारला. आपण आपल्या शत्रूच्या देशांत न्याय्य

युद्ध केलें आणि जर शत्रूच्या मुलखाची लूट केली आणि त्यामध्यें न जाणतांना इंग्रजांचा माल लुटला गेला, तर त्या गोंधळामध्यें ती लूट आपल्या शिपायांकडून झाली असण्याचा जितका संभव आहे तितकाच स्थानिक लोकांकडून झाली असण्याचा संभव असल्यामुळें आपला त्याला इलाज नाहीं, असेंहि त्यानें सांगितलें. आणखी वर मित्रत्वाच्या नात्यानें म्हणून त्यानें असा सल्ला दिला कीं 'पावसाळा संपतांच **मोठी निकराची लढाई** करण्याचा माझा विचार आहे; या करितां दख्खनमध्यें तुमचा व्यापाराचा पसारा यापुढें शक्य तितका कमी करा' ! तथापि त्यानें नुकसानीची यादी पाहावयास मागितली. परंतु तुमच्याकडून ती आली नव्हती यामुळें दाखवितां आली नाहीं. तरी सविस्तर हकीकत जलद कळवावी.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. मुंबई मा. १<br>पृ. ५७-५८ इ. | (१५४६)<br>मुंबई कन्सल्टेशन | श. १५९५ आषाढ व. ४<br>इ. १६७३ जून २३ |

**टॉमस निकल्स** शिवाजीकडून आज परत आला. त्यानें आपली रोजनिशी सादर केली. शिवाजीकडून आलेल्या वकिलांची आज दोनप्रहरीं भेट घ्यावी.

**शीघ व मोचिंबो** (Mochinbo) येथील नदीचे उतार पाहून येण्याकरितां शिवाजीचे बातमीदार आल्याची आणि तेथून उतारानें येऊन **बादशहाचें आरमार** झाकारून ठेविलें होतें त्यावर हल्ला करण्याचा शिवाजीचा बेत आहे अशाबद्दलची गव्हर्नरला बातमी लागली. यामुळें (१) याशिवाय दुसऱ्या ठिकाणाहून या बेटावर येण्याला मार्ग नसल्यामुळें, या दोन ठिकाणच्या नावा बंद ठेवून त्या दोन रस्त्यांनीं साष्टी बेटाकडे जाण्यायेण्याचा गुन्हा करणारास कडक शासन होईल असा जाहीरनामा काढावा. (२) ह्या बेटांवरून जाऊं येऊं इच्छिणारांनीं फक्त मुंबई व माहीम येथील तरींचा उपयोग करावा. (३) आणि या दोन तरींवर **जाणाऱ्या येणाऱ्यांची सविस्तर नोंद ठेवावी;** असें ठरलें.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. मुंबई मा. १<br>पृ. ६१ इ. | (१५४७)<br>मुंबई कन्सल्टेशन | श. १५९५ आषाढ व. ५<br>इ. १६७३ जून २४ |

'**शिवाजीचा तह**' हा विषय पुनः विचारांत घेऊन पूर्वी **उस्टिक**बरोबर **शिवाजीकडे** गेलेल्या राम शेणव्याचा भाऊ **नारायण शेणवी** हा योग्य आहे म्हणून त्याला शिवाजीच्या वकिलाबरोबर रायरीला पाठवावें असें ठरलें. त्याच्याकरितां सूचना तयार कराव्या. अद्यापपर्यंत अनेक वकिलांना पाठविण्यांत कंपनीला पुष्कळ खर्च आला असल्यामुळें यापुढें निकाल लौकर करून घेऊन हा खर्च संपविला पाहिजे इत्यादि विचार झाला. शिवाजीकडे करावयाची मागणी निश्चित ठरविण्याकरितां मागील मागण्या काढून पहातां मुरतेच्या प्रेसिडेंटनें **उस्टिक**ला पाठविलें त्यांतेळीं ते १५०००

होनांना कबूल असून नंतर १२ ह. होन घेण्यासहि तयार झाले होते असें दिसलें. यावेळीं या मुद्यांवर पुनः वाद होऊन, रोकडीनें किंवा मालाच्या रूपानें **शिवाजीनें** ८००० होन दिले आणि राजापुरास ५ वर्षांची किंवा निदान ३ वर्षांची जकातीची माफी दिली तरी, नारायण शेणव्यानें तें पत्करून त्याच्याशीं तह करावा असें ठरलें.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. मुंबई भा. १<br>पृ. ५९–६० इ. | (१५४८)<br>मुंबई कन्सल्टेशन. | श. १५९५ आषाढ व. ६<br>इ. १६७३ जून २५ |

**शिवाजीचा** वकील गव्हर्नरला दोनदां भेटला. त्याच्या म्हणण्याचा इत्यर्थ असाः—**शिवाजीनें** राजापूरला केलेल्या **लुटीची कमाल किंमत १० ह. होनां** इतकी असून तो ती देण्यास तयार आहे. ती घेऊन राजापुरची मागील खटखट मिटवून इंग्रजांनीं राजापुरला वखार घालावी. ही रकम देण्यास शिवाजीपाशीं रोकड नसल्यामुळें इंग्रजांनीं व्यापार सुरूं करतांच जकातींतून फेडून घ्यावी. **हुबळीच्याबद्दल शिवाजीला** कांहीं माहिती नसून ती लूट आदिलशाही सैन्यानें किंवा तेथील सुभेदारानेंच केली असावी. शत्रूच्या गलबतांना इंग्रजांनीं आश्रय दिला याबद्दल तक्रार करून शिवाजीकरितां वकिलानें २१३ मोठ्या तोफा मागितल्या आणि शेवटीं राजापूरचें गलबत पकडलें तें परत मागितलें.

प्रेसिडेंटनें सिद्दीच्या गलबतांच्या बाबतींत वकिलाचें समाधान सहज केलें 'इतर सगळ्या गोष्टी राजापूरच्या भरपाईवर अवलंबून आहेत. त्याचा निकाल झाल्यावर सर्व कांहीं सुरळीत होईल' असें त्यानें बाकीच्या गोष्टींबद्दल कळविलें. यापुढें १० हजार होनांबद्दल बोलणें झालें. नंतर 'तह करण्याकरितां प्रथम हिंदी इसम पाठवून नंतर इंग्रज पाठवावा. (कारण इंग्रजाला खर्च पुष्कळ येतो) आणि **शिवाजीच्या** वकिलाला व बरोबरच्या लोकांना वस्त्रें देऊन त्यांची रवानगी करावी' असें ठरलें.

| | | |
|---|---|---|
| ओ. कॉ. भा. ३४<br>नं. ३८०७ इ. | (१५४९)<br>नारायण शेणव्यास सूचना | श. १५९५ आषाढ व. ८<br>इ. १६७३ जून २७ नें नंतर |

कंपनी व **शिवाजीराजा** यांच्या तहाच्या बाबतींत नारा(यण) शेणवी यास प्रेसिडेंटच्या सूचना.

**शिवाजी राजाचा** वकील **भीमाजी पंडीत** राजापूरास झालेल्या नुकसानीच्या भरपाईबद्दल शिवाजीच्या वतीनें १२००० होन देण्यास तयार झाला. परंतु हिशेबानें कंपनीचें ९० हजार होन आणि इतर इंग्रजांचें २०. ह. होन असें नुकसान झाल्यामुळें गव्हर्नर व कौन्सिल यांना ही रक्कम मान्य नाहीं. या २० हजारांची तजवीज होण्याच्या पूर्वी शिवाजीशीं तह करूं नये असा इंग्लंडच्या राजाचा निक्षून हुकूम असतांहि प्रेसिडेंट शिवाजीच्या स्नेहाखातर त्या २०००० हजार बदल १२००० होन रोख

किंवा मालाच्या रूपानें घेण्यास तयार आहे. कंपनीच्या नुकसानीबद्दल शिवाजीनें रोख भरपाई न करितां राजापूर बंदरांत इंग्रजांना **जकातीशिवाय सात** किंवा निदान पांच **वर्षे** तरी **व्यापार** करूं द्यावा, याला प्रेसिडेंट व कौन्सिल यांची संमति आहे. असा व्यापार करूं देण्यानें शिवाजीराजाची संपत्ति आणि पत सहजच वाढेल, असें सांगावें.

भीमाजी पंडिताकरवीं शिवाजीनें दोन तोफा मागविल्या. त्यास, 'तह झाल्यावर दोनच काय परंतु लागतील तितक्या तोफा व वाटेल तें इतर सामान त्याला मिळेल' असें कळवावें.

सात वर्षे जकातीशिवाय व्यापाराची परवानगी देणें हें शिवाजीला फारच तोट्याचें वाटलें तर 'आम्हीं स्वतः जकात न दिली तरी आमच्या मालाच्या मोबदल्यांत माल आणून देणारे इतर व्यापारी जकाती देतीलच' हें समजाऊन सांगून त्या योगानें शिवाजीला नफा होऊन बंदराची भरभराट होईल हें स्पष्ट करावें.

वादळामुळें मुंबई बंदरांत शिरलेल्या गलबताबद्दल **शिवाजीनें** विचारल्यास **पोर्तुगीज** किंवा खुद्द शिवाजीच्या मुलखांत वादळामुळें जाणाऱ्या गलबतांची काय अवस्था होते याचें स्मरण द्यावें, म्हणजे शिवाजीला तें गलबत धरण्याचें कारण समजेल !

हुबळीच्या बद्दल जबाबदारी तो नाकारील तर 'आपल्या तेथील वखारवाल्यांकडून या बाबतींत आम्हांला मिळालेली नक्की बातमी आम्ही पुरवितों' असें सांगून ठेवावें. अधिरीच्या हवालदारानें मलबारी लोकांकडून गतसालीं विकत घेतलेलें आमचें गलबत व कांहीं दारू आम्हांला परत द्यावी असा त्या हवालदाराला शिवाजीनें हुकूम द्यावा अशी खटपट करावी. मलबारी लोकांकडून विकत घेतलेलें फ्रेंचांचें गलबत जर परत देण्यांत आलें तर आमचेंहि परत आलें पाहिजे असें सांगावें. कारण त्यानें आमचा बोज राहील !

एकंदरींत १२००० होन व सात वर्षे राजापूर बंदरांत बिनजकातीनें व्यापार, या अटी मान्य करून घेण्यास कमालीचे प्रयत्न करावे; तें नच जमल्यास १० ह. होन व ५ वर्षे तरी पदरांत पाडून घ्यावीं; हेंहि **नच जमलें तर ९ ह. किंवा ८ ह. होन आणि ४ वर्षें बिन जकातीचा व्यापार येथपर्यंतहि उतरावें.** वारंवार पत्र पाठवून मात्र आमचा सल्ला विचारावा.

**(से) फॅ. रे. सुरत मा. १०६ पृ. १५३ इ.**　**(१५५०) मुंबई—सुरत**　**श. १५९५ आषाढ व. ९ इ. १६७३ जून २८**

७।८ दिवसांपूर्वी शिवाजीचा वकील आला. त्याचेशीं दोनदां बोलणें झालें तें ता. २५ व २७ च्या बैठकीच्या अहवालांत नमूद केलें आहे. ह्या महत्त्वाच्या बाबतींत आपण विचार करून योग्य मत द्यावें. [ऑर्म ११४-२ पृ. ८९]

फॅ. रे. सुरत भा. ३ }
पृ. २१ (तृ. स.) इ. }
(१५५१)
सुरत कन्सल्टेशन
{ श. १५९५ श्रावण शु. ७
{ इ. १६७३ जुलै १०

मुंबईहून [ता. २५ व २७ जूनच्या कन्सल्टेशनच्या अनुरोधानें] पत्रें शिवाजीशीं तह करण्याच्या बाबतींत आलीं. त्यांचा विचार केला. त्याच्याशीं सलोखा राखण्याला कारणें दिसतात तीं:— (१) **डचांशीं** हल्लीं युद्ध चालू आहे. त्यांनीं शिवाजीशीं एकमत केलें तर दोघे मिळून आम्हांला हाकून लावितील. (२) मुंबईला बऱ्याच गोष्टींकरितां पण मुख्यतः सर्पणाकरितां **शिवाजीच्या मुलखावर अवलंबून रहावें लागतें.** (३) **पोर्तुगीजांनीं** ठाण्याचा मार्ग बंद केल्यामुळें औरंगाबाद व बऱ्हाणपूर येथून माल मुंबईला यावा अशा सोईचें बंदर त्याच्या मुलखांतीलच आपल्याला मिळविलें पाहिजे. या गोष्टींमुळें म्हणजे ज्यांच्यावर बेटाची सुरक्षितता आणि मरमराट अवलंबून आहे त्या गोष्टींमुळें, आम्हीं मुंबईकरांप्रमाणेंच ८ ते १० हजार होन घेण्यास मान्यता देतों. ही रकम ज्यांचें नुकसान झालें त्यांना रोख देतां यावी म्हणून शिवाजीनें रोख अगर मालाच्या रूपानें द्यावी. जकातीची रकम अगदीं अल्प असल्यामुळें जकातीचा हवाला आपल्याला मान्य नाहीं. ठरलेली रकम हातीं येईपर्यंत मस्कतचें (राजापूरचें) गलबत सोडूं नये. शिवाजीशिवाय राजापूरच्या कित्येक व्यापाऱ्यांकडून कंपनीचें येणें आहे. त्यांचा कांहीं संबंध या गलबतांत असेल तर बेलाशक भरपाई करुन घ्यावी.

फॅ. रे. सुरत भा. ३ }
पृ. २२ (तृ. सं.) इ. }
(१५५२)
सुरत कन्सल्टेशन
{ श. १५९५ श्रावण व. १
{ इ. १६७३ जुलै १९

कारवारच्या वखारवाल्यांकडून **हुबळीच्या लुटीची** तपशीलवार हकीकत आली. त्याबद्दल **शिवाजीच्या लोकांची जबाबदारी** स्पष्ट दिसत असतां [ ले. १५४४] शिवाजी कानावर हात ठेवितो ! राजापूरबद्दल बोलणें चालू आहे त्याच वेळीं हुबळी लुटण्याचा हुकूम देतो ! तेव्हां त्याच्या बंदरांतील **गलबतें मकेहून** पुढच्या महिन्याच्या दुसऱ्या पंधरवड्यांत येतील तीं **पकडण्याचा** हुकूम कारवारकडे जाणाऱ्या आपल्या गलबतांच्या कप्तानांला प्रेसिडेंटनें द्यावा.

ऑर्मे ११४-२ }
पृ. ९६ इ. }
(१५५३)
मुंबई-सुरत
{ श. १५९५ श्रावण व. ४
{ इ. १६७३ जुलै २३

शिवाजीशीं तह करण्याबाबत तुमच्या सूचना प्रसंगानुसार अमलांत आणिल्या जातील. शिवाजीच्या मुलखांत भयंकर **पाऊस पडला.** त्यामुळें **नारायण शेणव्याकडून** कांहींच उत्तर आलें नाहीं.

फॅ. रे. मुंबई, भा. १ }
पृ. ७१ इ. }
(१५५४)
मुंबई कन्सल्टेशन.
{ श. १५९५ अ. भाद्र. शु. १२
{ इ. १६७३ आगस्ट १५

शिवाजीचीं गलबतें वाटेंत आढळल्यास तीं पकडण्याबद्दल हुकूम द्यावा कीं नाहीं

असा प्रश्न विचारास निघाला. **नारायण शेणवी** तहाचें बोलणें करण्यास गेला आ व लवकरच तह होईल हें लक्षांत घेऊन, राजापूरचीं गलबतें आढळल्यास तीं शत्रूचीं म्हणून न पकडतां त्यांच्याशीं **चांगल्या तऱ्हेनें वागावें** असाच हुकूम द्यावा असें ठरलें.

| | | |
|---|---|---|
| ओ. कॉ. भा. ३४<br>नं. ३८३२ इ. | (१५५५)<br>सुरत-मुंबई. | श. १५९५ अ. भाद्र. व. ३<br>इ. १६७३ आगस्ट २० |

पठाणाच्या (**बहलोलखान**) प्रगतीबद्दल कांहींच कळलें नाहीं. परंतु **बहलोलखानाचा** दाब शिवाजीवर जबर पडत आहे एवढें मात्र खास. त्यानें लांच खाऊन शिवाजीशीं (अल्पांतच) तह करण्यास तयार होऊं नये म्हणजे झालें !

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. मुंबई, भा. १<br>पृ. ७४-७५ इ. | (१५५६)<br>मुंबई कन्सल्टेशन | श. १५९५ अ. भाद्र. व. ४<br>इ. १६७३ आगस्ट २१ |

**कारवारच्या** वखारीला चंडखोरांचा वेढा पडल्यामुळें तेथील व्यापार धोक्यांत आहे. तेव्हां शिवाजीचा व आमचा वाद अद्यापि पूर्णपणें मिटला नसला तथापि **राजापूर**हून विलायतचें गलबत भरून घ्यावें. **डचांशीं** सलोखा व सख्य असतें आणि कारवारच्या वखारीला स्वास्थ्य असतें तर शिवाजीवर **दंडाचा प्रयोग** यशस्वी झाला असता. परंतु दोन्ही गोष्टी विरुद्ध असल्यामुळें या वर्षी **आपले उद्देश झांकून ठेवून** राजापूरला वखार घालण्याचें बोलणें लावावें. मिरीं, लाख व धनगरी वगैरे साधें कापड निदान एका गलबताच्या भरतीचें येथील व्यापारी मिळवून देतील. आतां हा उद्देश सिद्धीस जाण्याकरितां राजापूरचें अडकवून ठेवलेलें गलबत सोडावें लागेल. परंतु त्यामध्यें ८।१० हजार रुपयांपेक्षां अधिक किंमतीचा माल नसून तो बहुतांशीं राजापूर प्रकरणांत निरपराधी असणाऱ्या अनेक लहान व्यापाऱ्यांच्या मालकीचा आहे. शिवाय, या प्रकरणांत रदबदली करण्याकरितां शिवाजी, संभाजी व मुख्य अमलदारांचीं जीं पत्रें घेऊन ते व्यापारी येथें आले आहेत, त्या पत्रांत राजापूरच्या बाबतींत आम्ही समाधानकारक निकाल करतों अशीं वचनें दिलेलीं आहेत. **इत्यादि गोष्टी प्रेसिडेंटनें सांगितल्या** त्यावर विचार झाला; व ह्या बाबतींत सुरतकरांची संमती मिळाल्यावर राजापूरचें **पकडलेलें गलबत मालकांच्या स्वाधीन करून** त्याबद्दल शिवाजीला कळवावें. तसेंच युरपकरितां माल खरेदी करण्यासाठीं **राजापूरला या वर्षी वखार घालण्याचा** आपला उद्देश कळवावा. [ ह्या मजकुराचें पत्र सुरतेला २६ आगस्टला गेलें. पहा. ऑर्मे. ११४-२ पृ. ११९-२० ]

| | | |
|---|---|---|
| (खे) फॅ. रे. सुरत, भा. १०६<br>पृ. १८४ इ. | (१५५७)<br>मुंबई-सुरत. | श. १५९५ अ. भाद्र. व. ४<br>इ. १६७३ आगस्ट २१ |

[वरील बाबतींत पत्र]........इतक्या लोकांचीं शिफारस पत्रें आलीं आणि

**शिवाजीनें** आमच्या **नुकसानीच्या याद्या पुनः पहावयास मागितल्या.** तथापि आम्हीं अद्यापि कांहीं ठरविलें नाहीं. आम्हीं विचारलेल्या गोष्टींचा नीट विचार करा आणि जबाब लौकर पाठवा. हिंदुस्थानांतील राजे लोकांशीं सलोख्याचे संबंध राखण्याबद्दल **कंपनीची** आज्ञा स्मरा; आणि हें गलबत सोडून दिल्यानें इंग्रजांचें नांव व पत वाढेल हें लक्षांत घ्या. त्या योगानें मुंबईंत व्यापारी वर्गाची वस्ती वाढून मुंबईचा व्यापार वाढेल याचाहि विचार करा.

ऑर्म. भा. ११४ } (१५५८) { श. १५९५ अ. भाद्र व. ११
बि. २ पृ. १२३ इ. } मुंबई-इंग्लंड { इ. १६७३ आगस्ट २८

**डच आरमार** सीलोनकडे परत गेल्यावर, मुंबईचे व्यापारी व्यापाराबद्दल विचार करूं लागलेले पाहून, त्यांच्या उत्तेजनाकरितां म्हणून, **शिवाजीच्या मुलखांत जाणाऱ्या सुमारें चाळीस मिठाच्या गलबतांबरोबर,** आमचीं कांहीं व्यापारी गलबतें व **संरक्षणार्थ** दोन हत्यारबंद गलबतें पाठविलीं. या व्यवहारांत नगदी नफा झाला नसला तथापि बेटाची प्रशंसा झाली आणि व्यापारी लोकांनाहि समाधान वाटलें......**सिद्दी संबूळचें** शिवाजीवर जाणारें आरमार मुंबईस १० मेच्या सुमारास पोचलें. राजापूरचें बंदरांत शिरलेलें गलबत प्रथम पकडून ठेवावें असें वाटलें होतें. परंतु नंतर सोडून देणें इष्ट वाटलें....रास्त मार्गानें न वागणाऱ्या शत्रूंना धाक दाखविण्याकरितां, अशा बंदरांचीं व राजांचीं गलबतें धरण्याबद्दलची परवानगी देऊन ठेवा.

खं. २० ले. १३१ } (१५५९) { श. १५९५ अधि. भाद्र. व.१२
सु. १०७४ जवल २५ } मिसेली फा. मु. व सी. { इ. १६७३ आगस्ट २८

अज दि० पर० वाई—ता मोक० कसबे वाई
वाई येथील ५ होन चित्राव यास दिले आहेत. आदा करणें.

फॅ. रे. सुरत, भा. ३ } (१५६०) { श. १५९५ अ. भाद्र. व.१४
वि. ३ पृ. ३३ इ. } सुरत कन्सल्टेशन { इ. १६७३ आगस्ट ३०

राजापूर किंवा हुबळी या बाबतींत समाधानकारक भरपाई मिळण्याच्या पूर्वीच विलायतच्या गलबतांकरितां राजापूरचा माल मिळावा; याकरितां थोडा वेळ आपले हेतू लपवून तेथें वखार घालावी आणि राजापूरचें गलबत सोडून द्यावें अशी दुसरी सूचना होती. परंतु कौन्सिलला ती मान्य नाहीं. याचीं सविस्तर कारणें या तारखेच्या उत्तरांत दिलीं आहेत.

ऑर्म भा. ११४ } (१५६१) { श. १५९५ भाद्र. शु. ३
वि. २ पृ. १३२ इ. } मुंबई-मद्रास { इ. १६७३ सप्टें. ३

कारवारच्या लोकांनीं विजापूरच्या अदिलशहाविरुद्ध बंड करून तेथील वखारीला

'पुष्कळच त्रास दिला.... **शिवाजीच्या** सैन्यानेंहि हुबळी, कोल्हापूर (Callapore) आणखी कित्येक शहरें लुटल्यामुळें त्या प्रांतांत कितपत स्वास्थ आहे; याबद्दल कल्पन होत नाहीं.

मोंगल बादशहानें विजापूर व गोवळकोंड्याचे राजांशीं तह केला. आणि नुकतेंच पठाणांचें बंड मोडलें. यामुळें शिवाजीशीं युद्ध चालविण्यास आतां तो मोकळा झाला आहे. या आपल्या उद्देशाच्या सिद्धयर्थ, जमीनीकडून शिवाजीच्या मुलखांत प्रवेश करून त्याच्या किल्ल्यांत त्याला कोंडून ठेविण्यासाठीं **बहादरखान व दिलेरखान** हे दोन सरदार व किनाऱ्यावरील बंदरावर छापे घालण्याकरितां लहान गलबतांचें आरमार घेऊन **सिद्दी संबूळ**, असे त्यानें शिवाजीवर पाठविले. सिद्दीच्या आरमाराचा कांहीं भाग पावसाळ्यांत ह्या बंदरांत थाकाराला गेल्यामुळें शिवाजीला प्रथम वैषम्य वाटलें. परंतु अली· कडे आम्हीं योग्य खुलासा केल्यामुळें त्याचें समाधान झालें.... **गोवेकर डचांशीं युद्ध** करण्याची तयारी करीत होते. परंतु लिस्बनहून पुरेशी मदत न आल्यामुळें तो बेत जागच्या जागीं जिरला.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. मुंबई भा. १<br>पृ. ७९ इ. | (१५६२)<br>मुंबई कन्सल्टेशन | श. १५९५ भाद्र. शु. ४<br>इ. १६७३ सेप्टें. ४ |

शिवाजीच्या ब्राह्मणानें **राजापूरच्या गलबताबद्दल** अर्ज सादर केला कीं, "गलबताच्या मालकाचा शिवाजीशीं संबंध नसून तो, लूट झाली तेव्हां, कंपनीचा साहाय्यक होता. त्याचीच त्या लुटींत नागवण फार झाली. आतां तो पुष्कळ गरीब झाला असल्यामुळें त्याचें गलबत व माल परत मिळावा." याचा विचार होऊन, 'सुरतेच्या डे० प्रेसिडेंटकडे विचारणा केली आहे, त्याचें मत कळल्याशिवाय कांहींच मुकर करूं नये' असें ठरलें.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. मुंबई भा. १<br>पृ. ८३-८६ इ. | (१५६३)<br>मुंबई कन्सल्टेशन | श. १५९५ भाद्र. शु. १५<br>इ. १६७३ सप्टें १५ |

प्रेसिडेंटनें २१ ऑगस्टच्या जनरल लेटरमध्यें सुचविलेल्या मुद्यांवर सुरतेहून डेप्युटी प्रेसिडेंटचें ३० आगस्टचें प्रतिकूल पत्र आलें. त्याचा विचार करून येथील कौन्सिलचें मत बनलें तें असें: सुरतेच्या कौन्सिलचीं बरींच प्रमाणें चुकीचीं आहेत. कारितां राजापूरचें पकडलेलें गलबत खालील कारणांकरितां सोडून द्यावें असें आम्हाला वाटतें:-

एका बाजूनें बहलोलखान व दुसऱ्या बाजूनें मोंगलांचें सैन्य अशा **पेचांत शिवाजी** असल्यानें तो प्रतिकार करण्यास असमर्थ आहे आणि म्हणून त्याच्याशीं लपंडाव करून सौजन्यानें वागण्याचें कारण नाहीं असें सुरतवाले म्हणतात. वस्तुस्थिति अशी नसून शिवाजी दोघांनांहि तोंड देण्यास समर्थ आहे; एवढेंच नव्हे तर, नुकताच त्यानें

आदिलशाहींतील मध्यवर्ती आणि महत्त्वाचा किल्ला सातारा घेऊन तेथील अमर्याद लूट बैलांवरून रायगडास नेली. वर सांगितलेले दोघेहि सरदार त्याच्या मुलखांत यावर्षी, शिरतील हें खरें असलें तथापि रसदेचा तुटवडा भासून ते दीर्घ काल राहूं शकणार नाहींत. शिवाजीच्या सैन्यापासूनहि त्यांना फार त्रास होईल. शिवाय शिवाजीचा पुरा नाश व्हावा हा त्यांचा उद्देश नाहीं. कारण, हे उमराव स्वतःच्या फायद्याकरितां ह्या लढाया धोरणानें बादशाही खर्चानें चालवीत असतात ! नेट धरून एकदा युद्धाचा निकाल लावावा असें त्यांना कधींच वाटत नाहीं. अशा परिस्थितींत, डचांसारख्या प्रबळ शत्रूशीं युद्ध चालू असतांना, शिवाजीला चिडविल्यास आमच्यावर महासंकट ओढवेल. गेल्याच वर्षी डच लोकांनीं शिवाजीकडे ३००० सैन्याची कुमक मुंबई बेट घेण्याकरितां मागितली. त्यानें ही गोष्ट जाहीर रीतीनें मान्य केली होती. आणि शिदीचें आरमार येथें पावसाळ्यांत राहिलें त्यावेळीं रागानें डच पुनः आल्यास आपण काय काय करूं याबद्दल त्यानें धमकी दिली ! शिवाजी लुचा आहे असें सुरतकरांचें म्हणणें आहे. परंतु त्यामुळें आम्हीं त्याच्याशीं वैर केलेंच पाहिजे असें ठरत नाहीं. आम्हीं प्रथम कुरापत न काढल्यास तो भांडण उकरून काढणार नाहीं. त्यांतून एका बाजूनें दुष्काळाला आणि दुसऱ्या बाजूनें डच व शिवाजी यांच्या संयुक्त सैन्याला तोंड देण्याची आपली तयारी असल्याशिवाय आपण त्याच्या वाटेस जाऊं नये असें आम्हांला वाटतें. प्रेसिडेंट राजापूरच्या व्यापाऱ्यांची कींव करितो; परंतु राजापूरला लुटलें गेलेल्या व्यापाऱ्यांची करीत नाहीं हा आरोप निराधार आहे. गेलीं तीन वर्षे सतत याच गोष्टीकरितां निकाल लांबणीवर पडला आहे. तथापि व्यक्तींच्या हितसंबंधाकरितां सार्वजनिक वैर काय म्हणून संपादावें ?

प्रजेवर झालेल्या जुलमाचा सूड घेणें ही सर्वमान्य नीती असली आणि इंग्लंडच्या राजानें सार्वभौम सत्ता हवालीं केल्यामुळें कंपनी जरी स्वतःला 'राजसत्ता' आहे असें मानीत असली तथापि कंपनी हा एक फक्त व्यापारी संघ आहे. प्रामाणिक व्यापार हाच मुख्य उद्देश ठेवून युद्धांतील लूट म्हणून शिवाजीची काय किंवा कोणाची काय गलबतें घेणें हें सावधगिरीनेंच केलें पाहिजे. जरी स्वतःच्या शेळपटपणामुळें आमचें नांव बहुत बद्दू होत असलें तथापि कंपनीचा गलबतें पकडण्याचा आपल्याला थेट हुकूम नाहीं. गेल्या कित्येक वर्षे शिवाजी आणि झामोरीन यांशीं वाद चालू असताहि त्यांच्या बाबतींत देखील तसा त्यांचा हुकूम नसून उलट त्यांच्याशीं जमवून घ्या असेंच कंपनीचें सांगणें आहे.

समजा, बहलोलखानानें विजापूरकरांच्या वतीनें राजापूर घेतलें; तथापि हें गलबत परत केल्याशिवाय आम्हांला राजापुरांत व्यापार करतां येईल काय ? राजापूर बंदराचें महत्त्व तितकें कमी लेखतां येणार नाहीं. कारण, कित्येक प्रकारचा माल सुरतेपेक्षां राजापुरास किमानपक्ष शेंकडा २० टक्के स्वस्ताईनें मिळेल.

**कारवार इतकेंच हें बंदर महत्त्वाचें** असून मुंबईच्या व्यापाराला पोषक आहे. शिवाजीला मिळून गलबत परत दिलें असें जग म्हणेल; असा आणखी एक मुद्दा आहे. याची पर्वा करावयाची का कंपनीच्या खऱ्या हिताची काळजी करावयाची? एक तर **आपण सूड पक्का घेण्यास समर्थ नाहीं** आणि असलों तरी ही योग्य वेळहि नाहीं. आणि शिवाय कंपनीचा त्या गोष्टीला हुकूम नाहीं हें वेगळेंच.

हुकूम आधींच दिला गेला हें मोठें अडचणीचें प्रमाण नव्हे. तो सवडीप्रमाणें व सोईप्रमाणें बदलला पाहिजे. शिवाजीकडे करावयाची मागणी यामुळें आम्हीं सोडून देणार आहोंत असें नाहीं. वेळ प्रसंग पडेल त्याप्रमाणें व हात साधेल त्याप्रमाणें आपण तो प्रश्न पुढें चालवूंच.

या आणि इतर कारणांमुळें गलबत सोडून किनाऱ्यावरील व्यापाराचें पुढील बोलणें काढण्याकरितां गलबताच्या मालकाला शिवाजीकडे पाठविण्याचें ठरलें.

शिवाजीकडे गेलेल्या **नारायण शेणव्याचें** पत्र आलें. पुष्कळ खोटी होऊन तो परत यावयास निघाला होता इतक्यांत शिवाजीनें त्याला परत बोलावून सांगितलें कीं, 'वाद तोडण्यास मी तयार आहें. परंतु युद्धें चालू आहेत त्यामुळें रोकड हाताशीं नाहीं. परंतु कंपनीचा माल आपल्याला ७ ह. होनांचा मिळाला त्याची भरपाई राजापूरला वखार घातल्यावर जकातींतून करून घ्यावी. इतर इंग्रजांच्या देण्याचा विचार वखार घातल्यावर अवश्य करीन.' याबद्दलचा विचार नारायण शेणव्याच्या येण्यावर तहकूब ठेविला. [ऑर्म मा. ११४ वि. २ पृ. १४४ यांमध्यें ता. २० सप्टेंबरचें मुंबईचें सुरतेस पत्र बहुतेक याच मजकुराचें आहे.]

ओ. कॉ. मा. ३४ } नं. ३५५२ इ. }　　(१५६४) शिवाजी-ऑंजिअर　　{ श. १५९५ भाद्र. शु. १५ { इ. १६७३ (आगस्ट १५ते) सप्टें. १५

**भीमजी** व **नारायण** शेणवी स्नेहाचें बोलणें करण्यासाठीं आले. राजापूरच्या तहाचेंहि काम होऊन आतां तुमच्याकडे परत पाठविले आहेत. परस्परांचा स्नेह अबाधित रहावा, यापेक्षां अधिक लिहीत नाहीं. पाठविलेल्या नजराण्याचा स्वीकार करावा. [ले. १५५४ व १५६३ वरून साधारणतः वरील तारखेची मर्यादा येईल.]

(से) फॅ. रे. सुरत, मा. १०६ } पृ. २०४ इ. }　　(१५६५) मुंबई-सुरत　　{ श. १५९५ भाद्र. व. १४ { इ. १६७३ सप्टें. २९

**शिवाजीचा** पूर्वीचा **वकील** [भिमाजी] यास बरोबर घेऊन **नारायण शेणवी** आला आहे. राजापूरचा वाद मिटविण्याचा हुकूम घेऊन आल्याचें तो सांगतो. एकदां भेट झाली. **चाइल्ड, उस्टिक** व **डे** असे त्याच्याबरोबर बसून तो एकदां हिशेब तपासून बघणार. तो वकील त्यांच्यावर काय शेरे करितो तें पाहून कळवूं. नारायण शेणव्यानें

अशी पक्की बातमी आणली आहे कीं, विजापूरकरांनीं शिवाजीशीं तह केला. शिवाय विजापूरकर व गोवळकोंडेकर या उभयतांनीं मिळून मोंगलांशीं युद्ध चालू ठेवण्याकरितां शिवाजीला पैशांच्या मोठ्या रकमा दिल्या. बहलोलखान मिरजेला आजारी आहे. आतां मोंगल शिवाजीला कांहीं अपाय करितील हें भय अशक्य कोटींतील आहे. कारण मोंगलांची खोड मोडण्यासाठीं म्हणूनच त्यानें मोठें सैन्य उभारलें आहे. ही बातमी नारायण शेणव्याशिवाय इतरांनींहि आणिली आहे.

ओ. कॉ. भा. ३४ } (१५६६) { श. १५९५ भाद्र. आश्वीन
नं. ३६७९ इ. } मुंबईची हकीकत { इ. १६७३ आगस्ट [आक्टो (?)]

कांहीं महिन्यांपूर्वी दक्षिणबाजूनें काँडे डा सारजीडा या नांवाचा एक पोर्तुगीज इसम मलबार किनाऱ्यावर आला. थोड्याच दिवसांत त्याची लबाडी उघडकीस आली. आपण फ्रेंच सरदार आहों असा बहाणा करून हा इसम शिवाजीबरोबर होता. इंग्रजांकडून एक घोडा थोड्या वेळापुरता घेऊन त्यानें तो शिवाजीला दिला. शिवाजीनें त्याला सन्मानानें वागवून आपल्या देशांतून बाहेर काढून लाविलें तेव्हां त्याच्याबरोबर एक सैन्याची तुकडी दिली !

फॅ. रे. मुंबई भा. १ } (१५६७) { श. १५९५ आश्वीन शु. १
पृ. ९१-९२ इ. } मुंबई कन्सल्टेशन { इ. १६७३ आक्टो. १

शिवाजीच्या वकिलानें राजापूरच्या बाबतींत तडजोड ठरविण्यापूर्वी इंग्रजांच्या हिशेबांतील चुका दुरुस्त केल्या पाहिजेत असें सांगितल्यावरून चाइल्ड, उस्टिक व ढे यांनीं आज दोनप्रहरीं त्याचें म्हणणें ऐकून घेऊन प्रेसि. व. कौ.कडे अहवाल द्यावा असें ठरलें.

फॅ. रे. मुंबई, भा. १ } (१५६८) { श. १५९५ आश्वीन शु. ३
पृ. ९२ इ. } मुंबई कन्सल्टेशन { इ. १६७३ आक्टो. ३

सुरतेवर लुटीकरितां हल्ला करण्याचा शिवाजीचा बेत आहे अशी बातमी आली म्हणून सुरतेच्या रक्षणाकरितां शक्य तितकें लवकर एक गलबत पाठवावें.

(से) फॅ. रे. सुरत भा. ८८ } (१५६९) { श. १५९५ आश्वीन शु. ३
पृ. २५ इ. } कोटकोना-सुरत { इ. १६७३ आक्टो. ३

स्वालो या नांवाचें इंग्रजांचें गलबत पोर्तुगीज गलबतानें पकडलें. स्वालो हें बँटमहून मुंबईला येत असून त्यांत मुख्यत्वेंकरून मिरी होती.

ओ. कॉ. भा. ३३ }
नं. ३७५८ इ. } (१५७०) मुंबई कन्सल्टेशन { श. १५९५ आश्वीन शु. ६ { इ. १६७३ आक्टो. ६

इ. १६५९।६० मध्यें शिवाजीनें राजापूरची लूट केल्या वेळीं झालेल्या कंपनीच्या व कंपनीच्या नोकरांच्या नुकसानीबाबत शिवाजी राजाचे वकील व प्रेसिडेंट ऑंजिअर यांचेमध्यें तहप्रकरणीं झालेल्या बोलण्याचा वृत्तांत—

## तहाबद्दल वाटाघाटीचा अहवाल.

शिवाजी राजानें राजापूर प्रकरणींचा वाद मिटविण्याबद्दल बोलणें केल्यामुळें प्रथम कॅप्टन **उस्टिकला** बोलण्याकरितां पाठविलें. परंतु शिवाजी कांहींहि फेड करण्याला तयार नसल्यानें त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं [पहा. ले.१४६९]. त्यानंतर शिवाजीकडून **सुंदरजी** नांवाचा वकील आला. त्यानें अगदीं थोड्या फेडीचें बोलणें काढलें. तें प्रेसिडेंटला पसत न पडून आपलें मागणें काय आहे तें कळवून त्याला परत पाठविण्यांत आलें. पुढें इ. १६७३ च्या फेब्रुवारींत शिवाजीकडून **पिलाजी** या नांवाचा वकील आला. परतु त्या वेळीं इंग्रजांचें डचांशीं युद्ध चालू होतें; आणि अशा वेळीं केलेला तह कंपनीच्या हिताचा झाला नसता. म्हणून तहाचा प्रश्न तहकूब करण्याचीं मामुली कारणें दाखवून सामोपचाराचें पत्र देऊन पिलाजीला माघारा पाठविला [ले. १५१६]. त्यानंतर इ. १६७३ मे १९ रोजीं आमच्या मागण्या सांगण्याकरितां **टॉमस निकल्स शिवाजीकडे जाऊन** १६ जूनला परत आला. या वेळीहि तहाचें पाऊल पुढें पडलें नाहीं [कंपनीनें त्याचा वृत्तांत पहावा. ले. १५३६]. इतकें झाल्यावर जूनमध्यें शिवाजीकडून **भिमाजी** ( Biminagee ) पंडीत आला. त्याच्याशीं बरेच वेळां बोलणें होऊन कांहीं अंशीं तडजोड होऊ शकली. त्यानंतर शिवाजीशीं बोलणें करण्यापर्यंत पाळी आली. तेव्हां इकडून किमान मागणीची मर्यादा सांगून **नारायण शेणव्या**ला भीमाजीबरोबर शिवाजीकडे पाठविला [ले. १५४९]. सप्टेंबर २४ रोजीं नारायण शेणव्याबरोबर भीमाजी परत आला. पहिल्या दिवशीं मामुली वहिवाटीप्रमाणें स्वागता पलीकडे कांहीं झालें नाहीं. तथापि 'शिवाजीकडून तहाचे संपूर्ण अधिकार घेऊन मी आलों आहें' असें त्यानें सांगितलें. मागणीच्या कांहीं कलमांबद्दल त्याच्या शंका दूर करण्यांत आल्यावर तहाबद्दल निश्चय व्हावयाचा होता. परंतु **शिवाजी मोठें सैन्य तयार करून दौरा काढण्याच्या विचारांत होता**; त्याप्रमाणें एकदां तो निघून गेल्यावर त्याची भेट मागाहून घेणें कठीण झालें असतें. म्हणून त्या वकिलाला तहाबद्दल थोडी घाईच होती. **ऑक्टोबर १ ला** हिशेबावरील शिवाजीचे आक्षेप समजून घेण्यासाठीं चर्चा झाली [ले. १५६७]. तेथें कंपनीच्या ३९९५७ होनांच्या मागणीचा तपशील सांगण्यांत आला. तो पाहून वकील थोडासा दचकून ' शिवाजीला इंग्रजांकडून प्रत्यक्ष मिळालेल्या मालमत्तेच्या किती तरी पट हा आंकडा मोठा आहे ! यांत तडजोड होणें कठीण दिसतें ! ' असें म्हणाला.

परंतु **शिवाजीनें केलेल्या यादीशीं** इग्रजांचा तपशील कलमवार **ताडून पहा-ण्याचें अखेरीस ठरलें.** शिवाजीच्या वकिलाचें कलमवार म्हणणें खालीलप्रमाणें. पडलेः-**कलम १**-गंधक, कुलपी गोळे, पितळेचीं भांडीं वगैरे वजनदार किंवा ज्वाला-ग्राही जिनसा शिवाजीनें घेतल्याच नाहींत. आणि त्या नेणें त्या वेळीं शक्यहि नव्हतें. केवळ इतके कुलपी गोळे न्यावयासच जवळ जवळ २००० मजूर लागले असते! परंतु **शिवाजीच्या पाठीवरच आदिलशाहाची फौज आल्यामुळें** लगेच राजापूर सोडून शिवाजीला आपल्या किल्ल्यांचा आश्रय करावा लागला. आणि त्यानंतर तीन महिनेपर्यंत राजापूर **आदिलशहाच्याच ताब्यांत होतें.** तीन महिन्यानंतर पुनः राजापूर शिवाजीला मिळालें तेव्हांहि त्याच्या हातास ह्या वस्तु लागल्या नाहींत.

**कलम २**—राजापूरच्या **व्यापाऱ्यांकडून कंपनीचें येणें होतें तें देण्याची जबाबदारी शिवाजीवर मुळींच पडत नाहीं.** समजा, उद्यां हा वाद मिटल्यावर शिवाजीनें सुरत किंवा दुसरें एकादें शहर लुटलें. तर त्या शहरांत तुमचें देणे-करी असतील त्यांचें नुकसान होऊन तुमचें येणें बुडालें म्हणून ती सर्व जबाबदारी शिवाजीवर घालणार कीं काय? तुमची वखार आणि माल वांचविला जावा हें केव्हांहि मान्य आहेच. पण तुमचे देणेदार कोण आहेत याची प्रथम तुमच्याकडे यादी मागून त्यांना सांभाळीत बसणें हें अशा वेळीं कसें शक्य होईल?

**कलम ३**—**आदिलशहाकडून** किंवा **रुस्तुमजमाकडून** तुमचें येणें असेल तेंहि वरच्याच कारणांकरितां शिवाजीवर लादतां येणार नाहीं.

**तीची जरुरी नाहीं** हें उघड आहे. कारण, इंग्रजांशीं हा जुनाच वाद चालू आहे. त्याच मुदतींत मोठ्या मोंगल सैन्याशीं त्याचा झगडा अव्याहत चालू असून त्यांत त्याची एकसारखी सरशीच होत आहे ! इंग्रज शिवाजीचें नुकसानच करण्यास टपून बसले तर काय मोठेंसें करतील ? तर त्याच्या मुलखांतून जाणारीं कांहीं गलबतें पकडतील ! त्याचीहि शिवाजीला पर्वा नाहीं. तथापि ५००० होनांवर तुटत असेल तर राजापूर प्रकरण मिटवून सलोखा राखण्याची शिवाजीची तयारी आहे.'

यावर युक्तिवाद करून त्याला आम्ही उत्तर दिलें कीं, 'आमच्या आजपर्यंतच्या नरमपणाच्या वर्तनामुळें आमच्या हर्षामर्षाची पर्वा करावी असें शिवाजीला वाटत नाहीं हें शक्य आहे. तथापि त्याच्या मीठ नेणाऱ्या गलबतांची सुरक्षितता आमच्या मर्जीवर आहे हें लक्षांत ठेवावें. शिवाय त्याचीं किंवा त्याच्या राज्यांतील व्यापाऱ्यांचीं गलबतें आम्हीं धरण्याचें ठरविलेंच तर थोड्या वेळांत आमच्या नुकसानीची आम्ही भरपाई करून घेऊं हेंहि विसरूं नये. तुम्हीं दिलें हेंच शेवटचें उत्तर असेल तर शिवाजीनें ह्यापुढें ह्या बाबतींत तसदी घेण्याचें कारणच नाहीं. कारण, हें उत्तर आमच्या गव्हर्नरला सांगण्याच्या लायकीचें नाहीं. तुम्हांला व आम्हांला ज्याअर्थी ह्या प्रश्नाचा निकाल करण्याकरितां नेमिलेलें आहे त्याअर्थी **उभयतांना मान्य होईल अशी कांहीं योजना** काढण्यांत तुमच्या बुद्धीचा उपयोग करा.'

**ऑक्टोबर ३ रोजीं** दुसरी बैठक होऊन भीमाजी ७००० होनांवर आला. एवढ्यावर तडजोड होणार नाहीं असें आम्ही म्हणतांच गवर्नरला भेटण्याची त्यानें इच्छा प्रदर्शित केली. परंतु भरपाईची रक्कम चढविल्याशिवाय तें शक्य नाहीं असें म्हटल्यावर तो जें बोलला त्यावरून तो कांहीं चढवील अशी आमची समजूत झाली. आणि तदाकरितां उत्सुक असल्यामुळें आम्हींहि गवर्नरची भेट करविण्यासाठीं प्रयत्न करण्याचें वचन दिलें.

४ तारखेला मुंबई किल्ल्यांत गवर्नरनें त्याची भेट घेतली. बरेच तास पुनः पहिल्यापासून चर्चा झाल्यावर भीमाजी ९००० होनांवर आला. हे ९००० होन **७ वर्षांमध्यें जिनसांच्या रूपानें** आणि इंग्रजांनीं राजापुरास वखार घातल्यावर **जकातींतून** द्यावयाचे असें ठरलें. आणि एवढें कबूल करण्यांतच आपण हुकुमाचे पलीकडे गेल्याचें दर्शवून यापेक्षां अधिक रक्कम चढवितां येत नाहीं असें म्हणून तो थबकलाच.

शिवाजीचा हुकूम असा होता कीं, वकिलानें १००२५ होन (असमोला !) कबूल करावें. पैकीं २५०० होन कंपनी राजापूरला आयात निर्यात व्यापार करील त्यावरील जकातींतून द्यावे. राहिलेले तीन भाग जरूरीप्रमाणें मालाच्या रूपानें भरावे. त्यांतील एक हिस्सा राजापूरला वखार घालतांच द्यावा. दुसरा व तिसरा हिस्सा त्या दिवसा-

पासून एक एक वर्षाच्या अंतरानें द्यावा. आदिलशहा आणि रुस्तुमजमा यांच्या कर्जाची फेड व्हावी अशाकरितां शिवाजीनें शक्य ती खटपट करावी.

इतर राजापूरचे व्यापाऱ्यांनीं कंपनीचें देणें आहे त्याबद्दल, राजापूरला वखार घातल्यावर जे व्यापारी नादार झाले नसतील असे पाहून ते कंपनीचें देणें देण्यास अनुकूल होतील असें शिवाजीनें करावें. [ हाच वृत्तांत फॅ. रे. मुंबई भाग १ पृ. ९५-१०० येथें सदर तारखेलाच मुंबई कन्सल्टेशन म्हणून नोंदला आहे. त्यांत शेवटचा परिच्छेद नसून त्याऐवजीं 'प्रेसिडेंटनें तहाबद्दल मतें विचारतांच सर्वांनीं सन्मान व हितसंबंध सांभाळणारा हा तह आहे अशी मान्यता देऊन नारायण शेणव्यानें शिवाजीकडे जाऊन तह पुरा करून आणावा; व त्यानें शिवाजीकरितां पांच सहाशें रुपयांचा नजराणा घेऊन जावा असें ठरविलें ' असा निराळा परिच्छेद आहे.]

ओ. कॉ. मा. ३४ नं. ३९५१ इ. — (१५७१) प्रेसि॰ ऑंजिअर-शिवाजी — श. १५९५ आश्विन शु. ६ इ. १६७३ आक्टो. ६

(आपला वकील) भीमाजी पंडित आज [?] नारायण शेणव्याबरोबर तहाचा निकाल करण्याकरितां आला. जरी आमचें नुकसान पुष्कळ झालें असलें तरी मित्रत्वांत व्यत्यय येऊं नये म्हणूनच ७५०० होन रोख आणि २५०० होन राजापूर जकातींतून फेडावयाचे; अशी फक्त १० हजार होनांवरच तोड करण्याविरुद्ध आम्ही जात नाहीं. भीमाजीनें ठरविलेल्या इतर कलमांबद्दल आणि पुढें काम निघेल त्या बाबतींत उभयतांचा सलोखा राखण्यांत आमच्याकडून कसूर होणार नाहीं. नारायण शेणवी हें पत्र घेऊन जाईल. त्याचेबरोबर तुमच्याकरितां एक अरबी घोडा व इतर नोकरांकरितां वस्तु नजर पाठविल्या आहेत. [ ले. १५७० वरून ही तारीख संभवनीय वाटते. ]

फॅ. रे. सुरत मा. ३ पृ. ३८ (तृ. सं.) इ. — (१५७२) सुरत आणि शिवाजी — श. १५९५ आश्वीन शु. ७ इ. १६७३ आक्टो. ७

सुरत कन्सल्टेशन– सुरतेस शिवाजीचें सैन्य येण्याची हूल उठली. आणि सुभेदाराचे हुकमानें शहरचे दरवाजे बंद करण्यांत आले. प्रसंग पडल्यास आमच्या रक्षणाकरितां एक गलबत अनाची महिनाभराची तरतूद करून तयार ठेविलें.

ओ. कॉ. मा. ३४ नं. ३७७९ ता. २० आक्टोबरच्या मुंबईच्या हकीकतींत हीच बातमी आहे-सुभेदारानें फक्त एकच दरवाजा वगळून बाकीचे बंद करून ठेविले आणि शत्रूचे भक्ष्यस्थानीं पडण्याकरितांच जणुं सर्व व्यापाऱ्यांना शहरांत कोंडून ठेविलें.

फॅ. रे. मुंबई मा. १ पृ. १०२ तारीख सदर-मुंबई कन्सल्टेशन— 'चौल आणि इतर ठिकाणाहून शिवाजी सुरतेलाच निघाल्याची बातमी आल्यामुळें सुरतेच्या रक्षणाकरितां हंटर गलबत पाठवावें. व जरूर नसल्यास सुरतकरांनीं तें परत पाठवावें.'

फॅ. रे. मुंबई मा. ६ } (१५७३) { श. १५९५ आश्वीन शु. ७
पृ. १५६ इ. } मुंबई—मच्छलिपट्टण { इ. १६७३ आक्टो. ७

[या पत्रांत शिवाजीशीं तह; मोंगल, विजापूरकर आणि शिवाजी यांचे परस्पर संबंध यांचें ले. १५६५ प्रमाणें वर्णन आहे. व शिवाय पुढील माहिती आहे.] मोंगलाचें सैन्य **येत्या उन्हाळ्यांत** (Summer) शिवाजीच्या मुलखांत शिरेल असें लोक बोलतात. त्याला तोंड देण्याची तयारी शिवाजी करीत आहे. विजापूरकरांशीं युद्धाचा वहाणा चालू आहे.... **पोर्तुगीज लोक** शांतपणें आपला व्यापार किफायतीनें करीत आहेत [ऑर्म. हस्त. भा. ११४ ].

ओ. कॉ. भा. ३४ } (१५७४) { श. १५९५ आश्वीन शु. ८
न. ३७७९ इ. } मुंबईकडील हकीकत { इ. १६७३ आक्टो. ८

राजापूरचे संबंधांतील **शिवाजीशीं** चाललेल्या **वादाचा निकाल** एका अर्थानें आमचा मान राहून, आम्हाला किफायतशीर आणि आमच्या लौकिकाला शोभेल असा लागला. आतां अल्प काळांत शिवाजीच्या मुलखापासून कंपनीच्या व्यापाराला बरकत येईल असें म्हणण्यास हरकत नाहीं. आदिलशाहा व शिवाजी यांच्यांत **तहाची वाटा-घाट** चालू असल्याची बातमी चौल व इतर ठिकाणांहून आली. शिवाजीनें मोठें सैन्य उभारून **मोंगल व बहलोलखान** या उभयतांना आतांपर्यंत चांगलेंच तोंड दिलें. विजापूर व गोवळकोंडा यांच्याकडून **शिवाजीला गुप्तपणें पैसा आणि सैन्य** यांचा पुरवठा होतो. मोंगलांचा सेनापती आणि पथके सरदार यांना **शिवाजीनें द्रव्य चारून** अनुकूल केल्यामुळें या वर्षी मोंगल देखील मोठी लढाई देतील असें वाटत नाहीं. तथापि शिवाजीची जंगी तयारी पाहून तो कोणाशीं तरी तोंड देण्याची अगर आपण होऊन बादशाही मुलखांत हल्ला चढविण्याची अपेक्षा करीत असावा असें वाटतें. बादशाही खर्चावर उमराव लोक हें **युद्ध मुत्सद्देगिरीनें** चालू ठेवतात! शिवाजीचा पुरा नाश करण्याचा त्यांचा केव्हांच इरादा नाहीं. तसें करण्यांत कांहींच फायदा नाहीं! कारण युद्ध संपल्यावर **शांततेच्या काळांत त्यांची तुंबडी कशी भरेल?**

ऑर्म भा. ११४ } (१५७५) { श. १५९५ आश्वीन शु. १२
वि. २ पृ. १६२ इ. } मुंबई–सुरत. { इ. १६७३ आक्टो. १२

**सिद्दीच्या** आरमारानें आपल्या लीलांनीं आम्हांला चकित केलें! पैगंबराच्या आणि कुराणाच्या घेतलेल्या सर्व शपथा बाजूला ठेवून, त्यानें जबरदस्तीनें कारंजा, नागोठणा, पेण ह्या बाजूच्या खाडींत प्रवेश करून **नाकेबंदी केल्यामुळें मुंबई** बेटाला फार हलाखीचे दिवस आले.... **शिवाजी** किंवा दुसऱ्या कोणाहि लबाड माणसापेक्षां **सिद्दी** अधिक नीच, कृतघ्न आणि दुष्ट शत्रू आहे. त्याला रसद मिळवून देण्याचें

बावतींत या बेटाचे त्याच्यावर इतके उपकार झाले आहेत असें असूनहि ज्या अर्थी त्यानें बेटांतील आयात बंद केली त्या अर्थी **शिवाजीपेक्षां** आमच्याच राजीला अधिक बसावें असा त्याचा उद्देश दिसतो ! आम्हांला रसदीचा तोटा आल्यामुळें आम्हीं त्याच्या होड्यांना मुंबईत येण्याची बंदी केली. याबद्दल तक्रारी होऊन सुरतेचा सुभेदार तुम्हांला घालवून देण्याची धमकी देईल तर आपण एका पायावर तयार असल्याचें सांगा....

| | | |
|---|---|---|
| डाग रजिस्टर १६७३<br>पृ. ३०० इ. आक्टो. २३ न्यू. | (१५७६) | श. १५९५ आश्विन शु. १३<br>इ. १६७३ आक्टो. १३ |

पोपट नाईक बनिया, वेंगुर्लो—ग० ज० हिंदुस्थान. ( पोर्तुगीजावरून भाषांतर )

माझें सर्व वित्त, जीवित आणि कुटुंब धोक्यांत घालून आपली सेवा केली.......
शिवाजीच्या त्रासामुळें मला वेंगुर्लें सोडावें लागलें. पोर्तु० व शिवाजी यांनीं माझीं २ गलबतें पकडलीं.

| | | |
|---|---|---|
| स. पृ. १२२ ले. १५<br>सु. १०७४ रजब १५ | (१५७७)<br>महजर | श. १५९५ आश्विन व. १<br>इ. १६७३ आक्टो. १६ |

**शिवाजीचें** लष्कर हावसबावीसो जातां वेळे कागनेलास आग लावून गेलें तेव्हां गुरुनाथभट जोसी याचे घर व कागद जळाले.

| | | |
|---|---|---|
| ऑर्म मा. ११४ वि. २<br>पृ. १६४ इ. | (१५७८)<br>मुंबई–सुरत (?) | श. १५९५ आश्विन व. १<br>इ. १६७३ आक्टो. १६ |

बादशाही मुलुखांतील एकादे भागाची लूट करण्याची तयारी शिवाजी करीत आहे. २० हजार पिशव्या त्यानें लूट आणण्याकरितां तयार करविल्या आहेत. आणि शीघ्रगामी सैन्याचीहि त्यानें उभारणी केली आहे. त्याच्या **नजरेसमोर सुरतच** असण्याचा बराच संभव आहे असें वाटतें.

| | | |
|---|---|---|
| ऑर्म मा. ११४<br>वि. २ पृ. १६६ इ. | (१५७९)<br>मुंबई–सुरत | श. १५९५ आश्विन व. २<br>इ. १६७३ आक्टो. १७ |

**सिद्दी संबूळ** कारंजाच्या खाडींत बंदी करून या वर्षभर तसाच राहणार असें दिसतें. खाडीच्या तोंडांतील लहान बेटावर त्यानें किल्ला बांधला तर मुंबईला मोठा धोका बसेल. याकरितां आम्हीं शांतपणें हा अपमान सहन करणें इष्ट नाहीं....तुम्ही (सुरत सोडून) येथें फक्त १० दिवस येऊन राहिलां असतां, तर या **नालायक सिद्याला** त्याच्या ठिकाणांतून काढून मुंबईतून पार हाकून लावलें असतें. आणि मग हल्लींपेक्षां अधिक मानानें आणि अधिक सुरक्षितपणें तुम्हांला सुरतेंत परत पोंचविलें असतें !...जरी सुभेदार संतप्त होऊन बेफाम झाला तथापि तेथील **व्यापाऱ्यांचा तुमच्यावर लोभ** असल्यामुळें ते तुम्हांला सुरत सोडूं देणार नाहींत.

(दि) ओ. कॉ.
न. ३८७० इ.　　(१५८०)
मुंबई-सुरत.　　श. १५९५ आश्वीन व. ८
इ. १६७३ आक्टो. २३

दोन दिवसांपूर्वी शिवाजीचें सैन्य सुरतेला गेल्याची बातमी आली. तेव्हां हंटर गलबत सुरतेला पाठविण्याची तयारी केली. परंतु गुप्त हेरांकडून त्याचें सैन्य अद्यापि **महाड** जवळ असल्याची खबर कळल्यामुळें तूर्त हंटर येथेंच ठेवून पुनः तशी कांहीं खबर मिळतांच तें तत्काल रवाना करण्याच्या तयारीनें राहिलों आहोंत. **आणखी एक दोन महिने** शिवाजी इकडे गुंतून राहील असें दिसत असलें तथापि तुम्हीं आपला माल स्वालीकडे न्यावा हें चांगलें. सिद्यानें शिवाजीच्या मुलखांतील **गांवें जाळून** फारच दुष्टपणा केल्यामुळें चिडून जाऊन शिवाजी सुरतेवर किंवा अन्य कोणत्या तरी शहरावर त्याचा सूड उगवील हें खचित आहे. तुमच्या सूचनेप्रमाणें **शिवाजीवर गुप्त हेर** ठेविले आहेत. शिवाजीचे बेत अत्यंत गुप्त ठेविले जातात; आणि त्याच्या सैन्याचा *तळ कोठेंच टरत नसून कोणालाच कळल्याशिवाय केव्हांच दत्त म्हणून तो अचानक* छापा घालतो, यामुळें हेरांनीं आणलेल्या बातमीवर कितपत विसंबून रहावें हें आम्हांला समजत नाहीं.

**राजापूर व हुबळी** या दोन्ही लुटींच्या बाबतींत शिवाजीकडून समाधानकारक निकाल लावून घेण्याची आमची आशा आहे. जर शिवाजी कोणत्या राष्ट्राबद्दल **स्नेह** बाळगीत असेल तर तो **इंग्रजांबद्दल** होय. आणि यामुळें सुरतेवर हल्ला झाला तथापि इंग्रजांच्या वखारीला तो तोशीस देणार नाहीं. परंतु इंग्रज वखारींत त्याला कांहीं मिळाल्यास त्याची भरपाई करण्याबद्दल मात्र आपल्याला बांधून घेण्यास तो तयार नाहीं! ओ. कॉ. ३८७१ च्या याच तारखेच्या दुसऱ्या एका सुरतेस पाठविलेल्या पत्रांत **'सिद्दी** अलीकडे स्तब्ध आहे. **परंतु** नीचपणानें त्यानें आमच्या विरुद्ध तक्रारी केल्याचें कळतें. तरी तुम्हीं सुभेदाराची समजूत घालावी. वास्तविक सिद्दीनेंच येथें गुरें चारणें व अन्य तऱ्हेनें गरीब लोकांना सतावणें असे अत्याचार केले. आणि स्वतःचें त्यांच्या अत्याचारापासून रक्षण करणें किंवा दुष्काळ पडूं नये म्हणून खबरदारी घेणें याच्या पलीकडे आम्हीं कांहींच केलें नाहीं!" असा मजकूर आहे.

ओ. कॉ. मा. ३४
नं. ३८७२ इ.　　(१५८१)
मुंबई-कंपनी　　श. १५९५ आश्वीन व. ८
इ. १६७३ आक्टो. २३

कारवारला बंड चालू असल्यामुळें तेथील परिस्थिती पूर्ववत् बिकट असून तेथील वखार व व्यापार बंद आहे. मुंबईला सर्व शांतता आहे. तथापि, [सिद्दीबद्दल तक्रार आहे]. सुरत किंवा बंगाल इकडील व्यापाराला आमच्या कृत्यानें धोका येईल असें वाटलें नसतें तर सिद्दीला आम्हीं पक्का पायबंद घातला असता. कारण मुंबईची वाढ

होके नये म्हणूनच सुरतेच्या सुभेदारानें त्याला चिथावलें असावें. तरी सर्व बंदरांवर तुमचा हक्क आहे हें लक्षांत घेऊन कायती आज्ञा द्या. लढाऊ गलबतांना त्यांत राहूं देऊन आपला व्यापार धोक्यांत येतो. कारंजा व साष्टी यांचें स्वामित्व पोर्तुगीजांकडे आहे. त्यामुळें या बंदरावर आपला कांहीं हक्क ते सांगत असले तथापि इंग्रजांच्या द्वेषानें नागोठण्याजवळ सिद्दी जो किल्ला बांधीत आहे त्याला ते विरोध करणार नाहींत. डचांशीं चालू असलेलें युद्ध आणि मोंगली मुलखांत आमची वखार असल्यामुळें आमचा अडकलेला हात लक्षांत घेऊन आम्हीं आतां कांहींच प्रतिकार करूं शकत नाहीं. तथापि आमची मुख्य अडचण तुमचा तसा हुकूम नाहीं ही आहे. आम्हांला हुकूम दिला तर आम्हीं त्याचा दुरुपयोग करणार नाहीं ही खात्री बाळगावी. जशीं निष्कारण भांडणें उकरून काढणें हें अनिष्ट असतें तसेंच अपमान मुकाट्यानें सहन करणें हें हि अनिष्ट असतें.

शिवाजी आमच्याशीं सलोख्यानें वागतो. आम्हींहि ( उघडपणें नाहीं तथापि ) त्याच्याशीं स्नेह ठेविला आहे. शिवाजीच्या तहाबद्दल नंतर कळवूं. हा तह चांगला झाला असून शिवाजीच्या मुलखापासून आम्हांला किफायत होईल अशी उमेद आहे.

[ द्वि. ]—आमच्या मनांत अशी उत्कट इच्छा आहे कीं, मुंबईतील आणि शेजारच्या बेटांतील सर्व किस्ती लोकांनीं इंग्लंडमध्येंच बनविलेल्या कापडाचीं वस्त्रें वापरावीं. आमचा माल स्वस्त विकून लोकप्रिय करण्याची आम्हांला आशा आहे. युद्धाची धामधूम चालू नसती तर शेजारच्या राजांनीं आपल्या शिपायांना त्याच रंगाचे कपडे द्यावे अशी खटपट यशस्वी झाली असती.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. सुरत, भा. ३ <br> पृ. ४० ( तृ. सं. )इ. | (१५८२) <br> सुरत कन्सल्टेशन | श. १५९५ आश्वीन व. ११ <br> इ. १६७३ आक्टो. २५ |

मुंबईचा प्रेसिडेंट व कौन्सिल यांचें पत्र १७ तारखेचें आलें. त्यावरून सिद्दीबद्दल हकीकत कळली. सलोख्यानें नच जमेल तर मग दंडाचा अवलंब करावा. आम्हीं काय होईल तें शांतपणें सहन करूं. मध्यंतरीं सिद्दीच्या ह्या अत्याचारयुक्त व्यापाराबद्दल बहादुरखान व दिलेरखान यांच्याकडे तक्रार करून हुकूम आणवावा. त्याच्या बाबतींत प्रेसिडेंटने येथील कौन्सिलचा सल्ला विचारिला आहे. त्याबद्दल विचार करितां दोन मुद्दे दिसतात. (१) मुंबई बेटाचा व्यापार आणि लोक ह्यांची सुरक्षितता आणि भरभराट या दृष्टीनें ह्या गोष्टीचा विचार होईल किंवा (२) मोंगलांच्या मुलखांतील व्यापार राखण्याच्या दृष्टीनें विचार करावा लागेल....शिद्दी तेथें राहून व्यापारांत अडथळा करूं लागला तर लोकांचे उपासमार होऊन लोक सोडून जातील; कंपनीचें उत्पन्न कमी होईल; आणि कंपनीला बेटाचें रक्षण करणें हा आतबट्ट्याचा कारभार होऊन बसेल. म्हणून निर्वाणीचा विचार करावयाचा तर

**हिंदुस्थानांतील इतर भागांमधील व्यापारापेक्षां बेटाचे सुरक्षिततेला अधिकच महत्व दिलें पाहिजे.** तेव्हां प्रथम मन वळविणें, आर्जव इत्यादि उपाय केरून पहावे.

ओ. कॉ. मा. ३४ } (१५८३) { श. १५९५ आश्वीन व. ११
नं. ३८७४ इ. } सुरत-मुंबई. { इ. १६७३ आक्टो. २५

विजापूरकर शिवाजीविरुद्ध पाठविलेलें आपलें सैन्य काढून घेतील असेंच आम्हांला वाटतें. [ कारणांकरितां पहा. ले. १५६५ व १५७४ ] परंतु आमच्या व्यापाराच्या बचावाकरितां आणि ह्या देशांत आम्हांला शांततेनें रहावयास मिळावें म्हणून विजापूरकरांनीं तसें करूं नये आणि आम्हांला उपद्रव करण्याचीं साधनें शिवाजीच्या हातीं येऊं नयेत अशी आमची फार इच्छा आहे....शिवाजीबद्दल येथें भीती वाटत होती. परंतु त्याचें सैन्य विजापूरकरांच्या मुलखांत गेल्यामुळें ( अशी आमची समजूत आहे ) सर्व शांत आहे.

ओ. कॉ. मा. ३४ } (१५८४) { श. १५९५ कार्तिक शु. १
नं. ३८७९ इ. } मुंबई-सुरत { इ. १६७३ ऑक्टो. ३०

तुमच्या बेटावरील **सिद्दीच्या वाकनवीसानें** तुमच्या विरुद्ध तक्रार करण्याकरितां येथील सुभेदाराकडे अनेक खांके पाठविले आहेत. मुंबईत त्यानें खरेदी करून ठेवलेले गहूं त्याला तुम्ही नेऊं न देतां त्याच्या होड्या रिकाम्या परत गेल्या; **शिवाजी हा मोंगलांचा शत्रू** असून शेणव्याकडून तुम्ही त्याला नजराणा पाठविला; इत्यादि तक्रारी ज्यांत आहेत त्या वाक्याच्या नकला तुमच्याकडे पाठविल्या आहेत. येथील सुभेदारानें तुम्हीं सिद्दीशीं सामोपचारानें वागावें असें तुम्हांला कळविण्यास सांगितलें आहे.

ओ. कॉ. मा. ३४ } (१५८५) { श. १५९५ कार्तिक शु. २
नं. ३७७९ इ. } मुंबईची हकीकत. { इ. १६७३ आक्टो. ३१

**सिद्याचे कांहीं लोक शिवाजीच्या** मुलखांतील **भातांचीं** उभीं शेतें **कापून नेत असतां** शिवाजीच्या शिपायांनीं त्यांच्यावर अचानक छापा घालून सुमारें शंभर जणांना यमसदनाला पाठविलें व त्यांतील कित्येक बऱ्या लोकांचीं **शिरें शिवाजीकडे नेलीं.**

(दि.) ओ. कॉ. } (१५८६) { श. १५९५ कार्तिक शु. ९
नं. ३८८१ इ. } मुंबई-सुरत { इ. १६७३ आक्टो. ३१

शिवाजीच्या सैन्याकडून तुमच्याकडील भागाला कांहीं वेळ तरी तोशीस पोंचणार नाहीं अशी आमची समजूत आहे. कारण, आम्हांला असें खात्रीलायक कळलें आहे

की, शिवाजी जातीनें १५००० सैन्य बरोबर घेऊन **गोव्यानजीकचा फोंडा** ( Panda ऑर्मे ) या नांवाचा किल्ला विजापूरकरांपासून जिंकून घेण्याकरतां गेला आहे. **कर्नाटकामध्यें** यादवी उत्पन्न होऊन मरहूम राजाच्या **विधवेनें** मोठा खजीना देण्याचें वचन देऊन त्याची मदत मागितल्यामुळें, तो प्रांत ( साधल्यास ) जिंकण्याचा त्याचा विचार आहे.

दख्खनच्या किनाऱ्यावरील हद्दपांत आणि नागोठण्याच्या नाकेबंदीच्या बाबतींत, शिवाजीनें ३०० लोकांनिशी बंदोबस्त केल्यामुळें, **सिद्दीसंबूलची फजीती** होऊन आतां तो आमच्याशीं स्नेह जोडूं पाहात आहे. आमच्या विरुद्ध त्याच्या तक्रारीचें निराकरण करण्याकरितां आम्ही याचा **टॉमस रोच** याला प्रेसिडेंटनें पत्र लिहिलें. **बादशहालाहि** उत्तम कारकुनाकडून **एक अर्जदास्त** लिहवून सिद्दी आपल्या वर्तनानें बादशहाला कसें लांच्छन आणितो आणि स्वतःला कोणतेंहि यश मिळालें नसतां बादशहाला कसें फुगवून सांगती हें बादशहाला कळविण्याचा इरादा आहे (पहा ले. १५९०). तुम्ही सिद्दीला बंदराबाहेर लावण्याकरितां नजराणा वगैरे द्यावा असें सुचविलें तें प्रेसिडेंटला पसंत नाहीं. तसें केल्यानें असा नजराणा ही वार्षिक खंडणीची बाब होऊन बसून बंदरावरील कंपनीच्या स्वामित्वाला बाध येईल. त्यापेक्षां सुरतेचा सुभेदार **घास्तीखान** यालाच नजराणा देऊन सिद्दीला कडक हुकूम देववावा हें अधिक चांगलें. (आर्मे ११४-२ पृ. १८७).

ओ. कॉ. भा. ३४ } (१५८७) { श. १५९५ कार्तीक शु. ३
नं. ३७१४ ड. } सुरत-इराण { इ. १६७३ नोवें. १

हिंदुस्थानांतील हकीकत—शिवाजीनें विजापूरच्या मुलखांत शिरून ( आदिलशहा या वर्षी वारला, १६७२ नो. २४; श. १५९४ मार्ग शु. १५ ) अनेक किल्ले व हुबळी इत्यादि अनेक ठिकाणें घेतली व लुटली. कारवारच्या वखारीचा सर्व माल व खरेदी-विक्री करण्याची **आमची बाजारपेठ** हुबळीला होती. तेथें कंपनीचे सुमारें ३५०० पौंडांचें नुकसान झालें. हा हल्ला केल्यामुळें विजापूरच्या राजानें शिवाजीवर मोठें सैन्य रवाना केलें. आणि ह्या बाजूला मोंगलांचें सैन्य आहेच. शिवाजीनें चांगलें सैन्य उभारून आपल्या राज्यांत शिरण्याच्या मार्गाची उत्तम नाकेबंदी केली असल्याकारणानें दोन्ही शत्रूंशीं युद्ध देण्याची त्याची चांगलीच तयारी आहे. **शिवाजी** आहे म्हणूनच मोंगलांची वक्रदृष्टी आपल्यावर वळत नाहीं हें विजापूरकरांना पक्कें माहीत असल्यामुळें शिवाजीचा नाश करण्यांत त्यांना फायदा नाहीं. तेव्हां त्यांचें सैन्य परत जाईल असें वाटतें. अशा रीतीनें शिवाजी अडचणींत सांपडला असतांनाहि, सुरतेपासून ६० मैलांवर त्याचें एखादें सैन्य आल्याची बातमी येतांच शहरांत भीती पसरून लोक पळण्यास तयार होतात; गेल्या महिन्यांत असें घडून आणीर लोक थांबविण्याकरितां शहरचे दरवाजे बंद करावे लागले. पहा

ले.१५७२, ऑक्टो ७. [शब्दशः याच मजकुराचें पत्र फॅ. रे. सुरत भा. ८७ पृ. ५४ वर आहे. यांत इ. १६७३ मे ते नोव्हेंबरची हकीकत दिली आहे. ओ. कॉ.]

फॅ. रे. सुरत भा. ३
पृ. ४२ (तृ. सं.) इ.

(१५८८)
मॅथ्यूमे (स्वाली)-सुरत

श. १५९५ कार्तिक शु. ८
इ. १६७३ नोव्हें. ६

(हंटर बोटीच्या कप्तानास पत्र)- सुरतेला स्वस्थता आहे. आतां **बादशहाचीं दोन** लढाऊ **गलबतें** आणि इतर लहान तरांडीं तुमच्या (मुंबई) बंदरांतील **सिद्दीच्या आरमाराला मिळण्याकरितां** जात आहेत. अशा वेळीं मुंबईला सैन्याची आवश्यकता जाणून आम्हीं फक्त २ पथकें येथें ठेवून बाकीचें सैन्य मुंबईकडे परत करीत आहोंत. तें घेऊन जावें. घांटेंत बादशाही आरमार भेटल्यास त्याच्याशीं गोडीनें वागावें. ६ गलबतें व ४० गुराब असें **शिवाजीचें आरमार** बाहेर येत आहे अशी बातमी आहे. तरी त्यांनीं प्रथम कुरापत काढल्याशिवाय त्यांच्याशींहि हातघाईस येऊं नये.

(से) फॅ. रे. सुरत भा. ८७
पृ. १३ इ.

(१५८९)
स्वालीमरीन-मुंबई

श. १५९५ कार्तिक शु. ८
इ. १६७३ नोव्हें. ६

फ्रेंचानीं एक गलबत राजापुराकडे पाठविलें आहे. त्यांत २००० मण शिसें व ८८ लोखंडाच्या तोफा आहेत. त्या सुमारें ३ ते १७ पौंड वजनाच्या (गोळ्यांच्या ?) आहेत. [(प) सदर पृ. ७४-७५; १६७४ जाने. १२ सुरत-कंपनी] — **२५ ऑगस्ट [१६७३] रोजीं** हें सुरतेला आलें व राजापूरकडे गुप्तपणें रवाना झालें.

फॅ. रे. मुंबई, भा. ६
पृ. २५१-२ इ.

(१५९०)
मुंबई-टॉमस रोच, आग्रा.

श. १५९५ कार्तिक शु. ८
इ. १६७३ नोव्हें. ७

**सिद्दी संबूळचें** बादशाही आरमार गेल्या पावसाळ्यांत येथें होतें. त्याचें जमीन व पाणी या दोन्ही बाजूंनीं शिवाजीपासून मीं आपलेपणानें रक्षण केलें. कारण तें जाळण्याचा शिवाजीचा फार हेतु होता. गेल्या **ऑगस्ट अखेर** तीं गलबतें दंडाराजपुरीला जाऊन महिन्यानें परत आलीं. आणि पूर्वीचे दारूगोळा, माणसें व अन्न सामुग्री पुरविल्याचे उपकार न स्मरून किनाऱ्यावरून बेटावर येणाऱ्या मालाची त्यांनीं बंदी केली. त्यामुळें त्यांना बेटावरून सामान देण्याचें आम्हीं नाकारलें. शिवाय, त्या लोकांनीं गुरें चोरण्याचा आणि बेटावरील घरें लुटण्याचा अत्याचार केल्यामुळें त्यांना बेटावर येण्याचीहि बंदी केली. ह्यामुळें सिद्दी संबूळनें आमच्याविरुद्ध अनेक खोट्यानाट्या गोष्टी लिहून **बहादरखान** व **सुरतेचा सुभेदार** यांच्याकडे तक्रारी केल्या आहेत. बादशाही हितसंबंधाला विरोध करून त्याचा शत्रू शिवाजी याला मी मदत करतों असें खोटेंच भासविण्याचा त्यानें प्रयत्न केला. शिवाजी लुटारू आहे. त्यानें नुकतेच दख्खनमधील

खं. २०.ले. १३३ } (१५९८) { श. १५९५ मार्ग. शु. ९
सु. १०७४ रम ८ } मिसेली फा. मु. मज. सी. { इ. १६७३ डिसें. ७

अज दि. पर. वाई——ता मौक. मौ. गोवे वगैरे.

नरसीभट बिन रंगभट चित्राव यास गोवे वगैरे गांवी १० होन सादिलवार आहे. तरी पूर्वीप्रमाणें आदा करीत जाणें.

खं २० ले. १३४ } (१५९९) { श. १५९५ मार्ग. शु. ९
सु. १०७४ रम ८ } मिसेली फा. मु. मज. सी. { इ. १६७३ डिसें. ७

अज दि. पर. वाई——ता मोक. कसबे वाई.

वाई येथील गिरमाजी त्रिंबक यास वाई येथें एक चावर जमीन इनाम आहे. तरी ती पूर्वीप्रमाणें चालू ठेवणें.

खं. २० ले. १३५ } (१६००) { श. १५९५ मार्ग. शु. ९
सु. १०७४ रम ८ } मिसेली फा. मु. मज. सी. { इ. १६७३ डिसें. ७

अज दि. पर. वाई——ता मोक. मौ. बोरखल व किण्ही.

नरसीभट बिन रंगभट व एकनाथ रामेश्वरभट (चित्राव) यास वरील गांवीं एकंदर १॥ चावर जमीन आहे. ती पूर्वीप्रमाणें चालविणें.

खं. २० ले. १३६ } (१६०१) { श. १५९५ मार्ग. शु. ९
सु. १०७४ रम ८ } मिसेली फा. मु. मज. व सी. { इ. १६७३ डिसें. ७

अज दि. पर. वाई——ता मोक. मौ. पसर्णी.

नरसीभट बिन रंगनाथभट चित्राव यास सिद्धनाथवाडीस नीम चावर जमीन इतर हकासुद्धा इनाम आहे ती पूर्वीप्रमाणें त्याजकडे चालविणें.

ओ. कॉ. भा. ३४ } (१६०२) { श. १५९५ मार्ग. शु. १०
नं. ३९०४ इ. } कारवार-सुरत { इ. १६७३ डिसें. ८

**शिवाजीच्या चळवळ्या स्वभावामुळें** त्याच्या शेजाऱ्यांना शांतता मिळत नाहीं. आदिलशाहाचा मृत्यु, त्याच्या वारसाचें पोरवय आणि सरदारमंडळींतील दुही यांचा फायदा घेऊन शिवाजी मोठ्या सैन्यासह ह्या राज्यांत शिरला व त्यानें अनेक मजबूत किल्ले घेतले व व्यापारी पेठा लुटल्या. [ त्यांत हुबळीचें महत्त्व व कंपनीचें नुकसान झालें ह० ] ......परंतु हें प्रकरण इतक्यावरच न थांबतां येथील सुभेदारानें आदिलशहाविरुद्ध बंड करून त्याला द्रव्य सहाय्य मिळविण्याकरितां आमची वखार लुटण्याचा बेत केला. परंतु स्वतः सावध राहून आदिलशहानें पाठविलेल्या सुभेदाराला आम्हीं मदत केली. बंडखोराचें सैन्य अनेक वेळां मोठें नुकसान होऊन परत गेलें. या गडबडींत गलबतें भरण्याला पुरेसा माल जमा झाला नाहीं.

सज्ज करण्यास बरें पडेल. कारण त्याला फक्त तोफाच पाहिजे होत्या. त्याबद्दल त्यानें आमच्याकडे मागणी केली. परंतु आमच्याजवळ पुष्कळ तोफा असूनहि आम्हीं तुमच्या सुरतेंतील हितसंबंधांकडे लक्ष देऊन तोफा दिल्या नाहींत.

सा. ले. ३८९ फ. १०८३ } (१५९३) { श. १५९५ कार्तीक व. ४
सु. १०७४ साबान १७ } फर्मान { इ. १६७३ नोवें. १७

फर्मान हु०-बजा, आमिल० देसा० मामले गोवा:— दुलबा परताबराव सरदे० यांस कर्या०-देसकतीची मिरास दिली आहे ती त्याजकडे चालविणें.

फॅ. रे. संकीर्ण भा. २ } (१५९४) { श. १५९५ कार्तीक व. १४
पृ. १४९ इ. } मुंबई कन्सल्टेशन. { इ. १६७३ नोवें. २७

दूलम (Dulam!)ला फिनिक्स गलबत (ketch) घेऊन जाऊन तेथून लाकूड सामान आणणारे लहान पडाव मलबारी चांचे, शिवाजी आणि सिद्दी यांच्या हल्ल्यापासून सुरक्षितपणें बचावून आणावे अशी मि. नॉरमॅन्ड् याला आज्ञा.

फॅ. रे. मुंबई भा. ६. } (१५९५) { श. १५९५ कार्तीक मार्ग. व. २
पृ. २२४-५ इ. } मुंबई-कंपनी { इ. १६७३ नोवेंबर-व डिसें. १५

तांबें आणि कथील ह्यांच्या व्यवहारांत मुंबईची टांकसाळ किफायतशीर होईल. आचीनहून परत आलेलें थोडेंसें कथील शिल्लक होतें. त्याचे प्रेसिडेंटनें चग्रूक (टिनी) पाडून घेतले. त्यांतील बहुतेक या बेटांतच खपून लोकांची फार सोय झाली. राहिले ते चौल आणि शिवाजीच्या मुलखांत फारच किफायतीनें दिले. दरमणीं २५ रु. नफा झाला. १८ रु. च्यावर एक पै मिळेल अशी त्याची अपेक्षा नव्हती.

(से.) फॅ. रे. सुरत भा. ८७ } (१५९६) { श. १५९५ मार्ग. शु. ४
पृ. ४३ इ. } सुरत-फोर्ट सेंट जॉर्जे. { इ. १६७३ डिसें. २

ब्रूस्टर नांवाच्या तरुण इसमाचे मुंबईहून राजापुरास जाणाऱ्या एका गलबताला गोव्याहून येणारीं शिवाजीचीं चार गलबतें भेटलीं. त्यांनीं इंग्रजांचीं ७ गलबतें गोव्याच्या नरतार्शी असल्याचें सांगितलें.

खं. २० ले. १३२ } (१५९७) { श. १५९५ मार्ग. शु. ९
सु. १०७४ रम ८ } मिसेली फा. मु. मज. सी. { इ. १६७३ डिसें. ७

अज दि. पर. वाई——ता मोक. मौ. पसरणी.

नरसीभट बिन रंगभट चित्राव यांस सिद्धनाथवाडीची नीम चावर जमीन इतर हक्कासह इनाम आहे ती त्याजकडे पूर्वीप्रमाणें चालविणें.

खं. २० ले. १३३ }
सु. १०७४ रम ८ }
(१५९८)
मिसेली फा. मु. मज. सी.
{ श. १५९५ मार्ग. शु. ९
{ इ. १६७३ डिसें. ७

अज दि. पर. वाई——ता। मौक. मौ. गोवे वगैरे.

नरसीभट बिन रंगभट चित्राव यांस गोवे वगैरे गांवी १० होन सादिलवार आहे. तरी पूर्वीप्रमाणें आदा करीत जाणें.

खं २० ले. १३४ }
सु. १०७४ रम ८ }
(१५९९)
मिसेली फा. मु. मज. सी.
{ श. १५९५ मार्ग. शु. ९
{ इ. १६७३ डिसें. ७

अज दि. पर. वाई—ता। मोक. कसबे वाई.

वाई येथील गिरमाजी त्रिंबक यास वाई येथें एक चावर जमीन इनाम आहे. तरी ती पूर्वीप्रमाणें चालू ठेवणें.

खं. २० ले. १३५ }
सु. १०७४ रम ८ }
(१६००)
मिसेली फा. मु. मज. सी.
{ श. १५९५ मार्ग. शु. ९
{ इ. १६७३ डिसें. ७

अज दि. पर. वाई—ता। मोक. मौ. बोरखल व किण्ही.

नरसीभट बिन रंगभट व एकनाथ रामेश्वरभट (चित्राव) यास वरील गावीं एकंदर १॥ चावर जमीन आहे. ती पूर्वीप्रमाणें चालविणें.

खं. २० ले. १३६ }
सु. १०७४ रम ८ }
(१६०१)
मिसेली फा. मु. मज. व सी.
{ श. १५९५ मार्ग. शु. ९
{ इ. १६७३ डिसें. ७

अज दि. पर. वाई—ता। मोक. मौ. पसर्णी.

नरसीभट बिन रंगनाथभट चित्राव यांस सिद्धनाथवाडीस नीम चावर जमीन इतर हकाखुद्दा इनाम आहे ती पूर्वीप्रमाणें त्याजकडे चालविणें.

ओ. फॅा. मा. ३४ }
नं. ३९०४ इ. }
(१६०२)
कारवार–सुरत
{ श. १५९५ मार्ग. शु. १०
{ इ. १६७३ डिसें. ८

**शिवाजीच्या चळवळ्या स्वभावामुळें** त्याच्या शेजाऱ्यांना शांतता मिळत नाहीं. आदिलशाहाचा मृत्यु, त्याच्या वारसाचें पोरवय आणि सरदारमंडळींतील दुही यांचा फायदा घेऊन शिवाजी मोठ्या सैन्यासह ह्या राज्यांत शिरला व त्यानें अनेक मजबूत किल्ले घेतले व व्यापारी पेठा लुटल्या. [ त्यांत हुबळीचें महत्त्व व कंपनीचें नुकसान झालें इ० ] ......परंतु हें प्रकरण इतक्यावरच न थांबतां येथील सुभेदारानें आदिलशहाविरुद्ध बंड करून त्याला द्रव्य सहाय्य मिळविण्याकरितां आमची वखार लुटण्याचा बेत केला. परंतु स्वतः सावध राहून आदिलशहानें पाठविलेल्या सुभेदाराला आम्हीं मदत केली. बंडखोराचें सैन्य अनेक वेळां मोठें नुकसान होऊन परत गेलें. या गडबडींत गलबतें भरण्याला पुरेसा माल जमा झाला नाहीं.

फॅ. रे. सुरत भा. ८८ पृ. ५२ —कारवार—सुरत, तारीख सदर—'शिवाजी स्वतः सैन्य घेऊन येथून दीड दिवसाच्या अंतरावर आला आहे.'

(दि.) ओ. कॉ. नं. ३९०७ इ. (१६०३) मुबई—ई. इं. कपनी श. १५९५ मार्ग. व. २ इ. १६७३ डिसें. १५

मुंबईच्या लोखंडी तोफा आम्ही **शिवाजीला** देऊ शकूं. परंतु तसें केल्यानें शत्रूला तोफा पुरविल्याबद्दल बादशहाचा आपल्यावर राग होईल....

दहा आज्ञा आणि खिस्ती धर्माच्या तत्वांचें देशी भाषांत भाषांतर करून तें बेटांत फैलावून **खिस्ती धर्म स्वीकारण्यास उत्तेजन द्यावें** ही आपली आज्ञा आम्हांला महत्त्वाची वाटते. आणि तो अमलांत आणण्याचा प्रसंग येईल त्याप्रमाणें आम्ही अमलांत आणूं. परंतु धर्माचे बाबतींत सर्वांना स्वातंत्र्य देण्याची आमची प्रतिज्ञा असल्यामुळेंच येथें लोकवस्ती वाढत आहे, हें ध्यानांत घेतां या बाबतींत आमचें ताटस्थ्य थोडें देखील ढळल्याचें लोकांच्या लक्षांत आल्यास अनिष्ट परिणाम होईल. यामुळें हें **आक्रमण गुप्तपणेंच करणें** जरूर आहे.

(दि.) ओ. कॉ. नं. ३९१० इ. (१६०४) मुंबई—ई. इं. कंपनी. श. १५९५ मार्ग. व. २ इ. १६७३ डिसें. १५

आमच्या २३ ऑक्टोबरच्या पत्रांत शिवाजीच्या तहाबद्दल लिहिलें. त्याच्या वकिलाचा व आमचा पक्का करार झाला. तथापि **शिवाजी गेल्या तीन महिनेपर्यंत** स्वदेशांतून (स्वारीवर) बाहेर गेल्यामुळें खुद्द त्याची संमति मिळावयाची राहिली आहे. २५००० सैन्य घेऊन विजापूरकरांच्या मुलुखांत व कानडा प्रांतांत तो आपल्या सैन्याच्या खर्चाकरितां वसूली (लूट) करण्यासाठीं गेला आहे....हुबळीच्या लुटीची काडीमात्र जबाबदारी घेण्यास तो तयार नसला तरी राजापूरप्रमाणेंच त्याही गोष्टीचा अनुकूल निकाल लागेल अशी अपेक्षा आहे. कारण, शिवाजी त्याच्या बंदरांत पुनः इंग्रजांनीं व्यापार करावा अशी इच्छा करितो. आणि खरें पाहिलें तर **राजापूर, दाभोळ, केळशी** वगैरे बंदरें मुंबईच्या व्यापाराला अत्यंत पोषक अशीं आहेत. तेथें वखारी घातल्यास युरोपांतील बाजार-पेठांना उपयोगी असा पुष्कळच माल सुरत किंवा इतर ठिकाणांपेक्षां शेंकडा २५ टक्के स्वस्त मिळूं शकेल. शिवाजीच्या मुलखांत युरोपांतील माल खपवितां येईल. शिवाय त्या मुलखांत लागणारीं नाणीं पुरविल्यानें (पैसे, टिनी किंवा बसूके) मुंबईच्या टांकसाळीला मोठा फायदा होईल. तसेंच स्वतःचा माल खपविण्याकरितां तो **मुंबईला स्वतःच्या व्यापाऱ्यांची वखार** घालणार आहे. त्यायोगानें या बेटाचा व्यापार वाढेल व जकातींचेंहि उत्पन्न वाढेल. असो; या भरपाईच्या तहाबद्दल इंग्रजांनीं आपलें अभिनंदन करून घेण्यासारखें आहे. मोंगल, विजापूरकर,

पोर्तुगीज इत्यादींच्या मुलखांत शिवाजी लूट करीत असून आजपर्यंत इंग्रजांशिवाय दुसऱ्या कोणत्याहि राष्ट्राला लुटीबद्दल त्यानें भरपाई करून दिली नाहीं !( ही समाधानाची व विशेष अभिमानाची गोष्ट आहे. ) [ ऑर्म ११४-३ पृ. ३८-४० ]

ऑर्म. भा. ११४ } वि. ३ इ. | (१६०५) मुंबई-इंग्लंड. | { श. १५९५ मार्ग. व. २ इ. १६७३ डिसें. १५

[पृ. ३१]-जुन्नर, औरंगाबाद, रायबाग, हुबळी, विजापूर या ठिकाणीं कंपनीचा व्यापार (पुनः) थाटण्याचा विचार सिद्धीस जाईल अशी आशा आहे. [पृ. ३०]-**नागोठण्याच्या** खाडीच्या तोंडावर सिद्यानें त्याच वेळीं ठाणें दिल्यामुळें तेथून **मजूर** मिळण्याचें बंद पडलें. आणि पाण्याखालील जमीन दुरुस्त करावयाचें काम झालें नाहीं. [पृ. ३६]-मुसलमान अधिकारी, शिवाजी आणि पोर्तुगीज सत्ताधीश यांशीं प्रेसिडेंटला चांगले संबंध ठेवण्यासाठीं **निरनिराळ्या भाषांत पत्रव्यवहार** ठेवावा लागतो. परंतु या सर्वांत पोर्तुगीजांकडून फारच त्रास होतो. प्रत्येक ठाण्याचा **पोर्तुगीज अधिकारी** (Fidalgo) म्हणजे एक छोटा राजाच असून त्याला गोव्याच्या व्हाइसरॉयइतक्या मानानें व समारंभानें वागवावें लागतें !

फॅ. रे. सुरत भा. ८८ } पृ. ३०-३१ इ. | (१६०६) कारवार-सुरत. | { श. १५९५ मार्ग. व. ४ इ. १६७३ डिसें. १७

शिवाजी **कुद्रेरा** (Cuddera) ला आल्याची बातमी ८ तारखेच्या पत्रांत लिहिली ती खरीच ठरली. ४ इ. पायदळ व २ इ. घोडदळ घेऊन तो जातीनें आला; परंतु चार दिवसांपेक्षां अधिक राहिला नाहीं. त्याचें बहुतेक सैन्य **हुबळी** नजीकच्या टेकडीवर होतें. यामुळें तेथील व्यापारी शहर सोडून पळाले. [से]-आमचें कांहीं शिसें चोरीस गेल्याचें ऐकितों; परंतु कोणीं नेलें, किती नेलें वगैरेबद्दल कांहींच तपशील कळला नाहीं... शिवाय **बहलोलखानानें बंकापूरला** आणि **सर्जाखानानें चांदगडला** शिवाजींचा मोड केला असेंहि कळलें. याच पराजयामुळें तो इतक्या लवकर परत गेला असावा. अजूनहि येथें शांतता मिळत नाहीं !

फॅ. रे. सुरत भा. ८७ } पृ. ५१ (द्वि.सं.) इ. | (१६०७) स्वाली मरीन-मुंबई. | { श. १५९५ पौष शु. १ इ. १६७३ डिसें. २८

सर्व बोटी व गलबतें तुमच्याकडे परत करीत आहों. एक ड्रॉय (गलबत) मात्र **शिवाजीनें कांहीं उपद्रव दिलाच** तर येथील रक्षणाकरितां ठेवून घेत आहों.

खं. २० ले. १३७ } सु. १०७४ सवाल ४ | (१६०८) मिसेर्ली | { श. १५९५ पौष शु. ५ इ. १६७४ जाने. २

अज दि. पर. वाई——ता मोरु. तळिये, किन्ही, पिंपरी, माडले, खेड.

नारायणभट बिन एकनाथभट चित्राव यांस वरील गावीं, एकंदर १॥ चावर ज़मीन हक्कासह इनाम व सादिलवार होन ५ आहे. तरी वरील इनाम त्यांजकडे पूर्वीप्रमाणें चालविणें.

(दि.) ओ. कॉ.
न. ३९२९ इ.　　(१६०९)
प्रेसि. ऑजिअर-ईस्ट इं. कंपनी　　श. १५९५ पौष व. ४
इ. १६७४ जाने. १५

स्वतःच्या मनाशींच जेव्हां मी तुमचा व इतर खिस्ती राष्ट्रांचा व्यवहार यांची तुलना करून पहातों, तेव्हां इंग्लंडांतून निर्यात केलेल्या मालाचें प्रमाण व किमती, त्या मोबदला हिंदुस्थानांतून नेलेला माल, सामान्य खर्च, कारभाराचा नमुना, त्याचा मुख्य उद्देश आणि तत्सिद्धयर्थ अमलांत आणिलेले उपाय, इत्यादि अनेक दृष्टींनीं तुमचा व्यवहार इतरांच्या पेक्षां अधिक पक्क्या व चिरस्थायी पायावर उभारलेला आहे असें दिसतें. हें अधिक स्पष्ट करण्याकरितां इतरांचें थोडक्यांत वस्तुस्थिति-निदर्शक वर्णन देतों.

**डेन्स** लोकांचे संबंध अत्यल्प असून त्यांना चांचे लोकांपलीकडे कोणी मोजीत नाहीं.

**पोर्तुगीजांना** आपलें हिंदुस्थानांतलें स्थान टिकविण्याला फारच आयास पडतात. त्यांचा व्यापार अल्प परंतु खर्च मोठा आहे. आणि जरी सुव्यवस्थित कारभार केल्यास किफायतशीर होतील अशीं पुष्कळ ठाणीं त्यांच्या ताब्यांत आहेत, तथापि कारभार अनास्थेचा असल्यामुळें व्यापार नष्ट होतो आणि पाद्री व फिडालगो लोक सर्वच वसूल खाऊन टाकतात. अलीकडे व्हाइसरॉयाच्या दूरदर्शी कारभारानें व्यापार व वसूल या दोन्ही गोष्टींत थोडी वाढ आहे.

**फ्रेंच** मोठा डौल घालीत असले तथापि त्यांना या मितीपर्यंत फारसा फायदा झाला असेल असें वाटत नाहीं. स्वतःचा फायदा करून घेण्याच्या ऐवजीं शेजाऱ्यांना त्रास देणें हाच त्यांचा मुख्य उद्देश आहे असें दिसतें. आणि हा त्यांचा उद्देश बराच सिद्धीस गेला असें म्हणण्यास हरकत नाहीं. हॉलंडच्या युद्धांत यश आल्यास कदाचित् त्यांची महत्त्वाकांक्षा वाढून ते अधिक प्रगति करूं शकतील. सेंट टोम येथील त्यांची वसाहत त्या किनाऱ्यावर तुम्हांला बराच अडथळा करील; परंतु फ्रेंचांना स्वतःला तिचा कितपत फायदा होईल हें चिंत्य आहे. सीलोनांत स्थान मिळविण्याची त्यांची इच्छा असल्यास न कळे. परंतु डचांच्या ही गोष्ट ध्यानांत आली असून त्यांनीं त्यांना तेथून यापूर्वीच हुसकून लावलें असतें; परंतु तुमच्या आरमारानें दोनदां न कळत त्यांना मार्गे फिरविलें ( diverted ) यामुळें ते राहिले.

**डच** पैसा व सामर्थ्य यांनीं युक्त असून हिंदुस्थानांतील बहुतेक नाक्याचीं ठिकाणें त्यांच्या ताब्यांत आहेत. परंतु तीं सर्व त्यांनीं तरवार आणि अत्याचार यांच्या जोरावर मिळविलीं असल्यामुळें त्यांना तशींच राखणें भाग आहे ! सैन्याच्या उभारणीला अतो-

-नात खर्च होऊन नेहमीं प्राणहानी अगणित होते.. हिंदुस्थान आणि युरोप येथील प्रबळ शेजाऱ्यांची स्पर्धा आणि कारवाई यांपासून त्यांना नेहमीच भय आहे; आणि जिंकतांना केलेला जुलूम, शेजाऱ्यांवरील जबरदस्ती आणि त्यांच्या प्रजेचे नेहमीं होणारे हाल हे इतके प्रसिद्ध आणि सर्वत्र अप्रिय होऊन बसले आहेत कीं, त्यांच्या शिरावर या पापाचा भार होऊन त्याच्याच दडपणाखालीं ते चिरडून नाश पावतील !

परंतु इंग्रजांचें तसें नाहीं. इंग्रजांचा व्यापार तुमच्या सुंदर व्यवस्थेमुळें दैवी जलानें जीवन मिळणाऱ्या, आपल्या वसाहतींच्या नजीकच्या सर्व लोकांच्या प्रेमांत खोल मुळें गेलेल्या, वृक्षाप्रमाणें असून सर्वांनाच त्यापासून लाभ होत असल्यामुळें, राजे, राज्यें इत्यादींची तुमच्यावर एकप्रकारची भक्ति आहे. तुमचा कोणालाहि अनिष्ट अथवा जबरदस्तीचा त्रास नसून तुमचे उद्देश न्याय्य आणि स्तुत्य आहेत....सर्व ठिकाणीं व्यापार करण्यास योग्य असा माल स्वाधीन ( आपला आपल्याच देशांत मिळणारा ) आहे, व खर्च फार मोठा नाहीं; निदान मुंबई व सुरत येथील व्यापाराबद्दल मी खात्री देऊं शकेन. मात्र अलीकडे आपलें डचांशीं युद्ध चालू झाल्यापासून व हिंदुस्थानांत युद्धाची दंगल माजल्यापासून ही परिस्थिति जरा बदलली आहे. परंतु ही आपत्ती सर्वांवरच आली ती भोगली पाहिजे. अशीच ती चिरकाल टिकेल असेंहि नाहीं.

थोड्या हलक्या जातीच्या परंतु चांगल्या नीतीच्या इंग्रज बाया इकडे पाठवून घाव्या. म्हणजे त्यांचीं येथील शिपायांशीं लग्नें लावून देतां येतील. ते देशी बायकांशीं संबंध ठेवूं लागले तर धर्मनीतिप्रमाणें आम्हीं त्यांना त्यांच्याशीं लग्न करण्यास भाग पाडतों. त्यापेक्षां त्यांनीं इंग्रज बायांशीं लग्नें लाविलीं तर अधिकच चांगलें होईल.

सा. ले. १३४ } (१६१०) { श. १५९५ पौष व. ५
पु. १०७४ श. } { इ. १६७४ जाने. १६

बहिरो बावाजी सुरूरकर-गंगोपंत व महादाजीपंत बोकीलः-तुमच्या वडिलापासून १२ होन कर्ज घेतलें; ११॥ वर्षांत ८ होन व्याज होतें. मुदतींत न देऊं तरी ७॥ टके दरमहा व्याज देऊं. १॥ वर्षानंतर निमे कुलकर्ण व ज्योतिष किंवा म्हावसींची सवंध वृत्ती देऊं.

फॅ. रे. मुंबई मा. ६ } (१६११) { श. १५९५ पौष व. ८
पृ. ३८-४० ( द्वि. सं. ) इ. } मुंबई-ई. इं. कंपनी { इ. १६७४ जाने. १९

[ ओ. कॉ. ३९१० ले. १६०४ मधील, शिवाजीची तहाला मान्यता मिळावयाची राहिली आहे इत्यादि मजकूर ].

( से ) फॅ. रे. सुरत मा. ८७ पृ. ९२-९३ तारीख सदर, सुरत-कंपनीः— अलीकडे शिवाजीचें सैन्य विजापुराकडे गुंतलें आहे. यामुळें शिवाजीकडून आम्हांला कांहीं त्रास पोंचला नाहीं.

ऑर्म ११४-३ } (१६१२) { श. १५९५ पौष व. ८.
पृ. ४६ इ. } मुंबई-इग्लंड { इ. १६७४ जाने. १९

शिवाजीला फ्रेंचांनीं ८८ तोफा आणि ३००० मण शिसें पुरविल्याचें ते आपल्या तोंडानें कबूल करितात; परंतु आपल्याला (शिवाजीनें) त्या देण्यास भाग पाडलें असेंच ते म्हणतात. आतां (शिवाजीच्या लोकांना) आमच्याकडून तोफा व शिसें लागणार नाहीं. हल्लींच्या [विकट] परिस्थितींत आम्हांला याबद्दल कांहींच वाईट वाटत नाहीं.

डच रेकर्डस्, भा. ३१ } (१६१३) { श. १५९५ पौष व. १०
नं. ८०५ इ. जाने. ३१ न्यू. } डच ग.ज.-डच ई.इं.कंपनी { इ. १६७४ जाने. २१

मोंगलाच्या आणि विजापूरकरांच्या अशा जोड सैन्याने शिवाजीचा अनेक वेळां पराजय केला. तथापि त्याची जबरदस्ती सर्व देशांत पूर्ववतच चालू आहे. युद्धांत झालेली हानी सुवर्णाच्या प्रयोगानें कशी भरून काढावी, हें तो उत्तम जाणतो. थोडया दिवसांपूर्वी, एक नांवाजलेला महत्त्वाचा किल्ला [पन्हाळा?] मुसलमानांकडून काडीचाहि प्रतिकार न होतां त्यानें असाच प्रयोग करून घेतला. त्याचा मान आणि महत्त्व यांची पुनः चढती कमान आहे.

(से) फॅ. रे. सुरत भा. ८८ } (१६१४) { श. १५९५ माघ शु. ७
पृ. ६४ इ. } सुरत-फोर्ट सेंटजॉर्ज { इ. १६७४ फेब्रु. ३

आमच्या फत्तेमाऱ्यांना मुक्कामाला यावयास पूर्वी लागत असे त्याच्या दुप्पट वेळ लागला. या सर्वांच्या मुळाशीं शिवाजीच आहे.

फॅ. रे. सुरत भा. ८८ } (१६१५) { श. १५९५ माघ शु. १०
पृ. ५० इ. } सुरत-मुंबई { इ. १६७४ फेब्रु. ६

दिलेलखानाचा शिवाजीनें पक्का मोड केला. त्यांत दिलेलखानाचे १००० पठाण आणि शिवाजीचे सुमारें ४००।५०० लोक कामास आले.

स. ले. १४ पृ. १२१ } (१६१६) { श. १५९५ माघ व. २
सु. १०७४ जिल्काद १५ } सनद { इ. १६७४ फेब्रु. १२

स. इ. राजश्री राघो बल्लाळ सुभेदार व कारकून महालानिहाय तर्फ पुणें यांसी राजश्री शिवाजी राजेः-दंडवत सैद सादत हजरत पीर सैद हिसाम खताल व काजी कासिम पीरजादे व नायब काजी व खतिबा परगणे मजकूर महाराज साहेबांचे वेळेस मोगवटा चालिला असेल व अफजल(खान) मारिला त्याचे आधीं साहेब पुण्यास असतां, ते वेळेस मोगवटा चालिला असेल, तेणेंप्रमाणें तहकीक-

करून मनास आणून, इनाम व रोजमुरा व बाजे हक्क जे असेल ते भोगवटा प्रमाणें दुमाला करणें; व मशीद गांवगन्ना तेल रोपनाई चालत आलें आहे तेणेंप्रमाणें देणें. व काजी इभराइमाचे लोक, काजी कासिमासी खुतबा पढावयाबद्दल इस्कील करितातो, तरी या हरदोजणांचा निवाडा महाराज साहेबांचे वेळेस जाहला आहे. निवाडपत्र काजी कासिमापाशीं आहे. तें मनास आणून हरदोघांस सदरहू निवाडियाप्रमाणें वर्तवणें व मौजे फुरसिंगांचे मशिदीचे खिजमतेबद्दल हसन तांबोळी व चांदजी मोकादम कसबे खेडवारे हे हरदोघेजण गैरमिरासी असोन दखल करितात. तरी सनदपत्र मनास आणून गैरमिरासी असेल तो दूर करणें. सालाबाद चालत आले असेल तेणेंप्रमाणें चालवणें. रवाना मोर्तबसूद

ऑर्मे ११४-३ } (१६१७) { श. १५९५ माघ व. ७
पृ. ७१ इ. } मुंबई-इंग्लंड { इ. १६७४ फेब्रु. १७

दंडाराजपुरीचा सिद्दी व शिवाजी उभयतां युद्धाला कंटाळले असून, युद्ध रेंगाळत चाललें आहे. सिद्दीनें विनंति केल्याप्रमाणें उभयतांचा तह करून देण्याची प्रेसिडेंटला आशा वाटते.

फॅ. रे. मुंबई भा. १ } (१६१८) { श. १५९५ फाल्गुन शु. ९
पृ. १७-१८ (द्वि. सं.) इ. } मुंबई कन्सल्टेशन { इ. १६७४ मार्च ६

शिवाजी **रायगडला** परत आला आणि पूर्वी झालेला तह मान्य करण्यास तो तयार आहे असें समजल्यावरून, तह पुरा करण्याकरितां नारायण शेणव्याला तावडतोब रवाना करावें. **दंडाराजपुरीच्या** सिद्यानें आपला व शिवाजीचा तह करून द्यावा अशी प्रेसिडेंटला विनंति केली. सुरतेच्या कौन्सिलकडूनहि याबद्दल संमति आली. यामुळें, **नारायण शेणवी** तहाकरितां जाईल तेव्हां त्यानें शिवाजीची या बाबतींतील मर्जी पाहून इकडे कळवावें. शिवाजीची अनुकूलता दिसून आल्यास हें जुनें तहाचें प्रकरण मिटविण्या-करितां हेन्री ऑक्झिंडेन याला मुखत्यार वकील म्हणून पाठवावें. आणि त्यानेंच शिवाजी व सिद्दी यांचा तह व स्नेह घडविण्याचा प्रयत्न करावा.

ऑर्मे ११४-३ } (१६१९) { श. १५९५ फाल्गुन व. ८
पृ. १०० इ. } मुंबई-सुरत { इ. १६७४ मार्च १९

मोंगलांचें सैन्य **शिवाजी**च्या सरहद्दीवर आलें असून गेल्यावर्षीप्रमाणें शिवाजी-च्या मुलखांत घुसेल असा अंदाज आहे. इकडेच अन्नसामग्रीचा तुटवडा आहे. आतां ह्यांनीं गरीब प्रजेची जाळपोळ व लूटमार केल्यावर त्यांना स्वतःला कांहींच फायदा न होतां दुष्काळ मात्र अधिक कडकेल.

ऑर्मे. ११४-३ } (१६२०) { श. १५९५ फाल्गुन व. १२
पृ. ९६ इ. } मुंबई-सुरत { इ. १६७४ मार्च २४

गेल्या सालच्या गैरवर्तनामुळें **सिद्दी संबूळला** मुंबईला पावसाळ्यांत राहूं न देण्याचें आम्हीं ठरविलें.

-खं. ८ ले. ३० } (१६२१) { श. १५९५
सु. १०७४ } खुर्दखत 'प्रति.' सु. { इ. १६७३-७४

रा.**शिवाजी राजे**—— बकाजी फर्जंद

मौ. नांदेड तर्फ खडकवासले येथील निमी मोकदमी पोळापासून साहेबीं विकत घेतली ते तुम्हांस हाली १०० होनास विकत दिधली.

'एपि. इंडो. मॉस्लेमिका १९०७-८ } (१६२२) { श. १५९५-९६
पृ. ९ हि. १०८४ } शिलालेख { इ. १६७३

गुलबर्गा येथील पील बुरुजावरचा शिलालेखः—

शिकंदर आदिलशहाच्या कारकीर्दीच्या सुरवातीस मुख्य प्रधान **खवासखान** यानें हि. १०८३ मध्यें दिलेल्या हुकुमावरून मलिकंबराचा मुलगा सुभेदार व हवालदार **शिद्दी संबूल** यानें हि. १०८४ मध्यें हा 'शिकंदर बुरुज' बांधविला. (यांत उल्लेखिलेला मलिकंबर निजामशाही राज्यांतला प्रसिद्ध मुत्सद्दी नव्हे.)

फ्रायर भा. १ } (१६२३) { श. १५९५-९६
पृ. १५१-५२ इ. } फ्रायरची टिपणी { इ. १६७३

**कारवार** हें या (पश्चिम) किनाऱ्यावरील विजापूरकरांचें मुख्य बंदर होय. परंतु हें बंदर व त्याला जोडून थेट गुजराथपर्यंतचा प्रदेश हीं हल्लीं आदिलशहाशीं राजद्रोह (traytor) करणारा राजा शिवाजी याच्या ताब्यांत आहेत. त्यानें तेथील आमची वखार बहुतेक फोडून आमचेवर नाना अत्याचार केले....हा शिवाजी कोण आहे आणि त्याच्या वाढत्या सत्तेच्या मुळाशीं काय आहे हें पहाण्यास या देशांत अधिक वेळ राहिलें पाहिजे. परंतु प्रत्येक ठिकाणीं त्याचें नांव उच्चारतांच सर्वजण भेदरून जातात. एकाद्या प्रचंड लोंढ्याप्रमाणें त्याच्यापुढें सर्व कांहीं स्थानभ्रष्ट होत जातें.... हें शिवाजीचें बंड होईपर्यंत, दख्खन (?) व विजापूरचें राज्य यांची एकजूट होती आणि विजापूरचें राज्य पूर्णपणें स्वतंत्र असून तें मोंगलांना खंडणी देत नसे.

-(दि)लेटरबुक मा. ५ } (१६२४) { श. १५९६ चैत्र शु. ७
पृ. ११५ इ. } कंपनी-सुरत { इ. १६७४ एप्रील ३

भीमजीकरितां मुंबईबेटावर एक **मुद्रक, मुद्रणयंत्र, कागद** इत्यादि सामुग्री पाठविली आहे. मुद्रकाचा पगार दरसाल ५० पौंड इत्यादि सर्व खर्च भीमजीकडून घ्यावा.

फॅ. रे. सुरत मा. ८८ } (१६२५) { श. १५९६ चैत्र शु. ८
पृ.७८-८३ इ. } नारायण शेणवी—डे. गव्हर्नर, मुंबई. { इ. १६७४ एप्रील ४

मंगळवार ता. २४ मार्च रोजीं रायरीला पोंचलों व त्याच दिवशीं **निराजी पंडिताची** (Naragy Punditt) भेट घेण्याकरितां पायथ्याच्या **पाचाड** (Banchar) गांवीं गेलों. चौकशी केली. तेव्हां निराजी गडावर होता असें समजलें. म्हणून माझ्या आगमनाची वर्दी गडावर राजाकडे एका नोकराकरवीं पाठविली. त्याच दिवशीं निराजीचा हुकूम नोकरानें असा आणिला कीं, 'शिवाजीचें **पत्नीच्या मृत्यूचें** सुतक फिटेपर्यंत तुम्हीं आमच्याच घरीं रहावें' असें रिकामपणीं पांच दिवस घालविले. मध्यंतरीं निराजी पाडव्याकरितां [२८ मार्च] आपल्या घरीं आला. दुसऱ्या दिवशीं त्यानें मला आपल्याबरोबर नेऊन एका प्रशस्त घरांत माझी सरबराई केली. तेथें आणखी पांच दिवस राहिलों. काल **तीन तारखेला** दोन प्रहरीं **निराजी** मला दरबारांत शिवाजी समोर घेऊन गेला. स्वागत व कुशलप्रश्न झाल्यावर मीं राजापूरबद्दल प्रश्न काढला. निराजीनें अपेक्षेपलीकडे आमची तरफदारी केली आणि शिवाजीनें ताबडतोब कारकुनांना हुकूम लिहिण्यास सांगितलें. राजापूरची भरपाई तीन हप्त्यांनीं व्हावयाची; २५०० होन राजापूरच्या जकातींतून, २५०० होन येत्या १ सप्टेंबरला सुरू होणाऱ्या पहिल्या वर्षी आणि ५००० होन त्यानतर दोन वर्षांच्या अवधीन घावयाचे. अशा स्वरूपाचे कागद तीन चार दिवसांत तयार झाल्यावर ते आदिल मोदी ( Adall Moody ) याच्या हातीं सविस्तर हकीकत सांगून पाठवीन....नव्या वर्षारंभीं जूनमध्यें स्वतःला **राज्याभिषेक** करून घेण्याच्या इरादानें सोनें व हिरे यांचें एक भव्य सिंहासन शिवाजी बनवीत आहे. ह्या समारंभाकरितां असंख्य विद्वान् ब्राह्मणांना बोलावून तो मोठा दानधर्म करणार आहे. परंतु हा **राज्याभिषेक** तो **स्वतःला** करून घेणार आहे **किंवा दुसरा कोणी राजा** होणार आहे हें **माहीत नाहीं**. कारण **निजामशाही वंशांतील** एक राजा त्याच्या ताब्यांत आहे असें लोक म्हणतात !...**बहादूरखान** कोंकणांत उतरणार होता. परंतु शिवाजीनें ठिकठिकाणीं डोंगरांतील वाटा मोडून अवघड ठिकाणीं कडक पहारे ठेविल्यामुळें तो परत फिरला....**प्रतापराव बहलोलखानाशीं** एका खिंडींत फक्त ६ घोडेस्वारांनिशीं लढतांना बाकीचे सैन्याचे मदतीचे अभावीं, मारला गेला. त्याचे जागीं नवा सेनापती नेमून, सैन्याला नवे हुकूम देण्यासाठीं **शिवाजी कुडाळला** जाणार होता. परंतु प्रतापरायाचा दुय्यम आनंदराय यानें धीराचें पत्र लिहिल्यामुळें शिवाजीनें त्याला सेनापतीपद देऊन 'शत्रूचा मोड केल्याशिवाय तोंड दाखवूं नये' असा हुकूम केला. **शूर आनंदराय** बहलोलखानाचा पाठलाग करीत शत्रूच्या मुलखांत शिरला असतां, प्रतापरायाच्या मृत्यूची बातमी ऐकून बहलोलखानाच्या कुमकेला **दिलीलखानहि** त्वरेनें आला. दोघे एकत्र झाल्यानें आपला धडगत नाहीं असें पाहून आनंदराय रोजीं ४५ मैलाच्या मजला मारीत **कानडयास** गेला. उभय

(विजापुरी) सरदारांनीं पुष्कळ दिवस पाठलाग करूनहि कांहीं साधत नाहीं असें पाहून ते परत गेले. दिलीलखान **पन्हाळयाला** वेढा घालण्याकरितां म्हणून गेला तो तेथें फक्त पांच दिवस राहून परत गेला. आणि बहलोलखान **कोल्हापुरास** गेला. इकडे आनंदरायानें बरेंच आंत शिरून बहलोलखानाच्या जहागिरीपैकीं **बंकापूरपासून** २५ मैलांवरील **पेंच** नांवाचा गांव लुटून ३००० बैलांवर लादून ती लूट नेली. बहलोलखान आणि **खिदरखान** (Quider Ckaun) यांनीं प्रतिकार केला. बंकापूरजवळ घनघोर युद्ध झालें. त्यांत खिदरखानाचा भाऊ व बहलोलचा भाचा असे मारले गेले; आणि **आनंदरायाचा जय** होऊन त्याला ५०० घोडे व २ हत्ती वगैरे भरपूर लूट मिळाली. ती **शिवाजी**कडे पोंचवून तो आतां **बालाघाट**कडे आणखी लूट मिळविण्यास गेला आहे.......[पहा कानड्याचें बातमीपत्र डिसें. ५ ले.–] **फत्तेखान सिद्यार्शी** तह करण्याची शिवाजीची मर्जी नाहीं असें **निराजीनें** सांगितलें. तोच स्वतः या बाबतींत अधिक लिहील.... *सातवळीचे [सावित्री?] खाडींत* **सिद्दी संबूलनें दौलतखानाशीं** लढाई दिली. त्यांत त्याचे १०० व दौलतखानाचे ४४ लोक पडून **दौलतखानाचा जय** झाला. *उभयतांना जखमा लागल्या. अशा रीतीनें पराजय झाल्यामुळें तो* बेसिंग [बिसबी]-जवळ हरेश्वरला गेल्याची बातमी **शिवाजीनें**च स्वतः मला सांगितली. यापुढें तुम्हीं सिद्दीला कोणत्याहि प्रकारें जवळ केल्यास शिवाजीशीं जमणार नाहीं असें त्यानें पहिल्या भेटींतच मला सांगितलें....आतां ऑक्झिंडेनबरोबर चांगला नजराणा देऊन त्याला लगेच पाठवावा. निराजी पंडिताचे सांगण्यावरून, तुम्हीं, शिवाजीच्या नजराण्यांत अरबी घोडा न पाठवितां मूल्यवान् रत्नें राज्यारोहणाच्या वेळीं धारण करण्यासाठीं पाठवावीं, हें बरें दिसतें. नजराणा चांगला १०००।१२०० रुपयांचा पाठवा. निराजी-करितां २५ तोरमळ्यांचे खडे (thurmas) कबूल केल्याप्रमाणें पाठविण्याचें गिरिधर-दासला स्मरण द्यावें. [हें पत्र मूळ **पोर्तुगीज** भाषेंत लिहिलेलें आहे त्याचें इंग्रजींत भाषांतर केलें, त्याचें हें मराठीकरण आहे ]

| | | |
|---|---|---|
| (सं.) फॅ. रे. सुरत भा. ८७<br>पृ. १४३–४४ इ. | (१६२६)<br>सुरत–मुंबई. | श. १५९६ चैत्र शु. १२<br>इ. १६७४ एप्रील ७ |

आपण सिद्दीला परवानगी का देत नाहीं याचीं सविस्तर कारणें लिहून प्रेसिडेंटनें सुभेदाराला एक सीलबंद पत्र पाठवावें. आमचे माहितीकरितां त्या पत्राचें इंग्रजी भाषां-तर सोबत पाठवावें. म्हणजे संधी साधून आम्हीं तें पेश करूं. आम्हीं स्थानिक व जवळ-चेच असल्यामुळें आमच्या सांगण्यापेक्षां तुमच्या पत्राचा उपयोग अधिक होईल.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. मुंबई भा.१<br>पृ. २४ (द्वि.) इ. | (१६२७)<br>मुंबई कन्सल्टेशन | श. १५९६ चैत्र शु. १४<br>इ. १६७४ एप्रील ९ |

रानायण शेणव्याचे ४ एप्रीलचे पत्राचा विचार झाला. या वेळीं हा तह झाला

नसता तरी राज्याभिषेकाचे वेळीं नजराणा पाठवावा लागलाच असता; आणि तसा पाठविण्यानें कंपनीला पुष्कळ फायदा होणार आहे; वगैरे गोष्टींचा विचार करून, (१) मोठा नजराणा घेऊन शिवाजीकडे जाण्याची ऑक्झेंडेननें तयारी करावी. नजराण्याकरितां जरूर त्या वस्तू सुरतेहून त्वरेनें मागवाव्या; (२) ऑक्झेंडेन व उस्टिक यांनीं एकत्र विचार करून शिवाजीच्या तहनाम्यांत कांहीं नवीन कलमें घालणें जरूर असल्यास पुढील सभेच्या दिवशीं सुचवावें; (३) आणि शिवाजीच्या प्रधान मंडळांतील किंवा दरबारांतील कोणत्या मोठ्या मंडळींना आणि किती किंमतीची नजर द्यावी याबद्दल माहिती नारायण शेणव्याकडे एकदम मागवावी असें ठरलें.

आर्मे ११४-३ } पृ. ९८ इ. — (१६२८) मुंबई-सुरत — { श. १५९६ चैत्र शु. १४ इ. १६७४ एप्रील ९

नारायण शेणव्यानें रायगडाहून पाठविलेलें पत्र काल रात्रीं पोंचलें. त्याच्या पत्रावरून शिवाजीशीं लवकरच समाधानकारक तह होणार हें दिसून येईल. त्याकरितां ऑक्झिंडेनला पाठविणार आहोंत. ३१४ हजार रुपयांपर्यंत नजराण्याकरितां यादी प्रमाणें रत्नांची खरेदी करून पाठवावी......सिद्याला पावसाळ्यांत मुंबईत राहूं दिलें तर मीं तह करण्यास तयार नाहीं असा शिवाजीचा प्रेसि०ला निरोप आल्यामुळें आणि त्याचें बंदरांत रहाणें बंदराला त्रासदायक असल्यामुळें आम्हीं नकार देण्याचें ठरवून तुम्हांला त्याप्रमाणें कळविलेंच आहे. जरी नारायण शेणव्यानें शिवाजी-सिद्दी तहाबद्दल निराशा दाखविली तरी प्रेसि०ला अजून आशा वाटते.

फॅ. रे. सुरत } मा. ३ पृ. २१ (३) } — (१६२९) मुरत कन्सल्टेशन — { श. १५९६ चैत्र वद्य ६ इ. १६७४ एप्रील १६

मुंबईच्या पत्रांत लेखक नारायण शेणव्याची शिवाजीकडील हकीकत कळून, त्या कामांत अपेक्षेबाहेर यश आल्यामुळें, नारायण शेणव्याच्या पत्राप्रमाणें मुंबईकरांकडून रत्नांकरितां मागणी आली, त्यांपैकीं शक्य तितकीं पाठवावीं असा ठराव झाला. त्याप्रमाणें मुंबईला ६ मोत्यें, ३ आंगठ्या, १ शिरपेंच व २ सलकडीं अशा ३३१४ रु. किंमतीच्या वस्तु पाठविण्यांत आल्या. ( पहा नं. ८ पृ. ३०-३१ )

ऑर्मे ११४-३ } पृ. १०२ इ. } — (१६३०) मुंबई-सुरत — { श. १५९६ चैत्र व. ८ इ. १६७४ एप्रील १८

सिद्दीचें आरमार पावसांत राहून घेण्याला साफ नकार न देतां मोंगल सरकारावरच जबाबदारी टाकण्याचा प्रेसि०चा हेतू आहे....

दुसरें कारण असें आहे कीं, गेल्या वर्षी बेटावर सर्व प्रकारच्या जिनसांचा भरपूर पुरवठा होता. परंतु सिद्दीनें किनाऱ्यावर धुडमार केल्यापासून शिवाजीनें सर्व प्रकारचे

जिन्नस व सर्पण यांची बंदी केल्यामुळें दुष्काळ पडून आम्हांला पुरेल इतकाहि साठा नाहींसा झाला आहे. मग सिद्दीच्या आरमाराला कोठून सामुग्री पुरविणार ?

तिसरें असें कीं; **शिवाजीनें** असा खडखडीत निरोप पाठविला आहे कीं, 'सिद्याला बंदरांत जागा दिल्यास मीं तुमच्याशीं युद्ध करून बादशाही आरमार जाळण्याचा शक्य तितका प्रयत्न करीन.... आणि हें बेट घेण्याकरितां **डचांना** १०००० सैन्याची कुमक करीन.' या करितां आपण सिद्दीला प्रवेश मुळींच देतां कामा नये.

फॅ. रे. सुरत भा. ८७
पृ. १५३-५४
(१६३१)
सुरत-मुंबई
श. १५९६ चैत्र व. ८
इ. १६७४ एप्रील १८

आपल्या ९ तारखेच्या पत्राला हें उत्तर पाठवीत आहों.... ऑक्झिडेन जात आहे तेव्हां शिवाजीच्या देशांत व्यापाऱ्याच्या अधिक सवलती मिळतील अशी आशा आहे. (यादींतील) नजराण्याच्या वस्तु सराफांच्या ताब्यांत केल्याप्रमाणें ते तुमच्याकडे पोंचवितील. .... सिद्याला मेहेरनजरेनें शाकारण्यास परवानगी दिल्यामुळें **शिवाजी** नारायण शेणव्या-जवळ **नाखुषीच्या** गोष्टी बोलला असेल हें खरें वाटतें. तथापि जेव्हां **शिवाजीशीं** चाललेल्या स्नेहाच्या तहाची बातमी इकडे सुभेदारास किंवा तुमच्या आसपास वावरणाऱ्या मोगली सरदारास कळेल आणि त्याबरोबरच **सिद्दीचे** आरमाराला तुम्ही दिलेला **नकार** ते विचारांत घेतील, तेव्हां **त्यामचें अमित्रत्व** त्यांचे प्रत्ययास येऊन, आम्हांला किंबहुना कंपनीच्या व्यापारालाहि ठोकर बसेल, हीहि गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. परंतु बेटाचें स्वास्थ्य, रसद आणि व्यापार या गोष्टी शिवाजीशीं **सलोखा राखण्यावर अवलंबून आहेत** असें तुम्हीं वारंवार आमच्या मनावर बिंबविलें आहेच. म्हणून त्यासाठीं भोगाव्या लागतील त्या आपत्ति आम्ही शांतपणें भोगूं.... **सिद्दीशीं तह** करण्याची **शिवाजीची इच्छा नाहीं** त्याअर्थी दीर्घकाल धुमसणारें त्यांचें वैर एकदम चद होणें अशक्य दिसतें....

फॅ. रे. सुरत भा. ८८
पृ. १२९-१३१ इ.
(१६३२)
कारवार-सुरत
श. १५९६ चैत्र व. १२
इ. १६७४ एप्रील २२

अबूखान **रुस्तुमजमा** हा या प्रांताचा अधिकारी होऊन इकडे आल्यापासून इकडील बंड शांत झालें. कोदेरा, कारवार, अंकोला, शिवेश्वर इत्यादि क्रमानें त्यानें ताब्यांत घेतांच **मियासाहेब** नरम आला. पण रक्षणाचा बंदोबस्त अजीबात न करून भागणार नाहीं. प्रांताचे **सुभेदारच** कदाचित् **उलट फिरतील. शिवाजीहि** येथून एक दिवसाचे अंतरावर आल्याची बातमी आहे. एका उंच **डोंगरावर** तो किल्ला बांधणार आहे, व तेथून या प्रांताला त्याच्यापासून पुष्कळ उपद्रव पोंचेल.

फॅ. रे. सुरत भा. ८७ पृ. १५२, कालिकत-सुरत, ता. २५ एप्रीलः-**शिवाजी एक मूल्यवान सिंहासन बनवीत** असून येत्या जूनमध्यें तो स्वतःला राज्याभिषेक करून घेणार आहे.

| | | |
|---|---|---|
| ऑर्मे ११४- ३<br>पृ. १०४-५ इ. | (१६३३)<br>मुंबई-सुरत | श. १५९६ चैत्र व. ३०<br>इ. १६७४ एप्रील २५ |

सिद्दीचें आरमार येथें राहिल्यापासून **शिवाजीनें** आपल्या मुलखांतून धान्य व सर्पणाच्या निर्यातीला बंदी केली आहे. आणि त्यामुळें पोर्तु० मुलख आणि मटकल व इतर शहरें इकडून आम्हांला अन्नसामुग्री आणावी लागते....सोबत **नारायण** शेणव्याचें पत्र पाठविलें आहे; तें (सुभेदाराला) दाखवावें. म्हणजे **शिवाजीच्या** इच्छेपासून व त्यानें आमच्यावर युद्ध जाहीर केल्यापासून आम्हांला काय संकट येईल तें त्याला समजेल. **कल्याण-भिवंडी व नागोठणा** या भागाचा शिवाजीचा **सुभेदार** दादाजी याला शिवाजीकडून युद्धाचे हुकूम आल्याचें तो सांगतो.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. मुंबई. भा. १<br>पृ. २६-२७ (द्वि. सं.) इ. | (१६३४)<br>मुंबई कन्सल्टेशन. | श. १५९६ वैशाख शु. २<br>इ. १६७४ एप्रील २७ |

गेल्या शनिवारीं २५ तारखेला समुद्रांत वादळ झाल्यामुळें बंदराच्या मुखाशीं असलेलें सिद्दीचें आरमार आंत आलें. त्याला रसद वगैरे देण्याचा शिष्टाचार प्रेसिडेंटनें पाळला. त्यामुळें बादशहाचीं पांच गलबतें पावसाळ्यांत येथेंच शाकारण्याचे बाबतींत बोलणें करण्यासाठीं त्यानें एका नाखव्याला पाठविलें. त्याबद्दल कौन्सिल भरवून **शिवाजीकडून** प्रत्यक्ष किंवा त्यानें भयविलेल्या लोकांकडून व इतर तऱ्हांनीं त्या गलबतांना **त्रास** होईल ही गोष्ट उघडपणें त्या नाखव्यासमोर मांडून, पूर्वीचा नकार बदलूं नये असें ठरलें... शिवाय सिद्दीचें मुंबई बंदरांतील वास्तव्य आणि यामुळें **शिवाजीचें मन विघडण्याचा** संभव ह्या गोष्टी लक्षांत घेतां ऑर्क्झिडेननें शिवाजीकडे जाण्याची तयारी ठेवावी; परंतु वादळ कमी होऊन थोड्या दिवसांनीं सिद्दीचें **आरमार** येथून **बाहेर पडेपर्यंत,** जाण्याचें तहकूब ठेवावें असें ठरलें.

| | | |
|---|---|---|
| ओ. कॉ. भा. ३४<br>नं. ३९१८ इ. | (१६३५)<br>मुंबईकडील हकीकत. | श. १५९६ वैशाख शु. ३<br>इ. १६७४ एप्रील २८ |

सुरत आणि मोंगलांचा इतर मुलख यांतील व्यापारावर कंपनी अवलंबून आहे; आणि वादळामुळें आरमाराला मुंबई बंदरांत शिरावें लागलें; ह्या दोन गोष्टींचा फायदा घेऊन या वर्षी पावसाळ्यांत आपलें आरमार येथेंच ठेवण्यास **सिद्दी संबूळनें प्रेसिडेंटला भाग पाडलें.** परंतु त्या बाबतींत ठरलेल्या अटी आणि त्यांच्या मुक्कामामुळें

त्यांच्या हातून बेटांत खर्च होणारा पैसा यांकडे लक्ष देतां ही गोष्ट अनिष्ट झाली असें म्हणतां येत नाहीं. **शिवाजी** प्रथम याबद्दल फार नाखूष झाला. तथापि योग्य कारणें दाखविल्यावर त्याचेंहि **समाधान** झालें.

फॅ. रे. सुरत भा. ८७ } (१६३६) { श. १५९६ वैशाख शु. ४
पृ. १५५–५६ इ. } सुरत–मुंबई. { इ. १६७४ एप्रील २९

तुमचें १८ चें पत्र २६ ला पोंचलें. त्याबरोबर **सिद्दीला नकार** देण्याचीं कारणें लिहिलेलीं सुभेदार व सैद महमद यांच्या नांवचीं पत्रें मिळालीं. त्यांत आम्हीं थोडा फरक केला तो तुम्हांला समजावा म्हणून नक्कल पाठविली आहे:-(१) सिद्दीला काय हुकूम द्यावा हें संदिग्ध न ठेवतां, दंडाराजपुरी किंवा सुरत इकडे त्याच्या आरमाराला जाण्यास हुकूम द्यावा; असें आम्हीं स्पष्ट केलें आहे. (२) **शिवाजी इचांशीं संगनमत** करून हल्ला करील हें कलम गाळलें आहे. आणि (३) तुमचे फारकुनाची भाषा फाजील नम्रतेची आणि तुमच्या दर्जाला हीनत्व आणणारी होती तीहि दुरुस्त केली आहे.

फॅ. रे. मुंबई भा. १ } (१६३७) { श. १५९६ वैशाख शु. ५
पृ. २७–२८ (द्वि. सं.) इ. } मुंबई कन्सल्टेशन. { इ. १६७४ एप्रील ३०

डेप्युटी गव्हर्नर शॅक्स्टन, चाइल्ड, ऑक्सिडेन व उस्टिक अशा चार जणांनीं सिद्दीचे गलबतावर जाऊन, (१) **शिवाजी**कडून गलबतें जाळलीं जाण्याचा धोका आहे; (२) बेटावर अन्नसामुग्रीचा तुटवडा असून दुष्काळ पडण्याचा संभव आहे; व (३) आम्हीं सिद्दीला **आश्रय दिला तर शिवाजी आमच्याशीं युद्ध करील**; इत्यादि कारणें सांगून त्यानें बंदर सोडून निघून जावें; असें सामोपचारानें सांगावें. तो आग्रहानें तसें करण्याचें नाकारील तर बादशहाची त्याच्यावर द्वाही ( Duay ? ) घालून असें जाहीर करावें कीं, अन्नसामुग्री व पाणी घेण्याकरितां त्याला तीन दिवसांची सवड आहे. त्यापुढें बंदर त्याला बंद केलें जाईल. आणि नंतर बादशाही आरमाराला कांहीं धोका झाला किंवा त्यामुळें इंग्रज व मोगल यांच्यांत वैमनस्य उत्पन्न झालें तर त्याची जबाबदारी सर्वस्वी सिद्दीच्या शिरावर राहील.

फॅ. रे. मुंबई भा. १ } (१६३८) { श. १५९६ वैशाख शु. ९
पृ. २९ (द्वि. सं.) इ. } मुंबई कन्सल्टेशन. { इ. १६७४ मे ४

**शिवाजीचा राज्याभिषेक** जवळ आला. तरी त्याचे आधीं ऑक्सेंडेननें यावें; असें नारायण शेणव्याचें पत्र आल्यामुळें आणि तहाच्या दृष्टीनें सिद्दीचें आरमार या बंदरांत राहिलें त्याचा योग्य खुलासा लवकर करण्याकरितां, (१) ऑक्सेंडेननें लवकर निघावें; चाइल्ड, उस्टिक व ऑक्सेंडेन यांनीं नजराण्याची व्यवस्था ठरवावी; आणि जॉर्ज रॉबिन्सन व टॉमस मिचेल यांनीं ऑक्सेंडेनबरोबर मदतनीस म्हणून जावें असें ठरलें.

(से) फॅ. रे. सुरत भा. ८७ } (१६३९) { श. १५९६ वैशाख शु. १२
पृ. १६२ इ. } सुरत-मुंबई { इ. १६७४ मे ७

सिद्दीप्रकरण लक्षांत आलें. तेथील नास कसाहि बंद करावा. आमची फिकीर करूं नये. सिद्दीचें आरमार काढून लावण्यांत कसूर करूं नये. सुभेदाराचें पत्र, 'आरमार सुरतेला पाठवावें व लहान गलबतें बाहेर ठेवावयाचीं असल्यास त्यांचें भाडें द्यावें' असें सिद्दीला गेल्यामुळें बहुधा तो गलबतें उठवून सुरतेला आणील. तुमच्या पत्रांवर सुभेदाराचा हुकूम सिद्दीला अनुकूल होतो असें दिसून आल्यास तुमच्या सहीचें, सिद्दीच्या अत्याचाराचा पाढा वाचणारें असें **बनावट पत्र** आम्हीं तयार ठेविलें आहे तें देऊन टाकूं.

फॅ. रे. मुंबई भा. १ } (१६४०) { श. १५९६ वैशाख शु.१४
पृ. ३०-३१ इ. } सुरत कन्सल्टेशन { इ. १६७४ मे ८

नारायण शेणव्याकडून तहाबद्दलचे **शिवाजीच्या सहीचे** ( signed by Sevagy ) कागद आले. त्यांचें मार्यांतर करून पहातां, पूर्वी ठरल्यापेक्षां कित्येक गोष्टी अधिक घातलेल्या दिसून आल्यामुळें, कांहीं अवश्य दुरुस्त्या पुढें मांडल्या. [पुढें ले. १६४२ ता. ११ मे १६७४ पहा. ]

**शिवाजी** राजाचा **कौलनामा** किंवा ९ मोहरम (६ एप्रील) रोजीं कंपनीच्या वतीनें नारायण शेणव्यानें ठरविलेला तह (**शिवाजीच्या** वतीनें सुचविलेलीं कलमें)— आदिलशहाच्या कारकीर्दींत सुरतेची लूट होऊन कांहीं हिसा राजाच्या वांट्याला आला व इतर सैन्याला मिळाला. त्यावरून इंग्रज व शिवाजी यांमध्यें उत्पन्न झालेला वाद मिटविण्याकरितां, इंग्रजांना १०००० होन मिळावे. इंग्रजांनीं दरसाल ५००० होनांचा माल विकत घेऊन फक्त २५०० होन द्यावे. अशा तऱ्हेनें तीन वर्षांत ७५०० होनांची भरपाई करून घ्यावी. व राहिलेले २५०० होनांबद्दल राजापूरला त्यांनीं वखार घातल्यावर तेथील जकातींतून इतकी रकम भरेपर्यंत मुळींच जकात न देऊन, स्वतःची भरपाई करून घ्यावी.

राजापूर, चौल, दाभोळ, कल्याण इत्यादि शिवाजीच्या मुलखांतील कोणत्याहि ठिकाणीं **वखार घालण्यास इंग्रजांना स्वातंत्र्य** असावें. या बंदरांत इंग्रजांनीं आयात किंवा निर्यात केलेल्या मालाची किंमत चार व्यापाऱ्यांकडून ठरवून घेऊन त्यावर त्यांनीं फक्त शेंकडा २½ टक्के जकात द्यावी.

इंग्रजांनीं आपल्या वखारींत आपला माल वाटेल त्या व्यापाऱ्याला स्वतःच्या किंमतीला विकल्यावर त्या व्यापाऱ्यांनीं तो माल देशांतील जकाती भरून वाटेल तिकडे न्यावा; परंतु इंग्रजांनीं **खरेदी विक्री** करणें ती **बंदरांतच करावी.** अंतर्देशांत वहातूक करूं नये. एकादा माल विकला जात नाहीं म्हणून बंदरांतून दुसरीकडे पाठविणें झाल्यास तसा नेतांना, प्रथम भरलेल्या जकाती शिवाय अन्य जकात इंग्रजांपासून घेऊं नये.

[ सदर पृ. ३६-३७ ] पुढील ले. १६४१ मधील कलमें उतरल्यावर पुढील मजकूर- शिवाजीनें गल्बाबद्दल जकात देऊं नये; आणि कंपनीनें जकातींचा मक्ता दिला असल्यामुळें, त्यामळें मक्तेदाराचें होणारें नुकसान कंपनीनें भरून द्यावें.

त्रिवर्गांनीं ठरविलेली नजराण्याची व्यवस्था पसंत आहे. ती येणेंप्रमाणें-

**शिवाजी राजाला**-१ हिरेजडीत शिरपेंच किंमत रु. ६९०
२ हिरेजडीत सलकर्डी ,, रु. ४५०
२ मोतीं ( रती १० ९/१० ),, रु. ५१०
———
रु. १६५०

शिवाजीचा पुत्र **संभाजी राजा** याला —
दोन लालखचित सलकर्डी—रु. १२५
एक कंठी ८ हिऱ्यांची—रु. २५०
———
रु. ३७५

शिवाजीच्या फार मेहेरबानींतिल **मोरोपंडीत** यास,—
दोन मोठीं मोत्यें किंमत रु. ४००

शिवाजीच्या कृपेंतील **अण्णाजी पंडीत** यास,—
दोन सोन्याचे गोफ, वजन तोळे ७ किंमत रु. १२५

शिवाजीच्या कृपेंतील **निराजी पंडीत** यास,—
दोन पामऱ्या, किंमत रु. ७०

शिवाजीचा कारभारी (Secretary) **रावजी सोमनाथ**
यास— दोन पामऱ्या किंमत रु. ७०
———
रु. २६९०

इतर लहानसान अमलदारांना ऑक्झिंडेननें योग्यतेनुरूप व प्रसंग पाहून नजराणे द्यावे.

फॅ. रे. मुंबई, मा. ६ } (१६४२) { श. १५९६ वैशाख व.१
पृ. १२४-२८ (द्वि.सं.)इ. } *शिवाजी तहाचीं कलमें* { इ. १६७४ मे (१०)[१]

**श्रीछत्रपती शिवाजी** [ The Noble Prince ] राजे व ऑन. इं. ई. इं. कंपनी यांमधील शांतता, सहकार्य आणि सलोखा राखण्याविषयीं [ **इंग्रजांनीं सुचविलेलीं** ] तहाचीं कलमें:-

१ उभयतांमध्यें आजपासून पक्क्या व अभंग सलोख्याचा तह असावा.

२ सर्व शत्रुत्व नष्ट व्हावें आणि उभयपक्षीं कोठल्याहि मार्गात लूट करणें, छापे घालणें इत्यादि प्रकारें नुकसान करूं नये.

३ शिवाजीचे राज्यांत संचार, रहिवास व व्यापार या बाबतींत इंग्रजांना पूर्ण स्वातंत्र्य असावें. इंग्रजांनीं नित्याच्या जकाती देऊन सरकाराशीं आज्ञाधारकपणें वागावें. शिवाजी राजांच्या प्रजेला मुंबई बेटावर याच प्रकारच्या सवलती मिळाव्या.

४ परस्परांच्या बंदरांत आलेलीं परस्परांचीं जहाजें व्यापाराकरितां आलीं नसतां अडचणीमुळें आश्रयाला आलीं असतील तीं जकात घेतल्याशिवाय जाऊं द्यावीं. दुर्दैवानें फुटून किनाऱ्याला लागलेल्या गलबतांची जप्ती न करितां तीं मालकाचे हवालीं करावीं.

५ उभयपक्षांच्या जकातदारांनीं वगैरे शिरस्त्यापेक्षां बक्षिसें इत्यादि व्यापाऱ्यांकडून लुबाडून घेऊं नयेत.

६ कोणा इंग्रजावर शिवाजीच्या मुलखांत अन्याय झाला तर त्याला त्वरेनें न्याय मिळावा. इंग्रजांच्या मुलखांतहि शिवाजीच्या प्रजेला तसाच न्याय मिळावा.

७ कोणाहि खाजगी व्यक्तीच्या आगळिकीमुळें या सलोख्यांत व्यत्यय येऊं नये. गुन्हेगारालाच फक्त शिक्षा व्हावी. न्यायाला विरोध किंवा निष्कारण दिरंगाई झाल्याशिवाय जप्ती आदिकरून प्रकार होऊं नयेत.

८ मोंगलांच्या किंवा अन्य मुलखांतील इंग्रजांच्या वखारी स्वारीच्या वेळीं शिवाजीच्या लोकांनीं वांचवाव्या. लूट झाल्यास शिवाजीनें भरपाई करावी.

९ परस्परांनीं परस्परांचा समुद्रावर पकडलेला माल मालकीबद्दल पुरावा झाल्यास सोडून द्यावा.

१० इंग्रजांनीं राजापुरास वाटेल तेव्हां रहावें. राजानें आपल्या खर्चानें घर द्यावें. आयातनिर्यातीच्या वेळीं फक्त एकदांच जकात दिल्यावर मालाची वाहतूक करण्यास, मालाला देशांत कोठेंहि हरकत करूं नये.

११ आयात निर्यात मालावर शेंकडा २½ टक्के जकात इंग्रजांनीं द्यावी. माल विक्री न होतां परत गेला तर त्यावर व कोणत्याहि प्रकारचे लांकूड सामानावर जकात मुळींच घरूं नये.

१२ इंग्रजांना खरेदीविक्रीचें पूर्ण स्वातंत्र्य असावें. सुभेदार, जकात घराचे दरोगे यांनीं आपल्या अधिकाराचा दुरुपयोग करूं नये.

१३ देशी व्यापाऱ्यांनीं खरेदीविक्रीच्या बाबतींत इंग्रजांशीं केलेले करार पाळण्यास त्यांना शिवाजीच्या अधिकाऱ्यांनीं भाग पाडावें. तशी व्यवस्था न झाल्यास कर्जफेड किंवा कराराची पूर्ती होईपर्यंत इंग्रजांना अशा गुन्हेगारास आपल्या घरांत अडकवून ठेवण्याची कायद्यानें परवानगी असावी.

१४ राजापूरची वखार मोडकळीस आल्यामुळें तिची दुरुस्ती इंग्रजांनीं करून दुरुस्तीचा खर्च जकातींतून घ्यावा.

१५ इंग्रजांची डच, फ्रेंच, पोर्तुगीज व इतर कोणाशीं लढाई जुंपल्यास शत्रूंना शिवाजीनें मदत करूं नये आणि त्यांच्यापासून इंग्रजांच्या मालमत्तेचें व लोकांचें संरक्षण करावें. त्याच्या मुलखांतील कंपनीची इस्टेट कोणीं जप्त केल्यास शिवाजीनें भरपाई करावी.

१६ कोणत्याहि दर्जाच्या माणसानें इंग्रजांच्या वखारींत जबरदस्तीनें प्रवेश करूं नये. इंग्रजांचें देशांतील कोणाशीं वितुष्ट आल्यास तें सामोपचारानें संपवावें. रक्तपातापर्यंत *गोष्टी विकोपास गेल्यास देशी माणसाचा गुन्हा असल्यास शिवाजीतर्फे शिक्षा* देण्यांत यावी; इंग्रजाचा गुन्हा असल्यास त्याला वेडया घालून मुंबईच्या गव्हर्नराचा हुकूम येईल त्याप्रमाणें (इंग्रजांनीं) शिक्षा द्यावी. देशी व्यापाऱ्यांचा इंग्रज नोकरांशीं हिशेबाच्या बाबतींत मतभेद झाल्यास वखारीच्या मुख्याकडे नेऊन त्याचा निकाल व्हावा.

१७ इंग्रजांचा नोकर शिवाजीच्या मुलखांत गेल्यास तो इंग्रजांचे हवालीं परत द्यावा.

१८ मुंबई जवळच्या मुलखांतून जकात भरल्याशिवाय बेटावर सर्पण आणण्याची परवानगी असावी.

१९ परस्परांचीं नाणीं परस्परांच्या मुलखांत अप्रतिहत चालावीं.

२० शिवाजी इंग्रजांच्या मुंबईच्या प्रजेला ज्या सवलती देईल त्याच सवलती इंग्र*जांनीं शिवाजीच्या सर्व प्रजेला याव्या* [ प. ६१३ ].

| | | |
|---|---|---|
| ओ. कॉ. सा. ३५<br>नं. ३९६३ इ. | (१६४२) | श. १५९६ वैशाख व. २<br>इ. १६७४ मे ११ |

हेन्री ऑक्झिडेनला (तहाचे बाबतींत) सूचना—

तुम्हांला कौन्सिलांतील वादविवादांवरून सर्व माहिती झालीच आहे. राजापूरचा पूर्वीचा मतभेद आतां मिटला असल्यानें, यापुढें हें बेट आणि शिवाजीचा मुलूख यांमध्यें सुरक्षित आणि किफायतशीर व्यापार चालू होण्याकरितां आपण झटलें पाहिजे. या कामीं आपल्याला यश मिळावें म्हणून इकडील पद्धतीप्रमाणें (या वेळीं थोड्या सढळ हातानें) मुकर केलेले नजराणे शिवाजी, त्याची मातोश्री, राजपुत्र इत्यादिकांना योग्य वेळीं द्यावे. नारायण शेणव्याच्या सूचनेप्रमाणें राज्याभिषेकाच्या प्रसंगाला अनुरूप अशी रत्नांची निवड केली असल्यामुळें हे नजराणे प्रिय होतील अशी आशा आहे.

राजापूरच्या भरपाईबद्दल १० ह. होन देण्याचा करार शिवाजीच्या सहीचा आला. त्यांत त्याच्या वकिलाशीं पूर्वी ठरविलेल्यापेक्षां अधिक गोष्टी घातलेल्या दिसतात. (१) पहिल्या व पुढील दोन वर्षांत दरसाल ५००० होनांचा माल खरेदी करून त्यापैकीं निमी किंमत देण्याचा करार पूर्वी झाला नसून, ही रकम आम्हांला रोखीनें मिळावी

असें ठरलें होतें. तरी त्याबद्दल आग्रह धरावा. परंतु त्यानें तसें ऐकिलें नाहीं तर विकत घ्यावयाचा माल जुना, अविक्रेय किंवा किंमती चढविलेला नाहीं असाच पाहून युरोपांत खपण्यासारखा असेल तोच, आपल्याजवळील किंमतीची यादी पाहून मग घ्यावा.

(२) शिवाजीच्या मुलखांत इंग्रजांनीं वखारी घालण्याचें जें कलम आहे त्यामध्यें **नागोठणें, पेण** इत्यादि मुंबईच्या लगत्याचा मुलख स्पष्टपणें समाविष्ट केलेला नाहीं. तरी हा मुद्दा एका स्वतंत्र कलमांत नमूद करून घ्यावा. अशी परवानगी दिल्यानें *व्यापार त्या भागाकडे आकर्षिला जाऊन प्रांताची भरभराट होईल हें त्याचे निदर्शनास* आणावें.

(३) शेवटच्या कलमानें इंग्रजांनीं बंदराचे बाहेर व्यवहार करूं नये असें बंधन त्यानें घातलें आहे. ह्यामुळें अत्यंत गैरसोय होईल हेंहि त्याचे निदर्शनास आणावें. एकदां बंदरांत जकात दिल्यावर प्रांतांत वाटेल तेथें व्यापार करण्याची सवलत हिंदुस्तान, दख्खन, इराण, अरबस्तान वगैरे सर्व देशांत आम्हांला असून तरी येथें न मिळाल्यास व्यापाराला उत्तेजन मिळणार नाहीं; वगैरे सांगून त्या कलमांत योग्य बदल करून घ्यावा.

**सिद्दीचें** आरमार पावसांत मुंबईला राहिल्यामुळें **शिवाजीला** वैषम्य वाटणें साहजिक आहे. परंतु त्याला काढून लावण्याचे आम्हीं काय उपाय केले आणि त्याला कसें कठोरपणानें वागविलें हें तुम्हीं स्वतः पाहिलें आहे त्यावरून सांगितल्यास आणि व्यापाराचे दृष्टीनें आम्ही मोंगलावर किती अवलंबून आहों हें त्याचे निदर्शनास आणून दिल्यास त्याचें समाधान होईल यांत शंका नाहीं. शिवाय, **शिवाजीचीं स्वतःचींच गलबतें** मुंबई बंदरांत शाकारलेलीं असल्यामुळें, तीच सवलत **सिद्दीला** देण्याचें, आमचे कितीहि मनाविरुद्ध असलें तथापि, आम्हीं नाकारणें मुत्सद्देगिरीचें होणार नाहीं असें त्याला सांगावें.

शिवाजीच्या मुख्य प्रधानांपैकीं **निराजी पंडीत** हा कंपनीला विशेष अनुकूल असल्यामुळें, **शिवाजीला** काय सांगावयाचें असेल तें त्याला कळवून व त्याचा सल्ला घेऊन सांगावें. शिवाजीचा पेशवा ( or Second Minister of State ) याचा सन्मान ठेवावा. **अण्णाजी** पंडिताशीं आपला वारंवार संबंध येणार असल्यामुळें त्याच्याशीं दाट परिचय होईल तेवढें चांगलें.

शिवाजी व सिद्दी यांच्या युद्धामुळें व्यापाराला अडथळा होतो आणि शिवाजीविरुद्ध सिद्दीला कुमक करणारें बादशाही आरमार किनाऱ्यावर उपद्रव देतें ही आपत्ति टाळण्याकरितां **उभयतांचा तह होण्याची खटपट** केली पाहिजे. या बाबतींत युद्धामुळें होणारी हानी व शांततेपासून होणारा लाभ यावद्दल **निराजीशीं** चर्चा करून त्याचें मन वळवावें. तुम्हांला **खासगी रीतीनें सांगितलेल्या गोष्टी** त्याला सांगाव्या. आणि याउपर त्याचें मन नच वळल्यास खुद्द राजापाशीं याबद्दल गोष्ट काढूं नये. उभयतांशीं चांगला शेजारी व मित्र या नात्याचे संबंध ठेवण्याची प्रेसिडेंटची इच्छा आहे. यामुळें उभयतांनीहि परस्परांत सलोख्यानें रहावें एवढेंच बोलून ठेवावें.

**भीमजी** पंडिताशीं राजापूरच्या बाबतींत ठरलेला करार इतका योग्य तऱ्हेनें पुरा करण्यामध्यें **निराजींचीच मध्यस्थी** उपयोगी पडली. तेव्हां त्याच्या उत्तेजनार्थ म्हणून आम्हांला मिळावयाच्या रकमेपैकीं **५०० होन** देण्याचें वचन आम्हीं त्याला दिलें. **भीमजी पंडितालाहि १०० होन** देण्याचें ठरविलें. त्यांनीं त्याबद्दल इच्छा दर्शविलीच तर वचन पक्कें करून रकमफेडीच्या दुसऱ्या किंवा तिसऱ्या हप्त्यापर्यंत हें पारितोषिक देण्याचें लांबणीवर टाकतां येतें काय पहा. नाहींच जमलें तर त्यांचें मित्रत्व कायम राखण्यासाठीं पहिल्याच हप्त्यांतून देण्याचें नाकबूल करूं नका.

बालाघाट, अंतर्देशांतील पेठा आणि नागोठणें व आसपासचा मुंबईसमोरचा किनारा यांना जोडणारा मार्ग व्यापारी मालाची ने आण करण्यासाठीं खुला करण्याविषयीं **निराजी** पंडिताशीं चर्चा करावी. या योगानें व्यापार वाढून तो मुलूख सधन होईल, शिवाय तेथें आमचा व्यापार वाढतांच त्या मुलखाच्या रक्षणार्थ शत्रूविरुद्ध आम्हीं मदत देऊं; इत्यादि सांगावें.

न्यायाची वागणूक व नाना तऱ्हेच्या सवलती देऊन शेजारच्या दख्खनमधून व्यापारोपयोगी माल स्वतःच्या मुलखांत आणविण्याची निराजीनें शिवाजीला सल्ला द्यावी. सर्व अमलदारांना सामोपचारानें वागण्याची ताकीद दिली असतां, आणि जुलूम व दमदाटीचे प्रकार थांबविले म्हणजे व्यापार वाढून सान्याचेंहि उत्पन्न वाढेल.

हें काम करण्यास तुम्हांला बहुधा फार वेळ लागणार नाहीं. ३०ते४० दिवसांत संपावें.

| | | |
|---|---|---|
| ओ. कॉ. मा. ३५<br>नं. ३९६५ इ. | (१६४३) | श. १५९६ वैशाख व. ४ ते ज्येष्ठ व. ५<br>इ. १६७४ मे १३ ते जून १३ |

ऑक्झिंडेनची **रायगडच्या** शिष्टाईची **रोजनिशीः**–

मे १३– किनाऱ्यावर पोर्तु०च्या चौल शहरांत आलों. **१४ तारखेला,** चौलांत असतांनाच दोन प्रहरचे तीन वाजतां, शिवाजी **चिपळुणाहून** रायरीला आल्याची खबर मिळाली. तेथून दोन मैलांवर असलेल्या **वरचें चौल** या शिवाजीच्या शहरांत गेलो. मोंगलांच्या युद्धांनीं उध्वस्त होण्यापूर्वी हें दख्खनच्या व्यापाराचें महत्त्वाचें केंद्र होतें. नागोठणा, पेण आदिकरून समोरच्या मुलखाचा ब्राह्मण सुभेदार येथें रहातो. तो **थोडासा इंग्रजांना प्रतिकूल** असल्याचें नारायण शेणव्याकडून कळल्यामुळें त्याला भेटून, पामरीजोडीच्या नजराण्यानें खूष केलें. १६ तारखेला होडीनें निघून अष्टमी, निजामपूर, गंगावली ( Gongouly ) या मार्गानें १९ तारखेला सकाळीं ९ वाजतां **पाचाडला** आलों...देवीला अर्पण करण्यासाठीं त्यानें नेलेलें छत्र (Sombrero[1]) शुद्ध सोन्याचें **सवा मण वजनाचें होतें**..... ... २० तारखेला निराजीशीं बोलणें झालें.

---

१ Hobson Jobson, 1903, p.851 a.

...शिवाजी बाळपणापासूनच शिपाईपेशाचा मनुष्य असल्यामुळें व्यापाराच्या बाबी त्याला चांगल्या समजून सांगण्याबद्दल मीं निराजीला सांगितलें; तेव्हां, ज्याच्या मुलखांतून बहुतेक माल येतो तो आदिलशहा तद्दाला उत्सुक असल्याचें......वगैरे त्यानें सांगितलें. ...शेवटीं त्याला एक आंगठी आणि त्याच्या ज्येष्ठ मुलाला [ प्रल्हाद निराजी ] पाचरीं जोड देऊन रजा घेतली. २१ तारखेला शिवाजी आल्याची खबर आली. व २२ तारखेला आम्हीं वर गडावर आलों. गड फितुरीखेरीज अभेद्य असून वर राजमहाल, दरबार, प्रधानांचीं घरें मिळून सुमारें तीनशें इमारती आहेत. २६ तारखेला राजदर्शन व संभाषण झालें. याच वेळीं राजा व राजपुत्र यांस नजराणा दिला. ...पुढें मोरोपंताकडे तहाचें काम सोंपवून उभयतांहि महालांत परत गेले. २८ मे रोजीं निराजीचा नजराणे देण्याबद्दल सल्ला घेतला. मोरोपंताकडे स्वतः जावें; इतर प्रधानांकडे नारायण शेणव्यामार्फत पोंचवावा; व काम जलद व्हावें अशी इच्छा असल्यास यादींत नाहींत अशा कांहीं अमलदारांना पामऱ्या वगैरे द्याव्या लागतील; इत्यादि निराजीनें सांगितलें. मोरोपंताला दोन पामऱ्या योग्य नसून ४ दिल्या पाहिजेत; दत्ताजीपंत वाकनवीस (publique intelligener) यास १२५ रु. ची एक आंगठी; डबीर किंवा फारशी लेखकाला ४ पामऱ्या; शामजी नाईक मुद्राधिकारी ( Samgee Naigee, keeper of the seale ) यास व आवाजी पंडीत यांस प्रत्येकीं ४ पामऱ्या दिल्या म्हणजे मग काम त्वरेनें होण्याबद्दल शंका राहणार नाहीं असें निराजीचें मत पडलें. प्रल्हाद निराजीला बरोबर घेऊन मीं मोरोपंताकडे जाऊन नजराणा दिला...२९ मे रोजीं राजाची तुला केली. वजन १६००० होन झालें. यांत १ लक्ष होनांची भर घालून राज्याभिषेकानिमित्त गोळा होणाऱ्या ब्राह्मणांना त्याची खैरात वाटावयाची आहे. ३० मेला काम कसें होत आहे याबद्दल निराजीकडे चौकशी केली. ...त्यानें दरबारचें धोरण व दोन कलमांबद्दलची अशक्यता कळविली. मोंगली व आदिलशाही मुलखांत नौकाफूट इंग्रजांना दिली जात असल्यामुळें द्याहि ठिकाणीं देण्याबद्दल शिवाजीचें मन कधींतरी वळवितां येईल. परंतु नाण्यांच्या बाबतींत शिवाजी प्रत्यक्ष विरोध करीत नाहीं एवढ्यावरच समाधान मानलें पाहिजे असा निराजीचा सल्ला होता. जून ५ रोजीं, दुसऱ्या दिवशीं ७।८ वाजतां सिंहासनारूढ राजाला मुजरा व नजर करण्यासाठीं यावें म्हणून निराजी पंडिताचा निरोप आला. ता. ६ जून रोजीं, त्या वेळीं राजा भव्य सिंहासनावर आरूढ झालेला व मूल्यवान पोशाख केलेल्या प्रधानांनीं वेष्टिलेला दिसला. संभाजी राजे, पेशवा मोरोपंत आणि एक श्रेष्ठ ब्राह्मण हे सिंहासनाखालीं पायरीवर अगर ओट्यावर (on an ascent under the throne )बसले होते. राहिलेले सेनाध्यक्ष व इतर अमलदार बाजूला आदरानें उभे होते. मीं मुजरा केला व नारायण शेणव्यानें नजरेची आंगठी वर धरली. शिवाजीचें आमच्याकडे लक्ष जातांच त्यानें अगदीं सिंहासनाच्या पायरीजवळ येण्याचा आम्हांला हुकूम केला व पोशाख देऊन

आम्हांला तत्काल रजा दिली. थोडाच वेळ आम्हीं सिंहासनासमोर होतों. तेवढ्या वेळांत सिंहासनाच्या दोन्ही बाजूला सुवर्णांकित माल्याच्या टोंकावर (मुसलमानी पद्धतीचीं) अनेक **अधिकारदर्शक व राजसत्तेचीं चिन्हें** असल्याचें आम्हीं पाहिलें. उजव्या हाताला २ मोठीं मोठ्या दांतांच्या मत्स्यांचीं सुवर्णाचीं शिरें होतीं. डाव्या हाताला अनेक अश्वपुच्छें व एका मूल्यवान भाल्याच्या टोंकावर समपातळींत लोंबणारीं सोन्याच्या तराजूचीं पारडीं, न्यायचिन्ह म्हणून तळपत होतीं. राजवाड्याच्या दाराशीं आम्हीं परत आलों तों दोन लहान हत्ती दरवाज्याच्या दोन्ही बाजूला उभे केले असून दोन सुंदर [पांढरे] घोडे शृंगारून आणिलेले दिसले. गडाचा मार्ग इतका विकट होता हें लक्षांत घेतां हे पशु कोठून वर आले असावे याचा आम्हांला तर्कच करवेना!

जून ८ रोजीं, राजानें समारंभाशिवायच **चौथ्या बायकोशीं लग्न** केलें. ब्राह्मणांना दक्षणा देण्याचा क्रम चालू आहे. ता. **९ व १०**–निराजी पंडिताच्या पाठीस तहावर लवकर सही करण्याबद्दल टुमणें लाविलें. परंतु कलमें एकसारखीं जवळ बाळगूनहि **राजाच्या दानधर्मापुढें** त्याला सही करून घेण्यास अवसरच सांपडला नाहीं.

**जून ११**–नाण्यांशिवाय इतर सर्व कलमें मान्य करून **राजानें सही केल्याची** वार्ता निराजीनें सांगितली. [the Rajah had granted all our demands... and *had signed them*]. दुसऱ्या दिवशीं प्रधानांच्या सह्या होऊन आम्हांला निघण्यास हरकत रहाणार नाहीं.

**जून १२**-सर्व प्रधानांच्या सह्या झाल्या. निराजी पंडिताच्या घरीं जाऊन मीं कागद घेतले. निराजी फारच स्नेहानें बोलला. कलमांचे उतारे करणें इत्यादि कामगिरीबद्दल त्याच्या पुतण्याला एक पामरी देऊन आम्हीं १३ तारखेला रायरीहून निघालों. व १६ तारखेला मुंबईला आलों. [ऑक्झिंडेननें लिहिलेल्या पत्रांतील मजकुराची यांत पुनरावृत्ति केली नाहीं].

फ्रायर भा. १ पृ. १९५-२०९.; ऑक्झिंडेनच्या शिष्टाईचा फ्रायरनें दिलेला वृत्तांतः–[हा बहुतांशीं मागील लेखांकाप्रमाणें परंतु तृतीयपुरुषीं वाक्यरचना करून व स्थलविशेषीं बारीक शाब्दिक फेरफारांसह लिहिलेला असल्यामुळें, केवळ नवीन मजकूर आहे तेवढाच दिला आहे]–......शिवाजीनें भवानीला अर्पण केलेल्या (Lumbrico) चें वजन १। मण किंवा ४२ पौंड होतें...**निराजी.**–[ऑक्झिं० (Naragee) लिहितो तेथें फ्रायर (NarunGi) असें लिहितो].

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. सुरत, भा. ८८<br>पृ. १३८ इ. | (१६४४)<br>ऑक्झिंडेन-सुरत | श. १५९६ वैशाख व. ६<br>इ. १६७४ मे १५ |

पोर्तु० **चौलला** गेल्या बुधवारीं रात्रीं आलों. **शिवाजीच्या भीतीमुळें** आठ वाजण्याच्या आतच शहराचे दरवाजे बंद केले होते. पोर्तु० व्हाईसरायनें गोव्यांत

शिवाजीविरुद्ध युद्ध पुकारल्याची बातमी एकानें सांगितली. परंतु त्याचेशीं लढण्याचें सामर्थ्य पोर्तु० त नसल्यानें ही गोष्ट खरी वाटत नाहीं. शिवाजी आपल्या दौऱ्याहून रायरीला परत आला असल्यामुळें, येथील ब्राह्मण सुभेदाराची भेट घेण्यापुरताच थांबून, तांतडीनें शिवाजीच्या भेटीस जात आहें. शक्य तर तह पुरा होऊन पावसाळ्याच्या आंत परत येतां आल्यास येईन. ''

फॅ. रे. सुरत भा. ८८ } (१६४५) { श. १५९६ वैशाख व. ११.
पृ. १३८-४१ इ. } ऑक्झिंडेन, (रायगड पायथा)- { इ. १६७४ मे २१

सुरत.

१९ तारखेला येथें पोंचलों. पण शिवाजी राज्याभिषेकाप्रीत्यर्थ दर्शनादि समारंभानिमित्त प्रतापगडच्या भवानीला ( St. Bowany ) सोन्याचें छत्र ( Sombrero ) अर्पण करण्यासाठीं गेल्याचें समजलें. तो दोन तीन दिवसांत परत येतांच काम झटपट उरकून घेतों. निराजीला पत्र व नजराणे दाखविले. हिऱ्यांच्या किंमती फुगवून लाविल्याचें तो म्हणाला. खरेदी घाईनें करावी लागल्याचें कारण सांगितल्यावर त्याचें कांहींसें समाधान झालें. सिद्दीच्या तहाविषयीं निराजीवर कांहींच परिणाम झाला नाहीं. राज्याभिषेक होतांच जोराचा हल्ला करून येत्या किंवा पुढच्या पावसांत दंडा घेण्याच्या इरादाचें उत्तम सैन्याची तयारी चालू असून, तोफखान्यामध्यें १५ तोफांची भर शिवाजीनें नुकतीच घातली आहे. सिद्दीनें किल्ला ताब्यांत द्यावा आणि वाटेल तेवढी मनसब मागावी असें शिवाजीनें कळविलें; त्याला सिद्दीनें नकार दिल्यामुळें, आतां त्यानें शिवाजीसारख्या कट्टया शत्रूशीं दोन हात करण्यास तयार रहावें; असें निराजी बोलला. मोंगलांची सिद्दीला होणारी मदत किंवा सिद्दी किनाऱ्याला देईल तो उपद्रव, शिवाजीच्या खिजगणतींत नाहीं. गेल्या वर्षी सिद्दीनें खेळ केले तेव्हां शिवाजी दूर बालाघाटांत गुंतला होता; परंतु आतां त्यानें सर्व प्रकारचा पक्का बंदोबस्त केला आहे. त्यांतून, प्रथम आरमाराची कामगिरी सिद्दीवर सोंपवली तेव्हां किनाऱ्यावरील मुलूख व किल्ले जिंकण्याबद्दल त्यानें दिलेलीं वचनें त्याला अजूनपर्यंत पुरीं करितां आलीं नाहींत. यामुळें, बहादरखानानें रागानें त्याच्याकडे कामगिरीचा जाब आणि खर्चाचा हिशेब मागून, अधिक पैसा यापुढें मिळणार नाहीं असें त्याला निक्षून कळविलें आहे.

बालाघाट ते समुद्रकिनाऱ्याचा मार्ग व्यापाराकरितां खुला करण्याबद्दल व व्यापाराला उत्तेजन देण्याबद्दल बोलणें काढतांच, निराजी असें म्हणाला कीं, दोन्ही गोष्टी लवकरच अमलांत येतील. शिवाजीशीं युद्ध करण्यापेक्षां शांतता असण्यांत अधिक फायदा आहे असें विजापूरच्या आदिलशहाच्या लक्षांत आल्याचें चिन्ह म्हणजे त्याच्याकडून तहाचें बोलणें करण्याकरितां कित्येक वकील येऊं लागले

असून, या पावसांत **सलोख्याचा तह** होईल यांत शंका नाहीं. आतां राज्याभिषेक झाला म्हणजे शिवाजी **राजपदाला शोभेल असें वागून,** आपल्या **प्रजेचें पालन** व व्यापार इत्यादि गोष्टींमध्यें अधिक चित्त घालूं लागेल. कारण, याच गोष्टी महत्त्वाच्या असून त्यांवरच आपल्या राज्याची भरभराट अवलंबून आहे हें त्याचे लक्षांत आलें आहे.

मोंगली सरदार दिलेरखान दरबारकडे गेला. आणि आतां फक्त **बहादूरखान** राहिला आहे त्याला ते मोजीत नाहींत. पावसाळा संपतांच त्याच्या छावणीवर ते हल्ला करतील. निराजी पंडिताच्या मतें **मोंगलांशीं तह होण्याचा मुळींच संभव नाहीं.** कारण, मोंगल धनवान् असून आपल्या ( अवाढव्य ) सैन्याला काय उद्योग द्यावा ह्या विवचनेंत असल्यानें, नेहमीं शिवाजीच्या पाठीस त्याच्या **सैन्याचा ससेमिरा** असणारच ! परंतु, आदिलशहाशीं एकदां तह झाल्यावर, मोंगलांना थोपवून धरणें कठीण नसून, स्वराज्यांत भरभराट होण्याला मुळींच वेळ लागणार नाहीं.

सिद्दीच्या बंदरांत रहाण्याबद्दल सर्व हकीकत सांगितली. ती ऐकून **निराजीला** समाधान वाटलें. मोंगलांशीं असलेल्या संबंधांमुळें सिद्दीला शाकाराला जागा नाकारतां येत नाहीं हें खरेंच आहे. तेव्हां प्रत्यक्ष शिवाजीला विरोध करण्यास इंग्रजांकडून मदत होऊं नये एवढीच **राजाची अपेक्षा** असणार असें तो म्हणाला.

फ्रायर भा. १ }  (१६४६)  { श. १५९६ वैशाख
पृ. १५५ इ. }  उल्लेख, शिवाजी  { इ. १६७४ एप्रील-मे(!)

सिद्दीच्या आरमाराला या हंगामी एलिफंटा ( घारापुरी ) बंदरांत आश्रय घ्यावा लागला. सिद्दी हा मूळचा दख्खनमधील एक सरदार होता; तो आतां मोंगली आरमाराच्या सेनापतीपदावर चढला. किंवा शिवाजीपुढें टेकीस येऊन, किनाऱ्यावरील आपला प्रांत परत मिळविण्याच्या आशेनें त्यानें ही कामगिरी पत्करिली असें म्हटलें तरी चालेल. भूभागांत शिवाजीच्या हालचालींना पायबंद घालण्याचें काम दुसरे मोंगल सेनापती करितात. परंतु शिवाजीनें सिद्दीचा मुलूख ताम्यांत घेऊन, आतां **दंडाराजपुरीचा** मजबूत किल्ला घेण्याचें ठरविलें आहे. त्याचेंच रक्षण करणें सिद्दीला जड जातें. या उन्हाळ्यांत सिद्दी **दंडाराजपुरीचें** संरक्षण करण्यांत गुंतला होता. शिवाजी त्याचा उपहास करून, रायगडावर स्वतःला **महाराजा पद** घेण्याच्या तयारींत आहे. आपले हक्क राखण्याकरितां आपण त्याच्याकडे वकील पाठविला पाहिजे.

फ्रायर भा. १ }  ( १६४७ )  { श. १५९६ वैशाख
पृ. २४९ इ. }  उल्लेख, सुरत  { इ. १६७४ (मे! )

शिवाजीच्या **लुटीचीं स्मृतिचिन्हें सुरतेस** सर्वत्र दिसतात. आणि तो

पुनः येईल अशी सर्वांना प्रत्येक तासाला भीती वाटते. शहराची तटबंदी संपूर्ण होईपर्यंत ( तो आल्यास ) त्याचा राग शांत करतां यावा याकरितां ते एक लाख रुपये जमवीत आहेत. पुढें तटबंदी पुरी झाल्यावर रक्षणाकरितां ७०० माणसांची नेमणूक झाली; सर्व दरवाजांवर मिळून ६ युरोपिअन गोलंदाज ठेविले; व प्रत्येकीं ६ मोठ्या तोफा असलेले सुमारें ३६ बुरूज सजविले. शिवाय तटावर चढून येणें दुष्कर व्हावें म्हणून तटाच्या माथ्यावर भाल्याचे फाळ बसवून लांकडें टाकिलीं. [ ऑर्म ११४-३ पृ. १७४ व १८० येथील उल्लेख जमेला घरून पहातां डॉ. फ्रायर हा ऑगस्ट-सेप्टेंबरमध्यें सुरतेला गेल्याचें दिसतें !]

| | | |
|---|---|---|
| सं. १५ ले. १३३<br>सु. १०७५ रवल १ | (१६४८)<br>मु. सी. | श. १५९६ ज्येष्ठ शु. २<br>इ. १६७४ मे २७ |

अज दिवाण ठाणा ता सातारे – मोकदमानी मौजे वरये–

जोगींद्रगीर मानभाऊ अजहती कमलनयन, सेकीन सा निंब, यास इनाम जमीन ०१५ बिघे आहे. गुदस्ता जमीन पड होती. यंदा कीर्दीस लावितील, तरी लावूं देणें. पेस्तर सनद सादर होईल.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. सुरत मा. ८८<br>पृ. १४१-४३ इ. | (१६४९)<br>ऑक्झिंडेन, (रायरी)–सुरत. | श. १५९६ जेष्ठ शु. २<br>इ. १६७४ मे २७ |

२१ तारखेला राजा प्रतापगडाहून आला. दुसऱ्या दिवशीं आज्ञेप्रमाणें किल्ला चढून गेल्यावर एक चांगलें घर आमच्या दिमतीस मिळाल्यानें बरें वाटलें. दुसऱ्या दिवशीं आमची राजाशीं [ भेट ] करून देण्याबद्दल निराजीला सांगितलें. त्यानेंहि पुष्कळ प्रयत्न केला. परंतु आगामी राज्याभिषेकाची पूर्व तयारी, दोन दुसऱ्या बाय-कांशी लग्नें ( with two other [ blank ] women ) इत्यादि गोष्टींत राजा गुंतून गेल्यामुळें, शेवटीं काल त्याची भेट झाली. नजराण्याचा त्यानें कृपेनें स्वीकार केला. व 'आतां तह झाला आहे तेव्हां तुम्हीं खुशाल बिनधोक व्यापार करा' असें तो म्हणाला. त्याच कामाकरितां आपण आल्याचें सांगून इतर सर्व देशांत मिळतात तशाच सवलती आम्हांला तुमच्या देशांत मिळाव्या; असें बोलणें काढतांच मोरोपंताकडे हवाला देऊन तो आपल्या महालांत गेला. महालांत तो आणि त्याचे ब्राह्मण दिवसांचे दिवस धार्मिक विधि करीत असतात. इथें राजकारणाचें किंवा दुसरें कांहींच काम तो पहात नाहीं. आजउद्यां इतक्यांत पेशवा आदिकरून प्रधानांना नजराणे देऊन होतील. पुढें तहाच्या कलमांवर वाटाघाट होईल. मराठींत भाषांतर करून त्यांच्याकडे तीं दिलेलीं आहेत. त्यांपैकीं कित्येकांवर आणि विशेषतः मुंबईची नाणीं स्वराज्यांत चालू करण्याबद्दलच्या कलमावर आक्षेप घेतला जाईल. राज्याभिषेकानंतर

शिवाजी स्वतःचीच टांकसाळ काढून त्यांतील फायदा मिळविण्याचें ठरवीत असल्यामुळें ह्या कलमाला संमति मिळणार नाहीं; असें **निराजी** म्हणतो. वादळामुळें वगैरे किनाऱ्याला लागलेलीं गलबतें व माल आम्हांला परत मिळावीं ही आमची मागणी कोंकणच्या कायद्याप्रमाणें आक्षेपार्ह ठरेल.......

**निराजीची** आपल्याबद्दलची अनुकूलता लक्षांत घेऊन, शिवाजीच्या नजराण्यापैकीं एका अंगठीवर त्याचें मन बसल्यामुळें, ती त्याला आम्हीं दिली. राजावर त्याचें वजन असल्यामुळे ह्या मुलखांत आपण वखारी घातल्यावर त्याच्या मध्यस्थीचा आपल्याला पुष्कळच उपयोग होईल,

नजर करावयाची **दरबारी खुर्ची** आम्हीं भेटीला जाण्याच्या वेळापूर्वी सुमारें अर्धा तास, म्हणजे अगदीं वेळेवर पोंचली.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. सुरत भा. ८८<br>पृ. १४४-४६ इ. | ( १६५० )<br>ऑक्झिंडेन, (रायगड)-सुरत | श. १५९६ ज्येष्ठ शु. ५<br>इ. १६७४ मे ३० |

आपलें २३ चें पत्र पावलें. त्यावरून डचांच्या युद्धांत इंग्लंडच्या आरमाराला यश मिळाल्याचें कळलें. **परदेशांतील राजकारणाकडे लक्ष देणारे** किंवा परद्वीपस्थ राजांच्या उदयास्तांचा विचार करणारे कोणी या प्रांतांत असते तर ही आनंदाची बातमी मीं प्रसिद्ध केली असती. परंतु परदेशांतील यशापयशाची त्यांना फिकीर नसल्यामुळें स्वतःच आनंद मानून राहिलें पाहिजे.

तहावर व्हावयाच्या सह्यांबद्दल, व आमच्या भडोचच्या दलालाचें गलबत **दर्यासारंगानें** पकडून खारेपाटणास नेऊन ठेविलें तें परत देण्याबद्दल काय ठरलें, याविषयीं चौकशी करण्यासाठीं आज सकाळीं नारायण शेणव्याला **निराजीकडे** पाठविलें असतां, राज्याभिषेक होईपर्यंत सुमारें पधरा दिवस व त्यापुढें तितकेच दिवस म्हणजे जवळ जवळ **एक महिनाभर कांहीं काम होणार नाहीं** असें कळवून त्यानें आमच्या भ्रमाचा निरास केला.

नाण्याचें व किनाऱ्यावर फुटलेल्या गलबतांचें अशीं दोन कलमें वगळून बाकीच्या मागण्या त्यानें मान्य केल्या. नाणीं मांगली नाण्याइतकींच चांगलीं झालीं तर लोक तीं आपखुशीनें घेतील; परंतु आपण तीं घेण्यास कोणाला भाग पाडणार नाहीं, किंवा प्रतिबंधहि करणार नाहीं, असें शिवाजीचें म्हणणें आहे. आणि तें खरें दिसतें. कारण येथें कांहीं मोड आणविली त्यांत **मुंबईचे पैसे** पुष्कळ होते. बजूक ( टबू ! ) मात्र नव्हते. नावफुटीबद्दल त्याचें असें म्हणणें आहे कीं, एकदां इंग्रजांना तशी सवलत दिली म्हणजे फ्रेंच, डच इत्यादि सर्वांनाच तशी सवलत द्यावी लागेल; तशी आपण देण्यास तयार नाहीं. कारण, आपल्या देशाचा किंवा **पुरातन निजामशाहीचा कायदा** तसें करण्याच्या विरुद्धच आहे. बंदरानिराम इतरत्र विलजकालीनें व्यापाराची आम्हीं सवलत

मागतों ती त्यांना पसंत नाहीं. तथापि आदिलशाही कारकीर्दीत राजापुरास मिळालेल्या सवलती ते देतील असें वाटतें. त्या सवलती तसें पाहिलें तर थोड्या होत्या असें नाहीं. *नारायण शेणव्याला येथें ठेवून मी निघून जावें; कारण येथें राहून कांहीं अधिक उपयोग* होण्यासारखा नाहीं असें निराजीनें सांगितलें. परंतु तुमच्या हुकुमाची वाट पहात आहें.

**दिलेरखान** दरबारला गेला व **बहादरखानावरहि** बादशहाची इतराजी होऊन त्यालाहि परत बोलावून **रामसिंगाला** शिवाजीशीं तह करण्यासाठीं पाठविला; ही बातमी तुमच्या पत्रांत आहे त्याप्रमाणेंच येथेंहि कळली. मोंगल व आदिलशहा या उभयतांशींहि तहाचा असा योग आल्यामुळें **राजाच्या मुलखांत वखारी** घालणें आतां सुलभ आणि फायद्याचें होईल असें वाटतें.

राजापूरबद्दल ठरलेल्या करारांत बदल करून घेण्याचा प्रयत्न यशस्वी न होतां उलट **शिवाजी** नाखूष होईल असें निराजीचें म्हणणें आहे. दरसाल ठरल्याप्रमाणें माल राजापुरांत दिला जाईल. शिवाजीजवळ कापड मुळींच नसून मिरीं, सुपारी आणि नारळ यांचा पुरवठा तेथून होईल.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. सुरत मा. ८७ पृ. १७१-७२ इ. | (१६५२) सुरत-मुंबई. | श. १५९६ ज्येष्ठ शु. ५ इ. १६७४ मे ३० |

सिद्दीला राहूं घावयास नको होतें. शिवाजीशीं युद्ध चालू होतांच त्याचे लोक दंगा करूं लागतील. परंतु निदान कलमें लिहून घेतलीं हें चांगलें झालें. **सिद्दीचीं** गलबतें मुंबईंत आहेत म्हणून **शिवाजी** नाखूष होऊन तह लांबणीवर पडेल तर तें बरें होणार नाहीं [ से ].

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. सुरत मा. ८७ पृ. १७६ इ. | (१६५३) सुरत-धनगांव ( Dungum ? ) | श. १५९६ ज्येष्ठ शु. ९ इ. १६७४ जून २ |

**पठाणांनीं** बंड करून बादशहाचें कांहीं सैन्य कापून काढलें आणि मदतीकरितां बादशहानें आपल्या सर्व उमरावांना बोलाविलें वगैरे बातमी आम्हांला आधींच कळली होती. **दिलेलखान** आणि **बहादरखान** यांच्या जागीं राजा **जयसिंगाचा (Jessin) मुलगा** येत असून, या बाजूला **शिवाजीला प्रवेश** करूं देणार नाहीं अशी आशा वाटते. विशेषतः पावसाळ्यांत तरी त्याची भीति बाळगण्याचें कारण दिसत नाहीं.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. मुंबई. मा. ६ पृ. १३९-४१ ( द्वि. सं. ) इ. | (१६५४) मुंबई ऑक्झिडेन. | श. १५९६ ज्येष्ठ शु. १२ इ. १६७४ जून ५ |

तुमचीं २७ व ३० मेचीं पत्रें मिळालीं. **शिवाजीच्या** पहिल्याच भेटीवरून

पुढील तहावद्दल वरीच आशा वाटते. ज्या कलमांवद्दल मतभेद आहे तीं सोडून देऊन निष्कारण **आग्रह धरूं नये.** परस्परांचा अधिक परिचय होईल त्याप्रमाणें अधिक हक्क मिळत जातील...**निराजीला** आंगठी दिली त्याला मान्यता आहे...**चांदीच्या नाण्यांना** राजानें विरोध केला नाहीं म्हणजे झालें. मग राजाकडून अधिक कांहींच आम्हांला नको. परंतु आमचे **बगरूकहि** चालावे अशी आज्ञा यापुढें मिळविली पाहिजे. **आमच्या देशांतील मालापासून** बनणारें हें नाणें असल्यामुळें त्याच्या चलनानें आमचा पुष्कळ फायदा व्हावा अशी आमची अपेक्षा आहे. परंतु याहि बाबतींत विशेष ताणूं नये. **नावफुटीवद्दल** ते जो कायदा आम्हांला लावतील तोच आम्हीं त्यांना लावूं!...फक्त बंदरांतच जकाती घ्याव्या ( पुढें घाव्या लागूं नयेत ); असें नच जमल्यास मग आदिलशाही कारकीर्दीतील आमचे पूर्वापारचे हक्क मिळतील तरी मान्य करून घेऊं. नारायण शेणव्याला पुढें राहावें न लागतां आतांच तहावर सह्या होतील तितकें चांगलें.... **राजापूरच्या करारांत बदल होणें शक्यच दिसत नाहीं;** तर त्या बाबतींत **कांहींच यापुढें बोलूं नये.**

का. प्र. सा. पृ. १३ ले. १
रा. श. १
(१६५४)
श. १५९६ ज्येष्ठ व. १
इ. १६७४ जून ९

**श्रीशिवाजी राजे—**बाळाजी आवजी प्रभु चिटणीस.

तुम्ही स्वामिसेवा निष्ठेनें करून श्रमसाहास पुरे केले, राज्यवृद्धीचे कर्मी आला, यावरून तुम्हांवर कृपाळू होऊन अष्टप्रधानांतील पद घावें मनीं धरलें असतां, तुम्ही विनंती [ केली ] कीं, आपणाकडे चिटणीसीचा दरक चालत आहे. हा अक्षय वतनी वंशपरंपरेनें सनिध व सर्व राज्यांतील चालवावा. कारखानिसी व जमनिसी दोन धंदे राज्यांतील आपल्याकडे दिले ते अक्षय्य असावे. यावरून तसें तुम्हांकडे दिले असे. स्वामीचे वंशींचा कोणीहि अन्यथा करणार नाहीं. लिहिलेप्रमाणें सदरहू प्रयोजनाचे व्यापाराची सेवा करून पुत्रपौत्रीं अनुभविणें.

खं. २० ले. २६८
सु. १०७५ रवल १९
(१६५५)
खुर्द खत फा. ब. सी.
श. १५९६ ज्येष्ठ व. ६
इ. १६७४ जून १४

अजर सेख अजम लरिकरी मियासेख- देसमुखानी पा मंगळवेढा

तुम्हांकरतां नागणियानें दावा करून विलायती खराब केले. त्यासी [illegible] मदत करावे तितुके केले. त्याकरता भले मले लरिकरी ठार जाले. दोही सेहे घे[illegible] दसम पा मार मधे ठेविले आहे. रयेतीस दिलासा देऊन लावणी संचणी करावी. [illegible] दिवाणचे दौलतखाह अहा. तुमचे मुजरा होईल.

राम.अं. ६५-६६ ले. १६ } (१६५६) { श. १५९६ ज्येष्ठ व. ९
संवत्सर आनंद व मिती } फा. मु. व सी. { इ. १६७४ जून १७

आनंदराऊ—दामोदर व सिउमट सेडगे साो येरुलः—आम्ही त्या प्रांती देवदर्शनास आलों तर तुमच्या गृही राहूं.

स. पृ. १२२ ले. १६ } (१६५७) { श. १५९६ ज्येष्ठ व. १३
रा. श. १ } { इ. १६७४ जून २१

छत्रपती शिवाजी यांचा अष्टप्रधानादि अमलदारांचा कानुजाबता.

ऑ. कॉ. मा. ३४ } (१६५८) { श. १५९६ ज्येष्ठ
नं. ३९१८ इ. } मुंबई हकीकत. { इ. १६७४ जून

ऑक्झिंडेननें मोठ्या धोरणानें शिवाजीशीं **किफायतशीर, कायमचा** व **चिरस्थायी तह** घडवून आणिला. **शिवाजीनें** राज्याभिषेक करून घेऊन २ लाख होन ब्राह्मणांना व इतरांना वाटले. त्यानें **मोठें सैन्य** उभारलें असून त्याला कोणा शत्रूची भीती वाटत नाहीं. उलट शेजारच्या सर्व सत्ताधीशांना त्याची **दहशत** वाटते. विशेषतः **पोर्तु०** पासून **चौथाईची** मागणी करून त्यानें त्यांना त्रस्त केलें आहे.

चिट. घ. पृ. १७ } (१६५९) { श. १५९६ आषाढ शु. १
रा. १ संव. } राजपत्र. { इ. १६७४ जून २४

**श्री राजा छत्रपती—आणाजीपंत सचीवः**-बाळाजी आवजी चिटणीस याजकडे दामोळ वगैरे गांवांचा खोतीसुद्धां मोकासा दिला आहे. कामावर हुसेन याकुब दळवी ठेविला आहे. त्याचेकडून काम घेणें.

खं. २० ले. २११ } (१६६०) { श. १५९६ आषा.व. ४
सु. १०७५ रसर १७ } खुर्दखत मु. २ व सी. { इ. १६७४ जुलै १२

अजर. म. सर्क म. रेहान— कारकून व देशमूख ता करकंब.

नरसिंहभट बिन नारायणभट सा। पंढरपूर यानें सांगितलें कीं, आपणास इनाम जमीन चावर १। मौजे गुळसेर ता मा। येथें आहे. तिचा भोगवटा काशीस गेल्यामुळें तुटला. तरी गांवीचे मोख्तसर कुणबी व बुढे पाटील यांस पुसोन गहदस चालिले असेल तसे व कदीम इनामती तजकरा रुजू पाहोन मलिक अंबर याचे वेळीं चालिलेप्रमाणें चालवावें.

फॅ. रे. सुरत मा. ८७ } (१६६१) { श. १५९६ आषाढ व. ८
पृ. १८३ इ. } सुरत-रॉबर्ट स्मिथ, दिल्ली. { इ. १६७४ जुलै १६

शिवाजीच्या जूनमधील **राज्याभिषेक** प्रसंगीं निदान वीस हजार ब्राह्मण व त्याचे सर्व अमलदार हजर होते.

खं. २० ले. २५८ } (१६६२) { श. १५९६ श्रावण शु. १
श. } फर्जरोखा { इ. १६७४ जुलै २३

धनको—बिठोजी बिन सोकरावा कुलकर्णी मो गोडगो पा संगमनेर.

ऋणको—तानाजी पा मोक. व बापूजी जुपेडा मो मा.

घेतले ८८५ रुपये. २५० वर कुलकर्ण दिधले. व ५३५ रु. हे कुलकर्णाचे सिरी घेतले. आधी रुपये घेतले मग खत लेहोनु दिधले.

फॅ. रे. मुंबई मा. १ } (१६६३) { श. १५९६ श्रावण शु. ९
पृ. ७२ (द्वि.सं.) इ. } मुंबई कन्सल्टेशन { इ. १६७४ जुलै ३१

ज्याअर्थी शिवाजीच्या कराराप्रमाणें रकमेची फेड होण्याकरितां त्याच्या देशांतील माल खरेदी करणें जरूर आहे, आणि मिरीं, नारळ व सुपारी यांखेरीज अन्य माल तेथें होत नाहीं, आणि ज्याअर्थी मिरीं महागाईनें खरेदी करावीं लागतात त्याअर्थी नारळ व सुपारीच खरेदी करण्यासारखीं राहातात. आणि हाच त्यांचा हंगाम असल्यामुळें, दिरगाई केली तर आणखी एक वर्षपर्यंत हा व्यवहार लांबणीवर पडणार; हें लक्षांत घेऊन, कंपनीतर्फे माल—नारळ किंवा सुपारी किंवा दोन्ही वस्तु—घेण्याकरितां मुखत्यार नेमून त्याबद्दल राजापूरच्या सुभेदाराकडे, पत्र पाठवून त्याचें उत्तर मागवावें.

फॅ. रे. सुरत मा. ८७ } (१६६४) { श. १५९६ श्रावण शु. १०
पृ. १८७ इ. } सुरत-मुंबई. { इ. १६७४ आगस्ट १

औरंगाबादेहून अशी बातमी आली आहे कीं, शिवाजीनें बहादुरखानाच्या छावणीवर हल्ला करून लूटमार केली. बादशहाकरितां जमविलेले जातिवंत दोनशें घोडे व सुमारें एक कोटीचा खजीना लुटून, त्याचे सर्व तंबू त्यानें जाळून टाकले. शिवाजीच्या २००० घोडेस्वारांनीं बहादुरखान व त्याचें सैन्य यांस हूल दाखवून २०।३० कोस दूर नेल्यावर इकडे मागें ७००० घोडेस्वारांनीं हा पराक्रम केला अशी बोलवा आहे. परंतु खात्री नाहीं.

नुकत्याच झालेल्या तहामुळें शिवाजीवर कितपत विश्वास ठेवावा हें कळवावें. त्याचा कौल मिळेल तर घेऊन पाठवावा. परंतु त्याचें सैन्य या बाजूला आलें तर त्याचा उपयोग होईल काय?

[ से ]—गलबताची येथें जरूर नसेल तर पाठवून देऊं. परंतु शिवाजीनें येथल्या त्याच्या ब्राह्मणा ( वकिला) च्या मार्फत गेल्या ३ वर्षाच्या चौथाईचे ९ लाख रुपये सुभेदाराकडे मागितले आहेत हे दिले नाहींत तर 'पावसानंतर पाहून घेईन' अशी त्यानें धमकी दिली आहे. शिवाजीनें जेद्दा व मक्का इकडून परत येणारीं गलबतें पकडावीं असा आपल्या आरमाराला हुकूम दिला, अशीहि दुसरी एक बातमी आहे. सुभेदारानें आमचेकडे चौकशी केली आहे. तुम्हांला माहिती असेल तर कळवा.

फॅ. रे. सुरत भा. ८७ } (१६६५) { श. १५९६ श्रावण शु. १५
पृ. १८८ इ. } सुरत-मुंबई { इ. १६७४ आगस्ट ६

ऑक्झिंडनेनें केलेल्या तहाच्या कलमें वगैरे पाहून ठीक वाटलें. हा तह होईपर्यंतच्या कालांतील राजापूरला झालेल्या आमच्या नुकसानीची भरपाई करण्याबद्दलच्या अटी ज्या कांहीं असतील त्या आम्हांला पाहिजे आहेत! त्यांच्यावर पुढें वखार घालणें अव-लंबून आहे. नाहींतर अजूनहि कांहीं खुसपट निघेल. आतां **विजापूरचें सैन्य** जवळच टेकडीवर राहून व्यापाराला अडथळा करितें. ज्यांशीं आमचें युद्ध चालूच आहे आणि आमचेजवळ पुरेसा माल्रहि नाहीं. हीं आमच्या मतें, आणखीं विरुद्ध जाणारीं कारणें दिसतात. यावरून आम्ही अगदींच उलट आहों असें समजूं नये. **निराजीच्या** म्हणण्याप्रमाणें **शिवाजीचा आदिलशहाशीं** एकदम तह झालाच तर विलाय-तेचीं जहाजें आल्यानंतर वखार घालण्याचा विचार करण्यास हरकत नाहीं.

फॅ. रे. सुरत भा. ३ } (१६६६) { श. १५९६ श्रावण शु. १५
पृ. २८-२९ ( तृ. सं. ) इ. } सुरत कन्सल्टेशन { इ. १६७४ आगस्ट ६

मुंबईच्या प्रेसि० च्या २० तारखेच्या पत्रांतील सुचाबद्दल खालील ठराव करण्यांत येत आहेः—

**राजापुरास** पावसाळा संपतांच वखार घालावी का थोडी लांबणीवर टाकावी याबद्दल विचार करून, आमचीं युरोपांतील गलबतें येऊन तिकडून राजापुरास ठेवण्या-जोगा माल कोणता येतो व युरोपांत पाठविण्याच्या माल खरेदीविषयीं ( तेथील खरेदी ठरविण्याकरितां ) काय हुकूम येतो तें पाहून नंतर वखार घालावी, असें कौन्सिलला वाटतें. जितक्या लवकर वखार घालावी तितक्या लवकर जकातींच्या सवलतीच्या रूपानें व्हाव-याची भरपाई होऊं लागेल हें खरें असलें, तथापि **विजापूरकरांचें शिवाजीशीं युद्ध** चालू आहे, आणि त्या शहरावर व बंदरावर एकदम स्वारी करितां येण्याच्या तया-रीनेंच आदिलशाही सेनापति राहिला आहे हें लक्षांत घेतां, तेथें आजच व्यवहारांत पडणें तितकें सुरक्षित नाहीं असें आमचें मत आहे.

राम. अं. ६२ ले. ४ } (१६६७) { श. १५९६ श्राव. व. १
सु. १०७५ जवल १४ } खुर्दखत फा. मु. व सी. { इ. १६७४ आगष्ट ७

अजर. नाइकजी राजे खराडे–कारकून व देशमुख मसूर.

कासीमट बिन अंतमट सो पाटण यास २० बिघे इनाम जमीन चालत आहे. **हाली माहाराजास मोकासा अर्जानी जाहाला आहे.** माहाराज धर्मपरायण देउब्राह्मणाचे भगत आहा. ऐसियास आपण जनोवदार. यास्तव १० बिघे आणखी दिल्हीया कृष्णातीरी स्नानसंध्या करून आसीर्वाद देऊनु असो. तरी भट गोसावी यास पाव चावर दुंबाला कीजे.

(से) फॅ. रे. सुरत भा. ३ } ( १६६८ ) { श. १५९६ श्रावण व. २
वि. ४ पृ. ३३ इ. } सुरत कन्सल्टेशन. { इ. १६७४ आगस्ट ८

**शिवाजीचें** सैन्य सुरतेला येण्याचा संभव आहे. करितां आमच्या बंदोबस्ता-साठीं सैन्य पाठवणें जरूर आहे.

फॅ. रे. सुरत भा. ८७ } ( १६६९ ) { श. १५९६ श्रावण व. ६
पृ. १९०-९१ इ. } सुरत-मुंबई. { इ. १६७४ आगस्ट १२

मुंबईकरांनीं चार्लसच्या मुखवट्याचीं व 'इंग्रज किंग चार्लस' असें फारशींत लिहि-लेलीं नाणीं काढलीं त्याबद्दल मतभेद. हें नाणें अधिक कां चालावें ? सामान्य लोक फसले तथापि सराफ हे त्याच्या **धातूची किंमत** पारखूनच घेतील. दख्खनमध्यें सर्वत्र हलाच प्रघात असल्यामुळें विजापूर किंवा कारवार कोठेंहि त्याच्या मुळांतील धातूच्या किंमतीवरच त्याचें चलन होईल.

फॅ. रे. सुरत भा. ८७ } ( १६७० ) { श. १५९६ श्रावण व. ७
पृ. १८९ इ. } सुरत-मुंबई { इ. १६७४ आगस्ट १३

पुढच्या महिन्यांत **शिवाजीचें** सैन्य इकडे येण्याची भीती नाहीं असें तुम्हीं कळवीत असाल तरच इराणचा माल भरलेलें गलबत आम्हीं खालीं पाठवून देऊं.

ऑर्म भा. ११४-३ } (१६७१) { श. १५९६ श्रावण व. ९
पृ. १५९ इ. } मुंबई-सुरत { इ. १६७४ आगस्ट १५

**मोरोपंत,** ( शिवाजीचा पेशवा आणि ह्या भागांतील मुख्य सेनापती ) ८।१० हजार सैन्यानिशीं **कल्याणभिवंडीजवळ** आहे. ह्यामुळें पोर्तुगीज भयग्रस्त झाले. त्यानें त्यांचेकडून चौथाईची मागणी केल्यामुळें त्यांनीं **वसई** येथें पक्का बंदोबस्त केला व युद्धाची तयारी केली. परंतु त्यांतील सैन्य कोंकणांत पांगून गेल्यामुळें त्यांची भीति निमाली. आतां **शिवाजी स्वतंत्र राजा** (a sovereign Prince) झाल्यामुळें, आपल्या मोठ्या नांवाकरितां म्हणून कांहीं अचाट कृत्य करील असा संभव आहे. आणि तसें कांहीं तरी त्यानें मनांत योजिलें आहे हें खास. कारण, तो उत्कटतेनें युद्धाची तयारी करीत आहे. मात्र तो **बहादुरखानाच्या** छावणीवरच हल्ला करील अशी आम्हांला पक्की बातमी नाहीं. आम्हांलाहि तें खरें वाटत नाहीं. कारण, ते **परस्परांचे चांगलेच स्नेही** असल्यानें इतके असे आपआपसांत भांडणार नाहींत. शिवाय ते दोघेहि इतके मोठे युक्तिबाज आणि धोरणी शत्रु आहेत कीं परस्परांवर निष्कारण विश्वास ठेवणार नाहींत किंवा परस्परांकडून चकवले जाणार नाहींत ! **मक्केहून** येणाऱ्या गलबतांवर छापा घालण्याचा हुकूम **शिवाजीच्या** आरमाराला

दिल्याचें आम्हीं ऐकिलें नाहीं. परंतु उमाजीचा मार्दचंद आणि इतर पळून गेलेले लोक यांना शिवाजीनें नोकरींत घेतलें हें खरें आहे. आणि त्यांनीं त्याच्या डोक्यांत ही गोष्ट भरविली असण्याचा संभव आहे. तथापि शिवाजीच्या आरमारांत लहान गुराबा आणि हलक्या क्षुद्र नावा यांचाच भरणा असल्यामुळें आणि त्याचे खलाशी दर्याचे अननुभवी असल्यामुळें, मला त्यांची मुळींच भीति वाटत नाहीं. पण कल्याणचा सुभेदार एक मोठें गलबत—कोणत्या नमुन्याचें तें कोण जाणे ?—बांधवीत आहे असें समजतें. राजापूरला त्याचीं मस्कतला व्यापारी सफरी करणारीं ४।५ तिरकटी तारवें आहेत असेंहि मीं ऐकिलें आहे। परंतु समुद्रावर हालचाल करण्याची त्याची कांहीं तयारी असल्याचें ऐकिवांत नाहीं. त्यांतून सिद्दीचें आरमार आतां समुद्रसंचारार्थ बाहेर पडणार असल्यामुळें त्याच्या भीतीस्तव त्याचें कोणतेंहि गलबत बाहेर फिरकेल असें वाटत नाहीं. शिवाय, जरी यदाकदाचित् शिवाजीनें अशी तयारी केली असती तरी आमचे वकील राजापूर, दाभोळ इत्यादि सर्व बंदरांतआहेत त्यांचेकडून मला बातमी यावयास पाहिजे होती. तथापि चौकशी करून काय तें कळवितों.

शिवाजीनें तहांत मोंगली अगर दख्खनी मुलखांतील कोणत्याहि वखारीला त्रास न देण्याचें, व त्याप्रमाणें सर्व सेनापतींना हुकूम देण्याचें वचन दिलें आहे. म्हणून सुरते-बद्दल काळजी नको...तथापि सावध रहावें हें बरें !

मोंगलांशीं अधीक चांगल्या रीतीनें तोंड देतां यावें याकरितां आदिलशहा व शिवाजी यांचा तह होणें उभयतांच्या हितावें आहे. कारण आपसांत भांडून कोणा-च्याच हातास कांहीं लागणार नाहीं. पण फायदा झालाच तर तो लुटालूट करणाऱ्या शिवाजीचा होईल. कारण आदिलशहा किती कठोर झाला तरी शिवाजीचें सैन्य नाश पावावें किंवा असमर्थ व्हावें यांत त्याचें हित नाहीं.

ऑर्म मा. ११४-२ } (१६७२) { श. १५९६ भाद्र. शु. १
पु. १७३ इ. } मुंबई-सुरत { इ. १६७४ आगस्ट २२

किनाऱ्यावरील सरकारकून ( Chief Minister on the main ) मोरोपंडीत यानें प्रेसि० ला अनेक पत्रें व निरोप पाठवून, इंग्रजांच्या गलबतांतून त्याच्या देशांत मीठ पोंचविण्याबद्दल विनंति केली. कारण त्याच्या बंदरचा व्यापार अडविण्याचा चंग बांधून बसलेल्या सिद्दीच्या भीतीस्तच मराठ्यांचीं गलबतें बाहेर पडूं शकत नाहींत. प्रेसि० नें नकार दिला तरी त्याचें मागणें थांबलें नाहीं.

फॅ. रे. मुंबई, मा. १ } (१६७३) { श. १५९६ भाद्रपद शु. ६
पु. ७८ (द्वि. सं.) इ. } मुंबई कन्सल्टेशन. { इ. १६७४ आगस्ट २६

आम्ही शिवाजीपेक्षां सिद्दीला अधिक सवलतीनें वागवितों. अशा सबबीवर,



31129

शिवाजीनें प्रेसिडेंटला असें कळविलें आहे कीं, ' सिद्दीला यापुढें मुंबई बंदरांत राहूं दिलें तर आमचा तह झाला असला तथापि, मी सिद्दीवर बंदरांतच हल्ला करून तुम-च्याशीं युद्ध पुकारण्यास चुकणार नाहीं. ' ही बातमी सिद्दीला एकदम कळवावी आणि आतां पावसाळा संपला असल्यामुळें व पावसाळ्यांतील त्याची अडचण आपण उत्तम भागविली असल्यानें, त्यानें आपलें आरमार घेऊन बंदर सोडावें असें त्यास सांगावें.

फॅ. रे. सुरत मा. ८७ पृ. १९६-९७ इ. | (१६७४) सुरत-मुंबई | श. १५९६ भाद्र. शु. १२ इ. १६७४ सप्टेंबर १

कालच्या सभेंत शिवाजीनें राजापूरच्या सुभेदाराला तहाच्या बाबतींत दिलेले हुकूम वाचले. सामान्यतः दख्खनकडे मिळतात त्यापेक्षां ह्या सवलती कमी आहेत....व्यापाराकरितां बंदराचे बाहेर माल नेऊं न देणें अन्यायाचें आहे. आधीं जकाती भरून झाल्यावर तो माल वाटेल तर परत नेऊं देणें झाला सवलत असें म्हणतां येणार नाहीं. इतरत्र अशा मालावर आम्हांला जकात भरावी लागत नाहीं. शिवाजी-च्या मुलखांत मिठाचा व्यापार करण्याकरितां कंपनीचीं गलबतें वापरण्याला आमची संमति नाहीं. नंतर न्यावयाच्या मालावर खारलेल्या गलबतांचा अनिष्ट परिणाम होतो. दोन गलबतें पाहिजे तर जाऊं देत.

फॅ. रे. सुरत मा. ८८ पृ. २०३-२०४ इ. | (१६७५) कारवार-सुरत. | श. १५९६ भाद्र. शु. १३ इ. १६७४ सप्टेंबर २

फोंड्यापासून १६ मैलांवरील, त्याच्या हद्दींतील नरसा [ (Narsa) मसुरा? ] या ठिकाणच्या एका श्रीमंत व्यापाऱ्याला धरल्यामुळें शिवाजी फोंड्याच्या खाल सुभेदाराला संतापला आहे. सुभेदार त्याला भिऊन जलमार्गानें तोफखाना वगैरे कुमक फोंड्याकडे पाठवूं लागला आहे. आमच्याकडेहि त्यानें कांहीं तोफा व गलबत मागितलें. राजापूरला आपली वखार घातल्याची खबर त्याला सांगून, इतरांचे मानगडींत आम्हांला पडतां येत नाहीं असें कळवून आम्हीं नकार दिला. नाहीं तर मागच्याप्रमाणेंच राजापूरची वखार पुनः लुटली जाईल अशी भीति प्रदर्शित केली.

फॅ. रे. मुंबई मा. १ पृ. ८३ (द्वि) इ. | (१६७६) मुंबई कन्सल्टेशन. | श. १५९६ भाद्र. शु. १४ इ. १६७४ सप्टेंबर ४

सिद्दीनें शिवाजीशीं युद्ध करण्याकरितां गुप्त रीतीनें आमच्या बेटावरील पोर्तु. व टोपकरांची भरती आम्हांला कळविल्याशिवाय केली. यामुळें शिवाजीला वैषम्य वाटणें साहजिक आहे. करितां अशा भरतीविरुद्ध आणि गव्हर्नरच्या परवानगीशिवाय बेट

सोडून जाऊं नये असा जाहीरनामा काढावा. सिद्दीची नोकरी पत्करणाऱ्यास कडक शिक्षा होऊन त्याची मालमत्ता जप्त होईल असें जमातीच्या मुख्याला (?) (Chiefs of the pone) बोलावून आणून सांगावें.

फॅ. रे. सुरत भा. ८८ } (१६७७) { श. १५९६ भाद्र. व. २
पृ. २२७ इ. } फोर्टसेंट जॉर्ज–सुरत. { इ. १६७४ सप्टेंबर ७

**शिवाजीबरोबरचा** तह, राजापूरच्या नुकसानीबद्दल व फॅक्टरीबद्दल चांगलीं कलमें ठरविण्याबद्दल धन्यवाद. त्याचें राज्य वाढत जाईल तसतसें पूर्वी लुटीकडे असलेलें **त्याचें लक्ष आतां व्यापाराकडे लागेल.** तुमच्या मुलखांत तरी **मोंगली** आरमार त्याचे विरुद्ध मोकळेपणानें कारवाई करूं शकणार नाहीं हें त्याला उपकारक वाटेल. बेटाची भरभराट झाली याबद्दल अभिनंदन केलें पाहिजे.

फॅ. रे. मुंबई भा. १ } (१६७८) { श. १५९६ भाद्र. व. ३
पृ. ८७ (द्वि. सं.) इ. } मुंबई कन्सल्टेशन. { इ. १६७४ सप्टेंबर ८

**शिवाजीचें सैन्य** सुरतेला येण्याचा संभव असल्यामुळें सुरतेला राहण्याकरितां सैन्य पाठवावें.

फॅ. रे. मुंबई भा. १ } (१६७९) { श. १५९६ भाद्रपद व. ११
पृ. ९३–९४ इ. } सुरत कन्सल्टेशन. { इ. १६७४ सप्टेंबर १६

**रायबाग**जवळ इंग्रजांच्याकरितां खरेदी केलेला माल दोन सैन्यांच्या मधून बंदराकडे आणण्याची अडचण आहे. तरी इंग्रजांच्या जबाबदारीवर **राजापुराकडे** माल आणावा. परंतु आदिलशाही सुलतानाचा व बहलोलखानाचा कौल मिळविण्याची खटपट करावी.

फॅ. रे. सुरत भा. ८७ } (१६८०) { श. १५९६ भाद्र. व. ११
पृ. २०४ इ. } सुरत–मुंबई. { इ. १६७४ सप्टेंबर १६

**सुरतेला** पुनः भय उत्पन्न होऊन दरवाजे बंद केले. नगररक्षणाकरितां सुभेदारानें सधन व्यापाऱ्यांकडे १ लक्षाची मागणी केली. त्यांनीं सभा करून सुभेदाराकडे रोखा पाठविला. त्याचें त्यांना अजून उत्तर मिळालें नाहीं.

फॅ. रे. मुंबई भा. १ } (१६८१) { श. १५९६ भाद्र. व. ११
पृ. ९२ (२) इ. } मुंबई कन्सल्टेशन. { इ. १६७४ सप्टेंबर १६

जुन्नर (Ganeer ?) च्या सुभेदाराकडून मोंगलांच्या सैन्यांतून माल जाण्याकरितां **नारायण शेणव्यासमवेत** एका इंग्रजानें जाऊन कौल मिळवावा. **जुन्नरपासून कल्याण-भिवंडीपर्यंत शिवाजीच्या** मुलखांतीलहि कौल घ्यावा. हे दोन्ही कौल त्वरेनें पाठवावे.

ऑर्म मा. ११४-३ } (१६८२) { श. १५९६ आश्वीन शु. ३
पृ. १९७ इ. } मुंबई-मि. वॉर्ड. { इ. १६७४ सप्टेंबर २२

जॉन चाइल्ड याला राजापूरच्या वखारीचा मुख्य नेमिलें. त्याला येथें काम असल्यामुळें तुम्हीं पूर्व तयारीकरितां पुढें जावें.

ऑर्म मा. ११४-३ } (१६८३) { श. १५९६ आश्वीन शु. ६
पृ. २०३ इ. } मुंबई-सुरत. { इ. १६७४ सप्टेंबर २५

आम्हांला असें वाटतें कीं, **शिवाजीचा सुरतेला** कांहीं उपद्रव होणार नाहीं. त्याचें सैन्य दख्खनकडे **फोंडा किल्ल्याचे** बाजूला, **रुस्तुमजमाच्या** मुलाचें व त्याचें **भांडण** झाल्यामुळें वळलें आहे असें समजतें.

डच रेकॉर्डस्, मा. ३४ } (१६८४) { श. १५९६ आश्वीन शु. १४
न ८४१ इ. ऑक्टो.१३ न्यू. } वेंगुर्लो-बटेव्हिया { इ. १६७४ ऑक्टोबर ३

पुष्कळ दिवस पूर्वतयारी होऊन जूनमध्यें **शिवाजीच्या राज्याभिषेकाची** संपूर्ण तयारी झाली. आणि ब्राह्मण व विद्वान् भट्ट व सहकुटुंब असे सुमारें ११ हजार लोक रायगडावर जमा झाले. शिवाजीनें मुख्य व विद्वान् गृहस्थांना आपला हेतु सांगितला. इहींची मोसले जाती सोडून **क्षत्रिय जातींत प्रवेश** केल्याशिवाय आपल्याला मुकुट धारण करतां येणार नाहीं; करितां आपल्याला त्या जातींत घ्यावें अशी त्यानें विनंती केली. तुमचे पूर्वज पिढ्यान्‌पिढ्या मोसलेच असल्यानें तसें करणें अशक्य आहे; असें विद्वज्जनांनीं सांगितलें. मोसले क्षत्रियांचेच वंशज आहेत, आणि असें जातिपरिवर्तन होऊं शकेल असें शिवाजीचें म्हणणें पडलें. तेव्हां प्रथम क्षत्रिय बनल्याशिवाय शिवाजी मुकुटधारणाला योग्य होणार नाहीं, असा विचार करून आणि पूर्वीसारखें **जुलमाचें राज्य न करण्याचें त्यानें वचन दिल्याचें** लक्षांत घेऊन, गेल्या २९ मे रोजीं दुसऱ्या पक्षाच्या मंडळीनें त्याला मोठ्या समारंभानें क्षत्रिय करून घेतलें. **क्षात्रधर्माची** दीक्षा ते देणार होते; परंतु **ब्राह्मण्याचा आचार** आपल्याला शिकवावा अशी त्यानें इच्छा दर्शविली. ही गोष्ट त्यांना मान्य होईना. परंतु त्यांपैकीं एका मुख्यानें आपली संमति दिली आणि शिवाजीनें त्याला ७००० होन बक्षीस दिले. एक सर्व दिवस त्याबद्दल संस्कार करून १७००० होन धर्मार्थ वाटून दिले. पापक्षालनार्थ म्हणून ४ जून रोजीं शिवाजीनें **मोठा दानधर्म केला**. १७००० होन किंवा १६० पौंड वजनाची स्वतःची सुवर्णाची तुळा करून व त्याचप्रमाणें चांदी, तांबें, जस्त, कथील, शिसें, लोखंड, ताग, कापूर, मीठ, खिळे, जायफळें, जायपत्री, मसाले, लोणी, साखर, सर्व प्रकारचीं फळें, खाद्य, सुपारी, ताडीसुद्धां नानाविध वस्तूंच्या तुळा करून त्या सर्वांचा धर्म करून टाकला. शिवाजीनें जाळपोळ केली त्यांमध्यें स्त्रिया, मुलें, पशु व ब्राह्मण यांची **हत्या** झाली असण्याचा संभव होता. त्या पापाच्या क्षालनार्थ दोघां ब्राह्मणांच्या सूचनेवरून आणखी १६०० होनांचें दान करण्यांत आलें.

 आमणांची कुवली. मनाची ब्राह्मण !

सर्व आवश्यक धार्मिक विधि यथास्थित झाल्यानंतर ५ जून रोजीं मुद्दाम आणविलेल्या गंगाजलानें स्नान करून शिवाजीनें प्रत्येक ब्राह्मणाला १०० होन दक्षिणा दिली. मुख्याला ५००० होन व २००० होनांचें वर्षासन दिलें. ६ जून रोजीं पहाटेस ५ वाजतां त्यानें मुद्दाम बनविलेल्या सिंहासनावर आरोहण केलें, आणि जमलेल्या सर्व लोकांनीं त्याला शिवराज असें अभिधान दिलें.

त्यानंतर मुख्य प्रधान मोरोपंडित यांनीं मुजरा करून ८००० होन आणवून, शिवाजीच्या शिरावर ओतले. मुख्य हिशेबनीस निळो पंडीत यानें ७००० होन आणले; दोघा कौन्सिलरांनीं (?) प्रत्येकीं ५००० होन आणून त्याप्रमाणेंच शिवाजीला सुवर्णस्नान करविलें. राहिलेल्या प्रधानांनींहि मुजरे केले आणि ते सिंहासनाच्या उभय बाजूंना रांगा करून उभे राहिले. संभाजी राजा सिंहासनाच्या पायरीवर बसला. ७ जूनला, जमलेल्या सर्व वकील ( envoys ) व ब्राह्मण मंडळींना सार्वत्रिक देकार सुरू झाला. योग्यतेप्रमाणें प्रत्येक ब्राह्मणाला ३, ४ किंवा ५ रुपये आणि बायका-मुलांनाहि सरसकट १ किंवा २ रुपये दिले. ...हा दानधर्म १२ दिवस चालला होता व तितके दिवस भोजनें चालू होतीं. ह्या समारंभाचा व दानधर्माचा एकंदर खर्च दीड लाख होन इतका झाला असें म्हणतात.

शिवाजीची आई ८० वर्षांची वयातील म्हातारी होती. तरी राज्याभिषेकाला हजर राहून नंतर १२ च दिवसांनीं मरण पावली. तिनें २५ लाख होन-कांहींच्या मतें अधिकच-आपल्या पाठीमागें मुलाला ठेविले, (न्यू-सप्टेंबरच्या पहिल्या आठवड्यात =) ऑगस्टच्या शेवटच्या आठवड्यात, फोंड्यावर अचानक छापा घालण्याकरितां शिवाजींचा अण्णाजी ( आमाजी ? ) या नांवाचा सेनापती कुडाळास आला. परंतु महमदखानाला आधीं कळून तो सावध राहिल्यामुळें अण्णाजीला अपयश आलें.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. सुरत, भाग ८८ पृ. २१७ इ. | (१६८५) मुंबई-सुरत | श. १५९६ आश्विन शु.१५ इ. १६७४ ऑक्टोबर ४ |

शिवाजीला फायदा मिळतो म्हणून सुरत व भडोच येथून कोणत्याहि प्रकारची सामुग्री पाठवूं नये, असा बहादुरखानानें हुकूम काढला आहे.

| | | |
|---|---|---|
| ऑर्म भा. ११४-३ पृ. २०४ इ. | (१६८६) मुंबई-सुरत. | श. १५९६ आश्विन व.२ इ. १६७४ आक्टोबर ६ |

शिवाजी मोठें सैन्य घेऊन कल्याणला आला आहे. सुरतेवर किंवा बहादुरखानावर तो जाणार असें बोलतात. चपल जासुदाबरोबर पत्र दिलें आहे. अशा हुलींना किती महत्त्व द्यावें हें तुम्ही जाणताच.

| | | |
|---|---|---|
| ऑर्म ११४-३ पृ. २०७ इ. | (१६८७) मुंबई-सुरत | श. १५९६ आश्विन व. ६ इ. १६७४ आक्टोबर १० |

शिवाजी कल्याण-भिवंडीला मोठें सैन्य ठेवून तेथून निघून गेला. तो एकदम परत येईल अशी अपेक्षा आहे. त्याचा बेत कांहींच समजत नाहीं.

सा. ले. १०९ } (१६८८) { श. १५९६ आश्वीन व. ८
सु. १०७५ रजब २४ } म. सु. { इ. १६७४ आक्टोबर १२

महादाजी सामराज सुभेदार व कारकून सुभा माहालानिहाये.

माहादाजी नरस परभू ( प्रभु ) हवालदार व कारकुन ता। कर्याती मावळ.

राजश्री साहेबा (छत्रपती शिवाजी)चा हात रोखा आला कीं, 'मौ अहिरें कर्यात मावळ येथील कुलकर्ण जानकी कोम रंगमट बिन बाळंमट ठकार इची मिरासी आहे. शंकराजी भोवर मुतालिकीस ठेविला होता तो काढून वेगळा ब्राह्मण ठेविला. येसें असतां यादव नामदेऊ याणी **चिरंजीव** राजश्री **संभाजी राजयांचा** कागद शंकरजी भोवर याचें कुलकर्ण म्हणऊन नेला. व उगाच कथला करितात. तरी कथला करूं नये. शंकराजी हा मुतालीक आहे. जानकीचें कुलकर्ण मिरास. तरी ह्याप्रमाणें करावे.

फॅ. रे. सुरत भा. ८८ } (१६८९) { श.१५९६आश्वीन व. १०
पृ. २१८ इ. } निकल्स व मिंचिन, दामोळ–सुरत { इ. १६७४ आक्टो. १४

( से )–२४ सप्टेंबरला दामोळास येऊन मिठाची विक्री केली. चिपळूणच्या हवालदारानें गलबतावर माप घेण्याला फार आढेवेढे घेतले. [ प ]–पुढें मीठ विक्रीचे पैसे मागितले असतां सुभेदारानें प्रथम वायदेच केले. आणि शेवटीं काल रात्रीं त्यानें असें कळविलें कीं **शिवाजी मोठ्या स्वारीवर निघाला असून.** सैन्याचा तनखा देण्यांत पुष्कळ पैसा खर्च झाला...[ से ]–म्हणून आम्ही नांगर उचलून आज सकाळीं निघालों.

ऑर्म भा. ११४–३ } (१६९०) { श. १५९६ आश्वीन व.१०
पृ. २०९ इ. } मुंबई–सुरत { इ. १६७४ आक्टो. १४

शिवाजीचें सैन्य कल्याणभिवंडीला आलें तें **बहादूरखानाच्या** सैन्याच्या समोरील टेकडीवर ( जुन्नरगड Jenneah Gur ) गेलें. शिवाजी खुद्द **पालीला** ( Polly ) असून अविलंबानें सैन्यासमवेत तेथें जाईल असें म्हणतात. टिकाव, कुदळी, तोमरें इत्यादि **लुटीच्या उपयोगाचीं हत्यारें** त्यानें बरोबर घेतलीं आहेत. परंतु त्याचें उद्दिष्ट ठिकाण कांहीं समजत नाहीं.

आक्टोबर २३ चे पत्रांतहि [पृ. २१४] बेत अजून अज्ञातच आहे असें आहे.

फॅ. रे. सुरत भा. ८७ } (१६९१) { श. १५९६ कार्तीक शु. ४
पृ. २४४ इ. } सुरत–मुंबई { इ. १६७४ आक्टोबर २२

...शिवाजीचें सैन्य **रामनगरचे** आसपास आल्यामुळें शहरचे लोक फार भ्याले आहेत. बलसाड, चिखली व गणदेवीचे लोक पळाले. येथील व्यापारी बांधाबांध करूं लागले आहेत. आमच्या कानावर असें आलें आहे कीं रामनगरच्या राजाच्या तीन

चार हजार **भिल्लांनीं** रामनगरच्या खिंडींत शिवाजीच्या सैन्याला अडवून **धरलें.** आपल्याला त्यांनीं जाऊं द्यावें म्हणून शिवाजीनें त्यांना १ लक्ष रुपयांचें आमिष दाखविलें.

(से)फॅ. रे. सुरत भा. ८८-२ } (१६९२) { श. १५९६ कार्तीक शु.४
पृ. ३ इ. } राजापूर-सुरत { इ. १६७४ आक्टो. २२

**शिवाजीचें** सैन्य **कोल्हापूर**जवळ आल्याची हूल उठल्यामुळें वर्गीकरण केल्या-शिवाय कापड (सूत ?) मिसळलेलेंच पाठविलें.

फॅ. रे. सुरत भा. ८८ } (१६९३) { श. १५९६ कार्तीक शु. ६
पृ. २२१ इ. } राजापूर-सुरत. { इ. १६७४ आक्टो. २४

१७ तारखेला **शिवजी पंडीत** [? सेमध्यें Jonajee जनाजी असें आहे.] दिवाळीसाठीं येथें आला आणि १८ तारखेला आमच्या झोपडीवर आला. आमच्या जुन्या इमारतींत तो राहतो. ती मिळविण्याची आम्हीं खटपट केली. 'शिवाजीच्या *तहाच्या कलमांत तसें असल्यास मी एक क्षणहि रहाणार नाहीं'* असें तो म्हणतो. परंतु ती हवाली करण्याची त्याची इच्छा नाहीं. **अण्णाजी पंडीत** लवकरच येईल. कलमें *ठरवितांना तो हजर असल्यामुळें तो आल्यावर त्याची मदत काय मिळते तें पाहूं.* रण-छोडदास **रायवागला** माल घेऊन जात आहे.

[से] **अण्णाजी** राजापूरला येईतों वाट पहावी लागेल. **खवासखान, बह-लोलखान** व आदिलशाही नगरसुभेदार याचे पास त्याचेजवळ असल्यामुळें, चौकी-दारांनीं आमचा माल अडकवूं नये असे त्याचे हुकूम घेतले पाहिजेत.

फॅ. रे. सुरत भा. १०७ } (१६९४) { श. १५९६ कार्तीक शु. ७
पृ. १ इ. } प्रेसि. ऑंजिअर-सुरत कौन्सिल { इ. १६७४ आक्टोबर २५

अगदीं गुप्त राखलेल्या कोणत्या तरी कामगिरीवर **शिवाजी** मोठें सैन्य घेऊन *गेला हें खचित. गेल्याच वर्षी जिंकलेल्या* **सातारा** *किल्ल्याकडे तो गेला असें कित्येक* म्हणतात. परंतु कांहीं सांगतां येत नाहीं.

फॅ. रे. सुरत भा. ८८ } (१६९५) { श. १५९६ कार्तीक शु. ८
पृ. २४० इ. } कारवार-सुरत { इ. १६७४ आक्टो. २७

**खवासखानानें** बोलावल्यावरून **अबूखान रुस्तुमजमा विजापुरास** गेला. हा प्रांत दुसऱ्याला देतील असा सर्वांचा संशय आहे. कारण येथून जाण्यापूर्वी सर्व सावकारांना पिळून त्यानें पैसा काढला. ... विजापुरांत **बड्या खानांत लाथाळी** चालली आहे असें समजतें.

फॅ. रे. सुरत मा. ८८ } (१६९६) { श. १५९६ कार्तीक शु. ८
पृ. २३९ इ. } कारवार-सुरत. { इ. १६७४ आक्टो. २७

शिवाजीचें सैन्य **बेळगांवपर्यंत** आल्याचें कळल्यापासून **हुबळीचे** व्यापारी पळून गेले ते आजपर्यंत परत आले नाहींत.

ओ. कॉ. मा. ३५ } (१६९७) { श. १५९६ कार्तीक शु. ९
नं. ४०२५ इ. } सुरत-मुंबई. { इ. १६७४ आक्टो. २८

शिवाजीचे सैन्यानें **गणदेवीपर्यंत** येऊन तें शहर जाळलें अशी खोटी हूल उठल्यामुळें या शहरांतील लोक पळून जाण्याच्या तयारीला लागले. परंतु शिवाजीचें सैन्य **रामनगरच्या** पलीकडे चार कोसांच्या आंत आलेंच नाहीं. किल्ल्यावर **शिबंदी व रसद पोंचविणें** एवढाच त्यांचा इरादा होता असें वाटतें. आतां लोक परत गेले असून येथें शांतता आहे.

फॅ. रे. मुंबई मा. १ } (१६९८) { श. १५९६ कार्तीक व. ३
पृ. ११३-१४(२)इ. } मुंबई कन्सल्टेशन. { इ. १६७४ नोव्हेंबर ६

**शिवाजी**कडून छोटासा नजराणा ( सामान्य कापडाचे पांच तागे ! ) व अत्यंत स्नेहाचें पत्र घेऊन त्याचा वकील आला. ४० ते ६० इं. वे. वजनाच्या ५० मोठ्या तोफा शिवाजीनें मागितल्या आहेत असा खाजगी निरोप त्यानें तोंडीं सांगितला. अशा तोफा कंपनीजवळ विक्रीकरितां शिल्लक नसल्यामुळें **किल्ल्याच्या तटावर चढविलेल्या** आहेत त्याच काढून **दिल्या पाहिजेत.** शिवाजीच्या विनंतीचा विचार केला. त्याच्याशीं पक्का तह झाला आणि त्यानें इह्लींचें मित्रत्वाचें धोरण ठेविलें हें लक्षांत घेऊन—

**शिवाजीची** विनंती पूर्णपणें अमान्य करणें कंपनीला हितकर नसल्यामुळें, त्याचे म्हणण्याला अंशतः मान देऊन, त्याला गुप्तपणें **१० मोठ्या तोफा** द्याव्या; आणि दुष्काळ लक्षांत घेतां त्यांचे मोबदला धान्याचा **भाताची** मागणी करावी. भडोचहून मुंबईला सामुग्री येण्यास बंदी झाली. पोर्तुगीजांनीहि साष्टी वगैरे आपल्या प्रांतांतून मुंबईंत भात पाठविण्यास बंदी केली. या दोन कारणांनीं भातच मागणें इष्ट आहे. परंतु शिवाजीची आणखी तोफांची मागणी येण्याचा संभव आहे. आणि विक्री केल्याचें मोंगलांना कळल्यावर सुरतकरांना त्याचा त्रास होईल.

म्हणून या बाबतींत सोय गैरसोय यांचा विचार करण्याकरितां हें प्रकरण त्यांच्याकडे सोंपवावें.

(से.) फॅ. रे. सुरत } (१६९९) { श. १५९६ कार्तीक व. ५
मा. १०७ पृ. ५१६ इ. } मुंबई-सुरत. { इ. १६७४ नोव्हेंबर ८

**शिवाजी** स्वतः मोठें सैन्य घेऊन घाटाच्या (Goth) बाजूला **बहादुरखा-**

नाच्या लष्करावर छापा घालण्यास गेला. यामुळें सुरतेला भय प्राप्त झालें हें ऐकून खेद वाटला. बहादुरखानाच्या छावणीवर तो हल्ला करणार आहे, किंवा केवळ हूल दाखवून सुरतेस किंवा अन्यत्र लूट करण्याचा त्याचा बेत आहे हें सांगतां येत नाहीं.

[यापुढें नोव्हें. ६ च्या ले. १६९८ मधील मुद्यावद्दल हकीकत कळवून सल्ला विचारला आहे.]......तोफा तटावरून काढून दिल्या पाहिजेत. त्याशिवाय आपल्याजवळील दोन मोठ्या पितळी तोफा घेण्याबद्दल त्यानें विचारलें आहे. त्या योग्य फायदा घेऊन आम्हांला विकतां येतील. परंतु हा व्यवहार गुप्त ठेवणें शक्य नाहीं. मोंगलांना कळल्यास ताप होईल. तेव्हां तुमचे मताकरितां आम्हीं दोन गोष्टी तहकूब ठेविल्या आहेत. येथें पडून राहिलेल्या जंगम मालापैकीं कांहीं तोफा व विशेषतः त्या पितळी तोफा (आपल्याला भारभूत झालेल्या) विकून थोडासा भार कमी करितां आला तर तें चांगलेंच होईल. परंतु तुमच्या वखारीला यामुळें धोका येणार असेल तर तुमचें मत कळवावें. त्याप्रमाणें आम्हीं पुढें वागूं. [ ऑर्म ११४–४ पृ. १ ]

खं. २० ले. १२८ } (१७००) { श. १५९६ कार्तीक व. ६
सु. १०७५ साबान १७ } मिसेली फा. मु. मुज. व सीं. { इ. १६७४ नोव्हें. ९

अज दिवाण पा वाई—मोकदमानी को वाई.

गिरमाजी त्रिंबक इनामदार सो का वांई यास इनाम १ चावर देखील हक पूर्वीप्रमाणें चालविणें.

फॅ. रे. सुरत भा. ३ } (१७०१) { श. १५९६ कार्तीक व. ९
पृ. ४७ ( ३ ) इ. } सुरत कन्सल्टेशन { इ. १६७४ नोव्हें. १२

मुंबईहून २ तारखेचें [ ८ ? ] पत्रांत शिवाजीच्या तोफांच्या मागणीबद्दल कळविण्यांत आलें. त्यावर आमचें मत असें आहे कीं, अशा कृत्यानें बादशहाला घुस्सा येईल. फ्रेंचांनीं नुकताच त्याला दारुगोळा पुरविल्याबद्दल दरबाराकडे तक्रारी गेल्या आहेत. शिवाजीला बेटावरून अगसामुग्री मिळते याचाच त्यांना संताप येतो. मग त्याला युद्धसामुग्री पुरविली तर त्यांना वैषम्य वाटणारच. बरें, मुंबईच्या रक्षणाच्या दृष्टीनें मोठ्या तोफा फक्त १३च आहेत त्या व पितळी तोफाहि तेथें आवश्यकच आहेत.

फॅ. रे. सुरत भा. ८८ } (१७०२) { श. १५९६ कार्तीक व. ११
पृ. २४४ इ. } सुरत–मुंबई { इ. १६७४ नोव्हें. १३

शिवाजीपासून भीती नसल्यामुळें अधिक शिपाई लागणार नाहींत. [ ले. १७०१ प्रमाणेंच तोफा विकण्याविरुद्ध असलेलीं कारणें पत्ररूपानें पुढें लिहिलीं आहेत ]—...... शिवाजीला आपण धान्य वगैरे पुरवितों अशी बहादुरखानानें व इतर अधिकाऱ्यांनीं

-सत्कार केली आहे.......पितळी तोफांचा समुद्रावर चांगला मारा होतो. त्यांना खर्च -मोठा लागत असला तथापि **शिवाजी** किंवा दुसरा कोणी त्यांचा मालक होणें आम्हांला लाज आणणारें आहे.

ऑर्म मा. ११४-३ } (१७०३) { श. १५९६ कार्तीक व. १२
पृ. २१९ इ. } मुंबई—मद्रास { इ. १६७४ नोव्हेंबर १४

सुरतेच्या सुभेदाराच्या वर्तनानें डच व फ्रेंच चिडून सुरत सोडून जाण्याच्या विचारांत आहेत......पण एकंदरींत **ह्या सुभेदारानें सुरतेचा नावाजलेला व्यापार पार रसातळाला नेला.** कांहीं उपाय तावडतोब न केल्यास थोड्याच वर्षांत सुरतेचें नांव आणि प्रख्याती पुनः ऐकूं देखील यावयाचीं नाहींत.

खं. २० ले. १४० व १४१ } (१७०४) { श. १५९६ मार्ग. शु. २
सु. १०७५ सावान ३० } मु. सी. { इ. १६७४ नोव्हेंबर १९

आज दिवाण पा वाई.

मोकदमानी देहाय पा बोरखल व सां निंब व किण्ही सा कोरेगांव.

निरसीभट बिन रंगभट व एकनाथभट बिन रामेश्वर चित्राऊ वाई. यांस धर्मादाव इनाम सालिना होन १० मौ माहागाऊ, शियवर वगैरे गांवीं आहे व चावर १॥ दुदेह आहे तरी पूर्वीप्रमाणें चालविणें.

खं. २० ले. १३१ } (१७०५) { श. १५९६ मार्ग शु. २
सु. १०७५ सावान ३० } मिसिली फा. मु. व सी. { इ. १६७४ नोव्हें. १९

अजदिवाण प. वाई

मोकदमानी दुदेह-मो॥ खेड व तडवले बु॥ सा॥ कोरेगांव

आपदेभट विष्णुभट चित्राऊ जुनारदार वाई, यास वरील दोन खेड्यांत जमीन हकासह इनाम आहे. ती चालविणें.

(से) फॅ. रे. सुरत मा. १०७ } (१७०६) { श. १५९६ मार्ग. शु. ६
पृ. ११ इ. } मुंबई-सुरत { इ. १६७४ नोव्हें. २३

शिवाजी आम्हांनें मागणी करितो त्या तोफांबद्दलचें तुमचें मत कळलें. परंतु त्या विषयावर पुनः या कौन्सिलांत **वाद व विचार** झाल्याशिवाय आमचें मत कांहींच लिहितां येत नाहीं.

खं. २० ले. १४२ } (१७०७) { श. १५९६ मार्ग. शु. १०
सु. १०७५ रम २३ } मिसेली फा. मु. मज. सी. { इ. १६७४ नोव्हें. २७

अजदिवाण पा। वाई

मोकदमानी मौ. पसणीं व बोझर्डे सा। इवेली वाई व मौ एकसर सा। मुन्हे

नारायणभट बिन गोपिनाथभट चित्राऊ जुनारदार यास इनाम जमीन अनुक्रमें -॥-, -॥-, व ।= आहे ती चालविणें.

फॅ. रे. सुरत मा. ८८ } (१७०८) { श. १५९६ मार्ग. शु. १२
पृ. २५३ इ. } राजापूर-सुरत { इ. १६७४ नोव्हें. ३०

अण्णाजी थोडया दिवसापूर्वी येथें आला होता. परंतु अगदीं अल्पकाळ राहून पुनः १२ कोसांवरील किलनार [ खेळणा ] गांवीं गेला. लवकरच परत येईल. तो येथें होता तेव्हांच इमारतीचा प्रश्न काढला. तर **१० हजार होनांतच इमारतीचा समावेश झाला असें** *तो म्हणाला. दुसरी इमारत बांधावयास सोईची जागाहि देत नाहीं.* इकडील जागीं पाणी उथळ असल्यानें होडया जवळ येत नाहींत व इमाली फार वाढते. येथें दरमाणसीं मजुरीहि फार पडते. आम्हीं आतां किनाऱ्यावर लहानसें घर बांधलें आहे.

डच रेकॉर्ड्स मा. ३१ } (१७०९) { श. १५९६ मार्ग व. २
नं. ८२४ इ. डिसें. १५ न्यू. } कोचीन-डच कंपनी { इ. १६७४ डिसें. ५

कानऱ्यांतून १ एप्रीलचें ( न्यू एप्रील ११ ) पत्र आलें त्यांत दरोडेखोर **शिवाजीचा नवाच उपक्रम** वर्णिला आहे. त्यानें आदिलशाही मुलखाच्या हद्दीवर बंकापूर नजीक **हॉसपेठ** नांवाच्या बाजारांतून दोन लाख होनांची लूट नेली. परंतु एक विजापुरी सेनापती २००० घोड्यांसह त्याच्यावर तुटून पडला. त्यांत त्याचे २ हत्ती शिवाजीच्या हातीं लागल्यामुळें चिडून जाऊन, कुमक आल्यावर, त्यानें पुनः **शिवाजीवर** हल्ला करून त्याला लांबवर पळवून लाविलें शिवाजीचे १००० घोडे शत्रूच्या हातीं लागले. [ पहा मार्ग ले. १६२५ ता. एप्री. ४ ]

फॅ. रे. सुरत मा. १०७ } (१७१०) { श. १५९६ मार्ग. व. ८
पृ. ३० इ. } धनगांव-सुरत { इ. १६७४ डिसें. १०

या भागाच्या सरहद्दीवर **शिवाजी** आहे असा बातम्या अजूनहि येतात. त्याला विरोध करणाऱ्या एका राजाचे त्यानें ३१४ शें लोक कापून काढले व बाकीचे आश्रयार्थ **औरंगाबादेस** पळाले.

(दि) ओ. कॉ. } (१७११) { श. १५९६ मार्ग. व. १४
नं. ४०५१ इ. } मुंबई-ई० इं० कंपनी { इ. १६७४ डिसें. १६

**गोव्याच्या व्हाईसरायाशीं** तहाचे बाबतींतील तुमचा सल्ला तंतोतंत पाळूं.

फारंजा व ठाणा या मार्गांपैकीं कारंजाचा मार्ग आज आम्हांला कांहींसा मोकळा आहे. तथापि उभय मार्गांवरहि कंपनीचा हक्क आहे असें आम्हांला वाटतें. पोर्तु०नीं चिडून जाऊन डचांना मदत करूं नये म्हणून डचांशीं युद्ध चालू असतांना ठाण्याचा मार्ग आम्हीं मुद्दाम टाळला. शिवाय, मोंगल व शिवाजी यांचें युद्ध चालू असेतोंपर्यंत त्या मार्गा-वरील **कल्याण-भिवंडी** इत्यादि किनाऱ्यावरील बंदरें उभय युध्यमानांच्या सैन्यांनीं व्यापिलेलीं असल्यामुळें त्या मार्गाचा या वेटाला उपयोगच होण्यासारखा नाहीं. [ ऑर्म भा. ११४ वि. ४ पृ. ६ ].

सं. पृ. १६४ } (१७१२) { श. १५९६ मार्ग-पौष.
स. सा. पत्रें ले. ५२ वरून } { इ. १६७४ नोव्हें-डिसें.

**श्री समर्थ रामदास** स्वामी-रघुनाथ भट गोसावीः—हेळवाकीहून चाफळास पावलो. संकल्पाची समारादना जाली. शरीराचा उपचारहि हळुहळू होतो. आपणे ते कर्कश सीतळाईमध्यें बहुतची श्रम पावलो. वगैरे मजकूर.

(से) फॅ. रे. सुरत } (१७१३) { श. १५९६ पौष शु. ६
भा. १०७ पृ. ४३ इ. } मुंबई-सुरत { इ. १६७४ डिसें. २३

**मुंबईचा पैसा शिवाजीच्या मुलखांत चालतो**. विलायतेंतून १५०० तांब्याच्या पेट्या आल्या आहेत. त्या येथें **टांकसाळीकरितां** आम्ही उतरून घेतों. कारण आमचा पैसा **शिवाजीच्याच** मुलखांत चालतो असें नसून पोर्तु० मुलखांतहि चालतो.

(से) फॅ. रे. सुरत } (१७१४) { श. १५९६ पौष शु. १३
भा. १०७ पृ. ४७ इ. } मुंबई-सुरत { इ. १६७४ डिसें. ३०

**राजापुरच्या वखारीचें पुनरुद्धाटन** करण्याकरितां मि. चाइल्ड यास पाठवावें. कारण चाइल्ड जाऊन पोंचेपर्यंत तहाचीं कलमें पुरीं होणार नाहींत.

ओ. कॉ. भा. ३५ } (१७१५) { श. १५९६ पौष व. ३
नं. ४०५६ इ. } रिचर्ड ॲडॅम्सला सूचना { इ. १६७५ जाने. ४

मागें ता. १ मे १६७३ रोजीं टॉमस निकल्सला सांगितलेलें काम व दिलेल्या सूचना या ले. त रिचर्ड ॲडॅम्सला दिल्या आहेत. या वेळचा मार्ग मुंबई-कल्याण-जुन्नर असा आहे. **कल्याण-भिवंडी** शिवाजीच्या मुलखांत आहे. तेथून ३ दिवसांच्या अंतरावर **जुन्नर** आहे. [ पहा ले. १५२८ ]

ओ. कॉ. भा. ३५ } (१७१६) { श. १५९६ पौष व. ८
नं. ४०६२ इ. } सुरत ( स्वाली )—कंपनी. { इ. १६७५ जाने. ९

१२ आक्टोबरपासून पुष्कळ दिवसपर्यंत **शिवाजीचें** भय वाटत होतें. परंतु

रामनगरच्या अरण्यातील भिल्लांनीं त्याला अडविल्यामुळें त्याचें सैन्य औरंगाबादेकडे वळलें व तेथें आसपास त्यानें लूट केली. तिकडे मोंगलांचा सेनापती कुतुबखान यासीं त्यांची गांठ पडली. कुतुबखानाचा त्यांनीं पार धुव्वा उडवून ३०० च्या वर शिपाई कापून काढले. आदिलशाही मुलखांत त्याच्या स्वाऱ्या चालूच असल्यामुळें कारवार व हुबळी या शहरांना फार उपद्रव झाला.

डाग राजि. १६७५ इ. } (१७१७) { श. १५९६ पौष व. १४
पृ. २८ जाने. २४ न्यू. } { इ. १६७५ जाने. १४

वेंगुर्ल्याहून पाठविलेल्या पत्रांत, कानडांतील लोकांविरुद्ध पोर्तुगीजांचे पूर्ववत् चालू असलेले हल्ले; प्रसिद्ध चोर (वंडखोर) शिवाजी याचा थाटाचा आणि दरबारी राज्याभिषेक; व त्याला विजापूरकरांनीं कांहीं अडथळा न करतां तसें करूं देणें; इत्यादि बातम्या आहेत.

खं. ८ ले. ३१ } (१७१८) { श. १५९६ माघ शु. ३
सु. १०७५ जिल्काद २ } श्रीशंकर प्रसन्न { इ. १६७५ जानेवारी १८

म. इ. रा. शिवाजी विनायक सुभेदार व कारकून सुभे मामले प्रभावळी प्रती राजश्री शिवाजी राजे दंडवत. दौलतखान व दरियासारंग यांसी ऐवज व गल्ला राजश्री मोरोपंत पेशवे यांणीं वराता सुभे मजकुरावरीं दिधल्या. त्यांस तुम्हीं कांहीं पावलें नाहीं, म्हणोन कळों आलें. त्यावरून अजब वाटलें कीं, ऐसे नादान थोडे असतील. तुम्हांस समजलें असेल कीं, याला ऐवज कोठें तरी ऐवज खजाना रसद पाठविलीया मजरा होईल म्हणत असाल. तरी पद्मदुर्ग वसवून राजपुरीच्या उरावरी दुसरी राजपुरी केली आहे. त्याची मदत व्हावी, पाणी, फाटी आदिकरून सामान पावावें, या कामास आरमार बेगीनें पावावें, तें नाहीं. पद्मदुर्गे हबशी फौजा चौफेर जेर करीत असतील. आणि तुम्हीं ऐवज न पावबून, आरमार खोळंबून पाडाल! एवढी हरामखोरी तुम्ही कराल. आणि रसद पाठवून मजरा करूं म्हणाल, त्यावरी साहेब रिझतील कीं काय? हे गोष्ट घडायाची तऱ्ही होय; न कळे कीं, हबशियांनीं कांहीं देऊन आपले चाकर तुम्हांला केले असतील! त्याकरितां ऐसी बुद्धी केली असेल! तरी ऐशा चाकरांस ठीकेठीक केले पाहिजेत! ब्राह्मण म्हणून कोण मुलाहिजा करूं पाहतो! याउपरि तऱ्हीं त्यांला ऐवज व गल्ला राजश्री मोरोपंतीं देविला असे तो देतील. तो राजाना रसद पावलियाहून अधिक जाणून तेणेंप्रमाणें आदा करणें. कीं ते तुमची फिर्याद न करीत व त्यांचे पोटास पावोन आरमार घेऊन पद्मदुर्गाचे मदतीस राहात तें करणें. याउपरि बोभाट आलियाउपरि तुमचा मुलाहिजा करणार नाहीं. गनिमाचे चाकर, गनीम जालेस, ऐसे जाणून बरा नतीजा तुम्हांस पावेल. ताकीद असे. रवाना.

फॅ. रे. सुरत मा. ८८ } (१७१९) { श. १५९६ माघ शु. १
पृ. १३ इ. } सुरत-मुंबई { इ. १६७५ जाने. २०

१ जानेवारीला **शिवाजीनें डुमगांव** [नंदाबादजवळ, ऑर्म ११४-४ पृ. ७४ बऱ्हाणपूरचे जवळ, सदर पृ. १३५ ] ची वखार लुटली. शिवाजीशीं तह झाल्याबद्दल सेनापतीला जवळच्या माणसांनीं सुचवूनहि कांहीं उपयोग झाला नाहीं ! ...आपले लोक व दलाल यांनीं जेथें जेथें खरेदीकरितां रकमा लावल्या असतील त्या सर्व ठिकाणांकरितां **शिवाजीचे** कौल घेणें फारच जरूर आहे.

ऑर्म ११४ वि. ४ पृ. १०४ ता. मार्च २४, मुंबई-इंग्लंडः-मोगली सेनापतींनीं दुर्लक्ष केल्यामुळें शिवाजीच्या सैन्यानें थेट **बऱ्हाणपूरच्या** तटापर्यंत जाऊन सर्व मुलूख लुटला. याच वेळीं त्यानें आपल्या **डुमगांवच्या** वखारीवर हल्ला केला.

सं. २ पृ. ७३ ले. ५ } (१७२०) { श. १५९६ माघ शु. ६
सु. १०७५ जिल्काद ५ } { इ. १६७५ जाने. २२

**मोरेश्वर पंडितराऊ**—जिवाजी विनायक सुभे॰ व फार॰

*श्रीधर विश्वनाथ जोशी का पावस यांस मले ब्राह्मण म्हणून दहा मण तांदूळ व सवत्स चार गाईंची वण माफी दिली आहे.*

फॅ. रे. मुंबई. मा. ७ } (१७२१) { श. १५९६ माघ शु. १०
पृ. ६६-६७ इ. } मुंबई-चाईल्ड. { इ. १६७५ जाने. २६

(तुम्ही राजापुरास जातांना) **शिवाजीच्या तहाची** अमलबजावणी करून घेण्याकरितां मूळ कळमांची प्रत तुमच्याजवळ दिली आहे. पहिला हप्ता यापूर्वीच यावयास पाहिजे होता. **राजापुरास** गेल्याबरोबर त्याची व्यवस्था करावी. तेथील जुनी वखार तुम्हांस मिळावी अशाबद्दल हुकूम मिळविण्याचा प्रयत्न केला. परंतु **राजा इकडच्या बाजूस नसणें** वगैरे अडचणींमुळें तें राहिलें. तुम्हींहि प्रयत्न करावा. परंतु तोंपर्यंत दुसरें दगडी किंवा विटांचें घर मिळवावें.

डच रेकॉर्डस मा. ३१ } (१७२२) { श. १५९६ माघ शु. १५
नं. ८३६६. फेब्रु.-१० न्यू } ग. बटेव्हिया-डच ई॰ इं. कं. { इ. १६७५ जाने. ३१

शिवाजी **रायगडला** होता अशी तोंडी बातमी आहे. शिवाजीचे **वेंगुर्ल्याचे** अधिकारी आमच्याशीं मित्रत्वानें वागतात. आम्हीं तेथें पुनः वखार घालावी अशी त्यांची इच्छा असली तथापि आम्हांला त्याबद्दल अनुकूल सल्ला देतां येत नाहीं. गोव्यापासून ८ मैलांवर, शिवाजीच्या हद्दीच्या बाहेर, **कॉंडेयार** [१] हें ठिकाण आज आमच्या मंडळीला बरें वाटतें.

ओ. कॉ. भा. ३४ } (१७२३) { श. १५९६ माघ व. ६
नं. ३९०६ इ. } मुंबई हकीकत { इ. १६७५ फेब्रु. ५

मोंगलांचा **वडा सेनापती दिलेरखान** याचा शिवाजीनें मोड करून त्याचे १००० पठाण मारिले. शिवाजीचे फक्त पांच सहार्से मेले. आदिलशाही सैन्याबरोबरचें त्याचें युद्ध उमरावांच्या मुत्सद्देगिरीच्या धोरणानें रेंगाळत आहे.

फॅ. रे. सुरत भा. ८८ } (१७२४) { श. १५९६ माघ व.७
पृ. १५-२० इ. } राजापूर-मुंबई { इ. १६७५ फेब्रु. ६

४८ तासांच्या समुद्र-प्रवासानंतर २० तारखेला चाइल्ड राजापुरास पोंचला. **अण्णाजी** पंडीत व सुभेदार यांचीं पत्रें घेऊन गेलेला दलाल ३१ ला परत आला. किनाऱ्याला उतरून पहावें व घर देतील तें पसंत नसल्यास ३ महिन्यांत दुसरें बांधून मिळेल असें अण्णाजीनें कळविलें. चॉईनें जुन्या वखारीबद्दलच आग्रह धरला होता; तेव्हां 'तें मिळणार नाहीं. आणि तुम्हीं निघून गेलां तरी आम्हांला पर्वा नाहीं' असें अण्णाजी रागानें बोलला. **अण्णाजी** हा त्या सर्व **भागाचा सरसुभेदार** असून शिवाजीवर त्याचें वजन असल्यानें त्याची मर्जी राखणें जरूर असल्यामुळें आम्हीं किनाऱ्यावर जाण्याचें ठरविलें. शिवाजी १५।२० दिवसांत ह्या बाजूला येणार आहे असेंहि कळलें.

रेव्हिंगटननें बांधलेली वखार भोंवतालीं जागा न मिळाल्यामुळें अगदीं लहान बांधली होती. परंतु तिच्या शेजारचें एक घर १०० लारी भाड्यानें त्यावेळीं घेतलें होतें. आतां त्या घरांत सुभेदार रहातो व मूळ वखारींत न्याय कचेरी व दप्तरखाना ठेविला आहे. कचेरीची जागा आम्हीं पाहिजेच म्हटलें तर अण्णाजी देत आहे. परंतु ती अपुरी पडेल. तेथें आम्ही रहावयास गेलों तर सभोंवतीं उच्च हिंदू लोकांचीं घरें व मुसलमानांची मशीद आहे त्यांचा उठावा होऊन त्यांचीं मनें बिघडतील. तेव्हां अण्णाजीच्या म्हणण्याप्रमाणें दुसरी सोईस्कर जागा घेऊन नवेंच घर बांधावें हें बरें दिसतें. जुन्या घराची किंमत अर्थात् मिळाली तर घेऊंच.

२ तारखेला **राजापुरास उतरलों**. सुभेदार **जिवाजी पंडित**, आरमारी सेनापती **दौलतखान**, इतर अमलदार, सैन्यांतील लोक यांनीं स्वागत केलें. अण्णाजीनें कबूल केल्याप्रमाणें स्वागत न केल्यामुळें आम्हीं त्या दिवशीं त्याची भेट घेतली नाहीं. तीन तारखेला अण्णाजी राजापुराहून लोकर जाणार असें कळलें. म्हणून कागद-पत्रें नीट पाहून काल संध्याकाळीं त्याच्याकडे जाऊन पांच तास बोलणें केलें. वखारीच्या कलमांतील भाषा असंदिग्ध होती. परंतु त्यानंतर नारायण शेणव्यांशीं तोंडीं करार होऊन वखारीची किंमतहि १०००० त धरली असें अण्णाजी म्हणूं लागला. नारायण शेणव्याला असा स्वतंत्र करार करण्याला अधिकार नव्हता असें आम्हीं सांगितलें. परंतु 'तें कांहीं नाहीं; ह्या ४ जागा दाखवितों; ह्यांतून कोणती ती निवडा' असें अण्णाजी म्हणूं लागल्यामुळें

आम्हीं एक निवडली. तेथें २ महिन्यांत तो वखार बांधून देईल. वखारीचा बांधण्याचा खर्च कोणीं करावा हा प्रश्न वाध्यांतच पडला. परंतु 'पसत केलेल्या जागावर २ महिन्यांत वखार बांधून त्याचा खर्च जकातींतून वजा करावा' असें लिहून देण्याचें अण्णाजीनें कबूल केलें. त्याची प्रत सोबत आहे. पुढें २५०० होन मिळण्याचा प्रश्न आला. त्यावर त्यानें शिवाजीचा हुकूम मागितला तो दाखविला. त्यांच्याजवळ माल भरपूर आहे. परंतु ५००० चा माल घेऊन २५०० होन द्यावयास पाहिजेत तेहि आमच्याजवळ नाहींत.

शिवाजीचें ३००० घोडदळ **दत्ताजी पंडीताबरोबर** कोल्हापूरला गेलें. तेथील लोकांनीं १५०० होन देऊन त्याला लावून दिलें. **सोनगांवला** ५०० होन घेऊन तें तसेंच पुढें मटकलें. **अण्णाजी** पंडीत **फोंडा** किल्ला घेण्याकरितां आज रात्रीं किंवा उद्यां निघणार आहे.

[सं] मध्यें पुढील मजकूर आहे. अगदीं पालखींत बसेपर्यंत टोलवाटोलवी करून शेवटीं अण्णाजीनें कारकुनाकडून देवविलेला कागद पाहिला म्हणजे या लोकांना तहाची किंवा आपल्या शब्दाची किंमत नाहीं असें दिसतें.

| | | |
|---|---|---|
| ओ. कॉ. मा. ३५<br>न. ४०७७ इ. | (१७२५)<br>सुरत–कंपनी | श. १५९६ माघ व. १४<br>इ. १६७५ फेब्रुवारी १३ |

**शिवाजीनें** कांहीं किल्ले द्यावे; मुलाला ५।६ हजारांची मनसब घेऊन बादशाही नोकरींत पाठवावें आणि **शिवाजीला** औरंगाबादेपासून भीमेपर्यंतचा सर्व मुलूख मिळावा अशा अटींवर मोगल व शिवाजी यांचा तह व्हावयाचा होता. परंतु पक्का विश्वास नसल्यामुळें **शिवाजी** आपल्या मुलाला मोगली सेनापतीकडे पाठवीत नाहीं. हा तह होईल तर बरें.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. सुरत मा. ८८<br>पृ. २१–२२ इ. | (१७२६)<br>राजापूर–मुंबई. | श. १५९६ फा शु. ३<br>इ. १६७५ फेब्रु. १७ |

**सुभेदार** गोड वचनें देऊन आम्हीं वखार बांधावी म्हणून पाठीस लागला आहे. मात्र **शिवाजी** त्याचा खर्च देईल अशी खात्री वाटत नाहीं....**अण्णाजीनें** आम्हांला दिलेलें घर सुभेदाराच्या सांगण्यावरून कोणीं एकानें फोडलें. त्याबद्दल भांडण झालें. अंगाशीं लावतांच, गुन्हा नाकारून त्यानें घरफोड्या गुन्हेगाराला कैद केलें. 'रिव्हेंज' गलबत बंदरांत आलें त्याची दहशत घालण्यास बरा उपयोग झाला.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. मुंबई मा. २<br>पृ. ३३–३४ | (१७२७)<br>मुंबई कन्सल्टेशन. | श. १५९६ फा शु. ५<br>इ. १६७५ फेब्रु. १९ |

सुरतेहून डुमगांवची हकीकत कळली. **शिवाजीकडे** कळवून भरपाई मागावी

व यापुढें मोंगलांच्या मुलखांतील वखारींना **शिवाजीच्या** सैन्यानें त्रास देऊं नये म्हणून त्याचा कौल मागावा.

फॅ. रे. मुंबई भा. २ } (१७२८) { श. १५९६ फा शु. ७
पृ. ३४ इ. } मुंबई कन्सल्टेशन. { इ. १६७५ फेब्रु. २२

१० हजार होनांची चौथाई मरण्याबद्दल, व इंग्रजांना राजापुरास सोईस्कर घर देण्याबद्दल सुभेदाराच्या नांवचे आणि तत्रस्थ इंग्रजांना चांगल्या तऱ्हेनें वागविण्याबद्दल सुभेदार **अण्णाजी** याच्या नांवचे **शिवाजीचे** हुकूम, प्रेसि॰ कडे आले. ते पुढील व्यवस्थेकरितां राजापुरास पाठवावे.

(से.) फॅ. रे. सुरत } (१७२९) { श. १५९६ फा शु. १२
भा. १०७ पृ. ६८ इ. } मुंबई–सुरत. { इ. १६७५ फेब्रु. २७

**औरंग॰** व **शिवाजी** यांच्या तहाच्या बातमींत तथ्य दिसत नाहीं. कारण, नुकतेंच मोंगलांचें सैन्य **कल्याण–भिवंडीवर** येऊन जाळपोळ करून परत गेलें व शिवाजीचें सैन्य फिरून कल्याणला आलें. मोंगलांच्या मुलखावर स्वारी करण्याकरितां त्यानें मोठें सैन्य तयार केलें आहेच. **सुरतेचा** सुभेदार व शिवाजी यांचें बरें आहे, अशी आमची खात्री नसती तर सुरतेबद्दल आम्हांला काळजी वाटली असती. कारण, इतर नामांकित शहरें आधींच लुटून झालीं असल्यामुळें, सैन्याचा खर्च भागविण्यासाठीं मोंगलांच्या मुलखांतील लुटण्यासारखें असें सुरत हेंच शहर शिवाजीला आतां राहिलें आहे !

[पृ. ६९ ] **शिवाजी दंडाराजपुरीच्या** वेढ्याचें काम झटून करीत असून पावसापूर्वी तो किल्ला त्याच्या हस्तगत होईल असें वाटतें.

लेटर बुक भा. ५ } (१७३०) { श. १५९६ फा व. ४
पृ. १६७ इ. } कंपनी–सुरत. { इ. १६७५ मार्च ५

**शिवाजीशीं** तह केला हें बरें झालें. परंतु एकाशी तह करतांना इतर कोणाशीं बिघाड होतां कामा नये याकरितां जपावें. आमचे ग्रेनेड बाँब गोळे मिळाल्याचें शिवाजी साफ नाकारतो. तेव्हां त्याचें खरोखर काय झालें याचा तपास करावा.

(से) फॅ. रे. सुरत भा. ८८–२ } (१७३१) { श. १५९६ फा व. ८
पृ. ३० } सुरत–मुंबई. { इ. १६७५ मार्च ९

**सिद्दीला** मदत करण्यासाठीं येथून दोन मोठीं गलबतें सज्ज होत आहेत. समुद्रावर पोर्तु॰ च्या शत्रुत्वामुळें त्रास होतो.

(से.) फॅ. रे. सुरत मा. १०७ } (१७३२) { श. १५९६ फा. व. १२
पृ. ७५ इ. } मुंबई–सुरत { इ. १६७५ मार्च १३

डुमगांवचे प्रसंगाबद्दल बोलणें करण्याकरितां शिवाजीकडे मि. ऑस्टिन यानें स्वतः जावें असें ठरविलें. तो येथून दोन दिवसांनीं रायरीला जाईल. [मुंबई कन्सल्टेशन, ता. १० मार्च, फॅ. रे. मुंबई मा. २ पृ. ४४–४५]

खं. १८ ले. ५७ पृ. ८४ } (१७३३) { श. १५९६ फा. व. १२
सु. १०७५ जिल्हेज २५ } { इ. १६७४ मार्च १३

मोरो त्रिमळ व नारो नीळकंठ

बाजी धोलप, गोंरोजी गायकवाड इमारती पुरंधर हवालदार व कारकून किले पुरंधर.

*गोपाळसेट बिन नामसेट सेटिया व जावसेटी महाजन यांत पुरंदर पेठच्या सेटेपणाबद्दल झंटा होता.* शिवाजी पुरंदरी आले तेव्हां जावसेटी यानें आपलें सेटेपण म्हणून सांगितलें. पुढें गोत मेळवून सेटेपण गोपाळ सेटयाचें खरें ठरलें.

खं. १८ ले. ५७ पृ. ८० } (१७३४) { श. १५९६ फा. व. १२
सु. १०७५ जिल्हेज २५ } उल्लेख– { इ. १६७५ मार्च १३

मोरो त्रिमळ व नारो नीळकंठ—गोपाळ सेट सेटया

तुझा सेटेपणाचा निवाडा होऊन सेटेपण तुझें असे. याबद्दल भेट संभाजी राजे यास होन ५ व सरकार शेरणी होन १५० तुज खड केला.

खं. ८ ले ३९ } (१७३५) { श.
? } { इ.

राज्याभिषेकानंतरची पान विडे देण्याची पद्धत

सा. ले. ५५ } (१७३६) { श. १५९६
सु. १०७५ } { इ. १६७४–७५

जाबिता सिस्त मिरासी पटी, परगणे शिरवल मधील

खं. ८ ले. २९ } (१७३७) { श. १५९६
} शिवाजी व इंग्रज तह { इ. १६७४

१ इराणचा पातशाहा व हिंदुस्थानांतील मोगल पातशहा यांचा व इंग्रेजांचा तह झाला. *त्यांचे देशांत इंग्रजाचा व्यापार चालत आहे.* २ *व्यापारी माल येईल त्याजवरी* जकात घेऊं नये. महाराजांचे राज्यांत व्यापार चालावया अडथळा होऊं नये. ३ इंग्रजाचे *शिक्याचे रुपये व मोहरा व पैसे महाराजाचे राज्यांत चालावे.* ४ महाराजाचे मुलकात दर्यांचे काठीं इंग्रजाची जहाजें मोडून फुटून किनारियास लागली तर त्यांतील माल *आमचा आम्हास द्यावा. एकूण चार कलमांपैकीं महाराजांनीं ठराव केला तीं कलमें.*

१ महाराजांचे राज्यांत तुम्ही व्यापार करावा. २ माल येईल जाईल त्याची जकात माफ असे. ३ बाकीची कलमें गैरमजुरा होत.

ऑर्म मा. ११४ वि. ४ } (१७३८) { श. १५९७ चैत्र शु. ८
पृ. १०४ इ. } मुंबई-इंग्लंड { इ. १६७५ मार्च २४

शिवाजी ऑस्टिनच्या मागणीप्रमाणें बहुधा सर्व वखारींकरितां कौल देईल. परंतु या शत्रुमित्र न पहाणाऱ्या लुटारूंच्या सैन्यावर विश्वास ठेवण्यांत अर्थ नाहीं. शिवाजी आपल्या स्वतःच्या मुलखांत मात्र आपल्याला नांव ठेवण्यास जागा नाहीं अशा तऱ्हेनें ( as we can reasonably desire ) व्यापाराला यथोचित **उत्तेजन देतो**. परंतु मोंगलांचा व त्याचा तह मोडल्यामुळें त्यांच्या मुलखांतील व्यापाराच्या बाबतींत आमच्या इच्छेप्रमाणें सुधारणा होत नाहींत. कालांतरानें कांहीं करतां येईल असें वाटतें.

ओ. कॉ. मा. ३५ } (१७३९) { श. १५९७ चैत्र शु. ९
नं. ४०७७ इ. } सुरत-कंपनी. { इ. १६७५ मार्च २५

मोंगलांशीं शिवाजीचा तह होण्याबद्दलची बातमी शिवाजीनें लबाडीनें उठविली होती. इकडे **बहादुरखानाशीं** तहाचें बोलणें लावून त्यानें आपल्या किल्ल्यांत धान्यसामग्री भरली, आणि विजापुरकरांकडून युद्ध चालविण्याकरितां पैसा मिळविला. तो तसें न करता तर विजापुरकरांनीं मोंगलांशीं तह करून शिवाजीवर स्वारी करण्याची धमकी दिली होती असें म्हणतात [?].

फॅ. रे. सुरत मा. ८८ } (१७४०) { श. १५९७ चैत्र व. २
पृ. ३४ इ. } राजापूर-मुंबई. { इ. १६७५ एप्रील १

**राजा** येथें येऊन गेला. सहानुभूतीनें बोलला. आतां तो फोंड्याजवळील त्याच्याच ताब्यांतील **कुडाळला** गेला आहे. येथून जाण्यापूर्वी ४० लहान गलबतें त्यानें **वेंगुर्ल्याकडे** रवाना केलीं. त्याचेबरोबर १५००० घोडदळ १४००० पदाती व १०००० मजूर आहेत. फोंडा, गोवा, सुरूपनायकाचा ( surup [ N ?] agues ) देश, किंवा विजापूर असे त्याच्या उद्दिष्टाबद्दल नानाविध तर्क आहेत. त्यानें **कोलापूर** घेतलें. **रायबागहि** इतक्यांत घेईल. शिवाजी राजापुरास असतांना त्याला आम्हीं नजराणा दिला. व घराबद्दल वगैरे आमच्या सर्व मागण्या त्यानें मान्य केल्या.

फॅ. रे. सुरत मा. ८८ } (१७४१) { श. १५९७ चैत्र व. ३०
पृ. ३७ इ. } कारवार-मुंबई. { इ. १६७५ एप्रील १४

**शिवाजीचें** २००० घोडदळ व ७००० पायदळ इतकें सैन्य गेले सहा दिवस

**फोंड्याला वेढा** घालून बसलें आहे. पावसांत देखील वेढा चालू ठेवून फोंड घेण्याचा शिवाजीचा निश्चय झाला आहे. **महमदखानाजवळ** ४ महिन्यांपेक्षां रसदेचा अधिक पुरवठा नाहीं. विजापुराहूनहि कांहीं कुमकेची आशा नाहीं. **पोर्तु० नीं** शिवाजीला प्रथम थोडी चुणूक दाखविली. परंतु आतां ते स्वस्थ असून महमदखानाला मदत करितील असें वाटत नाहीं.

**कानड्यांतील** यादवी चालू आहे. फोंडा घेऊन शिवाजी तिकडे गेल्याशिवाय ती बंद पडणार नाहीं.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. सुरत मा. ८८<br>पृ. ४१–४९ इ. | (१७४२)<br>राजापूर–मुंबई | श. १५९७ वैशाख शु. ५<br>इ. १६७५ एप्रील २० |

आमच्याकरितां बांधावयाचें घर बिनखर्चानें व आम्हीं बांधूं शकूं त्यापेक्षां त्वरित बांधून मिळण्याची आम्हांला आशा आहे. आम्हांला ५००० होनांचा माल अण्णाजी पंडित देणार तो नारळ व सुपारी हा असून त्याचे दर, नारळाला ५ लारी खंडी व सुपारी १०० लारी खंडी, म्हणजे फारच महाग लाविले आहेत. वास्तविक दर अनुक्रमें २½ लारी व ८० लारी असे आहेत ! यांत कंपनीला काय मिळणार ?

**अण्णाजीनें** आम्हांस फसविण्यास सुरवात केली आहे. परंतु लोकांत आम्हांला चांगला मान आहे.

सुभेदारानें आम्हांला वखार बांधण्याबद्दलचा लकडा लाविला. आम्हींहि **अण्णाजीवर** अविश्वास न दाखवितां 'होय' म्हणत राहिलों. कारण शिवाजी थोडक्याच दिवसांत भेटण्याची आम्हांला आशा होती. मार्च २० ला शिवाजी दुसऱ्या दिवशीं ४ कोसांवर वेलवड्याला (Vellvorah) येणार असें कळलें. पुढें २२ तारखेला दोनप्रहरीं त्याची आमची गांठ रस्त्यांत पडली व सायंकाळीं आम्हांला बोलावण्याचें त्यानें कबूल केलें. त्यानंतर **अण्णाजीला** व प्रल्हाद निराजीलाहि आम्ही भेटलों. पुढें मार्च २४ ला **शिवाजीचा** मुक्काम राजापूरला आला व २५ तारखेला त्याची भेट झाली. त्या वेळीं आम्हीं त्याला २०० होनांचा नजराणा दिला व आमच्या मागण्या त्याला वाचून दाखविल्यावर त्यांबद्दल फर्मान देण्याचें त्यानें कबूल केलें. पुढें राजा सायंकाळीं निघून गेला. मोहनदासाला फर्मान आणण्याकरितां त्याच्याबरोबर पाठविलें आहे. परंतु पुढें राजाच्या मुक्कामापासून उत्तरेकडचें दळणवळण राजानें बंद केल्यामुळें हीं पत्रें त्वरेनें पाठविलीं आहेत. फर्मान येतांच नक्कल पाठवूं. घराचा पाया खोदून दगड व चुना आणिला आहे. राजानें बांधणीचें काम त्वरेनें करण्याकरितां मुद्दाम एक मनुष्य नेमिला आहे. पैसा सुभेदाराकडून मिळावयाचा आहे. हिशेबाच्या मोबदल्याचा माल आम्हीं अद्याप घेतला नाही. फर्मान मिळाल्यावर पाहूं.

शिवाजी सर्व सैन्य घेऊन **फोंड्याशीं** (चंग बांधून) बसला आहे. पुष्कळ प्राणहानी झाली. त्यानें चारदां सुरुंग लावले. परंतु तितक्याहि वेळां शत्रूनें उलट सुरुंग लावले. तटापासून १२ फुटांवर सैन्याचे रक्षणाकरितां त्यानें भिंत बांधली असून तेथून तो किल्ला घेतल्याशिवाय उठणार नाहीं असें म्हणतात. गोव्यांतील **पोर्तु०** त्याला भितात. कारण, **फोंडा** घेतल्यावर तो गोवा घेईल. **विजापूरचें राज्य** तर सर्वच त्याच्या ताब्यांत येईल. **रायबागला** त्याचें सैन्य आलें आहे. परंतु तें घेतल्याची अद्याप खातमी नाहीं. गोव्याच्या व्हाईसरायबरोबर शिवाजीचा वकील आहे. तथापि पोर्तु० शक्य ती **मदत फोंड्याला करतात.** एकदां अन्नसामुग्रीनें भरलेलीं फोंड्याकडे जाणारीं पोर्तुगीजांचीं १० शिबाडें **शिवाजीला** सांपडलीं. उघडपणें विचारल्यावर मात्र व्हाइसराय नाकबूल झाला.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. सुरत मा. ८८<br>पृ. ३७, ३८ इ. | (१७४३)<br>कारवार-मुंबई | श. १५९७ वैशाख शु. ७<br>इ. १६७५ एप्रील २२ |

*या प्रांताचा अधिकारी* **रुस्तुमजमा** १५०० घोडदळ व पायदळ घेऊन **फोंड्याला** कुमक करावयास आला. **शिवाजी** एकाच वेळीं अनेक ठिकाणीं उद्योग करीत आहे. फोंड्याचा वेढा इकडे चालू आहे तोंच तिकडे **आदिलशाहीचे हद्दींतील** एटगेरी, व गोंवळकोंड्याचे हद्दींतील **भागानगरजवळील** दोन अर्शी **तीन मोठीं शहरें** त्याच्या लोकांनीं लुटलीं व तेथून पुष्कळ संपत्ति व सावकार पकडून फोंड्यास शिवाजीपाशीं आणिले. **पोर्तु० हद्दींतील** कुकुली आणि वरूडें हीं दुसरीं **गांवें** त्याच्या सैन्यानें लुटलीं. पावसांत तो येथेंच छावणीकरितां राहणार असल्याकारणानें फोंडा त्याचे हातांत नक्की जाणार असें सर्वांनाच वाटतें. त्याचें सैन्य ३० हजार आहे असें लोक बोलतात. त्यापैकीं कांहीं सैन्य कदाचित् (लुटीकरितां) या बाजूलाहि येईल!

| | | |
|---|---|---|
| खं. १५ ले. १३४<br>सु. १०७५ सफर ७ | (१७४४)<br>न. म. मु. सी. | श. १५९७ वैशाख शु. ८<br>इ. १६७५ एप्रील २३ |

कृष्णाजी भास्कर सुभेदार व कारकून सुमा महालानिहाये पा। वांई व सातारा

कुकाजी बयाजी हवालदार व कारकून ता। सातारा

रा. जोगेंदगीर मानभाऊ अजहत कमळनयन सेर्कान निंब यास इनाम बिघे ८१५ आहे. ती गुदस्ता पड होती. तर आतां कौदीस लाऊं देणें. सनद पेस्तर येईल.

| | | |
|---|---|---|
| सा. ले. ५६<br>सु. १०७५ सफर १४ | (१७४५) | श. १५९७ वैशाख शु.१५<br>इ. १६७५ एप्रील ३० |

राघो बलाल–विसाजी गंगाधर

मौजे सुपे सुर्द पा। सुपे येथील मोकदमी तिसरी तक्सीम रा. शंकराजी नीळकंठ-

राऊ याची आहे. हल्लीं त्यावर मिरासपटी होन ३० प्रमाणें १० होन आली. पैकीं होन ५ तहकूब केले असते. तरी ते देणें.

फॅ. रे. सुरत भा. ८८ पृ. ५४ इ. (१७४६) राजापूर-मुंबई श. १५९७ वैशाख व. ४ इ. १६७५ मे ३

फोंड्याचा वेढा नेटानें चालविला आहे. राजानें दोन मान्याच्या जागा ताब्यांत घेऊन खंदक भरून टाकला, आणि ५०० शिड्या करून त्यांच्यावर चढून जाण्याचें धाडस करणाऱ्यांना **बक्षीस देण्याकरितां** त्यानें प्रत्येकीं अर्धा शेर वजनाचे **सोन्याचे ५०० तोडे** करविले. शिवाजीनें पुष्कळ सैन्य तेथें इरेस घातल्यामुळें त्याच्या ताब्यांत किल्ला जाणार अशीच आमची अपेक्षा होती. इतक्यांत वेढा उठवून [ परंतु ले. १७४७ पहा ] **शिवाजी** निघून गेल्याची बातमी आज सकाळीं आली. **बहलोलखान** स्वतःचें ८००० घोडदळ व ७००० पायदळ आणि शिवाय इतर मोठें सैन्य बरोबर घेऊन त्याच्यावर चालून येत आहे; म्हणून शिवाजी गेला असावा.

फॅ. रे. सुरत भा. ८८ पृ. ४६ इ. (१७४७) कारवार-मुंबई श. १५९७ वैशाख व. ९ इ. १६७५ मे ८

**शिवाजीनें फोंडा जिंकून** महमदखानाला बेड्या घातल्या; व किल्ले शिवाजीचे स्वाधीन करावे, असें शेजारचे किल्लेदारांना पत्र त्याचे हातून जबरदस्तीनें लिहून घेतलें. पण त्याचें कोणी ऐकणार नाहीं. गेले १५ दिवस ३००० घोडदळ व शिवाय कांहीं पायदळ **शिवेश्वरच्या** (Smimeseer) किल्ल्याला वेढा देऊन आहे. १२ दिवसांपूर्वी शिवाजीच्या एका सेनापतीनें येऊन **कारवार** जाळलें.

ऑर्म भा. ११४—४ पृ. ११० इ. (१७४८) मुंबई—राजापूर. श. १५९७ वैशाख व. १४ इ. १६७५ मे १३

अशा महाग दरांनीं नारळ व सुपारी देण्यानें **अण्णाजी** अन्याय करीत आहे हें खरें आहे. परंतु आपल्या सर्वच सावकारांना हाच माल व अशाच किंमतीस देण्याचा शिवाजीचा प्रघात असला तर, आपल्याला तितकी **तक्रारीला जागा रहात नाहीं.**

[ पृ. १११ ] — **अण्णाजी** हा तिकडील व्हाइसरॉयाच्या अधिकारावरचा अमलदार असल्यामुळें व चतुर असल्यामुळें आपल्या दर्जाप्रमाणें आपला मान ठेवला जावा असें त्याला वाटणें साहजिक आहे. तरी त्याचा योग्य मान ठेवा. आपल्या दर्जाला शोभेल असेंच तुम्हीं स्वतः वागा. परंतु उद्दामपणा व कृतघ्नपणा करूं नका. त्यांच्याशीं तुम्हांला वागावयाचें आहे ते लोक ( मराठे लोकांचा स्वभाव) **चतुर** आणि **चौकस**

( searching ) आहेत. त्यांच्याशीं व्यवहार करतांना मर्यादेनें आणि विचारानें करावा. भावनाप्रधान किंवा फाजील घमेंडखोर लोकांची केवळ कुचेष्टा करूनच न थांबतां ते त्यांच्यापासून शक्य तितका आपला फायदा करून घेतात.

( पृ. ११३ ) शिवाजीचा सेनापती कारवारला आला तेव्हां तुह्मी त्याला भेटायला गेला नाहीं हें बरें केलें नाहीं. त्याच्या सर्व सेनापतींना व प्रधानांना **चांगल्या रीतीनें वागविलें पाहिजे.**

खं. १८ ले. २० (१७४९) श. १५९७ ज्येष्ठ शु. १
सु. १०७५ सफर २९ इ. १६७५ मे १५

मोरो त्रिमल—राघो बलाल सुभे. महालानिहाये ताा जुनर.

पाा पुणेचे देसकुलकर्णी यानीं सांगितलें कीं, देसमुखास व आपणास पूर्वी सुभेदार दादाजी कोंडदेऊ ह्यांनीं ३०५ व ९५ अशी खंडणी दरसालची आकारली होती. त्याप्रमाणें खंडणी कांहीं वर्षे दिली. पण हालीं ५।७ वर्षे माहाल खराब पडला. वसाहत उजवी. तरी स्वामीनें महालास कागद द्यावा कीं, पूर्वी महालाची मामुरी असतां जो इनामतीचा वसूल होत असे व त्यांपैकीं जी खंडणी सरकारांत देत असे त्याप्रमाणें हालींच्या वसुलांत घेणें. तरी असा कागद पाठविला असे.

सा. ले. ५७ (१७५०) श. १५९७ ज्येष्ठ शु. २
सु. १०७५ सफर ३० इ. १६७५ मे १६

राघो बलाल—मोरो निवाजी मुजुमदार पाा पुणा.

निळोजी नीलकंठराऊ पुरंधरकर याचा इनाम मौ चांबिळी ताा करेपठार येथें कास टका १ आहे. त्यावरील मिरास पटी २५ होन घातली आहे; ती दूर करणें.

फॅ. रे. सुरत मा. ८८ (१७५१) श.१५९७ ज्येष्ठ शु.७
पृ. ६१ इ. राजापूर-मुंबई इ. १६७५ मे २१

कांहीं दिवसांपूर्वी, फोंडा घेतांच शिवाजीनें सरसहा सर्वांची कत्तल केली [ ! ]. आसपासचा सर्व आदिलशाही मुलूख **शिवाजीच्या** अमलाखालीं आणून देण्याचें वचन दिल्यामुळें फक्त महमदखान आणि आणखी ४।५ लोक यांचे प्राण वाचवले. **अंकोला** आणि **शिवेश्वर** हे दोन्ही किल्ले पडले. **कुदारा** [फोंडा] थोडासा **टिकाव** धरून आहे; पण लवकरच पडेल. शिवाजी आतां **कारवार** प्रांताचा स्वामी झाला असून त्याची **पुढची स्वारी गोव्यावर** होईल, असें म्हणतात.

फॅ. रे. सुरत भा. ८८ पृ. ५८ इ. | (१७५२) कारवार-मुंबई. | श. १५९७ ज्येष्ठ शु. ११ इ. १६७५ मे २५

ह्या भागांत शिवाजीला महद्यश आलें असून थेट **अंकोल्यापर्यंतचा** मुलूख त्याचे ताब्यांत आला. **फोंडा** हें त्याच्या **पराक्रमाचें फळ** असून इतरत्र द्रव्य-प्रयोगच यशस्वी झाला.......**कारवार** शिवाजीच्या अमलांत गेल्यामुळें त्याला आम्हीं व्यापाराच्या अटी विचारल्या. तेव्हां **राजापुरच्याप्रमाणेंच** येथेंहि चालेल असें तो म्हणाला. तिकडील **शिरस्ता** कळवा.

फॅ. रे. सुरत भा.८८ पृ. ६२ इ. | (१७५३) राजापूर-मुंबई | श. १५९७ ज्येष्ठ व. ३ इ. १६७५ मे ३१

**शिवाजी** राजानें आतां सर्व **विजापुरी कोंकण** जिंकलें आहे. कारवारच्या इंग्रजांशीं तो बरा वागला. **बहलोलखान** अजून **मिरजेंतच** आहे. त्यानें फोंड्याची कुमक करण्याचा प्रयत्न केला; परंतु राजानें झाडें तोडून तीं आडवीं घालून मार्ग बंद केले आणि सर्वत्र पहारे ठेवले यामुळें त्याचें कांहीं चाललें नाहीं अशी आमची माहिती आहे. परंतु बहलोलखानाला मोठा **लांच** दिल्यामुळें तो थबकला असें कारवारचे लोक लिहितात.

फॅ. रे. सुरत भा. ८८ पृ. १०५-६ इ. | (१७५४) फोर्ट सें. जॉर्ज-मुंबई | श. १५९७ ज्येष्ठ व. ३ इ. १६७५ मे ३१

शिवाजीच्या अमलाची किनाऱ्यावर वाढ झाल्यानें पोर्तु॰नां ताळ्यावर आणण्यास तें एक बरें साधन होईल. कारवारच्या कंपनीचेंहि त्यामुळें नुकसान होईल असें नाहीं. [से मध्यें याच पत्राची तारीख जुलै १७ दिली आहे.]

**से. फॅ. रे.** सुरत भा. १०७ पृ. ११५-तेथूनच व त्याच तारखेचें सुरतेस पत्रः- तुमचे **शेजारी पोर्तु॰** जलीं-स्थलीं तुमचेशीं दुष्टाव्यानें वागतात हें ऐकून खेद झाला. परंतु तुमचा **नवा स्नेही शिवाजी** त्यांना त्यापेक्षांहि अधिक त्रास देत असल्यामुळें जशास तसेंच होत आहे.

खं. ८ ले. ३२ सु. १०७६ रबल १६ | (१७५५) | श. १५९७ ज्येष्ठ व. ४ इ. १६७५ जून १

? — ह्यामजी आवजी हवालदार व कारकून तर्फ जाळगाऊ.

तर्फ मजकूरपैकीं मौजे पालघर येथील इसम पाव लोकाचा जुमलेदार सूर्याजी ढेंदुसकर याच्या चाकराची बाईल किले रायगडास इमारतकामावर मजुरी करीत असतां

तिनें बद अमल केला. ह्याबद्दल तर्फदार नरहरी बाबाजी यानें सूर्याजीपासून ५७ घ्यावे याकरतां दुंदुसकराचे घरीं मोकळदार बसवून तसवीस लाविलीयाचे हुजूर कळलें. तरी ज्याचा चाकर तोच येथें चाकराचा धनी आहे. सारी हकीकत लेहून पाठवणें व तोशीस न लावणें.

फॅ. रे. सुरत भा. ८८ } (१७५६) { श. १५९७ ज्येष्ठ व. ६
पृ. ६३ इ. } राजापूर-मुंबई. { इ. १६७५ जून ३

वहलोलखान आपलें सैन्य मिरजेला ठेवून पावसाळ्याकरितां विजापूरला गेला. शिवाजी अंकोल्याजवळ होता. तो सुंदा राजाचे देशाजवळ किल्ल्यांत छावणीस जाणार आहे. फोंड्याची डागडुजी व बंदोबस्त पहाण्याकरितां तो अण्णाजी तेथेंच राहिला.

फॅ. रे. सुरत भा. ८८ } (१७५७) { श. १५९७ ज्येष्ठ व. ११
पृ. ७१ इ. } कारवार-मुंबई { इ. १६७५ जून ९

शिवाजीनें फोंडा घेण्यापूर्वी ५ दिवस त्याचा एक सेनापती कारवारला आला. त्यावेळीं वहलोलखान फोंड्यापासून दोन दिवसांचे अंतरावर असल्याची आणि त्याच्या मागोमाग, या प्रांताचा भावी अधिकारी सिद्दी मुसेदचा पुत्र, मोठ्या सैन्यानिशीं आल्याची नक्की खबर आली होती. यावरून शिवाजी वेढा टाकून जाणें आम्हांला संभवनीय वाटलें. परंतु वहलोलखानानें ५० इ. होनांचा लांच व आपल्या प्रांताला तसवीस न लावण्याचें वचन घेऊन शिवाजीला विरोध केला नाहीं. शिवाजी बहुधा थोडा वेळ त्याला आपल्या बाजूला राहील आणि शेवटीं त्याचाहि नाश करण्यास [ शेवटचा गोड घांस घेण्यास ] सोडणार नाहीं !

फॅ. रे. सुरत } (१७५८) { श. १५९७ आषाढ शु. १
भा. ८८ पृ. ६५ इ. } राजापूर-मुंबई { इ. १६७५ जून १४

तीन दिवसांपूर्वी राजा रायगडकडे या शहरावरून गेला. वहलोलखानाला लांच दिला याबद्दल संशय राहिला नाहीं. आतां शिवाजी विजापूरचे घाल सुलतानाशीं तह करून पुढच्या उन्हाळ्यांत कर्नाटकांत सुरू नाईकाच्या देशावर स्वारी करील. तसें झाल्यास इकडे शांतता राहून येथील व्यापार वाढेल.

फॅ. रे. सुरत } (१७५९) { श. १५९७ आषाढ शु. २
भा. ८८ पृ. ६७ इ. } सुरत-मुंबई. { इ. १६७५ जून १५

शिवाजीच्या वकिलानें शिवाजीच्या तहावर मोगलाची सही घेतली असें बोलतात. तथ्य कळवावें.

(से) फॅ. रे. सुरत मा. १०७ पृ. १०५ इ. | (१७६०) मुंबई–सुरत | श. १५९७ आषाढ शु. ७ इ. १६७५ जून १९

हुमगांव प्रकरणीं वखार पुनः सुरू करण्यास हरकत नाहीं. कारण शिवाजी-कडून पक्के कौल मिळविण्यांत आपल्याला यश येईल असें वाटतें.

(से.) फॅ. रे. सुरत मा. ८८ पृ. ७३–७४ इ. | (१७६१) कारवार–मुंबई | श. १५९७ आषाढ व. ४ इ. १६७५ जुलै १

कारवारचे **नवे राज्यकर्ते त्रासदायक** आहेत. मुसलमानी अमलांत नव्हते असे प्रकार करून त्रास देतात. त्यांनीं नारळाचीं झाडें व फळें मोजलीं, शिपायांकडे तांदुळाची चौकशी केली आणि नाना तऱ्हा केल्या ! **शिवाजीचे मुलखांत** आपली **वखार भरभराटीस येणार नाहीं**. ते बियाणें देखील चोरून नेतात. सर्व लोक मुसलमान पुनः यावेत अशी प्रार्थना करितात. पावसानंतर तसें होईलहि. आम्हीं आपल्या तक्रारी शिवाजीकडे लिहून कळवीत आहोंत. तुम्हींहि या बाबतींत त्याच्याकडे लिहावें.

(से) फॅ. रे. सुरत मा. १०७ पृ. १०९ इ. | (१७६२) मुंबई–सुरत | श. १५९७ आषाढ व. ४ इ. १६७५ जुलै १

**शिवाजी व मोंगल** यांचा तह झाल्याची बातमी बरीच विश्वसनीय मानली जाते. शिवाजीनें मोंगलापासून घेतलेला मुलख व किल्ले मोंगलांना द्यावे; फक्त **सातारा** ( ऑर्म ११४–४ पृ. १३३ ) आणि मावळें आपल्याकडे ठेवावीं; **दख्खनमधील** सर्व **मुलखाचा देसाईपणाचा** अधिकार शिवाजीला मिळावा; आणि जुन्नरचा मोंगलांचा सुभेदार कल्याण–भिवंडीला यावा; अशीं कलमें आहेत. परंतु याबद्दल पक्केपणा नाहीं. **१७ जुलैचे** सुरत–मुंबई पत्रांत ( फॅ. रे. सुरत मा. ८८ पृ. ७८ ) तहाची बातमी [ वरील तपशील वगळून ] दिली आहे.

फॅ. रे. मुंबई, मा. २ पृ. ९४–९६ इ. | (१७६३) मुंबई कन्सल्टेशन | श. १५९७ आषाढ व. १० इ. १६७५ जुलै ७

अनेक गोष्टींचें आमहाचें मागणें केलेलें पत्र घेऊन **शिवाजीचा** वकील प्रेसिडेंटकडे आला. परतु शिवाजीला आधींच कंपनीनें विकलेल्या मालाबद्दल त्याच्याकडून बरेंच येणें आहे; तो रोकड न देतां भात, नारळ किंवा सुपारी मोबदल्यांत देतो. यामुळें कंपनीचा फायदा कांहींच होत नाहीं; आणि आतां त्यानें केलेली लोखंड, गोळे, दोन पितळी तोफा आणि तांबें यांची मागणी बरीच मोठी आहे; इत्यादि गोष्टींचा विचार करणें जरूर आहे. त्या-बरोबरच आतां **शिवाजी प्रबळ झाला असून** कंपनीचा पुष्कळसा **व्यापार त्याच्या अमलाखालीं चालतो** आणि त्याच्या सगळ्याच मागण्या झिडकारल्यास कंपनीचें नुकसान होईल; ह्यादि गोष्टी विचारांत घेतल्या पाहिजेत. तेव्हां भात बदली

घेण्याचें ठरवून, आमचें काम भागून राहील तेवढा दारुगोळा शिवाजीला द्यावा, परंतु तांबें फक्त रोखीनें विकावें. पितळी तोफांबद्दल पुढील सभेंत निर्णय करावा. [ ता. ९ रोजीं तांबें रोखीनें घेतल्यासच द्यावें व तोफा देऊं नयेत असें ठरलें. ]

आलेल्या वकिलाजवळ प्रेसिडेंट डुमगांवसंबंधीं बोलला. त्यावरून हा महिना अनारोग्यकर असल्यामुळें पुढील महिन्यांत ऑस्टेननें रायगडला शिवाजीशीं बोलणें करण्याकरितां जावें; असें ठरलें.

(सं.) फॅ. रे. सुरत भा. १०७ पृ. ११३ इ. (१७६४) मुंबई-सुरत. श. १५९७ श्रावण शु. ३ इ. १६७५ जुलै १५

राजापूरच्या वखारीपासून फायदा खास आहे. सर्व प्रकारचें कापड स्वस्त मिळावें म्हणून जुन्नरला वखार घालावी. मोंगल व शिवाजी यांचा तह आहे तोंपर्यंत मुंबईचा मार्ग सुरक्षित राहील. तह नच झाला तरी उभयतां आपले स्नेहीच आहेत. दोघांचेहि पास मिळतील.

फॅ. रे. सुरत भा. ८८ पृ. ७७ इ. (१७६५) सुरत-मुंबई श. १५९७ श्रावण शु. ११ इ. १६७५ जुलै २२

मोंगल-शिवाजी तह झाला नाहीं असें सुभेदारानें जाहीर केलें आहे. जरी कलमांवर सह्या झाल्या आणि तह घडवून आणण्याची कामगिरी केल्याबद्दल बादशहानें बहादरखानाला एक हत्ती पाठवून त्याची मनसब वाढविली, तरी शिवाजीनें त्याला फसविलें असेंच अखेरीस ठरलें. आदिलशाही मुलखांत बिनहरकत स्वारी करितां यावी एवढ्याकरितांच त्यानें हें कपटनाटक उभें केलें होतें !

फॅ. रे. सुरत भा. ८८ पृ. ८९-९० इ. (१७६६) कारवार-मुंबई श. १५९७ श्रावण व. २ इ. १६७५ जुलै २८

पावसानंतर काय होईल न कळे. परंतु मुसलमान फिरून हा भाग जिंकण्याकरितां आले, आणि शिवाजीहि सप्टेंबरांत इकडे उतरला, तर दोन्ही सैन्यांच्या उपद्रवांमुळें घांटाखालीं माल आणणें कठीण होईल.

सा. ले १३५ सु. १०७६ जवळ १५ (१७६७) श. १५९७ श्रावण व. ३ इ. १६७५ जुलै २९

त्रिंबक वासुदेव हवाल॰ व कार. ता कन्हेपठार

रा. पंताजी गोपीनाथ सब. व चिट. का सासवड:-का सासवडची सब. व चिट. तुमची. तुमचा गुमास्ता कृष्णाजी गोविंद खळदकर यास अवदा मोगलाचें धामधुमेकरितां कांहीं पावलें नाहीं. म्हणून रुजू न तुम्हाकडे आला आहे. तरी मावारा पाठविणें झाडा करून देऊं.

खं. २१ ले. ४ } (१७६८) { श. १५९७ श्रावण व. ७
सु. १०७६ जवल १९ } ता. म. मु. कौलनामा { इ. १६७५ आगस्ट २

अज दिवाण ठाणे तर्फे संगमेश्वर मामले प्रभावली
वेद. नीलकंठभट सोमनाथभट काने सेकीन मा
तुम्हीं सांगितलें कीं आपले वडील गोमांतकांत वैद्यकी करीत होते. सोमनाईक सरदेसाई मामले प्रभावलीकर यानीं त्यांस संगमेश्वरीं आणून घर देऊन ठेविलें. पुढें आपले सासरे वारल्यामुळें त्यांचीं मुलें आणून घरीं ठेविलीं. मी काशीस गेलों. येऊन उदरनिमित्त शृंगारपुरीं राहिलों. त्यावर राज्य राजश्री [शिवाजी] स प्राप्त जाइलें. तेव्हां आपण धुणकेश्वरींहून घरीं आलों. तों सप्रे म्हणूं लागले, तुमचे वडिलांनीं घर आम्हांस दिलें. यानंतर सभा होऊन निवाडा झाला. घर रामभट सप्रे याचें व घरभूमी आमची. तरी सुखें घर बांधोन राहणें.

फॅ. रे. सुरत मा. ८८ } (१७६९) { श. १५९७ श्रावण व.११
पृ. ९५-९७ इ. } रायबाग-मुंबई. { इ. १६७५ आगस्ट ७

३० जुलैला सकाळींच **कोल्हापूरच्या** मुसलमान सुभेदाराला शिवाजीच्या लोकांनीं कैद करून **पन्हाळ्यावर** नेल्याची बातमी आली. ती ऐकतांच आम्हीं रायबागला येण्यासाठीं निघालों. **शिवाजीच्या भीतीनें** व आदिलशाही सुभेदाराच्या जुलमामुळें मार्गांत सर्व उजाड झालें होतें. ... प्रथम **१७ किल्ले देण्याचें** कबूल करून, तहाच्या कलमांवर बाद० च्या सह्या झाल्या असतांना देखील, मागाहून किल्ले देण्याचें नाकारून **शिवाजीनें तह मोडल्यामुळें** बादशहा फारच क्रुद्ध झाला. **आदिलशहा** आणि **बहलोलखान** यांनीं कमालीचा प्रयत्न करून **शिवाजीचा नाश** करण्यास आपल्याला मदत करावी असें लिहून, विजापुरकरांनीं मोंगलांना धारवाडच्या खंडणीची देखील त्यानें ह्या कामगिरीकरितां सूट दिली. **बहलोलखानहि** ह्या विनंतीप्रमाणें पन्हाळ्यावर स्वारी करण्याच्या तयारींत आहे. चंद्र बदलताच तो निघणार असें जाहीर झालें असलें, तथापि पावसाचा त्याला अडथळा होईल हें उघड आहे. बहुधा दिवाळीच्या आधीं त्याचें येणें होणार नाहीं.

(से.)फॅ. रे. सुरत भा. ८८ } (१७७०) { श. १५९७ श्रावण व. ११
पृ. ९० इ. } जैतापूर-मुंबई { इ. १६७५ आगस्ट ७

**शिवाजीकरितां मोठें आरमार** बांधण्याचें काम चालू असल्यामुळें सुतार, अरकसदार, लोहार इत्यादि सर्व कामदार तिकडे गुंतले आहेत.

सा. ले. १३६ } (१७७१) { श. १५९७ श्रावण व. १२
सु. १०७६ जवल २५ } { इ. १६७५ आगस्ट ८

अज दिवाण ठाणे कों सासवड मोकदम देहाये का मार

कोडींत इ. नऊ गांवाहून २०५ होन सत्वर पाठविणें. चिटणीस, सबनीस व नायकवाडी यांचे तर्फेचे कृष्णाजी गोविंद यास या कार्याकरतां पाठविले आहेत. दर गांवीं ॥॰ प्रताप मसाला म्हणून त्यांस आदा करणें.

फॅ. रे. मुंबई भा. २ पृ. १२० इ. } (१७७२) मुंबई कन्सल्टेशन. { श. १५९७ श्रावण व.१३ इ. १६७५ आगस्ट ९

हुमगांवचें बोलणें करून, मोंगली व आदिलशाही इत्यादि सर्वच मुलखांत उपयोगी पडावे म्हणून इंग्रजांकरितां **शिवाजीचे कौल** आणण्यासाठीं ऑस्टिन जाईल, त्याचे बरोबर शिवाजीकरितां ५०० रु. चा **नजराणा** पाठवावा.

फॅ. रे. सुरत भा. ८८ पृ. ९९–१०० इ. } (१७७३) राजापूर–मुंबई. { श. १५९७ भाद्र. शु. ७ इ. १६७५ आगस्ट १७

**दंडाराजपुरीवर** हल्याची तयारी म्हणून अनेक नवीन गुराबा त्वरेनें बांधण्याबद्दल शिवाजीचा जरूरीचा हुकूम आल्यामुळें येथें काम चालू आहे. ......येथील सुभेदाराकडे कंपनीकरितां मालाची मागणी करीत आहों. तो बदलून त्याच्याबदली तुका पंडीत येणार आहे असें कळतें.......दिवाळीपूर्वी **राजाचा आदिलशहाशीं तह होईल** असें बोलतात.

फॅ. रे. सुरत भा. ८८ पृ. १०४ इ. } (१७७४) कारवार – मुंबई. { श. १५९७ भाद्र. शु. ८ इ. १६७५ आगस्ट १८

अंकोल्यापर्यंत देश घेतल्यावर **शिवाजीनें** सुंदा राजाच्या देशांत सैन्य पाठविलें. आणि कोणताहि अडथळा न होतां सुपे व वरस्हें हीं दोन ठाणीं घेऊन बार्दुल येथें जकातीचें नाकें स्थापिलें. यामुळें आमचे मालाला अडथळा होतो. परंतु किदरखानपर्वा व स्थानिक देसाई यांनीं एकजुटीनें हीं ठाणीं पुनः घेतलीं. शिवाजीचे ३०० लोक मेले आणि बार्दुलचें नाकें त्याला उठवावें लागले. मोंगलांचें सैन्य **शिवाजी-**जवळच तळ देऊन राहिल्यामुळें तो **दख्खनकडे मदत देऊं शकत नाहीं.** यामुळें इकडील मराठ्यांची त्रेधाच आहे....तिमण्णा व राणी [Rana] यांचा तह झाला. **राणी शून्यवत्** असून तिमण्णा कर्तबगार असल्यामुळें यथेच्छ कारभार करतो. यामुळें तिला तह करणें भाग पडलें. कांहीं व्यापाऱ्यांनीं त्याच्याविरुद्ध कट केला. परंतु **शिवाजी** जवळ आल्याचें समजल्याबरोबर लोकांत एकी राहण्याच्या उद्देशानें त्यानें त्यांना कैद केलें.

या पत्राची सुरतेहून पोंच **आगष्टो. १६ ची**, ओ. कॉ. नं. ४१२२–' सुंदा राजदरींत शिवाजीची स्वारी, तिमण्णा व राणी यांचा दूरदर्शीपणाचा तह आणि शिवाजीविरुद्ध झालेला त्यांचा निश्चय वगैरे गोष्टी कळल्या.

खं. २१ ले. ४ } (१७६८) { श. १५९७ श्रावण व. ७
सु. १०७६ जवल १९ } ता. म. मु. कौलनामा { इ. १६७५ आगस्ट २

अज दिवाण ठाणे तपे संगमेश्वर मामले प्रभावली

वेद. नीलकंठभट सोमनाथभट कात्रे सेकीन मा।

तुम्हीं सांगितलें कीं आपले वडील गोमांतकांत वैद्यकी करीत होते. सोमनाईक सरदेसाई मामले प्रभावलीकर यानीं त्यांस संगमेश्वरीं आणून घर देऊन ठेविलें. पुढें आपले सासरे वारल्यामुळें त्यांचीं मुलें आणून घरीं ठेविलीं. मी काशीस गेलों. येऊन उदरनिमित्त शृंगारपुरीं राहिलों. त्यावर राज्य राजश्री [शिवाजी] स प्राप्त जाहालें. तेव्हं आपण घुणकेश्वरींहून घरीं आलों. तों सप्रे म्हणूं लागले, तुमचे वडिलांनीं घर आम्हांस दिलें. यानंतर सभा होऊन निवाडा झाला. घर रामभट सप्रे याचें व घरभूमी आमची. तरी सुखें घर बांधोन राहणें.

फॅ. रे. सुरत मा. ८८ } (१७६९) { श. १५९७ श्रावण व. ११
पृ. ९५-९७ इ. } रायबाग-मुंबई. { इ. १६७५ आगस्ट ७

३० जुलैला सकाळींच **कोल्हापूरच्या** मुसलमान सुभेदाराला शिवाजीच्या लोकांनीं कैद करून **पन्हाळ्यावर** नेल्याची बातमी आली. ती ऐकतांच आम्हीं रायबागला येण्यासाठीं निघालों. **शिवाजीच्या भीतीनें** व आदिलशाही सुभेदाराच्या जुलमामुळें मार्गांत सर्व उजाड झालें होतें. ...प्रथम **१७ किल्ले देण्याचें** कबूल करून, तहाच्या कलमांवर बाद० च्या सह्या झाल्या असतांना देखील, मागाहून किल्ले देण्याचें नाकारून **शिवाजीनें तह मोडल्यामुळें** बादशहा फारच क्रुद्ध झाला. **आदिलशहा** आणि **बहलोलखान** यांनीं कमालीचा प्रयत्न करून **शिवाजीचा नाश** करण्यास आपल्याला मदत करावी असें लिहून, विजापुरकरांनीं मोंगलांना पावयाच्या खंडणीची देखील त्यानें या कामगिरीकरितां सूट दिली. **बहलोलखानहि** या विनंतीप्रमाणें पन्हाळ्यावर स्वारी करण्याच्या तयारींत आहे. चंद्र बदलतांच तो निघणार असें जाहीर झालें असलें, तथापि पावसाचा त्याला अडथळा होईल हें उघड आहे. बहुधा दिवाळीच्या आधीं त्याचें येणें होणार नाहीं.

(सं.)फॅ. रे. सुरत मा. ८८ } (१७७०) { श. १५९७ श्रावण व. ११
पृ. ९० इ. } जैतापूर-मुंबई { इ. १६७५ आगस्ट ७

**शिवाजीकरितां मोठें आरमार** बांधण्याचें काम चालू असल्यामुळें सुतार, अरकसदार, लोहार इत्यादि सर्व कामदार तिकडे गुंतले आहेत.

सा. ले. १३६ } (१७७१) { श. १५९७ श्रावण व. १२
सु. १०७६ जवल २५ } { इ. १६७५ आगस्ट ८

अज दिवाण ठाणे को सासवड मोकदम देहाये का मार

कोंढीत इ. नऊ गांवाहून २०५ होन सत्वर पाठविणें. चिटणिस, सबनीस व नायकवाडी यांचे तर्फेचे कृष्णाजी गोविंद यास या कार्याकरतां पाठविले आहेत. दर गांवीं ॥ प्रताप मसाला म्हणून त्यांस आदा करणें.

फॅ. रे. मुंबई मा. २ ) (१७७२ ) { श. १५९७ श्रावण व.१३
पृ. १२० इ. ) मुंबई कन्सल्टेशन. { इ. १६७५ आगस्ट ९

हुमगांवचें बोलणें करून, मोंगली व आदिलशाही इत्यादि सर्वच मुलखांत उपयोगी पडावे म्हणून इंग्रजांकरितां **शिवाजीचे कौल** आणण्यासाठीं ऑस्टिन जाईल, त्याचे बरोबर शिवाजीकरितां ५०० रु. चा **नजराणा** पाठवावा.

फॅ. रे. सुरत मा. ८८ ) (१७७३) { श. १५९७ भाद्र. शु. ७
पृ. ९९—१०० इ. ) राजापूर—मुंबई. { इ. १६७५ आगस्ट १७

**दंडाराजपुरी**वर हल्ल्याची तयारी म्हणून अनेक नवीन गुराबा त्वरेनें बांधण्याबद्दल शिवाजीचा जरूरीचा हुकूम आल्यामुळें येथें काम चालू आहे. ......येथील सुभेदाराकडे कंपनीकरितां मालाची मागणी करीत आहों. तो बदलून त्याच्याबदलों तुका पंडीत येणार आहे असें कळतें.......दिवाळीपूर्वी **राजाचा आदिलशाहीशीं तह होईल** असे बोलतात.

फॅ. रे. सुरत मा. ८८ ) (१७७४) { श. १५९७ भाद्र. शु. ८
पृ. १०४ इ. ) कारवार—मुंबई. { इ. १६७५ आगस्ट १८

अंकोल्यापर्यंत देश घेतल्यावर **शिवाजीनें** सुंदा राजाच्या देशांत सैन्य पाठविलें. आणि कोणताहि अडथळा न होतां सुपें व बरव्हें हीं दोन ठाणीं घेऊन बार्दुल येथें जकातीचें नाकें स्थापिलें. यामुळें आमचे मालाला अडथळा होतो. परंतु बिदरखानपर्चा व स्थानिक देसाई यांनीं एकजुटीनें हीं ठाणीं पुनः घेतलीं. शिवाजीचे ३०० लोक मेले आणि बार्दुलचें नाकें त्याला उठवावें लागलें. मोंगलांचें सैन्य **शिवाजी-जवळच तळ देऊन राहिल्यामुळें तो दख्खनकडे मदत देऊं शकत नाहीं.** यामुळें दक्षीण मराठ्यांचाच अंमल आहे...तिमण्णा व राणी [Rani] यांचा तह झाला. **राणी शून्यवत्** असून तिमण्णा कर्तबगार असल्यामुळें यथेच्छ कारभार करतो. यामुळें तिला तह करणें भाग पडलें. कांहीं व्यापाऱ्यांनीं त्याच्याविरुद्ध कट केला. परंतु **शिवाजी** जवळ आल्याचें समजल्याबरोबर लोकांत एकी राहण्याच्या उद्देशानें त्यानें त्यांना कैद केलें.

या पत्राची सुरतेहून पोंच **आक्टो. १६ ची**, ओ. कॉ. नं. ४१२२—'सुंदा राजावरील शिवाजीची स्वारी, तिमण्णा व राणी यांचा दूरदर्शीपणाचा तह आणि शिवाजीविरुद्ध झालेला त्यांचा निश्चय वगैरे गोष्टी कळल्या.

फॅ. रे. मुंबई भा. २
पृ. १२१ इ.
(१७७५)
मुंबई कन्सल्टेशन.
श. १५९७ भाद्र. शु. १०
इ. १६७५ आगस्ट २०

ऑस्टेननें न्यावयाचा नजराणाः—

| | किंमत रु. |
|---|---|
| लहान पितळी तोफ गाड्यासह शिवाजीकरितां | ३००: ०० |
| १२ यार्ड कापड मोरोपंडिताकरितां | १५०: ०० |
| ७ ,, ,,अण्णाजीपंडित ,, | ८७: १६ |
| १ आरसा व १ तोळा कस्तुरी | २५: |
| ३ यार्ड कापड सेनापती [ चिटणीस ? Senatary ] | २७: १६ |
| इतर किरकोळ वस्तु | १४०: |
| रुपये | ७४०: ०० |

ऑ. कॉ. भा. ३६
नंबर ४१०६ इ.
(१७७६)
ऑस्टेनचा वृत्तांत
श. १५९७ भाद्र. शु. १४ आश्वीन शु. ७
इ. १६७५ आगस्ट २४–सप्टें. १५

२४ आगस्टला निघून मह्री-चौल-निजामपूर [२ सप्टें.] या मार्गानें रायरीला गेलों. निजामपूरला आमचे मोठे दोस्त मोरोपंडित पेशवा व अण्णाजी पंडित होते, त्यांना भेटलों व नजराणे दिले. ८००० सैन्य घेऊन त्यांना तातडीनें जुन्नरला जावयाचें असल्यामुळें राजाला पत्र देण्यापेक्षां अधिक ते कांहींच करूं शकले नाहींत. मीं ६ सप्टेंबरला रायगडला पोंचलों व ७ तारखेला मला राजदर्शन झालें. मीं हकीकत सांगतांना राजा ओशाळून गेल्यामुळें त्यानें झोंप आल्याची बतावणी करून, आपल्याला त्यांतील कांहींच माहिती नाहीं असें उत्तर दिलें व विचार करण्यासाठीं मुदत मागून घेतली.

प्रल्हादपंडितानें बरीच खटपट केल्यावर १५ तारखेला तेथेंच पुनः मला राजानें बोलाविलें. 'आपल्याकडे अजून कांहींच कळलें नाहीं. फक्त कांहीं चांदीचीं मोडीं मिळाल्याचा दाखला आहे. अगदीं हलक्या सैन्यानें सहज लुटावें अशी बिनतटबंदीची वखार कोणींहि बाजारी लोकांनीं लुटली असल्यास तो गुन्हा अमच्या सेनापतीच्या अंगी चिकटविणें अन्यायाचें असल्यामुळें आपण भरपाई करून देण्यास बांधलों नाहीं.' इत्यादि त्यानें सांगितलें. पण 'मला धरून कैदी म्हणून सेनापतीनें नेलें; तेंव्हां त्याच्या माहितीशिवाय ही गोष्ट झाली नाहीं. समोरासमोर त्याला आणा. तो नाहीं म्हणूं दे' इत्यादि मीं बोललों तिकडे मात्र त्यानें लक्षच दिलें नाहीं. मीं सर्व वखारींकरितां कौलाची मागणी केली. त्याबद्दलहि विशेष आस्था न दाखवितां सुरत आदिकरून समुद्रकिनाऱ्यावरील बंदरांपुरती व्यवस्था तो करूं लागला! परंतु मीं चिकाटीनें आग्रह धरल्यामुळें सर्व वखारींबद्दल कौल देण्याचें कबूल करून, ते पाठविण्याचा चिटणीसाला त्यानें सर्वांच्या देखतच हुकूम दिला.

श्री. सं. ले. १३ } (१७७७) { श. १५९७ भाद्रपद व. ८
स. १०७६ जखर २१ } कौल'प्रतिपत्' मु. २ व सी. { इ. १६७५ सप्टें. २

अजर. रा. शि [illegible]राजे—मोकदम, उदमी व इतर लोक

ता सिवतर मौजे पारमाची कोंड नलवडा येथें पेठ रामनगर वसविण्याबद्दल **समर्थांनीं** आज्ञा केली आणि १२ वर्षेपावेतों दिवाणहसील माफ म्हणून सांगितलें. त्याप्रमाणें करणें.

सा. ले. १४४ सु. १०७६ } (१७७८) { श. १५९७ भाद्र. व. ११
जखर २४ फ. १०८५ } खुर्दखत { इ. १६७५ सप्टें. ५

बजाजी नाईक—कारकून, देशमूख व देशपांडे प्रा पुणें

ता सांडसपैकीं तुळापूर हे तेथील ब्राह्मणास अभार आहे. हाली पा भार आम्हास अर्जानी झाल्यामुळें सदर गांव त्या इनामदार ब्राह्मणास कुलबाब चालवावें यबाबा पत्र देत आहे. तरी चालविणें.

फॅ. रे. सुरत मा. १०७ } (१७७९) { श. १५९७ भाद्र. व. १३
पृ. १२४ इ. } मुंबई-सुरत { इ. १६७५ सप्टें. ७

**दंडाराजपुरीवर** हल्ला करण्याकरितां स्थलसैन्याचे जोडीलाच **आरमाराची त्यारी शिवाजी** करीत आहे. **दंडाराजपुरीवर** अंशतः सैन्य गुंतवून कदाचित् आणखी उत्तरेकडेहि **बादशाही मुलखांत** ही स्वारी जाईल; असेंहि कित्येक बोलतात. परंतु त्याचे बेत सुव्यवस्थित आणि गुप्तपणें होतात यामुळें कांहींच तर्क करितां येत नाहीं.

फॅ. रे. मुंबई मा. २ } (१७८०) { श. १५९७ भाद्र. व. ३०
पृ. १२६ इ. } मुंबई कन्सल्टेशन { इ. १६७५ सप्टें. ९

समोरच्या **शिवाजीच्या** मुलखातून आपल्या बेटाला बऱ्याच जरूरीच्या वस्तु मिळतात. तेथील लोकांनीं तेथें वखार घालण्याबद्दल वारंवार आग्रह केला; यामुळें प्रेसिडेंट व कांहीं कौन्सिलर अशांनीं तेथें प्रत्यक्ष जाऊन आपल्याला सोईस्कर अशा जागा पहाव्या.

सा. ले.२७५ } (१७८१) { श. १५९७ आश्विन शु. ४
सु. १०७६ रजब ३ } 'शिव.' मु. मर्या. सी. { इ. १६७५ सप्टें. १३

रा. **शिवाजी राजे— माहादाजी सामराज** सुबे व कार. ता मावळ.

बकाजी फर्जंद,साहेब कामावरी कस्टमशागती करितो. याबदल साहेबी मौ. खामगाव येथील स्वतःचें पाटिलकी वतन बकाजीस दिलें असे. तें चालविणें.

फॅ. रे. सुरत मा. १०७ } (१७८२) { श. १५९७ आश्वीन शु. ७
पृ. १३६ इ. } रायबाग-मुंबई. { इ. १६७५ सप्टें. १५

नबाब **बहलोलखानाला**, विजापूरच्या बालराजानें म्हणजे **खवासखानानें**, मोंगल

सेनापती बहादरखान यांशीं संगनमत करून शिवाजीचा नाश करण्याचे बाबतींत सल्ला विचारण्याकरितां बोलाविल्यामुळें बहलोलखान आपली पावसाळी छावणी ( मिरज ) सोडून १० दिवसांत विजापुरास जाणार आहे.

सा. ले. ५८ } (१७८३) { श. १५९७ आश्वीन शु. ९
सु. १०७६ रजब ७ } { इ. १६७५ सप्टें. १७

मल्हारजी यशवंतराऊ व महादजीराम प्रा सिरवळ—पंताजीपंत वोकील

छत्रपती स्वामींच्या आज्ञेप्रो; शिरवळ येथें आपणास घर बांधावयास जागा मिरास करून दिल्ही आहे.

सा. ले. २७६ व २७७ } (१७८४) { श. १५९७ आश्वीन शु. १०
सु १०७६ रजब ८ } 'शिव.' मु. व मर्या. सी. { इ. १६७५ सप्टें. १८

रा. शिवाजी राजे—महादाजी सामराज सुवे व कार. का मावल.

वकाजीच्या बापानें साहेबाचेथे कस्ट मशागत केली. तेव्हां कैलासवासी साहेबानी विकत घेतलेली खामगावची पाटिलकी वकाजीस दिली आहे. ती चालविणें.

सा. ले. २७८ } (१७८५) { श. १५९७ आश्वीन व. २
सु १०७६ रजब १५ } { इ. १६७५ सप्टें. २५

अजर० रा. शिवाजी राजे—वकाजी फर्जंद

कस्ट मशागत केलीस व पाटिलकी वतन जाहालिया गोतांत इज्जत आहे. सबब ( ले. १७८४ प्रमाणें ) ती दिली आहे.

सा. ले. २७९ } (१७८६) { श. १५९७ आश्वीन व. २
सु. १०७६ रजब १५ } { इ. १६७५ सप्टें. २५

अजर० रा. शिवाजी राजे—कार. व देशमूख का मावल:-(मज.सा.ले. २७६ प्रमाणें.)

सा. ले. २८० } (१७८७) { श. १५९७ आश्वीन व. २
सु. १०७६ रजब १५ } { इ. १६७५ सप्टें. २५

महादाजी सामराज—माहादाजी नरस प्रभू हवा. कार. का मावल.

साहिबाच्या हातरोख्याप्रमाणें ( ले. १७८४ ) वागणें.

(द्वि.) ओ. कॉ. मा. ३६ } (१७८८) { श. १५९७ आश्वीन व. ४
नं. ४११५ इ. } प्रेसिडेंट, सुरत–गिफर्ड, मुंबई { इ. १६७५ सप्टें. २८

पोर्तु०, मोंगल सुभेदार, फ्रेंच व डच हे सर्व आपल्यापरीनें येथें आम्हांला सतावण्यास झटत असतां, शिवाजी मात्र,—त्याच्या स्वतःच्या हिताकरितांच कां होईना—आमचा

उत्तम मित्र आणि उदार शत्रू ठरला आहे. ( Savajee onely hath proved,...,our fairest friend, and noblest enemy.)[प]-शिवाजीच्या मुलखांतील व्यापारापासून कंपनीला बराच फायदा होईल अशी माझी अपेक्षा आहे आणि कौन्सिसमध्येंहि याची बरीच चर्चा झाली आहे. तरी शिवाजीशीं असलेल्या स्नेहाला अधिक उत्तेजन द्यावें.

(से) फॅ. रे. सुरत भा. १०७ } पृ. १३१-३२ इ. (१७८९) राजापूर [?]-मुंबई { श. १५९७ आश्वीन शु.१० इ. १६७५ आक्टो. ४

शिवाजीकडून सोयतचे कौल व पत्र आलें. त्यापैकीं इकडले इकडे ठेवून बाकीचें कौल व एकंदर कौलांची नावनिशी प्रेसि०कडे पाठविली आहे.

ओ. कॉ. नं. ४१२७; सुरत-कारवार; ता. ९ नोवें. —शिवाजीचा कौल किंवा पास पाठविला आहे. त्याचे सुभेदार किंवा सेनापती यांचा त्रास झाल्यास उपयोग करावा.

सा. ले. ११० } मु. १०७६ रजब २७ (१७९०) फा. मु. व सी. { श. १५९७ आश्वीन व.१४ इ. १६७५ आक्टो. ७

माहादाजी सामराज सुबे.—माहादाजी नरसप्रभू सुबे. मावले

सिदंभट ठकार यानें पत्र आणलें ( महाराजांचें ) कीं, " चंद्रभटास निसबती नसतां सिदंभटाच्या का मावळच्या ९॥ गांवांच्या कुळकर्णाबदल खलेल करतो. तरी चौकशी करून इनाम स्वाधीन करणें." चौकशी करितां चंद्रभट खोटा झाला. तरी उक्त गांवांचें कुलकर्ण सिदंभट करवी घेणें.

फॅ. रे. सुरत भा. ८८ } पृ. ११३ इ. (१७९१) सुरत-मुंबई. { श. १५९७ आश्वीन व.३० इ. १६७५ आक्टो. ८

सुरतेचें आरमार सिद्दीसंबूळचा भाऊ सिद्दीकासम याचे सेनापत्याखालीं दंडाराजपुरीस जात आहे. त्यावेशीं चांगली वागणूक ठेवावी. त्यायोगें येथील सुभेदारास बरें वाटून बादशहाकडे त्याप्रमाणें शिफारस केली जाईल.

खं. १८ ले. २१ व सा. ले. २८१ } श. सु. १०७६ रजब ३० (१७९२) महजर. { श. १५९७ कार्तीक शु. २ इ. १६७५ आक्टो. १०

मौजे खामगांवची पाटिलकी कदीम लोहकराची. त्यांनीं पायगुडे यांस व पायगुड्यांनीं रा. साहेबास विकत दिधली. व साहेबानी बकाजीस दिल्ही. यास हिलाहरकती करील तो गोताचा खोटा.

फॅ. रे. सुरत भा. ८८ } (१७९३) { श. १५९७ कार्तीक शु. ६
पृ. ११६ इ. } सुरत-मुंबई. { इ. १६७५ आक्टो. १४

शिवाजीचे कौल मिळाले....या वर्षी शिवाजीची भीती वाटूं लागली आहे.

ओ. कॉ. नं. ४१२३ ता. २६ आक्टो., सुरत-कपनीः-शिवाजीची भीती वाटूं लागली आहे.

फॅ. रे. सुरत भा. ८८ पृ. १२८, सुरत-मुंबई. ता. ६ डिसें. चे पत्रांत, सुरतेची शिवाजीची भीति कांहीशी कमी झाली आहे, असें लिहिलें आहे.

खं. १५ ले. १३५ } (१७९४) { श. १५९७ कार्तीक शु. ७
सु. १०७६ साबान ५ } मिसेली फा. मु. मज. { इ. १६७५ आक्टो. १५

जगदेऊराऊ नाईकसाहेब

हुदेदारानि व मोकदमानी मो पापरडे ता मोरगीर मरली.

मो निंब येथील सदानंद मठपती कमलनयनगिरी यास निम चावर देसील हक दिधले आहे. चालवीजे.

सा. ले. ११२ } (१७९५) { श. १५९७ कार्तीक शु. ८
(सा. ले. ११०) साबान ६ } { स. १६७५ आक्टो. १६

माहादाजी नरसी हवाल० का मावल.—सिदंभट ठकार

८ गांवांचें कुळ० तुम्हाकडे. मधेंच चद्रामटानें खलेल केली. वाजीपुसीकरितां चंद-मट खोटा ठरला. तेव्हां काम सिदंभटाकरवी घेणें.

राम. अं. ६५-६६ } (१७९६) { श. १५९७ मार्गशीर्ष शु. १
ले. १७ श. } पुरोहितपण. { इ. १६७५ नोवें. ८

?— कृष्णाजी त्रिमलः — शंकरभट पुराणीक वेरूळचे आमचे पुरोहित.

रत्नाकर. १९२७ पृ. ६२३ } (१७९७) { श. १५९७ मार्ग. शु. ११
सु. १०७६ रम १० } { इ. १६७५ नोवें. १८

दा। बा। धनको नाम जयचंदी भाई व जमामाव बावानभाई मुकाम मलवडी यास रिणको नाम बजाजी नाईक निंबाळकर व सावित्रीबाई महादाजी नाईक निंबाळकर देशमुख प्रां फलटण सुा...... कारणें लिहून दिल्हा कर्जकतबा ऐसा जे, बदल खान अजम आबदलाखान यामी पातशहांनीं साहेबी सिवाजी राजेवरी मसलत केली. ते वख्ती आवदलाखान कुचावर कूच करून मलवडीवर उतरले. ते वख्ती अम्हाबदल सिवाजी राजे याणीं नाईकजी राजेस बहुत प्रकारें कागद लिहिला होता. तो आम्हास दस्त करून गल्यांत तोफ घालून सुनता करून हातीच्या पायाखाले घालून मारावे. तो नाईकजी राजे

यांनीं बहुत कांहीं आडमूड (जुड) होऊन आबदलाखानास अर्ज केल्यावरी साठी हाजारावरी करार करून होन ६०००० साठी हाजारावर दरम्यान नाईकजी राजे पांढरे जमान होऊन सोडविले. त्यास पंचोत्राप्रमाणें व्याज करून मुदत दोन वर्षांत तुमचे व्याजमुदल देऊ. जर न देऊ तर आपले फलटणची देसमुखी तुमची आसे. कांहींएक हरकत करूं तरी श्रीमाहादेवाची व श्री विठोबाची आण आसे. हा कतबा सही

गोही–१रतनजी माने देशमूख कसबे म्हसवड १ मलजी राजे पांढरे १ रवीराव ढोणे १ जाधवराव देशमूख दवलताबाद १ धुळाजी राजे सडगे १ देवजीराजे घायगुडे १ तानाजी राजे काकडे १ दत्ताजी माने देशमूख दर्यात मलवडी १ नाईकजी राजे विा विठ्ठल मालेरावजी दिवाण निा नाईकजी राजे पांढरे हे नक्कल.

| | | |
|---|---|---|
| ओ. कॉ. मा. ३६<br>नं. ४१३९६. | (१७९८)<br>मुंबई-कंपनी | श. १५९७ मार्ग. व. ४<br>इ. १६७५ नोव्हें. २६ |

**शिवाजीचा** आमचा स्नेह आहे. परंतु स्वार्थाकरितां सपथ किंवा वचन मोडण्यास तो नेहमीं तयार असल्यामुळें त्याच्यावर विश्वास ठेवण्याची सोय नाहीं. आज अनेक कामें त्याच्या पुढें असल्याकारणानें मात्र, इतक्यांतच त्याच्यापासून भय दिसत नाहीं.

मोंगलांनीं त्याची पाठ घेतली असून त्यांचें सैन्य **कल्याण-भिवंडीपर्यंत** आलें आहे. मोंगलांचा सेनापती **बहादरखान** याची बादशहानें खरड काढल्यामुळें या उन्हाळ्यांत शिवाजीची खोड मोडण्याचा निश्चय करून, त्यानें दख्खनचा राज्यरक्षक **(Protector) खवासखान** याच्या घराण्यांत शरीरसंबंध केला. आणि आदिलशाहा व शिवाजी यांचा तह अगदीं होण्याच्या बेतांत होता तो मोडण्यास लाविलें. अर्थात् आत. **विजापुरकरांचें दुसरें मोठें सैन्य** शिवाजीवर येणार. दंडाराजपूरचा **सिद्दी**देखील सुरतेहून मोठीं दोन लढाऊ जहाजें, धान्यें व युद्धसामुग्री व २००० नवे लोक अशी भरती करून किनाऱ्यानें शिवाजीचीं गलबतें जाळण्यास पहात आहे. परंतु कोणत्याहि बंदरांत त्याला आरमाराची जाळपोळ करण्यास न मिळाल्यामुळें त्यानें **वेंगुर्ले** आदिकरून नगरें जाळलीं. मग शिवाजीचीं ५७ छोटीं गलबतेंहि बाहेर आलीं....दोघांचीहि खाशी झुंपून आम्हांला **दोघांचाहि त्रास होतो** तो एकदांचा मिटेल तर बरें होईल.

एकंदरींत शिवाजीला पुरेशा अडचणी आहेत. त्यांतून तो कसा बाहेर पडतो तें पहाणें आहे.

**ऑर्म ११४-४ पृ. १६४:-शिवाजी** आणि **पोर्तु०यांचें** प्रत्यहीं भांडण होतें. ते त्याच्या जातीच्या अनाथ मुलांना, **रोमन कॅथोलिक धर्माची दीक्षा** देतात म्हणून तो त्यांचा **फार द्वेष करितो.** याच कारणानें पोर्तु० लोकांत आपसांतहि वाद होतात. **वसईच्या** कॅप्टन जनरलनें कांहीं पोरक्या मुलांचा पक्ष घेऊन तेथील जेसुइट लोकांना त्यांची मालमत्ता परत देण्यास लाविलें.

ऑर्म भा. ११४ वि. ४ } (१७९९) { श १५९७ मार्ग. व. १३
पृ. १७१ इ. } मुंबई-सुरत { इ. १६७५ डिसें. ४

**मोंगल** सैन्य कल्याणजवळ आलें होतें. परंतु पेशव्यानें त्यांना १० हजार होन रोख पोंचविल्यामुळें तें कांहींहि न करितां परत फिरलें.

सा. ले. १११ } (१८००) { श. १५९७ पौ. शु. ४
१ सवाल ३ } 'शिव.' मु. व सी. { इ. १६७५ डिसें. १०

**मोरो त्रिमळ व निळो सोनदेऊ**—दादाजी बाबाजी परभू हवा. व कार० ता। खटकुवासले व माण

विनायक भट ठकार यांचेकडून २५ रु. उचापती नेली आहे.

हाग. रजि. १७७५ } (१८०१) { श. १५९७ पौष शु. ८
पृ. ३४५ इ. डिसें. २४ न्यू. } { इ. १६७५ डिसें. १४

वेंगुर्ल्याकडील (सिलोनमध्यें प्रचलित असलेल्या) बातमीवरून निर्भयपणें सगळीकडे हिंडणान्या **शिवाजीचें** विजापूरकर व कानडातील राजे यांच्याशीं युद्ध सुरू आहे असें कळलें. त्यामध्यें त्याला कधीं हारहि खावी लागली आहे. पण त्यावेळीं **गोव्याच्या** इतक्या नजीक तो येऊन पोहोंचला होता कीं, **पोर्तुगीज** लोक भयग्रस्त होऊन गेले होते.

ऑर्म भा. ११४ } (१८०२) { श. १५९७ पौष व. १०
वि. ५ पृ. ३ इ. } मुंबई-सुरत { इ. १६७५ डिसें. ३१

**पोर्तु०च्या सिबॉन ? (Sibon)** नांवाच्या किल्ल्यासमोरच दोन गढ्या शिवाजी बांधूं लागल्यामुळें त्यांचें युद्ध जुंपलें. पोर्तु०च्या विरोधाला न जुमानतां शिवाजीचें काम चाललें आहे. त्याला यश आल्यास त्याचा पोर्तु०वर मोठाच दाब पडेल.

ऑर्म भा. ११४-५ } (१८०३) { श. १५९७ माघ शु. ३
पृ. ५ इ. } मुंबई-इंग्लंड { इ. १६७६ जाने. ८

बर्क्ले कॅसल जहाजावरून २४ पौंडी १३ लोखंडी तोफा आल्या. त्यापैकीं कांहीं **शिवाजीला** दिल्यामुळें, आम्हांला स्वतःकरितां तोफा पाहिजेच आहेत.

ओ. कॉ. भा. ३६ } (१८०४) { श. १५९७ माघ शु. ६
नं. ४१६३ पृ. १०-११ इ. } सुरत-कंपनी { इ. १६७६ जाने. ११

**राजापुरास** वखार घातल्यानंतर युरोपला पाठविण्याकरितां माल मिळावा म्हणून पुष्कळ पैसा लाविला होता. परंतु देशांतील **युद्धाच्या गडबडीमुळें** मालाची

जमवाजमव झाली नाहीं. पाऊसहि अवेळीं कोसळून काफिले नेहमींपेक्षां पक्षा एक महिना उशीरां आले. चाइल्ड सर्व वेळ मालाच्या शोधांत इतस्ततः संचार करीत असल्यामुळें शिवाजीच्या करारार्ची (राजापूर लुटीबद्दल) अमलबजावणी अद्याप झाली नाहीं. वर्ष दोन वर्षांत ह्या वखारीचा फायदा दिसूं लागेल.

फॅ. रे. सुरत मा. ८९ पृ. १० इ. (१८०५) राजापूर-सुरत — श. १५९७ माघ शु. ६ इ. १६७६ जाने. ११

नाना तऱ्हेच्या बातम्या येतात. **शिवाजी** मेला असें कित्येक बोलतात; फार आजारी आहे असें दुसरे बोलतात; **बहलोलखानानें** विजापुरास बोलाविल्यामुळें तिकडे जाण्याकरितां म्हणून **पन्हाळ्याला** तो सर्व सैन्य एकत्र जमवीत आहे; अशीहि एक बातमी आहे. नबाब बहलोलखानानें **खवासखानाला** कैद करून, तरुण सुलतान आपल्या ताब्यांत घेऊन, विजापूरचा मुख्य कारभार आटोपला आहे; अशी दाट वदंता आहे. **खवासखानाला बहलोलनें मारलें** अशीहि एक विश्वसनीय बातमी वरच्या लोकांत पसरली आहे.

फॅ. रे. मुंबई मा. २ पृ. ६ (२) इ. (१८०६) मुंबई कन्सल्टेशन — श. १५९७ माघ शु. ८ इ. १६७६ जाने. १३

आपलीं **पेणला** असलेलीं पांच गलबतें सिद्दीनें जाळूं नयेत म्हणून सुरक्षितपणासाठीं मुंबई बंदरांत ठेवण्याबद्दल **शिवाजीनें** बरींच पत्रें पाठविल्यावरून त्याला तशी मोकळीक द्यावी. मात्र **सिद्दीनें** त्यांना तोशीस दिल्यास इंग्रजांवर कोठल्याहि तऱ्हेची जबाबदारी नाहीं असें त्याच्यापासून [under his hand and seale] लिहून घ्यावें. सिद्दीला अशाच तऱ्हेची सवलत अनेक वेळां दिली गेल्यामुळें त्याला यांत तक्रार करण्याला जागा नाहींच.

सं. २० ले. १४३ व १४६ मु. १०७६ जिल्काद १० (१८०७) मिसेली फा. मु. मज. सी. — श. १५९७ माघ शु. ११ इ. १६७६ जाने. १६

अज्ञ दि. पा बाई— मोक. सौ. खेड व तइवले

अपदे विष्णु चित्राव याचा वरील गावी असलेला इनाम पूर्वीप्रमाणें चालविणें.

सं. २० ले. १४४ व १५० मु. १०७६ जिल्काद १० (१८०८) मिसेली-फा. मु. मज. सी. — श. १५९७ माघ शु. ११ इ. १६७६ जाने. १६

अज दि० पा बाई—मोक० पा मज०

नरसी रंगो चित्राव याचा गावगन्नाचा सादिल्वार चालविणें (होन १०).

सा. ले. १४५ व १४८ } (१८०९) { श. १५९७ माघ शु. ११
सु. १०७६ जिल्काद १० } मिसेली फा.मु. मज. सी. { इ. १६७६ जाने. १६

अज दि. पा। वाई—मोक० मौ. पसरणी.

नरसो रंगो चित्राव याचा सिद्धनाथवाडीचा इनाम चालविणें.

खं. २० ले. १४७ व १४९ } (१८१०) { श. १५९७ माघ शु. ११
सु. १०७६ जिल्काद १० } मिसेली फा. मु. मज. सी. { इ. १६७६ जाने. १६

अज दि. पा। वाई—मोक० देहाय बोरखल वगैरे.

नरसी रंगो व एकनाथ रामेस्वर चित्राव यांचा वरील गांवांचा इनाम चालविणे.

ऑर्मे. ११४–५ } (१८११) { श.१५९७माघ शु. १२
पृ. १२ इ. } मुंबई–सुरत. { इ. १६७६ जाने. १७

**शिवाजीचें मृत्युस्थान**, त्याचा रोग, आणि पुरण्याची तऱ्हा आणि जागा अशा संपूर्ण तपशिलासह शिवाजीचा मृत्यु, व और्ध्वदेहिक विधी यांबद्दल गेले कित्येक दिवस बातमी ऐकूं येते. शिवाजीच्या एका मुख्य ब्राह्मणाच्या मुलीशीं **संभाजीनें** व्यभिचार केला. तिला भेटण्यासाठीं रात्रीं गडाखालीं जाण्याचें त्यानें न सोडल्यास त्याचा कडे-लोट करण्याचा हुकूम शिवाजीनें दिल्याचें ऐकून संभाजीनें त्याला **विषप्रयोग** केला असें कित्येक बोलतात. तो आजारी होता आणि त्याचा आजार मुख्यत: त्याच्या डोक्यांतील भयंकर कळांमुळें होता ( कारण त्याचा मेंदू बहुतेक कुजला होता ! ); इतकें आम्हांला खात्रीलायक माहीत आहे. डे० प्रेसि० च्या एका नोकराला सिद्दीसंबूळ-कडून शिवाजी मेला असें कळलें. दाभोळ, कल्याण, चौल वगैरे ठिकाणचे व्यापारी तसेंच बोलतात. परंतु त्यावर फारसा विश्वास ठेवतां येत नाहीं. कारण **मोरोपंडित** माहुलीखालीं ससैन्य आहे. तो अद्याप तेथून हालला नाहीं.

सदरः—**जाने. २७** ( पृ. १५ ) पर्यंत निश्चित बातमी नव्हती. ' मृत्यु, मोठा आजार आणि पूर्ण आरोग्य असे त्रिविध प्रकार बातमीचे आहेत.'

**(दि.)** ओ. कॉ. } (१८१२) { श. १५९७ माघ शु. १२
नं. ४१६३ इ. } सुरत–कपनी. { इ. १६७६ जाने. १७

राजापुरास गमविलेल्या गोळ्यांबद्दल **शिवाजीनें** कानावर हात ठेविल्यामुळें तपास केला असतां असें कळतें कीं, त्यांपैकीं कांहीं विजापुरी सेनापती **सिद्दी** जौहार याला विकले; आणि वाकींचे वखारीची लूट झाली त्यावेळीं तेथेंच होते; ते नंतर शहरां-तील लोकांनीं लुबाडले. [ पहा मागें ले.८७४ व १५७० कलम १]

... रे. सुरत मा. ८९ } (१८१३) { श. १५९७ माघ व. ४
पृ. १३६. } सुरत-मुंबई. { इ. १६७६ जाने. २४

**शिवाजीनें** स्वतःकरितां आणि आपले सुभेदार व शिपाई यांच्याकरितां कंपनीकडून आणि मुंबईच्या व्यापाऱ्यांकडून खरेदी केलेल्या जिनसांच्या द्यावयाच्या रकमेबद्दल गोवळकोंड्याच्या एका इसमावर **हुंडी दिली** होती. ती परत आल्यामुळें तिची भरपाई करुन घेण्याकरितां दलाल गिरिधरदास, नारायण शेणवी आणि एक दोन इंग्रज पाठवून द्यावे. त्यांचेबरोबर सोबतचीं शिवाजी व मोरोपंत यांच्या नांवचीं पत्रें पाठवावीं. आणि या देण्याचा उलगडा न केल्यास स्नेहामध्यें बिघाड केल्याची जबाबदारी आमच्यावर नाहीं असें खडखडीत बोलून, या लोकांना परतच यावें लागलें तर त्यांचे जबाब घेऊन आमच्याकडे पाठवावे.

**शिवाजी मेल्याची बातमी आहे.** तेव्हां या बाबतींत निश्चित कांहीं कळेपर्यंत हातची हुंडी घालवून बसावें किंवा कसें याचा विचार करावा.

खं. १५ ले. १३६ } (१८१४) { श. १५९७ माघ व. ५
सु. १०७६ जिल्काद १९ } मिसेली म. मु. व सी. { इ. १६७६ जाने. २५

अज दि. सुभा वाई—मो. गोवें:—गोसाव्याच्या इनामाबद्दल कथला न करणें.

स. पृ. १३२ ले. १७ } (१८१५) { श. १५९७ माघ व. ७.
सु. १०७६ हि. १०८५ जिल्काद २१ } { इ. १६७६ जाने. २७

रा. **शरीफजी राजे** मोसले—निळकंठ गंगाधर त्रिंबककर

प्रत्यहीं १५० शिवलिंगें करणें. २५रु. देकं. त्यावर मनमुक्त झाली म्हणोन आपणास १०८ रु. वर्षासन केलें.

राम. अं. ६३-६४ ले. १ } (१८१६) { श. १५९७ माघ व. १३
श. सु. १०७६ जिल्काद २६ } महजर स्थल—पाली. { इ. १६७६ फेब्रु. १

खराडे व काळभोर यांजमध्यें पालीच्या मोकदमीचा तंटा लागला असतां दिव्य होऊन खराडे खोटे निघाले. या दिव्याचे वेळीं, **शिवछत्रपती**, हरजी राजे महाडीक, रघुनाथ नारायण, मोरो त्रिमल, दत्ताजी त्रिमल, निराजी रावजी, नारो निळकंठ, प्रतापराव, वगैरे गृहस्थ हजर होते.

ओ. कॉ. मा. ३६ } (१८१७) { श. १५९७ माघ व. १४
नं. ४१७५ इ. } सुरत—कंपनी. { इ. १६७६ फेब्रु. २

**डुमगांवच्या** बाबतींत शिवाजीकडे स्वतः ऑस्टिननें जाऊन केलेल्या बोलण्याला यश आलें नाहीं. ' आपण शत्रूच्या मुलखांत **न्याय्य युद्ध करीत** असतां

कोणाचें नुकसान झालेलें भरून देण्यास बांधलों नाहीं.' असें तो म्हणाला. त्या वेळच्या सेनापतीनें केलेल्या अत्याचाराबद्दल त्याला दोष देऊन, यापुढें असें होऊं नये म्हणून त्यानें तेथील व इतर वखारीकरितां कौल देऊन ठेविले आहेत. त्यांची शाश्वती कितपत मानावी हें संशयीतच असल्यामुळें आम्ही कोटेंहि किमान जरूरीपेक्षां अधिक पैसा गुंतविणार नाहीं.

खं. २० ले. १५१ } (१८१८) { श. १५९७ फाल्गुन शु.३
सु. १०७६ जिल्हेज १ } { इ. १६७६ फेब्रु. ६

अज दि. ठाणें वाई—मोक० मौ. पसरणी

नरसीभट चित्राव याच्या पसरणीच्या इनामाच्या बाबी त्यास पावत्या करणें.

फॅ. रे. सुरत मा. ८९ } (१८१९) { श. १५९७ फा शु. ५
पृ. १७ इ. } सुरत–मुंबई { इ. १६७६ फेब्रु. ८

ऑस्टिनच्या नुकसानीचें स्मरण ठेवून त्वरेनें भरपाई मिळवा. शिवाजी मेलाच तर बिचाऱ्याला एक पैहि मिळणार नाहीं।

[ से ]–जॉन चाइल्डनें लिहिल्यावरून असें समजतें कीं, राजापूरच्या सुभेदाराजवळ **करारान्वयें** विकण्याकरितां नारळ आहेत. ते आणण्यासाठीं गलबतें त्वरेनें पाठवावीं.

फॅ. रे. मुंबई मा. २ } (१८२०) { श. १५९७ फा शु. १५
पृ. ९ (२) इ. } मुंबई कन्सल्टेशन { इ. १६७६ फेब्रु. १९

हुंडीबद्दल **मोरोपंडितांचें** सामोपचाराचें पत्र आलें कीं, 'गोवळकोंड्याचा इसम पैसा घेऊन शिवाजीकडे परत आल्यामुळें **हुंडीचा घोटाळा** झाला. आतां शिवाजीकडे हस्तक पाठवून पैसे आणावे.' त्याप्रमाणें दोन एतद्देशीय इसम पाठवून काय होतें तें पहावें.

सा. ले. १२३ } (१८२१) { श. १५९७
सु. १०७६ } { इ. १६७५-७६

राघो वळाळ—१:—महाराज साहेबांचे खुर्द० माहाद मुद्गल पुरंदरे यानीं दाखविलें. त्याप्रो परवती, पिंपळे, पिपरीं गावांचें इनाम चालविणें.

सा. ले. ५८ } (१८२२) { श. १५९७
सु. १०७६ } { इ. १६७५-७६

मल्हारजी येशवंत देशमूख निगडे व महादजी राम देशकुलकर्णी प्रगणे शिरवळ पंताजीपंत बोकील

रा. छ. स्वामीनीं आज्ञापत्रीं लिहिलें कीं 'आपणास उत्तम स्थळ पाहून वाडा मिरास करून 'देणें' तरी शिरवळ येथें दिवाण-वाडियाचे पश्चिमेस ८०-६० हात जागा दिली असे. वाडा बांधोन राहणें.

| | | |
|---|---|---|
| फ्रायर भा. १ पृ. ३०७-३०९ इ. | (१८२३) उल्लेख. | श. १५९७. इ. १६७५ |

वसईच्या खाडींतून दर जातांना मुखाजवळील पोर्तु० मुलूख संपल्यावर कल्याण पासून एक दोन मैलांवर शिवाजीचा मुलूख लागतो....कल्याणची दुर्दशा झाली आहे. तथापि बेकार लोक श्रीमंतांच्या कबरस्थानांचा धर्मस्थळें म्हणून आश्रय करून राहिले आहेत. ते तसें न करतील तर गांवांतील ठिकाणीं असलेल्या इमारतींत धान्याचीं कोठारें ठेवण्याचा शिवाजीनें हुकूम दिला आहे. [ पृ. ३४१-४३ ]- लूट नाहीं तर सैन्याला पगार नाहीं असा शिवाजीचा दंडक आहे....देशस्वातंत्र्यापेक्षां प्रत्येकाला खाल्ल्या मिठाची चाड अधिक असल्यामुळें हिंदू किंवा मुसलमान हे भिन्न धर्मीयांच्याहि सैन्यांत आढळतात. घोडेस्वारांत बहुतेक मुसलमान व पायदळांत (तोडयाच्या बंदुकावाले) हिंदू असतात.

| | | |
|---|---|---|
| आठल्येसंग्रह सु. १०७६ | (१८२४) उल्लेख. (महजर श.१६१४ माद्र.शु.८) | श. १५९७-१५९८ ज्येष्ठ. इ. १६७५-१६७६ मे २४ |

सन सीत सबैनामध्यें, राजश्री कैलासवासी, छत्रपती स्वामी व राजश्री प्रधानपंत व राजश्री अमात्यपंत व राजश्री थनाजीपंत व राजश्री दत्ताजीपंत ऐसे किल्ले पनालियास आले. ते समयीं ता। मजकूरचे देशक व गावगना मिरासदार हुजूर गेले. (आठल्येहि गेले. त्यांनीं 'राजश्री छत्रपती स्वामींस' व 'राजश्री सरकारकुनास' सांगितलें. कागद दाखविले. देसक आले होते त्यांस शिवाजी महाराजांनीं विचारलें व खात्री झाल्यावर ) पत्र राजश्री रामाजी अनंत सुभेदार यास दिधले. ( पहा ले. १८२९)

| | | |
|---|---|---|
| आठल्येसंग्रह सु. १०७६ | (१८२५) उल्लेख-(आठल्येवादांतील मितीहीन कागद.) | श. १५९७-९८ इ. १६७५-७६ |

श्रीमंत कैलासवासी छत्रपती महाराज यांसंनिध पनाळे याचे मुकामीं आपले वडील जाऊन वर्तमान विदित केलें.......मनास आणून आमचे वतन आम्हांस बहाल केलें आणि ताकीदपत्रें दिलीं. त्याउपरी मागती... रेमणे घाटीच्या मुकामास हुजूर छत्रपती महाराजे यांसंनिध जाऊन शामजी नाईक पुंडे यांचे क्षिपमानें दक्षिणावर्ति शंख नजर करून विनंति केली....अमानत पत्रें आणिलीं....त्याउपरी हुजूर जावें तों महाराज थोरले कैलासवास थोडकेयाच दिवसांमध्यें जाहला.

आठल्येसंग्रह
सुमारें सु. १०७६ } (१८२६) उल्लेख (आठल्ये करीणा श. १६७९) { श. १५९७-९८ / इ. १६७५-७६

उपरांतिक कैलासवासी थोरले छत्रपती यांच्या राज्यांत मौजे कोंडगांव येथें...मराठ्याचे घरीं लग्न झालें.... ...उपरांतिक कै० थोरले छत्रपती सरकारकुनांसमवेत किले पनाळियास आले तेव्हां महालाचे देसक अवघे श्री स्वामीसंनिध गेले...... त्यावरून छत्रपती यांणीं आज्ञापत्र सुभां सादर केलें जे...

आठल्येसंग्रह
सु. १०७६ } (१८२७) उल्लेख-(वृत्तांत पत्र १६४७ वैशाख शु. ८) { श. १५९७-९८ / इ. १६७५-७६

श्रीमंत राजश्री पंतप्रतिनिधि स्वामीचे सेवेसी विनंति सेवक केसाबा नाईक सरदेसाई किले विशाळगड ( वृत्तांत कथन ).

सन सीत सबैनामध्यें राजश्री कैलासवासी थोरले छत्रपती सरकारकुनां समवेत पनालियासी आले. त्यांचे दर्शनास आम्ही अवघे देसक व गांवगनाचे खोत व न्यायकवाडी ता मार गेले. ते समयीं आठलियेहि गेले ( तेथें आठलियांनीं खटला पुढें मांडला व पूर्वे पत्रें दाखविलीं ]. त्यावरी राजश्री छत्रपती स्वामी व राजश्री सरकारकून स्वामी यांणीं पूर्वे पत्रार्थ मनास आणून आम्हां समस्तांस पुसिलें [ आम्हीं आठल्ये खरे असें सांगितलें ] त्यावरून राजश्री छत्रपती स्वामीनें आपलें पत्र करून दिल्हें......... त्यावरी रेमणे राजश्री संनिध वाईचे मुकामास जाऊन विनंति केली...व अमानतपत्रें आणिलीं.

सा. ले. १०० रा. श. २
सु. १०७६ जिल्हेज २९ } (१८२८) न. { श. १५९८ चैत्र शु. १ / इ. १६७६ मार्च ५

?—पदाजी वाटे मोक० मौ० केजळ ता। निरथडी

मानजी पा। यानें तुम्हांस दत्तक घेतलें. पुढें मानजीस मुलगे झाले. तुम्ही रसला. तरी तुम्हास वडिलपणा व इतर उत्पन्नाची यथान्याय तक्सीम दिली आहे.

आठल्ये संग्रह
सु. १०७६ जिल्हेज २९ } (१८२९) तालीक { श. १५९८ चैत्र शु. १ / इ. १६७६ मार्च ५

मशहूरुल हजरती राजश्री रामाजी अनंत सुभेदार व कारकून सुभा तरफ प्रभावळी प्रति राजश्री शिवाजी राजे दंडवत त्रिमलभट बिन बापदेभट व जनार्दनभट बिन पुर्शोत्तमभट व हरीभट बिन गोविंदभट व रुद्रभट बिन विश्वनाथभट आठोले उपाध्ये ता। देवले कसबा देहाय. हुजूर येऊन मालूम केले कीं उपाध्यपण मिरास आपले वडिला वडिलापासोन खात आलो आसो. दरिवस्त मौजे साखरपे व त्यामोवते गाव ऐसे आठ ८ आठा गावास गोविंदभट रेमणा दखल होतो कीं उपाध्यपण आपले म्हणौन नवाच कथळा करितो कांहींहि निसबत, धरीन नाहीं म्हणौन. तरी साहेबी त्यास

ताकीद करून (इ) लखुद ठेविले पाहिजे म्हणौन. त्यावरुन ता। माचे देसक हुजूर आले होते त्यासहि पुसता बोलिले जे, उपाध्यपण मिरास आटोलियाचीच आहे आठ गावहि यासच भोगवटा चालतो. गोविंदभट नसती करकर करितो म्हणौन तरी नसती करकर गोविंदभटास करावया काये गरज आहे, हली त्यास ताकीद करणें की आठा गावी उपाध्यपणास दखल न होय. आटोलियाचे वृत्त आटोलियास भोगवटा सालाबाद चालत आला असे तेणे प्रमाणे बिला कुसूर चाले ते करणें. मागती फिर्याद येऊ न देणे तालीक लेहोन घेऊन असल परतून देणे.

सा.ले. ५१ } (१८३०) { श. १५९८ चैत्र शु. २
सु. १०७६ मोहर १ } ता। { इ. १६७६ मार्च ६

रा. **शिवाजी राजे**—रामोजी व खंडोजी जगधाप मो. सुपे खु॥ येथील पाटिलकी निलकंठराऊ, काटककर, धणगर यांची असतां तुम्ही कथळा करितां. ताकीद केली तरी धनगराची माणसें धरऊन बंदीं घातले आहेत. तरी साहेब कैसे राजी राहतील. खराडे खोटे जाले तैसे तुम्ही आहां. वाद हुजूर सांगणें. काटकराचा व तुमचा निवाडा होईल. धनगराचे वाटे नव जाणे.

सा. ले. ६० } (१८३१) { श. १५९८ चैत्र शु. २
सु. १०७६ मोहर १ } { इ. १६७६ मार्च ६

रा. **शिवाजी राजे** — राघो बल्लाळ सुभे. सा। चनर

(इतर मज. ले. १८३१ प्रमाणें असून जास्त मज.) जगधापानी तुम्हास सांगोन धनगराची माणसे धरून ठेविली. खराडे खोटे जाले तैसेच हे जगधाप. एकाची मिरास एकास तो देवत नाहीं. तुम्ही जगधापाच्या बोले धनगराची माणसे बंदी घातली हा कोन इनसाफ. तरी धनगराची माणसे सोडून देणे. जगतापाचा निवाडा हुजूर होईल.

लेटरबुक मा. ५ } (१८३२) { श. १५९८ चैत्र शु. ४
पृ. २६४-६५ इ. } कंपनी-सुरत { इ. १६७६ मार्च ८

**डुमगांवची** मरपाई शिवाजीकडून मागण्याच्या व्यवहारांत प्रासीइतकाच खर्च झाला, तथापि भावी अनर्थ त्यामुळें टळतील. एवढ्याकरितां करीत अहांत तेंच ठीक आहे.

(से) फॅ. रे. सुरत मा. ८९ } (१८३३) { श. १५९८ चैत्र शु. ९
पृ. २३ इ. } राजापूर-सुरत. { इ. १६७६ मार्च १३

इकडे यातम्यांबद्दल खात्री नसली तथापि **शिवाजी राजा** पन्हाळ्याला सुरक्षित आहे हें अगदीं खरें आहे. त्यानें **अथणी** लुटल्यामुळें व्यापाऱ्यांचें [illegible] होन इतकें नुकसान झालें. आपली सर्व फौज घेऊन तो **विजापूर** किंवा गोवा [illegible] जाईल असें म्हणतात.

सा. ले. ३६२ } (१८३४) { श. १५९८ चैत्र शु. १०
सु. १०७६ मोहर ९ } कौल म. मु. व सी. { इ. १६७६ मार्च १४

अज दि. दत्ताजीपंत वाकेनिवीस—माहानाद व बाजे पेठ अथणीः— लस्कर अथणीस जाऊन तुम्हास दस्त करून पनालेयास ठेविले. तुम्ही खंड ७००० होन कबूल केले. तरी २ महिने मुदतींत देणें व सुखे उदीम करून असणें.

सा. ले. ३६३ } (१८३५) { श. १५९८ चैत्र शु. १३
श. } { इ. १६७६ मार्च १७

सिवाप्पा वगैरे १४ माहानाद—मुदसे, मोगलपा, बापूजीराम सेटिये वगैरे.

वकाजी फर्जंद याची स्वारी अथनीसी आली. त्यावेळी आम्हासी धरून नेलें व ७००० होन खडणी केली. आम्हीं तुम्हासी धनी केले. तुमचे पैसे तुम्ही मागा ते जागा देऊं.

श्री सं. ले. १४ } (१८३६) { श. १५९८ चैत्र व. १३
रा.-श. २ नल } न. राजपत्र. { इ. १६७६ मार्च ३१

छ. **शिवाजी**—आबाजी मोरदेव देशी व देशक प्रा जाउली.

फा चाफल प्रा कऱ्हाड येथील नित्य पूजा व सेवकांस वेतनें व शिष्यसमुदाय व अतीत अभ्यागतासह श्रीरामदास स्वामी यांसाठीं १२१ खंडी गला, हें स्वामींच्याच सांगण्याप्रमाणें चालत असतां स्वामींनीं 'दिल्हे ते सर्व पावले. याउपरी येक रुका-परियेत द्रव्य व दाणा गला न पाठवणे. आपणास काहीं न पाहिजे.' असें रायगडास सांगोन पाठविलें. त्यामुळें राजे यांनीं, ज्याचें कर्तव्य स्वामीस मानलें आलें त्या मुख्यास म्ह. दिवाकर गोसाव्यास पनाल्यास बोलावून स्वामींच्या त्या नकाराबद्दल विचारिलें. त्यास त्यांनीं सांगितलें कीं, 'श्रीची निस्पृह स्थीत आहे. महाराजांचे भक्तीस्तव वैभव घेतात. तरी आमान सामग्रीची मोईन चालवावी.' नंतर बाकीसह मोईन देऊन ऐवज निवल पोताहून देत जाणें, वराता न देणें. काडीइतकें अंतर न पडणें. जाणीजे

ओ. कॉ. भा. ३७ } (१८३७) { श. १५९८ वैशाख शु. ४
नं. ४२०२ इ. } सुरत (स्वाली)-कंपनी. { इ. १६७६ एप्रील ७

**शिवाजीच्या** मरणाची बातमी अजूनहि संशयित असली तथापि प्रचलित आहे. त्याच्या न्हाव्यानें त्याला विषप्रयोग केल्यामुळें बरेच दिवसांत तो बाहेर पडला नाहीं. त्याच्या सैन्यानें मात्र नुकतेंच रायबागजवळ **अथणी** नांवाचें व्यापारी शहर लुटलें. मुंबईशीं त्याचे संबंध अजून सलोख्याचे आहेत.

फॅ. रे. सुरत भा. ८९ } (१८३८) { श.१५९८ वैशाख शु १५
पृ. ३१ इ. } सुरत-मुंबई. { इ. १६७६ एप्रील १८

**सुरतेवर** शिवाजीचें सैन्य येणार किंवा कसें याचा तपास करून त्वरेनें कळवावें.

ऑर्म भा. ११४-५ } (१८३९) { श. १५९८ वैशाख व. ९
पृ. ४० इ. } मुंबई-सुरत. { इ. १६७६ एप्रील २६

शिवाजीचें १० हजार घोडदळ **कल्याणला** आलें. दमणजवळ, म्हणजे सुरतेपासून ३६ तासांचे अंतरावर **पारनेर** नांवाची टेकडी ( येथें पूर्वी किल्ला होता तो आतां ओसाड आहे ) घेऊन, तिची तटबंदी करून, सुरतेजवळ ठाण मांडून बसण्याचा त्याचा विचार आहे. सुरतेच्या व्यापारावर अर्थातच याचा अनिष्ट परिणाम होईल. नारायण शेणवी व मोदी या उभयतांनीं **पन्हाळगडावर शिवाजीला** पाहिलें. या वर्षी स्वाऱ्या करण्याचा त्याचा कांहीं बेत दिसत नाहीं.

ऑर्म ११४-५ } (१८४०) { श. १५९८ वैशाख व. ११
पृ. ४१ इ. } मुंबई-सुरत { इ. १६७६ एप्रील २८

**शिवाजीचा** सुरतेचा **वकील** केसो राम [ का केशव रमण, kisso Rawn? ] याच्या कर्तव्यच्युतीबद्दल त्याला कामावरून दूर करून, **मोरो पंडितानें** हें पत्र घेऊन जाणारा **सुंदरजी** परभू याला पाठविलें आहे.

फॅ. रे. सुरत मा. ८९ } (१८४१) { श. १५९८ वैशाख व. १२
पृ. ३३ इ. } सुरत-मुंबई { इ. १६७६ एप्रील २९

हुंडीच्या बाबतींत तुह्मीं करावी तितकी काळजी करीत नाहीं असें दिसतें. या व्यवहारांत त्याला आपल्याला फसविण्याची एकदां संधी दिली तर त्यापुढच्या व्यवहारांत आमचें अवसान जोखून तो नेहमीं वचनभंग इत्यादि अप्रामाणिकपणा करूं लागेल. तरी कंपनीच्या व्यवहारांतहि, तें कर्ज फिटेपर्यंत **त्याच्यावर विश्वास ठेवूं नये.**

फॅ. रे. मुंबई भा. २ } (१८४३) { श. १५९८ ज्येष्ठ शु. २
पृ. १२ (२) इ. } मुंबई कन्सल्टेशन. { इ. १६७६ मे ४

शिवाजीच्या अमलाखालील कांहीं **नृत्यांगना** या ठिकाणीं पळून आल्या आहेत. त्या **मोरो पंडिताच्या** मागणीवरून कराराप्रमाणें त्याच्या हवालीं कराव्या.

फॅ. रे. सुरत भा. ८९ } (१८४४) { श. १५९८ ज्येष्ठ शु. ६
पृ. ३७ इ. } राजापूर-सुरत. { इ. १६७६ मे ९

**नवाबाची** व **दक्षिण्यांची** निकराची लढाई होऊन त्याचे सुमारें १००० घोडे मारले गेले, त्याचे मुख्य साथीदार दगावले, आणि त्यालाहि पुष्कळ जखमा झाल्या. दक्षिण्यांचा मुख्य **शेख मीनस** ( Menass ) याचे सिद्दी **मसाउद** ( Mazoure ) व **सर्जाखान** हे साथीदार असून पठाणांशिवाय नबाबा ( बहलोलखाना ) कडे कोणीच नाहीं. त्यानें तहाचें लाविलेलें बोलणें दक्षिण्यांनीं झिडकारलें. यामुळें त्याची स्थिति हलाखीची झाली आहे. शिवाजीचें ४००० घोडदळ खुशाल लूट करीत हिंडत आहे. या स्थितीमध्यें देशावरचा कांहीं माल मिळेल असें वाटत नाहीं.

फॅ. रे. फोर्ट सें. जॉर्ज, भा. १८ } (१८४५) { श. १५९८ ज्येष्ठ शु. ११
पृ. १३ इ. } फोर्ट जॉर्ज-मुंबई { इ. १६७६ मे १३

**शिवाजीची** कांहीं बातमी नाहीं. परंतु विजापूरच्या दक्षिण हद्दीकडील त्यांचा सरदार **एकोजी** ( शिवाजीचा भाऊ ) यानें अपूर्वजित असा एक डोंगर (किल्ला) आणि रानवट प्रांत जिंकून, **स्वतःची संस्थापना केली** आहे; अशी खबर आहे. त्या देशाला Zowady condaly [?] असें म्हणतात. **बहलोलखानाचा** शिद्दीमसीद जेंकेरी व मसाउद आदिकरून लोकांनीं पराभव केला. तेव्हां **शिवाजी** हयात असेल तर त्याला खूप संधी आली आहे ! **जिंजी** या सुलतानाशीं तह करीत आहे. परंतु तो प्रजेला लुटण्याच्या उद्योगांत गुंतला असल्यामुळें तिकडे लक्ष देण्यास त्याला सवड नाहीं!

डाग रजिस्टर १६७६ } (१८४६) { श. १५९८ ज्येष्ठ व. ४
पृ. ११० इ. मे २१ न्यू. } { इ. १६७६ मे २१

वेंगुर्ल्याची हकीकतः— गोव्याचे पोर्तु. लोक मोठ्या उत्साहानें यशस्वी चांचा **शिवाजी** याच्या विरुद्ध तयारी करीत आहेत. परंतु व्हाइसराय त्याच्याशीं गुप्तपणें बराच पत्रव्यवहार करतो असें दिसतें.... **विजापूरचे उमराव** आपसांत भांडत असून **शिवाजी**विरुद्ध कांहींच न करितां उलट (कित्येक) त्याच्याशीं स्नेह ठेवितात; यामुळें **बादशहा** विजापुरावरच स्वारी करील असें वाटतें. सहा लहान होड्या आणि ११

जेटी गलबतें एवढें मोंगलांचें [सिद्दीचें] आरमार येऊन त्यानें १० नोवें. (२० नोवें. न्यू.) रोजीं चेंगुल्यास लूट केली, आणि शिवाजीचा सुभेदार व सैन्य यांना हाकून लाविलें. पुढें मोगली आरमारानें शिवाजीच्या आरमाराशीं युद्ध करून त्यालाहि पळवून लाविलें. आतां शिवाजीजवळ पैसा अगदीं राहिला नाहीं. आणि त्यातच मोंगलांचा आणि आदिलशाहाचा आपसांत तह झाल्यास शिवाजीचे सर्व मोठेमोठे बेत आगयावर बसतील !

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. फोर्ट सें. जार्ज मा. २८ पृ. ३७-३८ इ. | (१८४७) सुरत-फोर्ट जॉर्ज | श. १५९८ ज्येष्ठ व. ९ इ. १६७६ मे २५ |

सुरतेवर शिवाजी येणार अशी दोनदां हूल उठली. आतां त्यानें रामनगरच्या राजाचा मोड करून कोळी देशांत प्रवेश केला; तेथें एक सैन्य ठेविलें आणि सुरतेपासून आठ दिवसांच्या मुकामावर असलेल्या पिंडवोल टेकडीवर मजबूत किल्ला बांधला. अशा तऱ्हेनें रामनगरच्या आसपास त्याचें सैन्य असल्यामुळें अजून भीती गेली नाहीं; कारण शिवाजी इतक्या जवळ असूनहि जर आतांच सुरतेवर न येईल तर येत्या पावसांत तरी येण्यास चुकणार नाहींच. मधला मार्ग मोकळा मिळून इच्छा त्वरेनें करतां यावा म्हणून पोर्तु०ना त्यानें इतके नरम केले आहेत कीं त्याला त्यांच्या मुलखांतून जाऊं न देण्याची त्यांची छातीच नाहीं. शिवाजीसारखा त्रासदायक शेजारी मिळाल्यावर मग या शहराचा व्यापार थांबल्यास नवल नाहीं.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. सुरत मा. ८९ पृ. ३८-३९ इ. | (१८४८) सुरत-मुंबई | श. १५९८ ज्येष्ठ व. १० इ. १६७६ मे २७ |

या महिन्याच्या आरंभापासूनच रामनगरच्या राजाला त्याच्या देशांतून हांकून लावणाऱ्या मोरोपंताच्या सैन्यामुळें सुरतेला भीती वाटूं लागली. पिंडोल व पैनेका (Painecah) घेऊन मोरोपंत ३ दिवसांच्या अंतरावर येऊन शहराचा नाश करण्याची दहशत घालून मोठी खंडणी मागत आहे. सुभेदाराशीं त्याचें या बाबतींत बोलणें चालू आहे. पोर्तु० मुलखांतून येण्याजाण्याचें स्वातंत्र्य मिळवून शिवाजीनें भिमपूर (विंब [?] सारी Vinbassaree) आणि दमण येथें वसाहत करण्याची परवानगी मिळविली. अशा रीतीनें सुरतेवर जाण्याचा मार्ग पूर्णपणें ताब्यांत आल्यामुळें आतां शहराचा नाश करण्याचा किंवा मोठी खंडणी वसूल करण्याचा त्याचा पक्का बेत झाला असावा.

[सि]-सुंदरजी परभू आला आहे. परंतु सुभेदार त्याच्याशीं कसा वागतो हें समजेपर्यंत आम्हीं त्याला उघड सहानुभूती दाखविणें किंवा भेट घेणें हें करणार नाहीं.

| | | |
|---|---|---|
| ऑर्म ११४-५ पृ. ४२ इ. | (१८४९) मुंबई-सुरत | श. १५९८ ज्येष्ठ व. १३ इ. १६७६ मे ३० |

शिवाजीनें कांहीं हिशेब फेडला असून राहिलेला वसूल करण्याकरितां नारायण

शेणवी मागें राहिला अशी आमची समजूत आहे. शिवाजीकडून सर्व पैसा एकदम मिळणें कठीण असलें तरी तो निवळ फसवील असें म्हणवत नाहीं. आम्हीं राजापूरला नारळ व सुपारी आणण्याकरितां गलबतें तावडतोब रवाना केलीं. परंतु शिवाजीचे अमलदारांनीं चाइल्डला इतकें फसविलें कीं, गलबतें तेथें दोन महिने पडून राहिलीं एवढेंच नव्हे तर शेवटीं रिकामींच परत आलीं!

फॅ. रे. सुरत मा. ८९ पृ. ४० इ.    (१८५०) सुरत–मुंबई    श. १५९८ ज्येष्ठ व. ३० इ. १६७६ जून १

शिवाजीचा वकील **सुंदरजी परभू** याच्याबरोबर आलेल्या शिपायाच्या हातीं हें पत्र दिलें आहे. पांच दिवसांपूर्वी **शिवाजीच्या सैन्याची** भीती होती. आतां तें पेंढोलहून परत स्वदेशांत पावसाकरितां गेलें आहे. परंतु पावसाळा संपताच तें पुन: येईल अशी भीती वाटते.

फॅ. रे. सुरत भाग ८९ पृ. ४५-४६ इ.    (१८५१) सुरत–मुंबई.    श. १५९८ आषाढ शु. ८ इ. १६७६ जून ९

**सिद्दी** संबूळला कामावरून दूर करून **सिद्दी कासम** यास दंडाराजपुरीचा सुभेदार व मोंगलांचा आरमारी सेनापती नेमिलें. त्याची शिफारस मागच्या पत्रांत केलीच होती. येथील सुभेदार फारच आग्रह करीत आहे. तरी त्याला पावसांत मुंबईस राहूं द्यावें. आणि जरूर तर व्यापारी या नात्यानें सर्वांशीं समबुद्धीनें रहावें लागतें इत्यादि सांगून **शिवाजीची समजूत काढावी. सुंदरजी परभू** भेटला. त्याच्या बोलण्याकडे लक्ष न द्यावें हें बरें वाटतें. [ सिद्दी कासम २६ जूनला मुंबईस गेला. ऑर्म ११४-५ पृ. ४६ ता. ३ जुलैचें पत्र ] परंतु,

(से) फॅ. रे. सुरत भा. ८९ पृ. ३०, स्वाली-मुंबई, ता. १४ एप्रिल १६७६ ' सिद्दीला मुंबईस पावसांत राहूं देऊं नये. त्यानें फारच आग्रह धरल्यास त्याच्या लोकांच्या हालचालींवर बंधनें घालावीं. परंतु हें सामोपचारानें करून त्याला तक्रार करण्यास जागा ठेवूं नये. 'असा पूर्वीचा बेत होता.

खं. १५ ले. १३९ सु. १०७७ रखर १५    (१८५२) मिसिली फा. मु. व सी.    श. १५९८ आषाढ व. २ इ. १६७६ जून १७

अज दि. किले सातारा—मोक० मौजे निगडी

निगडी येथील आनंदगिरीच्या इनामास कोणी तोसीस देत आहे: तरी तसें करूं न देणें.

-डाग रजिस्टर १६७६ } (१८५३) { श. १५९८ आषाढ व. ५
-पृ. १४५-४६ इ. जून ३० न्यू } { इ. १६७६ जून २०

विजापूरकरांच्या स्वारींत शिवाजीनें (त्याची प्रकृति आतां पक्की सुधारली आहे.) -अथणीहून ५ लक्ष होनांची लूट नेली. त्यांत इंग्रजांचेंहि पुष्कळ नुकसान झालें. पण अंनुस्थान नांवाच्या विजापुरी सरदारानें त्याला बेळगांवच्या किल्यावर चांगलेंच चकविलें. ४० इ. होन घेऊन किल्ला ताब्यांत देण्याचें त्यानें वचन दिलें. परंतु आपली जबाबदारी टाळण्यासाठीं थोडा युद्धाचा देखावा करण्याचें त्यानें ठरविलें. त्याला अर्धी रकम पोंचल्या-वर, विश्वासानें शिवाजीचें सैन्य किल्ल्यांत शिरूं लागतांच मात्र त्यानें असा विरोध केला -कीं, तेथें शिवाजीचे ५०० लोक पडले आणि बाकीचे गोंधळून पळाले.

ऑर्म. ११४-५ } (१८५४) { श. १५९८ आषाढ व. ६
पृ. ४५ इ. } मुंबई-सुरत. { इ. १६७६ जून २१

शिवाजी रायगडला आहे. त्याचें सैन्य पावसाळ्यासाठीं स्वस्थानीं गेलें आहे.

-स. पृ. १३३ ले. १९ } (१८५५) { श. १५९८ आषाढ व. ७
ह. १०७७ रखर २० } { इ. १६७६ जून २२

रा. सिवाजी राजे—गंगाधर मुद्गल सरहवा. महालाहाय.

चिंचवड येथील श्रीचे ( गोसावी ) पेंके झाडा करून पाववीत नाहीं म्हणोन -कळो आलें. तरी हे गोष्टी बरी करीत नाहीं. बहुत अन्याय करितां. साहेब तुम्हावरि ये गोष्टीकारणें खिजतील. तरी बोभाट येऊं न देणें.

खं. १५ ले. १४१ } (१८५६) { श. १५९८ आषा. व. १३
-सु. १०७७ रखर २६ } { इ. १६७६ जून २८

माहादाजी अनंत सुभे. व कार. ता सातारा—तुकाजी प्रभू हवा. व कार. ता मज निगडी वगैरे गांवीं सदानंद गोसाव्याचा इनाम आहे तो पंतानीं दुमाला करविला आहे. तरी दुमाला करविणें.

ख. १५ ले. १३७ } (१८५७) { श. १५९८ आषाढ व. १४
सु. १०७७ रखर २७ } फा. सी. { इ. १६७६ जून २९

दताजी त्रिमल—माहादाजी अनंत सुबे. व कार० ता सातारा सदानंदाचा ये तर्फेचा इनाम पूर्वीप्रमाणें चालविणें.

-ऑर्म ११४-५ } (१८५८) { श. १५९८ अ. श्रावण शु. २
-पृ. ४६ इ. } मुंबई-सुरत { इ. १६७६ जुलै ३

शिवाजीच्या दरबारांत एक इंग्रज कायमचा ठेवण्याबद्दल तुमच्याकडून विचार होईल त्याप्रमाणें कळविल्यावर आम्हीं निवड करून पाठवून देऊं.

फॅ. रे. सुरत भा. ८९ } (१८५९) { श. १५९८ अ. श्रावण शु. ३
पृ. ४६ इ. } सुरत-मुंबई { इ. १६७६ जुलै ४

मोरोपंत पिंडोलच्या रक्षणाकरितां ४००० लोक ठेवून रायरीला परत गेला. सुंदरजी परभूकडे येथें कोणीच लक्ष देत नाहीं. म्हणून तो शहराचा नाश करण्याच्या गोष्टी सांगत असतो. तुम्ही शिवाजीच्या सैन्याच्या हालचालींवर लक्ष ठेवून तो या बाजूला वळण्याचा थोडासाहि संशय आल्याबरोबर कळवा.

खं. १५ ले. १३८ } (१८६०) { श. १५९८ अ. श्रावण शु. १४
सु. १०७७ जवल १२ } मिसेली. फा. मु. सी. { इ. १६७६ जुलै १४

अज दि० ता सातारा—मोक० मौ. निगडी वगैरे

सदानंद गोसावी याचा गावगंनाचा इनाम (ले. १८५६) रखरच्या सनदेप्रमाणें दुमाला केला आहे. तरी तुम्हींहि दुमाला करणें.

फॅ. रे. सुरत भा. ८९ } (१८६१) { श. १५९८ अ. श्रावण व. ४
पृ. ५२ इ. } सुरत-मुंबई { इ. १६७६ जुलै १९

नारायण शेणवी ( हुंडीच्या बाबतींत ) दिरंगाई लावतो असें दिसतें. तर कोणी एकादा इंग्रज व गिरिधरदास यांना पाठवून तावडतोब निकाल करून घ्या.

डाग रजिस्टर १६७६ } (१८६२) { श. १५९८ अ. श्रावण व. ७
पृ. १८५ इ. आगस्ट १ न्यू. } { इ. १६७६ जुलै २२

विजापुरा सेनापती एकोजी राजा हा कारोमांडेल किनाऱ्यावरील तंजावरचा पुरता स्वामी झाला. तो नागापट्टणला आला होता. परतु त्याला तेथें विरोध झाला. याच वेळीं मदुरेच्या नायकाला ताब्यांत आणण्याचा त्याचा उद्योग चालू होता.

फॅ. रे. सुरत भा. ८९ } (१८६३) { श. १५९८अ. श्रावण व.९
पृ. ६०-६१ इ. } राजापूर-सुरत. { इ. १६७६ जुलै २४

गोवळकोंडेकरांच्या मदतीने शिवाजीचा आदिलशाहाशीं तह झाला. शिवाजीकडे कोल्हापूरपलीकडील ५ कोसांवर कृष्णातीरापर्यंतचा मुलूख रहावा आणि त्यानें ३ लक्ष रु. पेशकस व दरसाल १ लक्ष होनांची खंडणी द्यावी; अशीं कलमें ठरलीं.

१० वर्षे मोंगलांकडे राहून मुसलमान बनलेल्या नेताजी नांवाच्या खोल मुत्सद्दी मनुष्याला पुन. हिंदू करून घेऊन शिवाजीनें आपल्याकडे मिळविला आहे. त्याअर्थीं शिवाजीचा कांहींतरी मोठा बेत चालला आहे असें पुष्कळांना वाटतें.

स. सं. ले. १५
सु. १०७७ जखर ८
(१८६४)
श. १५९८ श्रावण शु.१०
इ. १६७६ आगष्ट ८

रा. शिवाजी राजे

दसमाजी नरसाळा सर हवालदार महाल इमारती किल्ले महिपतगड.

श्रीरामदास शिवतरी राहताती. सांप्रत ते गडावर रहाण्यास येतील. तरी त्यांचे लोकांस गडावर घेणें व हरएक खबर घेणें.

स. सं. ले. १६
सु. १०७७ जखर ८
(१८६५)
श. १५९८ श्रावण शु.१०
इ. १६७६ आगष्ट ८

रा. शिवाजी राजे--जिजोजी काटकर हवाल. व कार० किले सज्जनगड.

(मजकूर ले. १८६४ प्रमाणें.)

ऑर्म ११४-५
पृ. ५३ इ.
(१८६६)
मुंबई-सुरत.
श. १५९८ श्रावण शु. ११
इ. १६७६ आगस्ट ९

**मोरोपंत** १० इ. फौज घेऊन, **दंडाराजपूर** जिंकल्याशिवाय **शिवाजीला** तोंड न दाखविण्याची प्रतिज्ञा करून आला आहे. त्यानें समोंवारची झाडी तोडून हल्ल्याची मोठी तयारी चालविली आहे. होड्यांत मोठ्या आच्छादक भिंती उभारुन त्यांच्या आडून किल्ला उडविण्याचा तो बेत करीत आहे. ४१५शें लोक घेऊन सिद्दी कासम त्वरेनें किल्ल्याच्या रक्षणार्थ जात आहे.

हाग रजिस्टर १६७६
पृ. २०७ इ. आगस्ट २६ न्यू.
(१८६७)
श. १५९८ श्रावण व. ३
इ. १६७६ आगस्ट १६

**शिवाजीचा** उपद्रव आदिकरून कारणांचा विचार करतां वेंगुर्ला, कोंडेवार, आणि कानडयांतीलहि कचेऱ्या (वखारी) मलबारी अमलांत आणाव्या असा सभेंत ठराव झाला.

फॅ. रे. सुरत मा. ८९
पृ. ५६ इ.
(१८६८)
सुरत-मुंबई.
श. १५९८ श्रावण व. ८
इ. १६७६ आगष्ट २१

नारायण शेणव्याला अपयश आल्यामुळें **शिवाजीकडे** **लें० ॲडॅम्सला** पाठविलें. त्यापेक्षां **कॅ. अङर्टनला** पाठविलें असतें तर बरें झालें असतें.

फॅ. रे. सुरत मा. ८९
पृ. ६२ इ.
(१८६९)
राजापूर-सुरत.
श. १५९८ श्रावण व.११
इ. १६७६ आगस्ट २४

**शिवाजीच्या** घाटावरील घमेंडखोर प्रधानांच्या अज्ञानामुळें आम्हाला पुष्कळच त्रास होऊन व्यापाराला अडथळा होतो.

डाग रजिस्टर १६७६ }
पृ. २३५ इ. सप्टें. २८ न्यू. } (१८७०) { श. १५९८ भाद्र. व. ६
{ इ. १६७६ सप्टें. १८

**एकोजी राजानें** (अल्प) यशानें फुगून जाऊन नागापट्टणच्या कंपनीच्या एकदोन खेड्यांची जाळपोळ व लूट केली. त्यावरून त्याच्यावर गलबतें रवाना केलीं. हल्ला करतांच त्याचें सैन्य उधळून गेलें आणि त्याचे ६० शिपाई व १६ घोडे पडले.

प. रे. ऑफिस सी. ऑ. ७७ भा. १३ } (१८७१) { श. १५९८ भाद्र. व. १०
पृ. ८३ (ए.) इ. } सुरत- { इ. १६७६ सप्टें. २२

**मे महिन्यांत रामनगर**जवळ आल्यावेळीं शिवाजी **(मोरोपंत)**कडून शहर सुरक्षित ठेवण्याबद्दल ९ लक्ष रु. खंडणी व प्रांताच्या वसुलाच्या चौथाई यांची मागणी आली. सर्वत्र भीती व पळापळी चालू झाली. परंतु सुभेदारानें दरवाजे बंद करून संरक्षण करण्याचा आव आणिला. **या वेळीं काळजी करण्यासारखी परिस्थिती दीर्घकाल राहिली.** पुढें पावसामुळें शिवाजी परत गेला असला तरी पुनः परत येईल असें वाटतें.

ओ. कॉ. भा. ३७ } (१८७२) { श. १५९८ आश्विन शु. २
न. ४२२५ इ. } कॅ. रॉबर्ट फिशरची नेमणूक. { इ. १६७६ सप्टें. २९

**राजापूर, कारवार,** आणि **कालिकत** येथील वखारींशीं तत्प्रांतीय लोकांची उद्दाम व अपमानकारक वर्तणूक थांबविण्याकरितां तुम्हीं जरूर ते उपाय करावे.

ऑर्मे ११४-५ } (१८७३) { श. १५९८ आश्विन शु. ६
पृ. ६१ इ. } मुंबई-सुरत { इ. १६७६ आक्टो. २

मि. मौलवेरर रायरीहून परत हात हालवीत आला. **शिवाजी कल्याणवर** वराती देणार होता; परंतु तो बेत रद्द झाला. आणि आतां त्यानें लुटींत मिळविलेलें, कांहीं घडीव चांदीसोन्याचें सामान, देण्यास तो तयार झाला आहे. परंतु तो वजनावर शेंकडा ५० टक्के घडणावळच मागतो. त्या दरानें घेतल्यास त्याचें सर्वच कर्ज फिटेल. पण यावेळीं हें न घेतल्यास पुढें कांहींच हातास न लागण्याचा संभव आहे. शिवाजी मेला, युद्धामुळें कफल्लक बनला, किंवा **प्रत्यक्ष बादशहानेंच त्याच्यावर स्वारी केली** तर शिवाजीची धडगत न राहून, मग वसूल तरी कसा होणार ? मौलेवेरेर तेथून निघाला त्याचवेळीं, शिवाजी मोठें सैन्य घेऊन कानड्याकडे स्वारीवर निघाला होता. **बार्सिलोर, होनावर** इत्यादि किनाऱ्याच्या लगतचा प्रांत घेण्याचा त्याचा बेत जाहीर झाला आहे. जातांना आमच्या मर्जीप्रमाणें आम्हांला चांदीसामान किंवा कल्याणवरील वराता धाव्या असें तो सांगून गेला. मात्र कल्याणवरील वराता वसूल करण्याचे श्रम आम्हीं घेतले पाहिजेत. नारायण शेणवी मागें राहिला आहे.

ऑर्म. ११४-५ } (१८७४) { श. १५९८ आश्वीन शु. १०
पृ. ६३ इ. } मुंबई-सुरत { इ. १६७६ आक्टो. ६

आज नारायण शेणवी परत आला. चांदीसामान ३० रु. शेरांनीं (२३ सुरती-तोळे = १ शेर) देणार; परंतु २८ पर्यंत भाव उतरेल. वरातांपेक्षां हें बरें वाटतें. **शिवाजी** किनाऱ्याकडे खालीं न जातां घाटापलीकडे बालाघाटांत गेला. बंकापुरानजीक **वेळगांव** आणि तेथून पांच दिवसांच्या अंतराव अलीकडे असलेला **वायेम रायिम** ? (Vayem Rayim) अशा दोन किल्यांना त्यानें वेढे घातले. विजापूर प्रांतांत त्यानें खूप उपद्रव केल्यामुळें राजापूरच्या व्यापाराला अर्थात् उपसर्ग पोंचेल.

-माटे सज्जनगड } (१८७५ = १४६२ अ) { श. १५९४ चैत्र व. १
पृ. ११२ श. } { इ. १६७६ एप्रील ४

के(श)व गोसावी— शु. म. प. रा. रा. दिवाकर गोसावी

आपण पत्र पाठविलें तें पावलें. मजकूर समजला. रा. **शिवराजे भोसले हे समर्थांचे भेटीस** येणार म्हणोन लिहिलें तें समजलें. मी येणार होतो, परंतु माझी प्रकृति फार बिघडली. येणें होत नाहीं. मी इकडून अकास येणेसाठीं लिहिलें. परंतु अकाचेंहि येणें व्हावयाचें नाहीं. गांवीं मानजी गोसावी असतील. **राजे यांची पहिलीच भेट आहे.** वाडीचे लोकांस खटपटेस आणावे. उपयोग होईल. झाडी बहुत आहे. इकडून उदईक त्रिंबक गो व विठ्ठल गो व दत्तात्रय गो उदइक पाठऊन देतो. श्रीचे उत्सवास मिक्षेचें धान्य जें मिळालें तें अश्वत्थभट मसूरकर यासमागमे पाठविलें. दत्ताजीपंताकडू(न) दोनशें होनु उत्सवास पाठविले ते अले असतील. लोभ करावा, हे विज्ञप्ति.

फॅ. रे. सुरत मा. ८९ } (१८७६) { श. १५९८ आश्वीन शु. १५
पृ. ६७-६८ इ. } सुरत-मुंबई { इ. १६७६ आक्टो. ११

प्रेसिडेंटकडे नारायण शेणव्याचें पत्र आलें आहे. वराता किंवा माताचे रूपानें **शिवाजी** कंपनीचें आणि इतरांचें देणें देण्यास तयार आहे. यापेक्षां अधिक सोईच्या अटी मिळणें शक्य नसल्यास जिन्नस घेतांना दराबद्दल योग्य खबरदारी घ्यावी. मोंगली सैन्याचा उपद्रव असलेल्या देशांत त्याची भरपाई व्हावयाची असल्यास सुरक्षितपणें माल हातीं येईल असें जपावें.

सां. इ. सा. ले. १९ } (१८७७) { श. १५९८ आश्वीन व. १
-श. } दानपत्र फा. सी. { इ. १६७६ आक्टो. १२

**खेमसावंत** भोसले सरदे. पर. कुडाळ—पुरोहित

आमचे वडील लखम सावंत वारले. त्यांचे १० वे दिवशीं तुम्हास का कुडाळपैकी सेत दान दिलें.

फॅ. रे. सुरत मा. ८९ } (१८७८) { श. १५९८ आश्वीन व. ६
पृ. ६९–७० इ. } सुरत–मुंबई { इ. १६७६ आक्टो. १७

नारायण शेणव्याची शिवाजीकडील हकीकत कळली.

**शिवाजी**च्या देशांतील व्यापार सुरळीत चालेल आणि आमच्याशीं सरळ आणि न्यायाचा व्यवहार करण्याइतकें स्वतःचें हित समजण्याचें शहाणपण त्याला असेल असें वाटलें होतें. परंतु या चांच्या दरोडेखोराला शत्रु-मित्र, देव-मनुष्य यांपैकीं कोणाबद्दलच विशेष भावना नसल्यामुळें त्याच्या देशांत व्यापाराला उत्तेजन मिळणें अशक्य समजून आम्हीं **राजापूरची वखार मोडण्याचें ठरविलें** आहे. करारप्रमाणें राहिलेलें कर्ज वसूल होईपर्यंत तेथें दोघांनीं राहून इतरांनीं कंपनीची सर्व मालमत्ता घेऊन मुंबईस परत यावें. कारवार देखील त्याच्याच अमलांत रहाणार असेल तर तेथील व्यवस्था तशीच करावी लागेल. तुम्हींहि त्याच्या मुलखाशीं काडीचा संबंध न ठेवितां, तसा तुम्हांला स्पष्ट हुकूम मिळाल्याचें सांगा. तो स्वतः व त्याचे प्रधान अविश्वसनीय असल्याचें आमच्या प्रत्यंतरास आलें असें सांगा. राजापूरला वगैरे आमची वखार असल्यामुळें आमचा हात सांपडला नसता तर त्याचीं गलबतें पकडण्याचा सद्यःफलदायी मार्ग पत्करण्यास आम्हीं मागेंपुढें पाहिलें नसतें. अजूनहि फसवाफसवीचाच त्यांचा प्रयत्न चालू राहिला तर नारायण शेणव्यानें तडकाफडकीं निघून यावें असा त्याला लिहून हुकूम पाठवा.

डाग रजिस्टर १६७६ } (१८७९) { श. १५९८ आश्वीन व. ६
पृ. २७७–७८इ. आक्टो. २७ न्यू. } { इ. १६७६ आक्टो. १७

**पोर्तु० कडून** असें कळतें कीं, **शिवाजी** मेला व संभाजी गादीवर आला. आसपासच्या कांहीं मुलखाच्या ताब्यासंबंधीं वाद निघून त्याची व **गोवेकर पोर्तु०ची** लढाई झाली आणि त्यात संभाजीला परत फिरावें लागलें. परंतु यावर विश्वास ठेवणें कठीण वाटतें. [कारण,] याच वेळीं **शिवाजी**चें सैन्य सुरतेपासून एक दिवसाच्या मुक्कामावर ठाणीं धरून बसल्याचें समजलें आहे. सुरतकर मुसलमानांना त्यामुळें भीती उत्पन्न होऊन व्यापार बसेल.

फॅ. रे. सुरत मा. ८९ } (१८८०) { श. १५९८ आश्वीन व. १३
पृ. ७२ इ. } सुरत–मुंबई { इ. १६७६ आक्टो. २५

**नारायण शेणवी** परत आल्याचें कळलें. दर शेराला २८ रु. दरानें चांदी-सोन्याचें सामान (Plate) घेण्यांत आमचा शेंकडा २०ते२५ तोटा असला तथापि पळत्याच्या पाठीस लागण्यापेक्षां हातचें सोडूं नये हें चांगलें वाटतें. म्हणून वरातीबद्दलचे पूर्वीचे हुकूम रद्द समजून शक्य तो किफायतशीर दर लावून **शिवाजी** देत आहे तें सामान घ्यावें व पहिला झालेला ठराव मोडावा. पुढील मागणी पुढें करूं.

डाग रजिस्टर १६७६ } (१८८१) { श. १५९८ कार्तीक शु. ११
पृ. २९९-३०० इ. नोव्हें. १६ न्यू. } { इ. १६७६ नोव्हें. ६

**शिवाजीच्या** हस्तकांकडून **वेंगुर्ल्याची स्थिरस्थावर** करण्याच्या बाबतींत ( डच ) कंपनीशीं बोलणें चालू झालें आहे. आलेला माल स्वतःच खरेदी करण्याचा त्यांचा कांहीं विचार चालू आहे.

विजापूरच्या हद्दीवर मोंगली सैन्याचा मोठा पराजय झाला. परंतु त्यांना कांहीं हजार सैन्य आणखी येऊन मिळाल्यामुळें, विजापूरकरांशीं एकमत करून **शिवाजीवर** स्वारी करण्याचा त्यांचा विचार अजून कायम होऊं शकला नाहीं. यामुळें **शिवाजी** अप्रतिहत सुरतेच्या बाजूला आपल्या राज्याचा विस्तार करीत आहे. त्यानें गोव्याकडे पोर्तु०नाहि फार त्रास दिला.

डच रे. भा. ३४ } (१८८२) { श. १५९८ कार्तीक व. ८
नं. ८४४ इ. नोव्हें. २८ न्यू. } बटेव्हिया-डच कंपनी. { इ. १६७६ नोव्हें. १८

मोंगलांचा सेनापती **बहादरखान** विजापुरापासून अर्ध्या दिवसाच्या मुक्कामावर आला. परंतु तेथें युद्धांत ४००० शिपाई, पुष्कळ सामान, व चार प्रसिद्ध सेनापती एवढ्यांचें नुकसान भोगून तो **सोलापुरावर** मागें हटला. तेथें **बहलोलखानानें** वकील व नजराणे पाठवून मुख्यतः **शिवाजीविरुद्ध बोलणें केलें**. इतक्यांत १० हे. घोडदळ घेऊन **दिलेरखान** छावणीस आला. आणि इतकें नुकसान सहन करून तह करणें अशक्य[अपमानाचें] वाटल्यावरून त्याकरितां बादशहाकडे पत्रें पाठवून उत्तराची वाट पहावी असें ठरलें. मध्यंतरीं शिवाजी सुरतेंत धुमाकूळ घालून आपला प्रांत वाढवीत आहेच. गोवळकोंड्याचें सैन्य विजापूरच्या बाल-सुलतानाच्या कुमकेस येत आहे. शिवाजी गोव्याकडे कांहीं जबरदस्ती चालवीत असे. परंतु त्याचे पूर्वीचे बेत आतां त्याचा ज्येष्ठ पुत्र **संभाजी** अमलांत आणितो. गतसालीं शिवाजीनें जिंकलेल्या **फोंडा किल्याचे** खालीं ते येतात.अशा सबबीवर ६० **गांव** सोडून देण्याबद्दल त्यानें **गोंवेकर पोर्तु**०ना कळविलें आहे. विजापूरचें राज्य शिवाजीनें जिंकून घेतलें नाहीं तोंपर्यंत प्रथम विजापुराहून याबद्दल संमती आणविली पाहिजे असा पोर्तु०नीं जबाब दिला. यावरून मराठ्यांनीं गोव्यावर जोराचा हल्ला केला परंतु पोर्तु०नीं तो हटविला. तेव्हां येथून परत फिरून ते सुरतेजवळ **दमणकडे** गेले. तेथील मुसलमान सुभेदारानें सावधगिरी करून सर्व दरवाजे बंद करून फक्त एकच खुला ठेविला.

ऑर्मे ११४-५ } (१८८३) { श. १५९८ मार्ग. शु. ७
पृ. ७४ इ. } मुंबई-सुरत { इ. १६७६ डिसें. १

**शिवाजीशिवाय** पितळी तोफांना दुसरें गिऱ्हाईक नाहीं.

यास आज्ञा केली ऐसी जे, पितांबर शेणवी यास दस्त केले ते वेळेस याचे पत्र वृत्तिसमयीं पहिले व हुहीं व वरकड खासगत कागद आणून तुह्मी ठेविले ते जे असतील ते याचे यास देणें. अनमान न करणें. फर्मान व पटे अ तमाम देणें.

खं. २० ले. १५२ } (१८८७) { श. १५९८ मार्ग.
सु. १०७७ सवाल १३ } म. मु. व. सी. { इ. १६७६ डिसें. १

राघो बल्लाळ सरसु०—एसाजी मल्हार सुभे. पा वाई, (ले. १८०७ प्रमा

खं. २० ले. १५३ व १५४ } (१८८८) { श. १५९८ मार्ग.
सु. १०७७ सवाल १४ } म. मु. व. सी. { इ. १६७६ डिसें.

एसाजी मल्हार सुभे. व कार. पा वाई—आमाजी कान्हो हवा. सा वाई

सुभे. च्या पत्राप्रो नरसी रंगो याचा परगणीं येथील इनाम चालविणें.

खं. २० ले १५४ } (१८८९) { श. १५९८ मार्ग.
सु. १०७७ सवाल १४ } { इ. १६७६ डिसें.

एसाजी मल्हारी सुभे. कार. पा वाई—अमाजी कान्हो सा वाई,

सरसुभेचे पत्राप्रो, नरसी रंगो व एकनाथ रामेस्वर यांचा परगणींचा चालविणें.

खं. २० ले. १५५ } (१८९०) { श. १५९८ मार्ग
सु. १०७७ सवाल १५ } म. मु. व. सी. { इ. १६७६ डिसें

एसाजी मल्हारी सुभे. कार.—एसाजी राम हवा. कार. सा गोंव.

सरसुभे ( राघो बल्लाल )चे पत्राप्रो नरसी रंगो व एकनाथ रामेस्वर यांचा येथील इनाम चालविणें.

खं. २० ले. १५६ } (१८९१) { श. १५९८ मार्ग.
सु. १०७७ सवाल १५ } म. मु. व सी. { इ. १६७६ डिसें.

एसाजी मल्हार—भिमाजी मल्हारी हवा. व कार. सा कोरेगांव.

सरसुभेचे सवाल ( ले. १८८७) पत्राप्रो नरसी रंगो व एकनाथ रामेस्वर किण्ही येथील इनाम चालविणें.

सं. २० ले. १५७ } (१८९२) { श. १५९८ मार्ग. व. ५
सु. १०७७ सवाल २१ } म. मु. व सी. { इ. १६७६ डिसें. १७

अज दि. हवा. व कार. अमाजी कान्हो पा वाई—मोक. मौ. पसणी.

सुभे० पा मा याचें (ले. १८८९) सनदेप्रो नरसी रंगो याचा पसणी येथील इनाम पूर्वीप्रो चालविणें.

ऑर्म ११४-५ } (१८९३) { श. १५९८ मार्ग. व. १०
पृ. ७८ इ. } मुंबई—सुरत { इ. १६७६ डिसें. २०

**मोंगलांचा तह मोडला.** शिवाजीनें संभाजीराजाला ओलीस पाठविण्याचें नाकारलें म्हणून तह मोडला असें म्हणतात. कित्येक असें म्हणतात कीं, हा तह फक्त बहादरखानानें घडवून आणला. पण त्याला बादशहाची संमति मिळाली नाहीं.

ऑर्म ११४-५ } (१८९४) { श. १५९८ पौष शु. ७
पृ. ७९ इ } मुंबई—सुरत. { इ. १६७६ डिसें. ३१

**मि. चाइल्ड** ( राजापूर वखारीचा मुख्य ) आज सुरतेस जात आहे.

सं. १५ ले. १४० } (१८९५) { श. १५९८ पौष व. १२
सु. १०७७ जिल्काद २५ } { इ. १६७७ जाने. २०

सिवजी बिन तुकोजी पवार—आनदगिरी गोसावी वस्ती ढोणजे.

तुमचे टके आम्हाकडील उगवणी करून देऊं.

राम. अ ६५, ६६ ले. १८ } (१८९६) { श. १५९८ माघ व. १२
फ. १०८६ जिल्हेज २५ } फा. मु. { इ. १६७७ फेब्रु. १८

जयसिंगजी राजे ( भोसले )

रघुनाथ विठल व विश्वनाथ तिमाजी भट सेडगे तीर्थ उपाध्ये. मु. वेरूळ

तुम्हांस वर्षासन रु. १२ प्रतिवर्षी देत जाऊ.

गो. इ. सा. ले. ३० } (१८९७) { श. १५९८ माघ व. १३
रा. ३ } { इ. १६७७ फेब्रु. १९

मोरेस्वर पंडितराऊ—गिरमाजी तुकदेऊ देशा. व देशल० देश सिरवट.

लावगांव येथील रामकृष्ण जोशी यास दहा मण धान्य देविले असे. लिखित माघ वदि १३ लेखन शुध फाल्गुन बहुल अमावास्या शुक्रवार. ( असेंच एक पत्र नारायण पीळ जोशी याच्या नावचें आहे.)





गो. इ. सा. ले ३१ } (१८९८) { श. १५९८ माघ व. १३
रा. ३ } { इ. १६७७ फेब्रु. १९

मोरेश्वर पंडितराय--गिरमाजी तुकदेव देशा. व देश० देश भिवगड

रामनारायण जोसी राह. मूळगाव यांस डिचोली नागांत जोतिष सांगण्याकरितां १० मण तांदूळ देविले असेत. [ असेंच एक पत्र केशव जोशी याच्या नांवचें आहे.]

गो. इ. सा. ले. ३२ } (१८९९) { श. १५९८ माघ व. १३
रा. ३ } { इ. १६७७ फेब्रु. १९

मोरेश्वर पंडितराऊ---धर्माजी नागनाथ व गिरमाजी तुकदेव देशा०·व देशले० व देशमू० प्रां फोंडा व डिचोली प्रां मर्दनगड व भिवगड

उभय देशी, देशस्त, कराडे, चितपावन, जोतिसी व पधेब्राह्मण आहेत, या सकळांची परीक्षा घेऊन वृत्ती चालविणें.

डॅन्, २ पृ. ३६० } (१९००) { श. १५९८ फाल्गुन शु.७
न्यू, } पोर्तुगीज गव्हर्नर-इंग्लंडचा राजा { इ. १६७७ फेब्रु. २८

आपल्या पत्रांत **कारंजा** व **ठाणा** येथील मांडवी ( Mandovis ) संबंधीं मजकूर आहे तो समजला. आपण ज्याला **जकात नाकें** म्हणतों त्याला मुसलमान लोक **मांडवी** म्हणतात. मुसलमानी अमदानींत **कारंजा** येथें अशा प्रकारचें जकातनाकें होतें. व कल्याण–भिवंडी प्रांतांचें जकात नाकें ठाण्यास होतें.

सरस्वतीमंदीर } (१९०१) { श. १५९८ फाल्गुन ?
इति. मं. पृ. ९७ } 'प्रतिपच्चंद्र' मुद्रा { इ. १६७७ मार्च

मालोजी राजे घोरपडे प्रति राजश्री **शिवाजी** राजे जोहार, उपरि.

**पूर्वी निजामशाहींतून आमचे बाप कैलासवासी महाराज इभराइम आदिलशहा पादशहाचे कारकीर्दीस इकडे आले.** त्यास इभराइम आदिलशहानें पादशाही कारभाराचा मदार महाराजाचे सिरीं टाकिला. तेव्हां महाराजानें हा विचार केला कीं, पादशाही मदार आपले हातास आला असतां आधीं तो आपले जातीचे लोक मराठे याला हातीं धरून सरदारकी करून पोटें भरतात ते पादशाही वजीर करावे. पादशाही कामें याजकडून करून नामोश होय, इज्जती थोर पावेत, तें करावें. म्हणून तुमचे बाप बाजी घोरपडे सरदारकी करून होते ते आणून पादशहास भेटून पादशाही वजीर केले. त्या दिवसापासोन तुमच्या बापाच्या हातें व तुमच्या हातें पादशाहीचीं कामें होत आलीं. पादशहानें तुमचें चालविलें. ऐशा तीन पिढ्या पादशहाच्या दोनी पिढ्या तुमच्या जाल्या. ऐसियास महाराजानें तुमच्या बापास इतकें बरें केलें हें स्मरण न धरून जेव्हां कांहीं मुस्तफा खानानें महाराजास दस्त करविलें तेव्हां तुमचे बाप

बाजी घोरपडे हमी होऊन महाराजास दस्त करून मुस्तफाखाचे हातीं दिल्हे. त्या दिवसापासून तुमच्या घराणियाचा व आमच्या घराणियाचा दावा वाढत चालिला. तो कित्येक झगडियांत तुह्मीं आमचे लोक मारिले व आह्मीं तुमचे लोक मारिले. आदिकरून तुमचे बाप बाजी घोरपडे त्यांला आमचे लोकीं झगडियांत मारिलें. ऐसा परस्पर दावा चालिला होता. ऐशियास सांप्रति राजकारण वर्तमान तरी दक्षिणचे पातशाहा तीन, निजामशहा, आदिलशाहा, कुतुबशहा, त्यांमध्यें निजामशाही पादशाही बुडाली ते समई निजामशाही उमदे वजीर होते त्यांणीं आदिलशाही दरगाहासीं रुजुवाती करून आपणास रोजगारास जागा केला. हालीं **आदिलशाही बहलोलखान पठाणीं घेतली.** पादशाहा लहान लेकरूं. नांव मात्र. ते आपले कैदेंत ठेविले आहेत. आणि तख्त व छत्र विजापूरचा कोट पठाणानें कबज केला आहे. कांहीं गुबारून मिळाला नाहीं. ऐशियास **दक्षिणचे पादशाहीस पठाण आला हे गोष्टी बरी नव्हे !** पठाण बळावला म्हणजे एका उपरी एक कुळी दक्षिणियांचीं घरें बुडवील. कोणासं तगों देणार नाहीं. ऐसें आम्हीं समजोन **हजरत कुतुबशाहा पादशाहा** यांसी पहिलेपासून रुजुवात राखिली होती. त्यावरून सांप्रत हजरत कुतुबशाहांनीं मेहेरबानी करून 'हुजूर भेटीस येणें' म्हणून दस्तखत मुबारक व दस्त-पंजियानसी फर्मान सादर केला. त्यावरून आम्ही येऊन हजरत कुतुबशाहाची भेटी घेतली. भेटीचे समई पादशाही आदब आहे कीं शिरमोई धरावी, तसलीम करावी. परंतु **आम्ही आपणावरी छत्र धरिलें असे, ही गोष्ट कुतुबशाहास मान्य होऊन** शिरमोई धरणें व तसलीम करणें हें माफ केलें. पादशाहा तिकडून आले; आम्ही इकडून गेलों. पादशाहांनीं बहुतच इज्जती होऊन, गळ्यास गळा लावून भेटले. आम्हांस हाती धरून नेऊन जवळी बैसविलें. कितीएक मेहेरबानी जाहीर केली. आम्हींहि जैसी रुजुवात करून ये तैसी केली. आणि कुतुबशाहाचा व आपला घरीं बरेपणा करून घेतला. याउपरी राजकारण विषयीं हजरत कुतुबशाहांनीं महादण्णापतांस व आम्हास एकचित्त करून ऐसा तह केला कीं जो काय उभयवर्गी तह घावा तो आपण कबूल करावाच. ऐसा कुल मनसबा व मदार आम्हांवरी टाकिला आहे, कीं 'आपली पादशाही जितकी वाढवूं ये तितकी वाढविणें. पठाणाची नरतनाबूद करणें. **दक्षणचीं पादशाही आम्हां दक्षणियांच्या हातीं राहे** तें करावें ' म्हणून. त्यास हा मनसुबा ये प्रसंगीं आमचे हातास आलिया उपरि आम्हीं हाच विचार केला कीं **जे कांहीं आपले जातीचे मराठे लोक आहेती** ते आपल्या वटांत घेऊन कुतुबशाहासीं त्यांची रुजुवात करावी. दौलत देवावी, त्यांचे हातें पादशाही काम घेऊन पादशाहाचा दराज करावी. आणि तुम्हीं लोकांच्या दौलतहि चालेत, घरें राहेन, तें करावें. आपल्या जातीच्या **मराठिया लोकांचे घरें दौरावें** हें आपणास उचित आहे ऐसें मनावरी आणून, तुमचा आमचा वडिलापासून दावा वाढत आला तो आम्हीं मनांतून टाकून, निवट होऊन, तुम्हीं

मराठे लोक, कामाचे, तुमचें बरें करावें ऐसें मनीं धरून, हजरत कुतुबशाहासी बहुत रीती बोलोन, तुम्हांस हजरत कुतुबशाहाचा कौलाचा फर्मान घेऊन पाठविला आहे. तरी तुह्मी कुलीन, आमचा भरोसा मानून, देखत पत्र, हरएक उपायें, पठाणापासून निघोन, मजलदरमजल भागानगरास आम्हापासी येणे, त्यास, तुह्मी तरी स्वार होऊन मजलदरमजल चालच. परंतु आपला कुली खुलासा, नेमस्त मुदा व इतबारी हेजीव बहुत सत्वर पुढें पाठवून देणें. कीं, तुम्हांहून पुढें चार दिवस आह्मांपासी यावे ऐसा पाठवून देणें. म्हणजे हजरत कुतुबशाहास आह्मी अर्ज करून दौलतेचे नेमस्त करून कौलाचा फर्मान दस्तपंजे मुबारक घेऊन फर्मान व लुगडीं मोहताप तुम्हांस पाठवून देऊन. ते घेऊन, येऊन, आमचे हातें हजरत कुतुबशहास भेटणें. ए प्रसंगीं ऐसें तुमचें दौलतीचें काम मजबूत करून देतों कीं, पुढें बहुत बरें केलें ऐसें तुम्हीं आठवावें; तुमचे पुत्रपौत्र आठवीत व दौलत थोर होए व हजरत कुतुबशाहाचें काम तुमचे हातें होऊन ये ऐसा समय असे. ऐशियास तुम्ही कदाचित् ऐसा विचार कराल कीं आदिलशाहीचे आपण दो पिढींचे वजीर आणि आतां विजापुराकडून कुतुबशाहींत राजे याचे बोलें कैसें जावें ? तरी जे समई **खवासखान** धरिला, विजापुरचा कोट पठाणें घेतला, विजापुरचा पादशाहा धाकटा आहे त्याला कैदेंत ठेविलें, तेच समई पादशाही बुडाली ! विजापूर पठाणाचे हातास गेलें ! **आतां आदिलशाही कैची ?** आणि उगीच तुह्मी तेथें आपली आदिलशाही आहे म्हणोन गुंतून राहिले आहां ! जरी पठाणाचीच चाकरी करून राहों ह्मणाल, तरी पठाण कांहीं तुम्हास थोर दौलत देणार नाहीं. आणि पठाणास तरी हजरती कुतुबशाहा व आम्ही व तमाम दखणी मिळोन चालोन घेऊन बुडवीतच आहों ! **तुम्ही मराठे लोक आपले आहा. तुमचें गोमटें व्हावें** म्हणून पत्रच तुम्हांस लिहिलें असे. जें काय तुम्हास पठाण देतो त्याची दुणी आम्हीं कुतुबशाहापासून तुम्हास देवीतच असो; किंवा त्याहून अधिकही होऊन येईल तरी करून देऊनच. सर्व प्रकारें तुमचें गोमटें करून, एविसी आम्हांपासून अंतर पडे तरी व मागील दावियाचा किंतु आम्ही मनांतून टाकिला एविसी आम्हास श्री – देवाची आण असे. तुम्ही नि:संदेह होऊन येणें. हेजीव आपला पुढें पाठविणें; त्या हातीं, आम्हांसी घरोबियानें बरें वर्तावें, मागील दावियाचा किंतु मनांतून टाकिला, ऐसें आपला आराध्य व कुलस्वामी असेल त्याची शपथ लिहून पत्र हेजीबा हातीं पुढें पाठवून देणें. आम्ही सर्व प्रकारें तुमचें गोमटें करावयासी अंतर पडो नेदऊन. बहुत काय लिहिणें.'मर्यादेयं विराजते.'

| | | |
|---|---|---|
| फार्यर २<br>पृ. २–५ इ. | (१९०२)<br>वृत्तांतांतील उल्लेख. | श. १५९८–९९<br>इ. १६७६ |

दंडाराजपुरीच्या किल्ल्यानें संरक्षित असलेल्या खोल फांट्यांत शिवाजीच्या आरमारापैकीं सुमारें ३० लहान गलबतें होतीं. नौसेनापतीचा [Admiral] ध्वज.

**पांढरा शुभ्र** होता.... कारवार प्रांतावर शिवाजीचा अंमल व लोकांची दुःस्थिती... शिवाजीनें मुसलमानांच्या पद्धतीप्रमाणेंच कारवार प्रांतांत शहरें व किल्ला यांवर निराळे सुभेदार नेमिले. या सर्वांवर घोडदळाचा एक सेनापति मुख्याधिकारी म्हणून रहातो. फौजदार, सुभेदार, हवालदार, मुलकी सुभेदार ( Civil Governors ), सेनापती किंवा लढाऊ धर्माधिकारी (!) अशा विश्वासाच्या आणि अधिकाराच्या जागा तो सर्व **ब्राह्मणांना** किंवा तत्सदृश अशा **पंडीत** (वैद्य?)नांवाच्या थोड्या हलक्या जातीच्या लोकांना मिळतात [!]. हे सर्वचजण सार्वजनिक हित किंवा सर्वमान्य प्रामाणिकपणा याबद्दल बेफिकीर राहून फक्त स्वतःचेंच हित पहातात. या वर्गाच्या स्वार्थी दृष्टीमुळें, शिवाजीच्या अमलाखालीं एवढा मोठा किनारा असला तथापि तेथें व्यापाराची भरभराट होण्याची आशा नको.

सामान्यतः शिवाजीची सर्व प्रजा एक प्रकारें गुलामगिरीचा अनुभव घेत आहे. देसाई लोकांकडे जमिनी दुप्पट धान्यानें जबरदस्तीनें देऊन त्याची वसुली करण्यासाठीं त्यांचा छळ केला जातो. आज कित्येक ब्राह्मण शिवाजीच्या कैदेंत असून, ब्राह्मण हे धर्माप्रमाणें छळापासून मुक्त असावेत असें असतांहि, तापलेल्या सांडसांनीं त्यांचा छळ होतो. अशा रीतीनें उकळलेला हा पैसा त्यांचाहि असाच छळ होऊन, सुभेदारांना पुढें राजालाच द्यावा लागतो. नंतर पुनः त्यांची नेमणूक होऊं शकते !! देसाई लोक याच तऱ्हेनें आपल्या कुणब्यांना छळतात. अशा रीतीनें **मात्स्य-न्यायानें प्रजेची नागवण** चालू असल्यामुळें फक्त कर्ते पुरुषच नव्हे तर कुटुंबेंच्या कुटुंबें बंधनांत खितपत रहतात !

आदिलशाही अमलांत कर फार हलके होते व लोकहि आबादानींत होते. परंतु बालराजा गादीवर आल्यापासून तेथेंहि अंदाधुंदी माजली आहे. नुकताच बहलोलखानानें **खवासखानाचा खून** करविला. शिवाजी व **मोंगल** हे दोघेहि विजापूरच्या राज्यावर टपून बसल्यामुळें आणखीहि कित्येक भयकर प्रसंग होतील.

| | | |
|---|---|---|
| फ्रायर २<br>पृ. ३२ इ. | (१९०३)<br>उल्लेख | श. १५९८-९९<br>इ. १६७६ |

**अंकोला** किल्ल्याचा मारा थेट **शिवाजीच्या** मुलखाचा [ कारवार, फोंडा इत्यादि जिंकल्यानंतर ] **दक्षिणेकडील सरहद्द** जी **गंगावली नदी** (Gongole River) तेथपर्यंत होतो.

| | | |
|---|---|---|
| फ्रायर २<br>पृ. ४३-४५ इ. | (१९०४)<br>उल्लेख | श. १५९८-९९<br>इ. १६७६ |

विजापूरचे राज्यांत शिवाजीनें सर्वत्र उलाढाली केल्यामुळें, कोणी कोणत्या पक्षाचा आश्रय करावा हेंच पुष्कळांना समजत नाहीं. आपल्या जोडीदार **दक्षिण्यांना** 'मी तुमचा

पुढारी, कैवारी आहे. तुमच्या देशाकरितां माझ्याशिवाय कोणी झटणारा नाहीं.' असें तो सांगतो. आणि यदाकदाचित् एकादे वेळीं त्यांना तो लुबाडीत असला तरी, अन्य प्रकारच्या अस्वाभाविक गुलामगिरींतून त्यांना वाचविण्याकरितां त्याला आणि त्याच्या सैन्याला पडणाऱ्या श्रमाचा तो मोबदलाच समजावा असेंहि तो म्हणतो. शिवाजीची ही बेइमानी आणि परदेशी बहलोलखानाचा उद्दामपणा हीं दोन्ही सहन न होऊन ते आतां मोंगलाला मदतीला बोलावितील असें दिसतें.

इकडे शिवाजी त्यांच्या ह्या अनिश्चितपणाचा फायदा घेऊन आदिलशाहींत, खुद्द विजापुरांत आणि पलीकडे भागानगरपर्यंत मोकाट संचार करितो. मुख्य सैन्य गोंव्यासमोर फोंड्याला ठेवून, आपल्या सैन्याची फक्त एक तुकडी घेऊन तो थेट सुरतेच्या तटापर्यंत जाऊन आला. दुसरी तुकडी संभाजीबरोबर जाऊन भागानगर जाळून लुटून परत आली. तों बहलोलखान आडवा आल्यामुळें विजापूर सोडून आणि तो विजापुरास परत जातांच त्याला चुकवून संभाजी हुबळी, रायबाग, गदग इत्यादि बाजारपेठा लुटून गेला. इकडे **शिवाजीची सुरतेकडील दौड** अगदींच फुकट गेली नाहीं. सुरत म्हणजे आपला 'खजीना' आहे आहे असें शिवाजी म्हणतो. तेथें नगराचे दरवाजे बंद केले. परंतु त्याचा नेहमींचा पेशकस त्यांनीं त्याला दिला. मोंगलाचें सैन्य नेहमीं आसपास मैदानावर असल्यामुळें सुरतेपासून तीस मैलांचे आंतील डोंगरी मार्गानें त्याला जावें लागे. त्याकरितां **रामनगरच्या** राजाकडून वारवार परवानगी लागे व ती तो देई. येतां जातां त्या मार्गाची बारीक माहिती मिळाल्यावर शेवटीं एकदां त्यानें खुद्द रामनगरच घेतलें. ह्याचें एकच कारण तो सांगतो कीं 'माझ्या **तिजोरीचें दार**' रामनगरच्या हातीं देणें मला सोईचें नाहीं !'

| | | |
|---|---|---|
| ऑर्म भा. २६८ पृ. १-११ इ. | (१९०५) कोणा डचाचा वृत्तांत | श. १५९८-९९ इ. १६७६ |

(फ्रेंचमधून भाषांतर) १६७६ मध्यें शिवाजीनें १२००० पायदळ व २४००० घोडदळ यांसह गोवळकोंड्यापासून नऊ मैलांवर तळ दिला आणि मोठी रकम न दिल्यास शहर जाळण्याची धमकी दिली. त्यामुळें भिऊन जाऊन, आम्हीं आमच्या मालाचें रक्षण व्हावें म्हणून १००० फ्लोरीन किंमतीचा बदाम, खारीक, द्राक्षें, पिस्ते अशा वस्तूंचा त्याला नजराणा केला. त्याबद्दल योग्य मान करून त्यानें आम्हांला कौल दिला.

गुप्तपणें ठेवलेली अपार संपत्ति हातीं लागावी म्हणून तो सुलतानाच्या व उमरावांच्या वाड्यांवर हल्ला करणार होता. परंतु सुभेदार **मादण्णा** यानें प्रसंग जाणून त्याला हजार दोन हजार ड्यूकट (होन) चा दररोज जणुंकाय रतीब लावला. नंतर **शिवाजी** सुवर्णानें स्वतःला मढवून घेऊन निघून गेला. शिवाजी १६७६ च्या आगस्टांत परत गेला.

सुलतानाची त्याची भेट झाली तेंव्हां राजे लोकांच्या वहिवाटीप्रमाणें त्यानें स्वतंत्र दरवाजानें प्रवेश केला. भेटीच्या प्रसंगीं त्याच्याकरितां विशेष आसन तयार केलें होतें... संभाषण चालू असतांनाच राजवाड्याला त्याच्या ६००० घोडेस्वारांनीं बोलचाल म्हणतांना वेढा घातला. ते फारच हलके पावलांनीं कोणाला न कळत गोळा झाले ! त्याची प्रजा त्याला जितकी मानते तितकेंच त्याच्यावर प्रेम करते असें यावरुन दिसून आलें.

हिस्टॉ-मिसलनी,-जेस्विट लेटर्स. पृ. ८-१० इ. } (१२०६) तंजावर आणि व्यकोजी. { श. १५९८-९९ इ. १६७६

इ. १६७४ ते ७६ चा जेस्विटांनीं लिहिलेला वृत्तांतः [ मदुरानायक व तंजावरचा नायक यांचें युद्ध होऊन तंजावर नायकाचा पराजय झाला. त्या वेळच्या वधसत्रांतून तंजावरच्या वंशापैकीं फक्त एक अंकुर वांचला. पुढें तो मुलगा मोठा झाल्यावर शिकंदर आदिलशहाकडे आपलें गार्‍हाणें घेऊन गेला. आणि दक्षिणच्या राजकारणांत हात शिरकविण्यास ही संधि बरी आहे असें पाहून त्याची तंजावरीं स्थापना करण्याच्या कामावर त्यानें एकोजीची योजना केली. ]

मदुरा व तंजावर हीं दोन्हीं संस्थानें आदिलशहाचीं मांडलिक असल्यामुळें, तंजावरच्या सुभेदाराला काढून माजी नायकाच्या मुलाला तें संस्थान देण्याचा हुकूम आदिलशहानें दिला. प्रथम तंजावरच्या रक्षकांनीं एकोजीचा पराजय केला. आणि मागें सरून एकोजी योग्य संधीची वाट पहात राहिला. अशीं दोन वर्षें गेल्यावर मदुरानायक व त्याचा भाऊ तंजावरचा अधिकारी यांमध्यें वैमनस्य आल्याचें त्याला कळलें. तेंव्हां त्यानें तंजावरावर अचानक हल्ला केला. पहिल्याच हल्लयांत तें त्याच्या स्वाधीन झालें.मदुरा नायकाचीं इतरहि ठाणीं त्यानें घेतलीं. आणि इकडे आदिलशहाच्या आज्ञेनें ज्याची तंजावरीं स्थापना करण्याकरितां तो आला होता त्या वारसाच्या सैन्यापासूनहि तो आपला बचाव करीत राहिला ! एकोजीच्या या यशामुळें मदुरा नायक इतका घाबरून गेला कीं, त्रिचनापल्लीच्या किल्ल्यासमोर एकोजी आला असतां त्यानें त्याला विरोध केला नाहीं. एकोजीनें त्याच्यावर हल्ला केला असता तर तंजावरप्रमाणेंच येथेंहि त्याला यश येऊन मदुरेचें सर्व राज्य त्याला जिंकतां आलें असतें. पुढें तंजावरचें सिंहासन तंजावरच्या वारसाला न देतां उलट त्याच्यावर एकोजीनें सैन्य पाठविलें, आणि तंजावर जिंकल्यापासूनच एकोजी सिंहासनाधीश होऊन बसला.

आदिलशहाचा प्रजाजन असलेला एकोजी एकदम राजपदावर अधिष्ठित झाला हें अनेकांना सहन झालें नाहीं; आणि नबाबानें [ बहलोलखान ] त्याच्यावर मोठें सैन्य रवाना केलें अशी बातमी पसरली. ( परंतु ही बातमी खरी असल्याचें प्रत्यंतर पुढील पत्रांत सांपडत नाहीं. )

[पृ. १८]—तंजावरच्या नव्या राज्यकर्त्यांच्या अमलाखालीं ओसाड पडलेल्या जमिनी लागवडीस आणण्याची सुधारणा अमलांत आली. पूर्वी कधींहि आलें नव्हतें असें विपुल पीक या सालांत आलें.

| | | |
|---|---|---|
| ओ. कॉ. मा. ३७<br>नं. ४२५३ इ. | (१२०७)<br>सुरत-मुंबई | श. १५९८ पौष व. २<br>इ. १६७७ जाने. १० |

**राजापुराविषयीं** आपलें मत तितकें वाईट नसतांनाहि तेथील असुरक्षितपणा, तेथील अधिकाऱ्यांचें वर्तन आणि तेथें झालेला अत्यल्प खरेदी-विक्रीचा व्यवहार ह्यांमुळेंच आपण तेथून हालण्याचा विचार केला आहे असें दिसतें. इथींची वखार दगडी असून तिला आगीचा धोका नाहीं. नवें घर बांधून तरी (आतांपर्यंत १७००० लारी खर्च होऊन नवें घर उभें होत आहेच.) आहे यापेक्षां अधिक काय सोय होणार ? बरें, निर्यात करण्याकरितां देशांतून आलेला माल लगेच बांधून रवाना होत असल्यामुळेंच **राजापुरांत** तो वीस दिवसांपेक्षां अधिक पडून रहात नाहीं. आणि घाटावर युद्धाची गडबड असल्यामुळें इकडे विक्री मंद होते. आणि आगात माल ठेवण्याची जरूरच पडत नाहीं. तेव्हां तेथे फार माल शिल्लक ठेवूं नये असाच हुकूम देण्यास हरकत नाहीं. जरूरच लागल्यास मुंबई जवळच आहे; तेथून १५ दिवसांत बिनखर्चानें पुरवठा होईल. राजापुरास देशांतून माल आणण्याच्या वेळीं व देशांत माल पोंचविण्याच्या वेळीं आणखी सुरक्षितता ती काय असावयाची ? आपणामार्फत मिळालेलें **राजाचें फर्मान** राजापुरास ठेविलें आहे. शिवाय मी विजापूरच्या **सुलतानाचें** व **नबाबाचें**हि फर्मान आणविलें आहे. विजापूरच्या लोकांनीं ह्या मितीपर्यंत आम्हांला काडीचाहि त्रास दिला नसून सर्व प्रकारें सवलतीनेंच वागविलें आहे. शिवाजीच्या फर्मानाची मात्र तितकी खात्री वाटत नाहीं हें आमच्या ध्यानांत आहे. परंतु त्याची भरभराट होऊन त्याचें राज्य वाढत आहे; यामुळें आपल्याच राज्यांत तो आमची लूट करील अशी शंका वेववत नाहीं. त्याच्या मरणानंतरहि काळजी करण्याचें कारण दिसत नाहीं. कारण, त्याच्या मुलास मुकुट (अधिकार?) प्राप्त झालाच असून (His son is allready crowned) तो बराच समंजस दिसतो. तथापि शिवाजीनें राजरोस केलेला तहहि पाळला नाहीं, आणि **अथणीस** आमची लूट केली; त्याच्या प्रधानांनीं आम्हांला त्रास दिला; राजाकडे बक्षीसा (!) ची अनेक वेळां मागणी करूनहि त्यांनी तें न दिल्यामुळें कंपनीचें नुकसान झालें; ह्या गोष्टी विसरण्यासारख्या नाहींत. या सर्वांचा पाढा वाचून, याबद्दल समाधान केलें नाहीं तर आपण बंदर कायमचें सोडून जाणार असें मीं जेव्हां कळविलें, तेव्हां 'पुढें नीट वागूं' असें त्याच्याकडून आश्वासन आलें. आमचें दर्यास, अथणीला केलेल्या लुटीची भरपाई वगैरे देण्याचें कबूल करून राजाच्या कोणाहि हस्तकानें आम्हांला यापुढें त्रास देऊं नये, अशी खबरदारी घेण्याचें त्यांनीं वचन दिलें. राजानें व अण्णाजी पंडितानें हें आश्वासन दिलें. आणि ह्याचा

ताबडतोब अमलहि झालेला दिसला. स्वतः राजा, पेशवा आणि अण्णाजी यांच्या सहीचे [signed by himself, pisheca (peshwa) and Annajee] सर्व सुभेदार व हवालदार वगैरे अधिकाऱ्यांच्या नांवचे हुकूम सुटले. राजापूरच्या इंग्रजांना काडीचाहि त्रास देतील ते हलालखोरांचे नोकर (निमकहराम? servants to Haulollcores) होत आणि त्यांच्याकडून कोणतीहि सबब न ऐकतां त्यांच्या अपराधाबद्दल भरपाई करून घेण्यांत येईल; अशा तऱ्हेचे ते हुकूम होते. माझ्याकडे आलेली हुकुमाची नकल एका नोकराबरोबर मी घांटांत पाठवून दिली. त्याबरोबर आमच्या रहदारीचा (योग्य) निकाल झाला. पन्हाळ्याच्या सरसुभेदारा ( seere subedar ) नें तर हुकूमाची योग्य अंमलबजावणी करून, शिवाय माझ्या सांगण्याप्रमाणें बैलाचें मर ओझें न मोजतां ९ मणांप्रमाणेंच हिशेब केला. वेळगांवाकडे जाणाऱ्या शिवाजीच्या सैन्याला वाटेंत आमचे १०० बैल दिसले. चौकशी करतांना ते आमचे असल्याचें आढळतांच त्यांना त्यांनीं कोणताहि त्रास दिला नाहीं; एवढेंच नव्हे तर कोल्हापुरावरून जाईपर्यंत रक्षण करण्याकरितां आपले कांहीं लोक बरोबर दिले. हल्लीं सुभेदार राजापुरांत नसला तरी, आमचा माल परवान्याशिवाय चढविणें उतरणें हीं कामें केवळ आमच्या शब्दानें होतात. पूर्वी सारखी मध्यरात्रीच्या परवलीची दगदग राहिली नाहीं [Without chopping (?) at midnight]. तात्पर्य, ते लोक मोठे धोरणी असल्यामुळें आपला फायदा कशांत आहे हें समजून आतां पूर्वीपेक्षां विचारानें वागतील असा अनुभव आला. चालू व्यवहार अगदीं अल्प आहे. हें अर्थात् खरें आहे. परंतु समोंवारची युद्धाची गडबड त्याच्या मुळाशीं आहे. आतां शिवाजी आणि नवाब या उभयतांनीं आपल्या परीनें लुटून हा प्रांत निःसत्त्व करून टाकल्यामुळें यापुढे सैन्याच्या खर्चाला त्यांना येथून पैसा मिळणार नाहीं. आणि त्यांना युद्ध थांबवावें लागेल. तह इतक्यांतच होणार अशा बातम्या येऊ लागल्या आहेतच. कोल्हापुरापासून ७ कोसांवरील संगम नदी ( River of sanggaum ) पासून समुद्र किनाऱ्यावरील सर्व मुलूख सुलतानाकडून मोकासा म्हणून शिवाजीच्या ताब्यांत राहील असें म्हणतात.

हा तह झालाच तर राजापूरची भरभराट होईल. परंतु तह होणें अनिश्चित आहे. पण पुढेहि दीर्घकाल चालण्याचा संभव नाहीं. तथापि राजापुरची वखार चालू ठेवून कारवार व राजापूर या दोन्ही वखारी एकाच मुख्याच्या ताब्यांत दिल्यास फायदा होईल. राजाचें राजापुराइतकें दुसऱ्या कोणत्याहि बंदरावर प्रेम नाहीं. तेव्हां राजापूरची रचना, मुंबई व सुरत यांचें सान्निध्य, शांतता झाल्यावर माल मिळविण्याची व विकण्याची शक्यता, या सगळ्या गोष्टी लक्षांत घेऊन राजापूर भरभराटीस येईल असें वाटतें.

ऑर्मे ११४-६ } (१९०८) { श. १५९८ पौष व. ८
पृ. २६. } मुंबई-सुरत. { इ. १६७७ जाने. १६

देशांत येण्याजाण्याचे मार्ग पोर्तुगीज आणि **शिवाजी** या दोघांमुळें बंद झाले आहेत.

अनेक व्यापाऱ्यांनीं धान्यानें भरलेल्या गुराबा बंदरांत उतरण्याकरितां आणिल्या. परंतु ते फक्त अर्धी जकात देण्यास राजी होते. भरजकात देण्याबद्दल आग्रह धरल्यामुळें ते पुढें चौलकडे निघून गेले.

ओ. कॉ. मा. ३७ } (१९०९) { श. १५९८ पौष व. १४
नं. ४२५८ इ. } सुरत ( स्वाली )-कंपनी. { इ. १६७७ जाने. २२

जॉन चाइल्ड आदिकरून **राजापुरास** प्रथम जाऊन राहिले तेव्हां त्यांनीं तेथील व्यापाराबद्दल पुष्कळच आशाजनक चित्र रेखाटलें होतें. परंतु कापड, वेलदोडे वगैरे माल सुरतेपेक्षां स्वस्त पडेल, युरोपीय माल खपेल आणि राजपूरच्या लुटीबद्दल भरपाई मिळेल इत्यादि त्यांचीं सुखस्वप्नें फोल ठरलीं. रायबाग, अथणी, कोल्हापूर इत्यादि पेठा शिवाजीनें लुटून ओसाड पाडल्या. कापसाचे दरहि फडकले. यामुळें खरेदी व विक्री न होतां राजापुरास माल पडूनच राहिला. राजापूरच्या सुभेदाराच्या लबाडीमुळें कराराप्रमाणें करावयाच्या नारळाच्या खरेदींतहि १२००० रु. चा तोटा झाला. ह्या आणि इतर गोष्टींमुळें-शिवाजीनें करार मोडून अथणी वगैरे ठिकाणीं इंग्रजांचा माल लुटणें, त्याच्या अधिकाऱ्यांचें त्रासदायक वर्तन, देशांतील अशांतता वगैरे—राजापूरची वखार मोडून आम्हीं तेथील नोकर परत बोलाविले. इतक्या थराला गोष्टी आल्यावर तरी शिवाजी न्यायानें वागतो किंवा कसें हें आम्हांला पहावयाचें होतें. त्याप्रमाणें ह्याचा चांगला परिणाम होऊन, शिवाजीनें आमच्या तक्रारी मिटविण्याकरितां व राजापूर न सोडण्याबद्दल मन वळविण्याकरितां आपला पुत्र **संभाजी** याला पाठविलें; आणि यापुढें सर्व कांहीं न्यायानें आणि नियमितपणें देण्याचें व करण्याचें वचन दिलें. तेथील सुभेदारानें **चाइल्डला** गलबतावर जाऊं दिलें नाहीं; आणि यापुढें सर्व गोष्टींत योग्य समाधान करण्याची आणि नियमितपणा संभाळण्याची खात्री देणारीं पत्रें इकडे पाठविलीं आहेत. आपलीं गलबतें भरून झालीं म्हणजे ह्या प्रकरणीं तपशीलवार विचार कौन्सिलमध्यें करूं. मध्यंतरीं, वखार चालू ठेवण्याच्या बाजूला जरी याप्रमाणें कांहीं प्रबळ प्रमाणें असलीं, तथापि येथील प्रांतांत अधिक शांतता प्रस्थापित होईपर्यंत तुमची मालमत्ता आम्हीं विशेष धोक्यांत घालणार नाहीं.

[दि] मुंबईला दगडचुन्याचें मोठें कोठार बांधविण्याबद्दलचा आपला दूरदर्शीपणाचा हुकूम पोंचला. जुनें कोठार वाढवून त्यांत सांठा करून ठेवणें अगदीं जरूर आहे. कारण, साष्टी वगैरे पोर्तु० मुलखांतून धान्यसामग्री आणण्याची त्यांनीं बंदी केली आहे.

मोंगल व **शिवाजी** यांच्या युद्धामुळें मोंगलांच्या मुलखांतून पूर्वीसारखा माल मिळत नाहीं. आणि **शिवाजी** आपल्या मुलखांतील **सर्व धान्य किल्ल्यांवर भरून ठेवितो.** तेव्हां मंगळूर व भटकळ येथील स्वस्त मिळणारा तांदूळ आम्हांला भरला पाहिजे. **पोर्तु॰** व डच लोकहि तेथूनच आपली भरती करितात.

**भीमजी पारखाच्या** इच्छेप्रमाणें आलेला मुद्रक नवे त्याच्या भाषेचे टाईप पाडूं शकत नाहीं. तरी दुसरा तज्ञ इसम पाठवाना. एकंदरीत पहातां देशी भाषेतील छपाई फारशी अशक्य वाटत नाहीं

| | | |
|---|---|---|
| ओ. कॉ. भा. ३७ } न. ४२६३ इ. | (१९१०) मुंबई-सुरत | { श. १५९८ माघ शु. १ इ. १६७७ जाने. २४ |

येथें धान्य विपुल असतें; आणि येथून राजापूर, गोवा इत्यादि ठिकाणांना पुरवठा होतो; यामुळें बेटावर सामग्रीचा तुटवडा कधींच पडूं नये अशी खबरदारी घेण्यांत येईल. परंतु मोंगल आणि **शिवाजी** यांच्यांत शांतता नांदत असती किंवा एकट्या मोंगलांच्या ताब्यांत हा मुलूख असता तर थोड्या श्रमांत आम्हीं वरच्या देशातहि प्रवेश केला असता [१]. तथापि **मोंगल व शिवाजी** यांच्या सरहद्दीवर, डोंगरांत, येथून दोन दिवसांच्या मुक्कामावर, **अविरत युद्धाचें क्षेत्रच** आहे. यामुळे व्यापारी लोकांना तेथून जातांना लूट होण्याचें नेहमीं भय रहातें. अर्थात् यांना आपल्या मालाची विल्हेवाट निश्चयानें करण्याचीं साधनें उपलब्ध नसल्यामुळें त्यांनीं मुंबईला माल आणण्याची अपेक्षा आम्हांला करितां येत नाहीं.

[ ऑर्म ११४-६ पृ. ७ ]—प्रत्यहीं अनेक ब्राह्मण कुटुंबें पोर्तुगीजांचा मुलूख सोडून येथें येऊन रहातात. कारण, त्यांना पाद्री लोकांचें भय वाटतें. एखादा इसम मृत्यु पावल्यास हे पाद्री लोक त्याच्या सर्व मुलांना खिश्चन होण्यास भाग पाडतात. प्रमुख ब्राह्मणांपैकीं जे कोणी अद्यापि वसईसारख्या ठिकाणीं राहिले आहेत त्यांनींहि आपलीं घरें मुंबईतच बांधलीं असून [ अशा आपत्तीपासून त्यांचा बचाव होण्याकरितां ] तेथेंच आपलीं बायका-मुलें ठेवण्याचा त्यांनीं प्रघात पाडला आहे.

[ पृ. ९ ] **शिवाजीचें** व आपलें न बिनसल्यास याच्याहि तिप्पट माल आपल्याला मिळेल. असें म्हणण्याचें कारण असें आहे कीं, आमचा बराचसा माल आम्हांला या आखाताच्या पलीकडल्या बाजूला तयार करून घ्यावा लागतो. साष्टी नदीच्या मुखापासून सुमारें २० मैलांवर विणकऱ्यांचा मोठा जमाव आहे. त्यांच्याकडून ह्या मालाचा पुरवठा होणार आहे. त्यांनीं **मुंबईत येऊन रहावें** अशाबद्दल अद्यापपर्यंत आम्ही **त्यांचें मन वळवूं शकलों नाहीं.** कालांतरानें कदाचित् हीहि गोष्ट शक्य होईल.

फॅ. रे. सुरत मा. ८९ } (१९११) { श. १५९८ माघ शु. ३
पृ. ९ (२) इ. } सुरत (खाली)-मुंबई { इ. १६७७ जाने. २६

शिवाजीकडून कांहीं द्रव्य मिळालें कीं नाहीं किंवा त्याची काय व्यवस्था होत आहे हें कळलें नाहीं. अजूनहि तो फसवीत आहे असें दिसलें तर दाभोळ, चौल, कल्याण वगैरे त्याच्या बंदरांतील गलबतें पकडून माल ताब्यांत ठेवावा. लोकांना मात्र सोडून द्यावें. त्याला एकदां अशा प्रकारची समज दिली पाहिजे, म्हणजे भरपाईबद्दल तो कांहीं त्वरा करील !

(खे) फॅ. रे. सुरत मा. ४ } (१९१२) { श. १५९८ माघ शु. ४
पृ. १४ इ. } स्वाली कन्सल्टेशन { इ. १६७७ जाने. २७

जॉन चाइल्डनें राजापूर-प्रकरणीं कांहीं सूचना केल्या; त्यांवरून त्यानें तेथें पुनः जावें असा हुकूम देण्याइतकी आम्हांला आशा वाटली. बक्षिसाच्या संबंधांत त्यानें राजा व सुभेदार यांच्याकडे पुनः मागणी करून काय यश येतें तें कळवावें. म्हणजे त्यानें तेथेंच रहावें कीं निघून यावें याबद्दल पुढील हुकूम देण्यांत येईल.

(खे) फॅ. रे. सुरत मा. ८९ } (१९१३) { श. १५९८ माघ शु. ९
मा. २ पृ. ९, १० इ. } सुरत–मुंबई. { इ. १६७७ फेब्रु. १

चाइल्ड राजापुरास परत गेल्यास शिवाजी व त्याचे सुभेदार अधिक सामोपचारानें वागतील अशी आशा वाटल्यावरून त्याला जाण्यास आम्हीं परवानगी दिली.

फॅ. रे. सुरत मा. ८९ } (१९१४) { श. १५९८ माघ शु. ११
पृ. १२ (२) इ. } सुरत–मुंबई { इ. १६७७ फेब्रु. ३

जॉन चाइल्डकडून आम्हांला असें कळलें आहे कीं, नारायण शेणवी शिवाजीकडील काम चांगल्या रीतीनें बजावीत नाहीं; त्याच्या मोठ्या शब्दांनीं घाबरून जातो; आणि आमच्या आज्ञांची अमलबजावणी करण्याच्या ऐवजीं त्याचा कल मराठ्यांकडेच आहे. याबद्दल चाइल्डशीं चर्चा करून नारायण शेणव्याची लबाडी स्पष्ट दिसून आल्यास तुम्हीं त्याला कामावरून दूर करावें. आणि शिवाजीकडील सर्व काम चाइल्डकडे किंवा आम्ही सुचवूं त्या इंग्रजाकडे सोंपवावें.

ऑर्म ११४-६ } (१९१५) { श १५९८ माघ व. १०
पृ. १६ इ. } मुंबई–सुरत { इ. १६७७ फेब्रु. १७

आमच्या हातांत आहे त्या मार्गांनीं शिवाजीकडून उगवणी करून घेत आहोंत. नारायण शेणव्यानें १०० मण सुपारी आणि २०० मुडे भात मिळविलें असून बरेच नारळांचें वचनहि घेतलें आहे. त्याच्या हातून उत्तम व्यवस्था होत नाहीं याची जाणीव आम्हांला

आहे. परंतु त्यानें कांहीं थोडा वसूल केला आहे हें ध्यानांत घेऊन त्याच्याच हातून काय-कमाल वसूल होतो तें प्रथम पाहूं. राहिलेला वसूल मग चाइल्डकडून करवून घेऊं. त्यालाहि तें न जमेल तर शिवाजीच्या मुलखांतील सांपडेल तें गलबत धरण्याचा शेवटचा मार्ग आहेच.

लेटर बुक भा. ५ } (१९१६) { श. १५९८ फा शु. १३
पृ. ४०८ इ. } कंपनी–सुरत { इ. १६७७ मार्च ७

**राजापूरची वखार** किफायतशीर होण्याचा संभव आहे हें ऐकून आनंद झाला. **शिवाजीकडून** यावयाच्या द्रव्याबद्दल खटपट सोडूं नका. कर्ज जुनें होईल तशी त्याची वसूली कठीण होईल.

[ दि. पृ. ४०३ ] मुंबईच्या टांकसाळीबद्दल इंग्लंडच्या राजाकडून परवानगी मिळाली. ठसे पुढच्या गलबतानें पाठवितों. तोंपर्यंत तुमचें नाणें पाडण्याचें काम पूर्ववत् जोरानें चालू ठेवा.

इकडून पाठविलेल्या दोन मोठ्या पितळी तोफा बेटावर न ठेवितां विकून टाका. बेटावर ठेवण्याकरितां भरपूर लोखंडी तोफा पाठविल्या आहेत. त्यांची किंमत पितळी तोफांच्या एकपष्ठांश म्हणजे फारच कमी आहे. तरी ह्या पितळी तोफा जरूर विकाव्या.

(से) फॅ. रे. सुरत भा. ८९ } (१९१७) { श. १५९८ फा व. ३
पृ. १५ इ. } स्वाली–मुंबई { इ. १६७७ मार्च १२

ठरल्याप्रमाणें जॉन चाइल्ड राजापुरास जाण्याकरितां निघूं शकला नाहीं. आतां लवकरच निघेल.

ओ. कॉ. भा. ३७ } (१९१८) { श. १५९८ फा व. ११
नं. ४२७२ इ. } मुंबई–कंपनी. { इ. १६७७ मार्च १९

**शिवाजी** आणि **मोंगल** यांच्यामध्यें **तह** झाल्याची विश्वसनीय बातमी आली. घांटाकडून आलेल्या आमच्या कांहीं नोकरांनीं असें सांगितलें कीं **शिवाजीच्या** मुलखां-तून मोंगलांच्या मुलखांत जाण्यायेण्यास पूर्ण मोकळिक झाली आहे. असें असेल तर देशाशीं व्यापार वाढविण्याची आम्हांला आशा वाटते. [ ऑर्मे ११४–६ पृ. २३ ]

फॅ. रे. सुरत भा. ८९ } (१९१९) { श. १५९८ फा व. १४
पृ. २३ (२) इ. } सुरत–मुंबई. { इ. १६७७ मार्च २२

**शिवाजीनें** ऑस्टिनला कल्याण-भिवंडीवर १००० रु. ची बरात दिली आहे. कंपनीचा पैसा वसूल करितांना स्मरण ठेवून याचाहि पैसा वसूल करावा.

हिस्टॉ. मिसेलनी-जेस्विट लेटर्स } (१९२०) { श. १५९८-९९
पृ. १०-११ इ. } जेस्विटांचा वृत्तांत. { इ. १६७७

इ. स. १६७६ च्या आरंभीं, (पूर्वीचा) आदिलशहाचा सेनापती व हल्लीं तंजावरचा राजा झालेला **एकोजी**, आणि त्रिचनापल्लीस आपल्या दरबारासह रहाणारा **मदुरेचा नायक** ह्यांच्यामध्यें मोठें युद्ध होईल अशी अपेक्षा होती. (पण ती फोल ठरली !)

[पृ. ११]-इ. १६७७ च्या आरंभीं, एकोजीचा वडील भाऊ शिवाजी (Sibaji) उत्तरेकडून मोठें प्रबळ सैन्य घेऊन **जिंजीचें** (*Ginja*) राज्य जिंकण्याकरितां येत आहे अशी खबर आली. शिवाजी हा मोंगलांचा सरदार असून बेइमानानें त्यानें मोंगलांचा बराच मुलख आपल्या हाताखालीं घातला होता. शिवाजीच्या मुलखापासून हा प्रांत दोन महिन्यांच्या मार्गावर म्हणजे फारच दूर असल्यामुळें आणि मध्यें **विजापूर** व **गोवळकोंडें** या समर्थ मुसलमानी शाह्यांचे अमल असल्यामुळें, शिवाजी इकडे येणें ही गोष्ट सामान्यतः अशक्यच समजली गेली. परंतु लवकरच **जिंजीचा** मोठा किल्ला त्यानें जिंकला आणि अशक्य वाटणारी गोष्ट शक्य झाली ! यावेळीं मुसलमानांमध्यें आपसांत **दुही** होती आणि इतर कित्येक **हबशी लोक** (Abyssinians) त्याला मिळाले; ह्या गोष्टींचा त्याला फायदा झाला. [पृ. १२]-शिवाजीनें जिंजीचें राज्य इतक्या सहज जिंकलें कीं पुढें त्याला कोणीं विरोध केला नाहीं. त्या किल्यावरील हबशी अधिकारी शस्त्रास्त्रांपेक्षां सुवर्णामुळेंच पराजित झाला ! आदिलशहानें नबाबाला दिलेल्या प्रांताचा सुभेदार २ हजार घोडदळ उभारून शिवाजीला अडविण्यासाठीं सज्ज झाला होता. परंतु शिवाजी समोर येतांच त्यानें पळ काढला. पुढें तो व त्याचा मुलगा असे शिवाजीनें कैद केले. पण तो स्वतः पळून गेला. आणि जबर दंड भरून त्यानें मुलाची सुटका करून घेतली.

[ पृ. १३ ]-जुलमी ( tyrant ) शिवाजीनें जिंजीचें राज्य ( मागील पत्रांत लिहिल्याप्रमाणें ) घेतल्यावर आणि एक वर्ष वेढा घालून वेलोरचा किल्ला जिंकल्यावर हिंदुस्थानांतील मुसलमानांचें बळ लक्षांत घेऊन, भविष्यत्कालीं त्यांच्या सर्व एकवटलेल्या सामर्थ्याचाहि प्रतिकार करतां यावा म्हणून त्यानें बंदोबस्त करण्यास सुरवात केली. मुसलमानांना ह्या राज्यांतून शिवाजीनें घालवून लावतांना त्यांच्या मशिदींचा अपमान आणि भ्रष्टाकार केला होता ! यामुळें, तूर्त जरी त्याला कोणतीहि भीति नव्हती [ तरी पुढची तरतूद करणें अवश्य होतें ]. आपला उद्देश सिद्धीस नेण्याकरितां निसर्गतःच दुर्गम असलेल्या जिंजी किल्ल्याची पुनः त्यानें डागडुजी केली. पहिले तट पाडून नवे तट व बुरुज असे कौशल्यानें बांधले कीं, तें काम हिंदी लोकांचें नसून युरोपीयांचेंच असावें असें वाटतें. कांहीं जुने निरुपयोगी किल्ले पाडून त्यानें कित्येक नवे भुईकोट व डोंगरी किल्ले बांधले. पाश्चात्यांच्या पद्धतीचें अवलंबन करून त्यानें मोठे खंदक खोदले, तलाव बांधले आणि युद्धोपयोगी इतर इमारती वगैरे रचना बनविल्या. या कारखान्यांवर त्यानें आपल्या प्रजेकडून जुलूम करून जमविलेली अपार संपत्ति खर्च केली.

[पृ. १४]- शिवाजीच्या जबर करांच्या ओझ्याला कंटाळून पुष्कळ लोक देशत्याग करून गेले. ज्यांना असें जातां आलें नाहीं ते त्याला शाप देऊन मुसलमानांचें राज्य फिरून व्हावें म्हणून इच्छितात ! जिंजी आणि वेलूरचीं राज्यें वेचिराख झालीं आहेत. सर्वांना ठार करून एकट्यानेंच ह्या डोंगर पठारावर त्याला राज्य करावयाचें आहे असें दिसतें !

एकोजीच्या राज्याशिवाय इतरत्र अशा रीतीनें सर्वत्र निर्वैर केल्यावर, शिवाजी एकोजीला भेटण्याचें ठरवून, मदुरानायकाच्या मुलखांतून शांततेनें कूच करून, तंजावरपासून ९ मैलांवर (३ लीग) कावेरीच्या तीरीं येऊन राहिला. बंधुभावानें स्वागत होईल अशा आशेनें एकोजी त्याला तेथें जाऊन भेटला; परंतु बापाच्या खजीन्याचा हिस्सा मिळण्याकरितां लोभाविष्ट होऊन शिवाजीनें त्याला कैद केलें. एकोजीनें मोठ्या धाडसानें पुरांतून पोहून आपली सुटका करून घेतली. आणि हें कळतांच शिवाजीनें त्याचा जिंजीकडील मुलूख काबीज केला......नंतर शिवाजीचा मुलगा [संभाजी] मोठें सैन्य घेऊन उत्तरेकडे होता त्याला मुसलमानांनीं अडचणींत आणल्याचें कळल्यामुळें तो इकडील सैन्य सोडून देऊन उत्तरेकडे गेला. ह्या वेळीं एकोजीनें जिंजींतील मुलूख परत मिळविण्याची खटपट केली. त्याच्या पदरचे मुसलमान हयशाचे शत्रू आणि नबाबाचे पक्षपाती असल्यामुळे त्यांच्या चिथावणीनेंच तो ह्या उद्योगास लागला. भावाच्या सैन्याचा त्यानें पराजय केला. शिवाजीच्या ह्या सैन्याचीं अधिकारसूत्रें एक ब्राह्मण आणि शिवाजीचा सावत्र भाऊ संतोजी अशा दोघांच्या हातांत होतीं. संतोजी हा मोठा शूर व कसलेला सेनापती होता.

एकोजी फारसा विरोध न होतां जिंजी प्रांतांत शिरला. त्याचे सैन्यांत ५।६ हजार घोडदळ होतें. शिवाजीच्या सैन्यांत ९ हजार होतें असें म्हणतात. परंतु शिवाजीच्या जुलमानें चिडलेले एकोजीकडील मुसलमान जीवावर उदार होऊन आल्यामुळें शिवाजीचे लोक त्यांना वचकत होते. उभयपक्षीं मोठे शौर्यानें युद्ध झालें. एकोजीचें पायदळ पळूं लागलें त्याच्या घोडदळानें शिवाजीच्या लोकांचा पराजय केला. परंतु एकोजी अडचणींत सांपडला आणि त्याचा पक्का मोड झाला. एकोजीचा एक सेनापती आणि लहान भाऊ कैद झाले. दोन्ही सैन्यांची मिळून पांच सहा हजार मृत्युसंख्या झाली. एकोजीपेक्षां त्याच्या शत्रूंचेंच नुकसान अधिक झालें. एकोजीचें मुसलमान सैन्य पळत जाऊन कावेरीपार झालें आणि त्यांनीं मदुरानायकाचा आश्रय केला. त्यामुळें संतोजी बरोबरच मदुराच्या सैन्यानेंहि तंजावरला वेढा दिला. मोठी रकम घेऊन तंजावरचा किल्ला व राज्य मदुरानायकाच्या हवालीं करण्याचें संतोजीनें ठरविलें. परंतु पुढें वचनभंग करून एकोजीचा ताबा कायम ठेवून संतोजी परत जिंजीकडे फिरला.

डाग रजिस्टर १६७७
पृ. ९८-९९ इ. एप्रील ११ न्यू. } (१९२१) कॉरोमंडेल- { श. १५९९ चैत्र शु. ९ इ. १६७७ एप्रील १

विजापूरच्या राज्यांतील यादवीचा फायदा घेतां यावा म्हणून, गोवळकोंड्याच्या सुलतानानें, २ लक्ष पायदळ व २० ह. घोडदळ इतकें सैन्य **दिवाण मादण्णा** आणि **सरलष्कर इब्राहीमखान** यांच्या हाताखालीं देऊन, त्यांना विजापुराकडे पाठविलें. विजापुराकडे याच वेळीं **मोंगलांचीहि** स्वार्थी दृष्टि वळली त्यामुळें, त्यांच्या भीतीस्तव हें सैन्य गोवळकोंड्याच्या राज्याच्या हद्दीवरच राहिलें......**एकोजी** राजानें आमच्यावर **नागापट्टण**कडे शस्त्र धरलें होतें. परंतु इ. १६७६ डिसेंबर १ ( ११ न्यू. ) रोजीं त्याचा आमचा तह झाला......एकोजीवर **मदुरेचा** नायक व इतर राजे स्वारी करण्याचें योजीत आहेत, त्याची फिकीर न करितां तो आपल्या प्रजेची सहानुभूती मिळविण्याकरितां आपल्या देशांतच उत्साहानें सुधारणा करीत आहे......

ऑर्म ११४-६
पृ. २९ इ. } (१९२२) मुंबई-सुरत. { श. १५९९ चैत्र शु. ११ इ. १६७७ एप्रील ३

आम्हीं पूर्वी **भिवंडीच्या** विणकऱ्यांबद्दल लिहिलेंच होतें. जरी आम्हीं **त्यांनीं येथें येऊन रहावें अशासाठीं त्यांचें मन वळवूं शकत नाहीं**; तथापि बराच माल पुरविण्याचें त्यांनीं आम्हांला अभिवचन दिलें आहे.

ऑस्टिनच्या हिशेबापैकीं शिवाजीकडून अद्यापि कांहींच भरपाई झाली नाहीं. आणि लवकर कांहीं प्राप्त होईल असेंहि आम्हांला वाटत नाहीं.

मि. चाइल्ड राजापूरला गेला आहे.

[ सदर पृ. ३५ ]- मे २ चे आधींचें पत्र-**सिद्दी**संबूळनें उद्यां निघावें म्हणून आम्हीं लकडा लाविला. परतु आपली येथें रहाण्याची परवानगी येईल या आशेनें तो आणखी ३।४ दिवस रेंगाळत आहे.

याच बाबतींत मे १८ चें पत्र आहे. आतां उशीर झाला, जातां येत नाहीं, असें म्हणण्याच्या इरादानें तो दिवस पुढें ढकलीत आहे !

फॅ. रे. सुरत मा. ४
पृ. ४२ इ. } (१९२३) सुरत कन्सल्टेशन { श. १५९९ चैत्र व. ३ इ. १६७७ एप्रील १०

**शिवाजीनें** [धरनगांव] लुटलें त्यावेळीं गाड्या फार महाग मिळाल्या, त्यामुळें गाडीभाडें फारच पडलें.

फॅ. रे. सुरत मा. ४
पृ. ४५ इ. } (१९२४) सुरत कन्सल्टेशन { श. १५९९ चैत्र व. ५ इ. १६७७ एप्रील १२

या वर्षी शिवाजी **सुरतेवर येण्याची** लोकांना भिती वाटत असल्यामुळें एक महिनाभर येथें ठेवलेले शिपाई इतक्यांत परत पाठवूं नये असें ठरलें.

डाग रजिस्टर १६७७ } (१९२५) { श. १५९९ चैत्र व. ५
पृ. १०५ इ. एप्रील २२ न्यू. } { इ. १६७७ एप्रील १२

**मदुरेच्या नायकाची** स्थिति दिवसेंदिवस वाईटच होत आहे. नुकतेच त्याचे दोन नातेवाईक त्याचा पक्ष सोडून देऊन बऱ्याचशा सैन्यासह विजापूरचा सेनापती **एकोजी राजा** याला जाऊन मिळाले. यामुळें त्याची इतकी भयंकर निराशा झाली कीं तो आत्मघाताला प्रवृत्त झाला. एकोजी राजा दक्षिणेस कॉरोमांडलकडे आपली सत्ता क्रमानें वाढवीत आहे.

(से) फॅ. रे. सुरत } (१९२६) { श. १५९९ चैत्र व. ८
भा. ४ पृ. ५३-५४ इ. } सुरत, सुभेदार-सिद्दी संबूळ { इ. १६७७ एप्रील १५(!)

**मुंबई बेटावर** कोणाही परकी लोकांना येऊं देऊं नये असा इंग्रज प्रेसिडेंटला हुकूम आला आहे. परंतु मेहेरबानीखातर तुम्हांला तेथें राहूं देण्याबद्दल त्यानें डेप्यु० प्रेसि०ला कळविलें आहे. तरी तुम्हीं आपले शिपाई कह्यांत वागवून बेटावरील रहिवाशांना त्रास न होण्याबद्दल जपा. तेथेंच रहावयाचें ठरल्यास बेटावर ५० पेक्षां अधिक माणसें न ठेवितां, बाकीचीं तुम्हीं गलबतावरच राहूं द्यावीं.

शि. घ. ६६ } (१९२७) { श. १५९९ वैशाख शु. ३
श. } { इ. १६७७ एप्रील २४

मल्हारि गोसावी याच्या मोवले येथील अर्धे चावरांतून १५ बिघे कराड येथील विश्वनाथभट गिजरे यांस दिले आहेत.

सा. ले. ६२ } (१९२८) { श. १५९९ वैशाख शु. ३
सु. १०७७ रबल १ } रोखा सी. { इ. १६७७ एप्रील २४

अनाजी दत्तो-तहसीलदार नि॥ शंकराजी निळकंठ राऊ ( चांबळी )
तुवा शंकराजीस आजार न देतां उठीन येणें.

(से) फॅ. रे. सुरत } (१९२९) { श. १५९९ वैशाख शु. ८
भा. ८९ पृ. ३३ इ. } सुरत-मुंबई { इ. १६७७ एप्रील ३०

'सिद्दी संबूळला पावसांत राहूं द्यावं' अशी आम्ही तुमच्याकडे शिफारस करावी अशें संबूळचें आम्हांला पत्र आलें. परंतु तसें आम्हीं करीत नाहीं. त्याचें उद्दिष्ट **दंडाराजपूर** असतें तर त्याचें सैन्य मुंबईसच घोटाळत राहिलें नसतें. अशा परिस्थितींत तुम्हीं त्याला इतका दीर्घ कालपर्यंत आम्हांला कळविल्याशिवाय राहूं दिलें हें चांगलें केलें नाहीं. बरें, आतां तरी त्याला प्रथम सामोपचारानें असें सांगा कीं, बेटावर त्याला राहूं देणें

म्हणजे इंग्लंडचा राजा, कंपनी व प्रेसि० ह्यांचा हुकूम मोडणे आहे. याकरितां त्यानें एकदम बेट सोडून चालतें व्हावें. इतकें तो तसाच राहील तर सिद्दीच्या लोकांनीं बेट सोडून निघावें असा जाहीरनामा काढा. तीन दिवसांपुढें त्याला बेटांतून कोणत्याहि प्रकारची सामग्री विकूं नये,आपल्या घराजवळ येऊं देऊं नये किंवा त्याच्याशीं कांहींच संबंध ठेऊं नये अशी बेटावरील लोकांना ताकीद करा. आम्हीं त्याला बेटावर रहाण्याची परवानगी देणार नाहीं. आणि जर तो याउप्पर राहील तर त्यानें स्वतःच्या जबाबदारीवर रहावें.

डाग रजिस्टर १६७७ } पृ. १३२ इ. मे १२ न्यू. } (१९३०) सुरत- { श. १५९९ वैशाख शु.१० { इ. १६७७ मे २

बंगालचा **लोभी** नबाब **शाहिस्तेखान** यानें **नीचपणानें** आमच्याविरुद्ध असत्य तक्रारी दरबाराकडे केल्यामुळें त्याच्या निराकरणार्थ जानेवारी ८ (१८ न्यू.) रोजीं दिल्लीकडे एक व्यापारी पाठविला.

(से.) फॅ. रे. सुरत भा. ८९ } पृ. ३५-३६ इ. } (१९३१) सुरत-मुंबई. { श. १५९९ वैशाख शु.१५ { इ. १६७७ मे ७

मोगल सुभेदारानें विनंति केल्यावरून वरील [ ले.१९३० ] हुकूम बदलून सिद्दीला मुंबईला रहावयास परवानगी दिली. परंतु त्याच्या लोकांवर बरींच बंधनें घातलीं.

फॅ. रे. फोर्ट सेंट जॉर्ज } भा. १ पृ. ७ (४) इ. } ( १९३२ ) फो.सें.जॉज कन्सल्टेशन { श. १५९९ वैशाख व. ३ { इ. १६७७ मे ९

**शिवाजी** ( किंवा त्याचा मुलगाहि असेल ) **गोवळकोंड्याच्या** नोकरींत सामील झाला. तो २० ह. घोड० व ४० ह. पाय० घेऊन **जिंजीवर** चालून जात आहे. त्याच्या सैन्याच्या अघाडीचे सुमारें ५ ह. घोडेस्वार येथून ९ व ८ कोसांवर (legues Gentu) असलेल्या **त्रिपती** व कलस्त्रीवरून गेले ( Trippaty and calastry ). येथून ४ कोसांवर असलेल्या **कांजीवरमला** ते आज रात्रीं येतील. एवढी मजल एका रात्रींत जाण्याचें त्याच्या स्वारांच्या अंगवळणीं पडलें आहे.

त्याच्या स्वाऱ्यांचा सर्वत्र कटु अनुभव आला असल्यामुळें आम्ही बंदोबस्ताकरितां ५० खिस्ती व १०० हिंदी शिपायांची भरती करीत आहोंत. हिंदी शिपाई, त्याच्या सैन्यांत संचार करून त्याच्या हालचालींची बातमी मिळविण्याकरितां आणि आमच्या ब्राह्मणाबरोबर राहून वेळींच खबर काढण्याकरितां, वाढवावयाचे आहेत. **शिवाजीचे** बेत नजर दिसतात त्यापेक्षां दूरवर पोंचणारे आहेत अशी शंका येते. तेव्हां त्याच्या हालचाली पाहून धोरण ठरवावें.

टिपण—येथून अडीच कोसांवर **पेडा पोलम्** येथें **शिवाजीचें** सैन्य येऊन थोडा वेळ राहिलें आहे. [ फोर्ट सें. जॉर्ज डायरी १, १६७२--७८ पृ. ११२--१३ ].

ओ. कॉ. मा. ३८ } (१९३३) { श. १५९९ वैशाख व. ४
नं. ४२८३ इ. } सुरत व मलबार किनारा { इ. १६७७ मे १०

शिवाजी सुरतेजवळ आल्याची दाट वदंता आहे. वलसाड व चिखलीच्या आसपास फिरणाऱ्या त्याच्या लहानशा सैन्यामुळें सर्व देशांत गोंधळ झाला असून गणदेवीचे लोक त्याच्या भीतीमुळें सुरतेंत आश्रयार्थ आले. सुभेदारानें ५०० शिपायांची नवी भरती करून किल्ल्यांत जावयाच्या पुलावर कडेकोट बंदोबस्त केला. कोणाचाहि पुरा तपास केल्याशिवाय त्याला आंत सोडीत नाहींत; कारण शिवाजीचे पुष्कळच साथीदार सुरतेंत असावे असा त्याचा वहीम आहे.

फॅ. रे. फो. सें. जॉर्ज } (१९३४) { श. १५९९ वैशाख व. ८
मा. १ पृ. ७ (४) इ. } फो. सें. जॉर्ज कन्सल्टेशन { इ. १६७७ मे १४

शिवाजी राजाकडून निरोप आणि पत्रें घेऊन एक ब्राह्मण आणि दोन इसम आले. त्यांत त्यानें कांहीं पुष्टिकारक रत्नें (cordiall stones) व विषावर उतारे (counterpoisons) मागितले होते. आम्हीं शहरांतून खालील वस्तु विकत घेऊन त्या, एक मित्रत्वाचें पत्र, लहानसा नजराणा आणि कांहीं आमच्या बागेंतील फळफळावळ अशीं आमच्या दूताबरोबर देऊन त्याच्याकडे पाठविलीं. त्याचा दूत महादोजी पंतलू यास ४ वार कापड व चंदनाचीं ४ पात्रें (Veece ?) दिलीं. शिवाजीनें पत्रांत जिनसांच्या किंमतीबद्दल आकार करण्यास लिहिलें होतें. तथापि इतक्या क्षुद्र गोष्टींची किंमत घेणें आम्हांला बरें वाटलें नाहीं. कारण, तो एवढा मोठा इसम असून त्याचे मित्रत्वाचें आज कंपनीला महत्त्व असून पुढेंहि त्याचें सामर्थ्य वाढेल त्याप्रमाणें तें वाढणार आहे. विशेषतः त्याचें सैन्य येथून २ ते ५ कोसांच्या अंतरावर असून त्याच्या मनांत आल्यास तो केवळ एका दिवसांत येथें येऊन पोंहोंचूं शकेल.

शिवाजीला पाठविलेल्या औषधांच्या किंमती पुढें दिल्या आहेत. एकंदर किंमत ६० होन व २० फनाम झाली [डायरी मा. १ पृ. ११३].

स. १३३ ले. २० } (१९३५) { श. १५९९ वैशाख व. १२
श. } { इ. १६७७ मे १८

रा. शिवाजी राजे— पुरुषोत्तम सोमयाग भट (खुरडी).

आम्ही श्रीस ४२० होन नेम केला. पैकीं श्रीस ३० व तुम्हांस ३० अन्नछत्रास ३६० होन. तुम्ही कांहीं वचनार्थ न करणें.

फो. सें. जॉर्ज डायरी मा. १ } (१९३६) { श. १५९९ वैशाख व. १२
१६७२ ते ७८ पृ. ११४ इ. } { इ. १६७७ मे १९

गेलीं कित्येक वर्षे आपण अडचणींत आहोंत. आतां हग अधिकच वाढत आहेत. गोवळकोंड्याच्या राजाशीं झालेलें शिवाजीचें खलबत आम्हांला फार भीतिदायक वाटतें.

फॅ. रे. फो. सें. जॉर्ज, मा. २७ } (१९३७) { श. १५९९ ज्येष्ठ शु. ४
पृ. १३ इ. } शिवाजीराजा-ग. लॅंग्वॉर्न { इ. १६७७ मे २५

आपलें पत्र सुवेळीं पोंचलें. मालदीव नारळ, जहरी मोहरा (bezoar or beazar) इतर पुष्टचौषधें वगैरे पोंचलीं. आनंद झाला. महादोजीकडून आपलें चातुर्य वगैरेबद्दल कळून सर्व लोकांशीं आपण सलोखा ठेवितां हें ऐकून समाधान झालें. तरी आणखी नारळ वगैरे पाठवून किंमती कळविण्यास संकोच धरूं नका. या पत्राबरोबर आपल्याकरितां मानपान पाठविले आहेत त्यांचा स्वीकार करावा. [ हें पत्र शिवाजी राजा वेलूरला वेढा घालीत होता त्या वेळीं त्यानें लिहिलें. (Letter from his Leaguer at Raja Vealour), फो. सें. जॉर्ज डायरी मा. १ पृ. ११५]

फॅ. रे. सुरत मा. ८९ } (१९३८) { श. १५९९ ज्येष्ठ शु. ५
पृ. ४०-४१ इ. } सुरत-मुंबई { इ. १६७७ मे २६

गेलीं ४ वर्षे सुरतेला शिवाजीचें सारखें भय वाटत आहे. कारण, त्याचें सैन्य नवसारी व गणदेवी येथें सुरक्षितपणें राहिलें असून, मुख्य अधिकाऱ्यांनीं तेथील देसायांच्या घरांत वस्ती केली आहे. तेथील देसाई, आपलीं कुटुंबें घेऊन सुरतेला पळून आले. काजी व इतर अमलदारहि तसेच पळाले. शिवाजीचे लोक बाहेरच्या प्रांतांत खंडणी वसूल करितात एवढेंच नव्हे तर त्याचे ४०।५० घोडेस्वार येऊन ते सुरतेचे सुभेदार व बादशाही अमलदार यांच्याकडेहि राजरोसपणें रसद आणि खंडणीची मागणी करितात. शिवाजीचें सैन्य दररोज थोडें थोडें वाढत असून खुद्द सुरत शहरांत त्याचे कांहीं सैनिक गुप्तपणें राहिले आहेत असें खात्रीलायक समजतें. यामुळें किल्लेदारानें पहाऱ्यावर ५०० सैनिक वाढवून रात्रंदिवस कडक पहारा ठेविला आहे. फ्रेंच, डच व आम्ही कंपनीची मालमत्ता व स्वतः स्वातंत्र्य कसें राखतां येईल या फिकिरींत आहोंत. शिवाजी शहरावर अकस्मात् चालून आला तर त्याला आमच्याकडून विरोध होणें अशक्य आहे. यामुळें त्याच्याशीं जितकें सामोपचारानें रहातां येईल तेवढें रहाण्याशिवाय गत्यंतर नाहीं. मुंबई व राजापूर येथें त्याचे आपले संबंध मित्रत्वाचे असल्यामुळें येथेंहि आम्हांला तो बरें वागवील अशी आशा आहे. परंतु तितका विश्वास न येऊन आमच्याविषयीं त्याचें मन कसें आहे हें पहाण्याकरितां आम्ही सेनापती मोरोपंडितालासलोख्याचें पत्र लिहिलें आहे. 'तुम्ही शहरावर वाटेल त्या तऱ्हेचा हल्ला केला तथापि तुमच्या लोकांनीं आमची वखार, लोक, दलाल किंवा नोकर यांना त्रास देऊं नये; असे हुकूम शिवकजी वगैरे अधिकाऱ्यांना द्यावे; आणि प्रसंगीं दाखविण्यासाठीं उपयोगी पडावे म्हणून असे हुकूम (प्रत) तुम्ही आमच्याकडेहि पाठवावे.' असें त्यांत सुचविलें आहे. त्या पत्राच्या नकला पाठवीत आहों. त्या नारायण शेणव्याकडे पाठवूं नयेत. त्याचा कारभार दीर्घसूत्री आहे. कॅप्टन केविन् आणि खवास (Kaus) मोदी यांच्याबरोबर पत्रें पाठवून त्वरेनें उत्तर आणवा

......**शिवाजीला** देखील त्याच मजकुराचें पत्र पाठविण्याचें आमच्या मनांत आलें आहे. पूर्वी केरिवनला पाठविण्याबद्दल लिहिलें. परंतु थोड्या धोरणी अशा एखाद्या सार्जंटलाहि पाठवून हें काम थोडक्यांत भागेल असें वाटतें. खवास मोदीनें मात्र शक्य ती माहिती मिळवून खुद **शिवाजी** पावसांत कोठें रहाणार, **मोरोपंत** छावणीला कोठें जाणार इत्यादि बातमी मिळवून कळविण्याची खबरदारी घ्यावी.

| | | |
|---|---|---|
| ओ. कॉ. भा. ३८<br>नं. ४२८३ इ. | (१९३९)<br>सुरतेची हकीकत | श. १५९९ ज्येष्ठ शु. १०<br>इ. १६७७ मे ३१ |

शिवाजीचें सैन्य आपल्या देशांत जाऊन राहिल्यामुळें हल्लीं शिवाजीबद्दलची भीती कमी झाली आहे.

| | | |
|---|---|---|
| डाग रजिस्टर १६७७<br>पृ. १८१ इ. जून २० न्यू. | (१९४०)<br>कॉरोमांडेल— | श. १५९९ ज्येष्ठ व. ६<br>इ. १६७७ जून १० |

विजापूरकर व शिवाजी यांच्या युद्धामुळें गोवळकोंडा-दरबारांत थोडी चलविचल झाली. **महमद इब्राहीम** सैन्यासह अजून बाहेर लढाईच्या तयारीनें आहे.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. मुंबई. भा. २<br>पृ. ६–७ (३) इ. | (१९४१)<br>मुंबई कन्सल्टेशन | श. १५९९ ज्येष्ठ व. ९<br>इ. १६७७ जून १३ |

सुरतकरांचें २६ मेचें पत्र आल्याप्रमाणें मोरोपंडिताच्या नांवचें पत्र घेऊन **रायगडला** त्वरेनें जाण्यासाठीं खवास मोदीला पाठवावें. त्यानें लगेच जाऊन सुरते-जवळील सैन्याच्या सेनापतीकरितां मोरोपंताचे हुकूम घेऊन प्रेसि०ला देण्याकरितां जलद परत यावें.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. फो. सें. जॉर्ज<br>भा. २७ पृ. १४-१५ (३) इ. | (१९४२) | श. १५९९ ज्येष्ठ व. १२<br>इ. १६७७ जून १६ |

वीर राघवय्या, गोवळकोंडा—ग० विल्यम लॅंग्थॉर्न.

**शिवाजी** राजा, **शेख मिनाजू** (Minaju), **सिद्दी मसाऊद**, **शेख मखटूम** (Mocktoom) **गसाल कोटी तिमय्या** वगैरे मोठे असामी अनेक देशांहून येथें जमा झाले आहेत. त्यांची सरबराई करणें, त्यांना भेटी देणें व त्यांची रवानगी करणें इत्यादि कामांत **मादण्णा** ब्राह्मण गुंतून गेल्यामुळें ह्या [things] ची रवानगी होण्यास इतका उशीर झाला. आतां पूर्वीप्रमाणें **कारभार कोणा एकाचे हातांत नसून ह्या सर्व मातबर असाम्यांच्यावर आम्हांला अवलंबून राहिलें पाहिजे** हें आपल्या लक्षांत आलेंच असेल.

फॅ. रे. फो. सें. जॉर्ज } (१९४३) { श. १५९९ ज्येष्ठ व. १४
भा. १ पृ. १० (४) } फो. सें. जॉर्ज कन्सल्टेशन { इ. १६७७ जून १८

शिवाजीमहाराजांचें वेलूरच्या वेढ्यांतून २५ मेचें पत्र आलें. त्यांत त्यानें आणखी जिनसा मागितल्या; त्या खटपटीनें मिळवून, आपला वकील रामण्णा याच्याबरोबर शिष्टाचाराचें पत्र देऊन पाठविल्या. जिनसांच्या किंमती न मागतां त्याला या वस्तु नजर केल्या. कारण, त्याचें सामर्थ्य एकसारखें वाढत आहे. गोवळकोंड्याच्या मुलखांत त्याचा इतका अमल चालतो कीं, राजाला मिळावयाचा कर तो सर्व आपल्या लोकांकडून वसूल करवितो. आणि राजाचे 'अवलदार' व इतर मोठे अधिकारी आहेत त्यांना आपल्या मनाप्रमाणें शासन करितो. पाठविलेल्या जिनसांची यादी पुढें दिली आहे. किंमत ५२ होन २१ फनाम. [डायरी भा. १ पृ. ११५]

डाग रजिस्टर १६७७ } (१९४४) { श. १५९९ ज्येष्ठ व. १४
पृ. १९४ इ. जून २८ न्यू. } सुरतेची बातमी { इ. १६७७ जून १८

एक वर्षापूर्वी शिवाजीनें जिंकलेल्या **रामनगरच्या** किल्ल्यांत (सुरतेपासून २५ मैल) त्याचें १० ह. सैन्य आल्यामुळें सुरतेला लुटीची भीती वाटली. त्या सैन्यानें शहरावर हल्ला करण्याची भीती दाखवून १० ह. रुपये उकळले असें म्हणतात. **डच कौन्सिलर अवेमा** यानेंहि आपल्या मालाचा बंदोबस्त केला.

ओ. कॉ. भा. ३७ } (१९४५) { श. १५९९ ज्येष्ठ व. ३०
नं. ४२६६ इ. } फो. सें. जॉर्ज-कंपनी. { इ. १६७७ जून १९

मोंगलांच्या व विजापूरकरांच्या हद्दींत मुलूख जिंकून व लूट करून प्रबळ आणि प्रसिद्ध झालेला **शिवाजी**, आतां १६ ते २० हजार घोडदळ व कित्येक ह. पायदळ घेऊन, गोवळकोंड्याच्या सुलतानाच्या म्हणजे **मादण्णाच्या** बोलावण्यावरून इकडे आला आहे. जिंजी, वेलूर, पमनगोंडा आणि पोर्टोनोवोपर्यंतचा कर्नाटकाचा भाग विजापूरकरांच्या ताब्यांतून घेण्यासाठीं त्यांनीं शिवाजीला **सेनापतिपद** दिल्यामुळें एका अर्थानें त्याला या प्रांताचें स्वामित्वच दिल्यासारखें झालें आहे. कारण, त्याला विरोध करण्यास समर्थ असें गोवळकोंडेकरापाशीं सैन्यच नाहीं. आतांपर्यंत दोनदा त्याला जरूर असलेल्या 'जहरी मोहरे' वगैरे ११२ हिंदी होनांच्या मालाचा आम्हीं नजराणा केला. राजापूर व कारवार येथें त्याच्या मुलखांत आपल्या दोन वखारी असल्यामुळें सलोख्याची अगदीं पहिली संधि घ्यावी म्हणून आम्हीं इतकें केलें. पहिला नजराणा त्यानें मोठ्या गौरवानें स्वीकारिला. आमचा ब्राह्मण वकील त्याच्या सैन्याबरोबर किंवा विशेषतः गोवळकोंड्याचा सरलष्कर **मिर्झा महमद अमीन** याच्याबरोबर आहे. त्याच्याकडून, दुसऱ्या नजराण्याबद्दल अद्याप कांहीं कळलें नाहीं. सरलष्कर अमीन

हा आमचा दोस्त आहे. १ ह. घोडदळ व ४ ह. पायदळ घेऊन तो शिवाजीच्या बरोबर स्वारीत असतो.

मध्यंतरीं आपला भाऊ **एकोजी** याच्या मुलखांतील इंग्रजांची **टिमेरी** (Timmery) येथील वखार लुटून त्यानें २००० होन किंमतीचा माल नेला अशी अनिष्ट खबर आली. (बहुधा भरपाई करतांना तो अनेक सबबी सांगेल.) आणखी अशी बातमी आली आहे कीं, ह्या प्रांतांत सगळीकडून आणि विशेषतः किनाऱ्यावरील शहरांकडून २लक्ष होन कर्ज काढण्याबद्दल त्यानें पत्रें लिहविलीं आहेत. पुलिकत आणि हें शहर यांच्या वांट्यास प्रत्येकीं ५ ह. रुपये आले आहेत. ही रक्कम उभी होण्याचा संभव नसल्यामुळें ह्या सबबीवर त्याला आपला जुना खेळ (लुटमार इ०) करण्यास चांगलें फावणार आहे. त्यांतून अलीकडे, जिंजी आदिकरून जिंकिलेला सर्व मुलूख तो आपल्या हाताखालीं दाबून बसल्यामुळें, त्याचें व **गोवळकोंडेकरांचें** वैमनस्य येऊन गोवळकोंडेकरांनीं त्याचा दरोजचा **३००० होनांचा तनखा** देण्याचें बंद केलें आहे; [यामुळें त्याला अशा मार्गांनीं पैसा उभा केलाच पाहिजे!] पण अजून चालू असलेल्या वेल्लूरच्या वेढ्यामुळें, किंवा **शीरखानाच्या** विरोधामुळें त्याला अडकून पडावें लागलें अथवा दक्षिणेकडील नायक लोकांच्या बाजूला कांहीं उद्देशानें तो सटकला [तर मात्र तसें (लुट इ०) कांहीं होणार नाहीं]. याप्रसंगीं सावकार लोक शक्य तितक्या त्वरेनें देशत्याग करीत आहेत. कारण, येथून दीन अडीच कोसांच्या टापूंतील व तो जेथून गेला त्या सर्व प्रांतांतील सावकारांची त्यानें खडानखडा माहिती मिळविली आहे. बंदोबस्ताची शक्य ती खबरदारी घेऊन आम्हीं (कांहीं) ब्राह्मण बातमी देण्याकरितां फिरते ठेविले आहेत. एकंदर पुढचा काळ थोडा संकटाचा दिसतो.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. फो. सें. जॉर्ज मा. २७<br>पृ. २८ (३) इ. | (१९४६)<br>फो. सें. जॉर्ज–शिवाजी. | श. १५९९ ज्येष्ठ व. ३०<br>इ. १६७७ जून १९ |

राजे साहेबांचें पत्र व तश्रीफा पोंचल्या. आपण कृपाळू होऊन 'जहरी मोहरे' इ० स्वीकारले. ह्या गौरवाला पाठविलेल्या वस्तु पात्र नव्हत्या. त्या वस्तूंबद्दल आपल्याला इतकी आवड आहे असें पाहून, थोडा उशीर लागला तथापि आम्हीं आपल्याकरितां त्या वस्तु मिळवू शकलों ही सुदैवाची गोष्ट आहे. वस्तु आणि त्यांच्या उपयोगाबद्दलची माहिती ब्राह्मणाच्या हातीं पाठविली आहे. राजेसाहेबांना हें अल्पोपायन देत आहोंत त्याचा स्वीकार करावा. आपल्या मुलखांत कंपनीच्या वखारी असल्यामुळें आपली भरभराट होवो अशी आम्हीं इच्छा करितों. आमच्या हातून होईल त्या प्रकारें आपल्या उपयोगी पडण्याची संधि मिळण्यांत आम्हांला आनंद वाटतो.

महाराज, राजेसाहेबांचा अत्यंत नम्र, व आज्ञाधारक सेवक,

विल्यम लँग्थॉर्न.

ऑर्म ११४-६ } (१९४७) { श. १५९९ आषाढ शु. ७
पृ. ३७ इ. } मुंबई-सुरत { इ. १६७७ जून २७

पाऊस फारच पडल्यामुळें शिवाजी व मोरोपंडित यांकडे पाठवावयाचीं पत्रें गेलीं नाहींत. नाइल्सच्या पत्रावरून असें समजतें कीं, **शिवाजी** गोवळकोंड्याच्या सुलतानाच्या एका किल्यांत असून तेथेंच पावसांत छावणी करणार आहे. पावसाळा संपतांच कर्नाटकावर त्याची स्वारी होईल असें म्हणतात. बरेच दक्षिणी उमराव त्याला सामील असून, कदाचित् **बहलोलखान** आणि **शिवाजी** यांचाहि सर्व कांहीं उभयतांनीं वांटून घेण्याचा **करार** झाला असावा, अशी लोकांची समजूत आहे.... **मोरोपंडित** नुकताच उत्तरेकडे **साल्हेरीस** शिबंदी पाहण्यास गेला होता. आतां या बाजूनें तो रायरीस गेला आहे. तेथेंच तो खात्रीनें सांपडेल ... दुसरा कोणी सार्जंट न मिळाल्यामुळें केविन व कृष्ण शेणवी यांनाच पत्रें घेऊन पाठवीत आहोंत. शिवाजीच्या देशाची परिस्थिति आणि त्याचीं सैन्यें कोठें कोठें छावणी करून राहिलीं आहेत, ह्याची पक्की चौकशी करण्याबद्दल आम्ही त्यांना हुकूम देऊं.

[पृ. ४०] **भट्टी**च्या दोनतीन ब्राह्मणांनीं कुलवंत कैदी मिळवून देण्याचें **सिद्दी**ला वचन दिल्यावरून सिद्दीनें मान्यता दिली. परंतु आपण नामानिराळें राहून त्यांना आपल्या होड्या किंवा माणसें न देतां सिद्दीनें त्यांच्याकडून ४ ब्राह्मण, मुंबईतील होडी व शिपाई यांच्या सहाय्यानें, कैद करून आणविले. हे चार ब्राह्मण तेथील प्रमुख नागरिक होते. त्यांना सिद्दीच्या गलबतावर ठेवण्यांत आलें. थोडक्याच दिवसांत **चौल**च्या सुभेदाराकडून या शेजारधर्माविरुद्ध वर्तनाबद्दल तक्रार येऊन, हे कैदी परत न दिल्यास किनाऱ्यावरून मुंबईंत कांहीं माल न पुरविण्याची व मित्रत्व मोडण्याची त्यानें दहशत घातली. आम्हीं सिद्दीकडून ते कैदी सोडवून परत पाठविले; आणि बेटावरील ज्या लोकांनीं तें काम करण्यांत मदत केली होती त्यांना पकडून शिक्षा दिल्या.

फॅ. रे. फो. सें. जॉर्ज, } (१९४८) { श. १५९९ आ. शु. ७
भा. २७ पृ. १६ इ. } शिवाजीच्या छावणीचें वृत्त { इ. १६७७ जून २७

ब्राह्मण वर्धापाचें पत्रः—२६ तारखेला रात्रीं **शेरखान** त्रिवादीला होता. तेथून तेवनापट्टणकडे पळून जाण्याच्या त्याच्या बेताची खबर कळून, शिवाजीकडे कांहीं घोडेस्वार त्याच्या पाठलागावर निघाले. वाटेंत अकलनायकाचें अरण्य होतें त्यांत शेरखान व त्याच्या पाठोपाठ मराठेहि शिरले. शेरखानाचे ५०० स्वारांनीं खडे राहून शिवाजीच्या लोकांना तोंड दिलें. रात्रीं दोन तास चांगलें युद्ध झालें. पुढें चंद्र बहुतेक खालीं गेला होता तोंच **शेरखान** कांहीं घोडे, हत्ती वगैरे घेऊन त्या अरण्यांतून दक्षिणेकडे गेला. शिवाजीच्या लोकांनीं आणखी पाठलाग केला. शिवाजी स्वतः तेवनापट्टणच्या दक्षिणेस एक कोसावर छावणी करून आहे. त्याच्या लोकांनीं वरील अरण्यांत शेर-

खानाचे २७० घोडे, २० उंटें, कित्येक बैल, तंबू, नगारे वगैरे पकडले. शीरखानाचा पाठलाग करीत गेलेले स्वार अजून परत आले नाहींत. शीरखानाचा सासरा अजून त्रिवादीला टिकाव धरून आहे. त्यानें अद्याप किल्ला हवालीं केला नाहीं. शिवाजीनें बाबासाहेब, कांहीं घोडदळ, सवारुमवार [?] आणि नासीरमहंदमखानाचे कांहीं स्वार असे तेथें ठेविले आहेत. इतर हकीकत आपल्याकडे येणारा ब्राह्मण पाठवील....शीरखानाच्या पाठलागावर गेलेले स्वार परत आले असून त्यांनीं शीरखानाचे २०० घोडे व २ हत्ती पकडून आणले. एकूण शीरखानाचे सुमारें ५०० घोडे त्यांनीं धरले. शीरखान फक्त १०० स्वार घेऊन बोनगिरीवर पळाला. तिकडेहि शिवाजीचे स्वार त्याचा पाठलाग करीत आहेत.

फॅ. रे. फोर्ट सें. जॉर्ज भा. २७
पृ. १६ इ.
(१९४९)
वीरराघवय्या–ग० लॅंगॉर्न
श. १५९९ आषा. शु.१४
इ. १६७७ जुलै ३

गोवळकोंड्याच्या ब्राह्मणाचें पत्रः—

दिलीलखान, बहादरखान आणि बहलोलखान हे आतां गुलबर्ग्याच्या (calubariga) किल्ल्याजवळ एकत्र जमले आहेत. येथील लोकांनींहि आपले सेनापती तिकडे पाठविले सरलष्कर (Sharlaskareen) महमद इब्राहीम हा तेथेंच होता. त्याला अधिक खबरदारी घ्यावी असा हुकूम दिला आहे. सिद्दी मसाउद, क [ग] सलाकोटी, तिमिनाजा आणि सैद मोकतुम हे सर्वजण सुलतानाला मदत करण्याकरितां तिकडे गेले आहेत.

फॅ. रे. सुरत भा. ८९
पृ. ४६–४७ (२) इ.
(१९५०)
सुरत-मुंबई
श. १५९९ आषाढ व. २
इ. १६७७ जुलै ६

रायरीपर्यंत पत्रें घेऊन जावयाचीं तर केंविनपेक्षां कृष्ण सेणवी (Coxsunay) किंवा अन्य कोणाला पाठवून कमी खर्चात काम भागतें काय पहा. पूर्वी आम्हीं लिहिलें तेव्हां मोरोपंडीत कल्याण-भिवंडी किंवा मुंबईच्या जवळपास कोठें तरी होता असें आम्हांला वाटलें होतें.

(सें) फॅ. रे. सुरत भा. ८९
पृ. ४९ इ.
(१९५१)
सुरत–मुंबई.
श. १५९९ आषाढ व. २
इ. १६७७ जुलै ६

सिद्दीसंबूळला काढून बादशाही आरमाराच्या अधिकारावर आतां सिद्दी कासमला नेमिला आहे. कासम दंडाराजपुरीला आहे. सावंद कोळी याचेबरोबर १५० लोक देऊन त्याला मुंबईच्या आरमाराचा ताबा घेण्याकरितां पाठविण्याबद्दल त्यानें आपला वकील महमद हसन याला कळविलें. सावंद व त्याचे लोक यांना चांगलें वागविण्याबद्दल हसननें आम्हांला विनंति केली आहे. तरी त्यांना योग्य प्रकारें वागवावें. माझ-बेटावर दंगा करूं देऊं नये.

ऑर्मे ११४-६ } (१९५२) { श. १५९९ आषाढ व. ७,
पृ. ४३ इ. } मुंबई-सुरत { इ. १६७७ जुलै ११

**प्रेसि० ऑंजिअर** [ ३० जूनला ] मेल्याबद्दल खेद. व **प्रेसि० रोल्ट** अधिकारावर आल्याबद्दल समाधान.

फारच पाऊस पडल्यामुळें केग्विनला **रायरी**कडे पाठविणें शक्य झालें नाहीं. आतां मरहूम प्रेसिडेंटच्या नांवचीं पत्रें पाठविण्यांत अर्थ नाहीं असें वाटतें. आपण नवीन पत्रें लिहिणार किंवा कसें तें कळवावें.

फॅ. रे. फो. सें. जॉर्ज मा. २७ } (१९५३) { श. १५९९ आषाढ व. ११
पृ. १७–१८ इ. } नेलोर रमणा-ना० लॅंवॉनें { इ. १६७७ जुलै १६

**शिवाजी**च्या छावणींतून पत्रः--मी प्रथम **वलीगंडपूरम्**कडे जात असतांना वाटेंतच शेरखानाचा पाठलाग करीत शिवाजी **पुनामली** मार्गानें गेल्याचें कळल्यामुळें तिकडे वळलों. पुढें शिवाजी थेट बोनागिरीपट्टमला असल्याचें समजल्यावर तेथें जाऊन आपलें पत्र व वस्तु दिल्या. पहिल्या नारळांशीं ताडून पाहून सर्व वस्तु चांगल्या आहेत असें आढळून त्याला फार समाधान झालें. हीं व इतर हकीकत पट्टमार ( ? ) ब्राह्मण कृष्ण याच्या मुखानें कळविली आहे. शिवाजी राजाचें सैन्य आतां कावेरीच्या कांठीं **तिरुमडवाड्यास** आहे. ३ यार्ड शेंदरी कापड मीं शिवाजी नायका [ ? ] ला दिलें. येथें मदुरा नायकाकडून एक हेजीब आला. त्याला शिवाजी राजा म्हणाला कीं, ' तुझ्या धन्याच्या द्रव्याचा अंदाज आम्हीं ९ कोटी इतका नांवावर मांडला आहे. तरी तूर्त खर्चाकरितां आम्हांला १ कोटी रु० त्यानें पाठवावे; त्यावर हेजिबानें उत्तर केलें कीं ' आमच्या धन्याचा कांहीं मुलूख मैसूरच्या नायकानें आणि कांहीं एकोजीनें घेतला. यामुळें आतां त्याला कांहींच देतां येत नाहीं. पण हा मुलूख तुम्हीं परत मिळवून दिला तर मग आम्ही ७ लक्ष देऊं. ' मदुरानायकानें त्रिचनापल्लीहून (Chertanapolle) आपलें कुटुंब मदुरेला पाठविलें आहे. कावेरी नदी तूर्त भरून वहात असल्यामुळें तें सुरक्षित आहेत, परंतु पुढचें भवितव्य कोण सांगणार !

मिर्झा महमद अमीनच्या नांवानें पत्र आलें आहे. त्यांतील खबर अशी आहे कीं, बहादरखान आणि **आदिलशहाचे मुलगे** [?] अलमखान, शेख मिनाजू आणि सारुनखान असे कृष्णापार होऊन, सात हजार स्वार घेऊन, शिवाजीच्या कुमकेकरितां येत आहेत ! दुसरी अशी खबर आहे कीं गोवळकोंड्याच्या राजानें कसालकोटी तिम्मनायकाला ६ लाखांचा मुलूख देऊन १ लक्ष पायदळ उभारण्यास सांगून त्याला **शिर्पा**च्या मार्गानें पाठविलें. गोवळकोंडा आणि विजापूर यांची एकी ह्या गोष्टीनें ध्वनित होते. विजापुराहून २० हजार घोडदळ आलें आहे असेंहि म्हणतात !

डाग रजिस्टर १६७७ } (१९५४) { श. १५९९ आषाढ व. ११
पृ. २३४ इ. जुलै २६ न्यू. } सुरत { इ. १६७७ जुलै १६

नागापट्टणच्या बाजूनें सीलोनकडे बातमी अशी आली कीं, सुप्रसिद्ध दरोडेखोर **शिवाजी** (गोवळकोंड्याच्या सुलतानाच्या सहाय्यानें) १५ ह. पायदळ व १६ ह. घोडेस्वार घेऊन **जिंजीवर** चालून गेला. विजापुरी किल्लेदार **नासीर महमदखान** यानें ७१८ ह. सैन्यानिशीं तो किल्ला लढविला. तथापि शिवाजीची ही स्वारी यशस्वी झालेली दिसते. लवकरच तो **जिंजीखालील** सर्व मुलूख ताब्यांत घेऊं शकेल. सरसुभेदार **शीरखान लोदी** शिवाजीपुढें सर्वस्वीं असमर्थ झाला आहे. कारण, विजापूरचा नवाब बहलोलखान हा, एका बाजूनें मोगली सैन्य आणि दुसऱ्या बाजूनें शिवाजीचें सैन्य यांच्यामध्यें सांपडल्यामुळें, त्याच्या सैन्याला कांहीं उपकारक कामगिरी करता येत नाहीं. मदुरेच्या नायकालाहि या संकटमय परिस्थितीचा धक्का बसणार असें दिसतें. सर्वच देशांत भीती पसरली आहे. राजा एकोजीचा दिवाण राजा वेंगण्णा याचीहि स्थिति समाधानकारक नाहीं. **तंजावरास एकोजीची** स्थिरता राहिली नाहीं तर, **तेगनापट्टणला** कंपनीच्या अडचणी सर्व बाजूनें वाढतील.

सा. ले. ६३ } (१९५५) { श. १५९९ श्रावण शु. ४
रा. ४ पु. १०७८ जखर २ } म. सी. { इ. १६७७ जुलै २३

मोरो त्रिमल व नारो निळकंठ—त्रिंबक गोपाळ देशा. व ले० प्रा पुणें.

निळकंठराऊ याचा चांबळी येथें इनाम आहे. छत्रपति स्वारीहून आल्यावरी विले करतील, तोवरी तकूब असो देणें.

सं. ८ ले ३४ } (१९५६) { श. १५९९ श्रावण शु. ७
रा. ४ } म. मु. व सी. 'श्रीशिव मर्या.' { इ. १६७७ जुलै २६

श्री राजा शिव छत्रपति—यशवंतराव शाहाजी कदम नामजाद कोट बालगुडानूर.

कोट मजकूर. इशमें नामजाद आहेत व जिन्नसहि आहे. ऐसियास तिमाजी नारायण यास लिहिण्यास मदतनीस पाठविले आहे. तैनात होन ३.

फॅ. रे. फोर्ट सें. जॉर्ज, मा. २० } (१९५७) { श. १५९९ श्रावण शु. ८
पृ. १८-१९ इ. } नेलोरामण्णा-ग. लँग्होर्न { इ. १६७७ जुलै २७

नुकताच शिवाजी राजाच्या देशांतून **रघुनाथपंत** ४०० घोडेस्वार घेऊन आला. त्यावेळीं **शिवाजी** राजानें सामोरें जाऊन त्याचा सन्मान केला आणि आपल्या जवळ दोन दिवस ठेवून घेऊन नंतर त्याला **मदुरानायकाच्या** हेजिबाबरोबर तिकडील निकाल ठरविण्याकरितां पाठविला. गोवळकोंड्याचा मादण्णा पंतलु या नांवाचा ब्राह्मण

द्दि. त्यानें मला बोलावून ! तुम्ही गोवळकोंडयाच्या राज्यांतील व्यापारी आहांत. आतां ावाजीनें तुमच्याकडे तशीफा पाठविल्या. आतां तुमचें येथें काय काम आहे ? गोवळ-डियाहून इतके हेजीब सैन्याबरोबर ठेवूं नये असा हुकुम आला आहे,' असें सांगितलें. पून निघण्याबद्दल आपला हुकूम नसल्यामुळें मीं कांहीं तरी सांगून वेळ मारून नेली. ी काय करावें तें कळवावें.

**रघुनाथपंतानें** मदुरेच्या नायकाशीं ६ लक्ष होनांचा करार करून शिवाजीनें ापलें सैन्य परत न्यावें असें ठरविलें. पैकीं दीड लाखांचा भरणा त्या हेजिबाचे मार्फत ाबदतोब झाला. शिवाजीचा भाऊ एकोजी २००० स्वार घेऊन त्रिमलवाडयाला ावाजीला भेटण्याकरितां आला. शिवाजी तेरुपतोरा गांवापर्यंत त्याला सामोरा गेला. क्कामावर आल्यावर ' वडिलांच्या हयातींत मिळविलेली संपत्ति, घोडे, जवाहीर, व ीत यांचा एकचतुर्थांश फक्त तुम्हांला ठेवून राहिलेले तीन चतुर्थांश तुम्हीं आम्हांला ावे' असा शिवाजीनें निरोप पाठविला. एकोजी या गोष्टीला कबूल न झाल्यामुळें ावाजी फार रागावला आणि त्यानें त्याला 'चालता हो' म्हणून सांगितलें. एकोजी पांच डेस्वार घेऊन तत्काल निघाला. शिवाजीनें लगेच जगन्नाथ पंतलू, शिवाजी पंतलू, नेरी पंतलू आणि निळोजी नायक नांवाचा एक व्यापारी एवढ्यांना कैद केलें. शिवाजी नार्दनपंताला एकोजीचा प्रांत ताब्यांत घेण्याकरितां पाठविणार आहे.

. ८ ले. ३३ } (१९५८) { श. १५९९ श्रावण शु.११
४ } मु. 'शिव' व मर्या. सी. { इ. १६७७ जुलै ३०

शिव **छत्रपति**—नागोजी भोसले मुद्राधा० कोट उटकूर

स्वामींनीं तुम्हास उक्त कोटाचा हवाला देऊन एक नाइकवाडीहि दिला. (पुढें तैना-चा तपशील आहे.)

. ८ ले. ३५ } (१९५९) { श. १५९९ श्रावण शु.११
४ पिंगल } मर्या. { इ. १६७७ जुलै ३०

शिव **छत्रपति**—नागोजी भोसले कोट उटकूर.

कोट मज० स सरनोवत व बारगीर तैनाता ठरवून पाठविले आहेत.

. ८ ले. ३६ } (१९६०) { श. १५९९ श्रावण शु. ११
४ } 'शिव.' व मर्या. { इ. १६७७ जुलै ३०

राजा शिव **छत्रपति**—केदारजी फिरंगोजी जाधव हवाल. उटकूर.

तुम्हास कोटाचा हवाला दिला आहे. नेमिल्याप्रमाणें तैनात घेणें.

सा. ले. १६४ } (१९६१) { श. १५९९ श्रावण शु. ११
शु. १०७८ जखर ९ } म. मु. व सी. { इ. १६७७ जुलै ३०

त्रिंबक गोपाळ सुभे० व कार० पा। पुर्णे-विसाजी गंगाधर हवाल. व कार. माहादाजी गोसावी यांचा सुपे येथील इनाम पूर्वीप्रमाणें चालविणें.

फॅ. रे. सुरत भा. ८९-२ } (१९६२) { श. १५९९ श्रावण शु. १२
पृ. ५० इ. } सुरत-मुबई { इ. १६७७ जुलै ३१

शिवाजी व मोरोपंडित यांना लिहिलेलीं पत्रें अद्याप गेलीं नसल्यास आतां तीं पाठविणें जरूर नाहीं असें वाटतें. कारण तीं लिहिणाऱ्या प्रेसि०च्या मृत्यूची बातमी तीं पत्रें पोंचण्याच्या पूर्वीच त्यांना पोंचेल. परंतु पवासाळा संपतांच **शिवाजीचें सैन्य** सुरतेवर येणार अशी येथें भीती वाटत असल्यामुळें, इकडे येणाऱ्या सेनापतींना आम्हीं त्या पत्रांत मागणी केली होती त्या स्वरूपाचे हुकूम त्याच्या आधीं मिळविण्याची कांहीं खटपट करतां येण्यासारखी असल्यास करावी.

ऑर्मे ११४-६ } (१९६३) { श. १५९९ श्रावण शु. १४
पृ. ४५ इ. } मुबई-सुरत { इ. १६७७ आगस्ट २

**सावान कुली** ४ दिवसांपूर्वी येथें येऊन पोंचला. त्याला आम्हीं सर्व प्रकारची मदत दिली. **सिद्दी संबूळनें** आरमाराचा ताबा अद्याप दिला नाहीं. मागील सर्व बाकीची पूर्तता होऊन हिशेब पुरे होईपर्यंत तो ताबा देण्याचें लांबणीवर टाकीत आहे. **बहादुरखानानें** तसाच हुकूम दिला असल्यामुळें, सुरतेहून पैसा येईपर्यंत तो ताबा देणार नाहीं.

**शिवाजी** हल्लीं लांबच्या कर्नाटक प्रांतांत छावणी करून राहिला आहे. **त्याच्या गैरहजेरींत** मोरो पंडित, अण्णाजी पंडित आणि एक ब्राह्मण असे **तिघेजण कारभार** करण्याकरितां ठेविले आहेत. सुरतेकडे येणाऱ्या त्यांच्या सेनापतींनीं इंग्रजांना कोठेंहि त्रास देऊं नये असे कौल मागण्याकरिता त्यांच्याकडे मनुष्य पाठविला आहे.

फॅ. रे. फो. सें. जॉर्ज भा. २७ } (१९६४) { श. १५९९ श्रावण शु. १४
पृ. २० इ. } नेलोर रामण्णा-ग. लँगॉर्न { इ. १६७७ आगस्ट २

तुंदुमगुर्ती ठिकाणाहून पत्रः— शिवाजी वलीगंडपुरम् सोडून **तुंदुमगुर्तीला** ससैन्य आला. तेथून **येलवनरासोरला** आपलें सैन्य पाठवून तो स्वतः सिमोजी नायकाला [शिवाजी का, संभाजी नायक ? Seinogee Nague] व इतर मोठे लोक बरोबर घेऊन **तिरुदाचलम्**ला देवदर्शनाला गेला. तें सैन्य येलवनरासोरलाच असून शिवाजी अजून देवदर्शनाहून परत आला नाहीं.

सि. डीगॉर आणि तेवेनापट्टणचा अधिकारी शिवाजीला भेटावयास आले. त्यांनीं रेशमी कापड, चंदन, गुलाबपाणी, मालदिवी नारळ, लवंगा व तरवारीचीं पातीं अशा वस्तूंचा नजराणा केला. तो त्यानें सुप्रसन्नें स्वीकारला व त्यांना तश्रीफा दिल्या. कित्येकांच्या मतें शिवाजीनें ह्यांना आमंत्रण केलें; असें आहे. परंतु तेवेनापट्टणच्या बाजूला त्यांचा कांहीं माल लुटला गेला त्याबद्दल भरपाई मागण्याकरितां ते आले होते; असेंहि दुसरे लोक बोलतात. शिवाजीनें आपल्या भावाचा मुलूख कात्रीज करण्याचा हुकूम दिला आहे. आज येलावनसोर किल्ला त्याच्या हातीं पडला. जगन्नाथ पंडितानें करार ठरवून किल्ल्यांतील लोकांना किल्ला सोडून जाण्यास भाग पाडलें. जगन्नाथ पंतळू, शिवाजी पंतळू आणि निळोजी नायक ह्यांना शिवाजीनें आपल्या बरोबर घेतलें आहे.

| | | |
|---|---|---|
| ओ. कॉ. भा. ३८<br>नं. ४२८३ इ. | (१९६५)<br>सुरतेकडील वृत्तांत | श. १५९९ श्रावण शु. १५<br>इ. १६७७ आगस्ट ३ |

राजापुराहून आलेल्या पत्रांवरून **मोंगल** व **नवाब** यांचा **तह** झाल्याची बातमी पक्की आहे; असें कळतें. मोंगलांनीं ८ वर्षेपर्यंत विजापूरकरांकडून नालबंदी [खंडणी ?] घेऊं नये; दोघांनीं मिळून कुतुबशहावर चालून जावें; त्याचा मोड केल्यावर नंतर सर्वांनी मिळून **शिवाजीवर** चाल करून जावें; तो पुरा नम्र होईपर्यंत थांबूं नये; अशीं कलमें ठरलीं. **शिवाजीनें** सुद्धां कर्नाटकी आणि दख्खनी राजांसमवेत, व कुतुबशहाशीं एकमत करून **युद्ध करण्याचा निश्चय** केला आहे.

| | | |
|---|---|---|
| स. पृ. ६४ रा. ४<br>सु. १०७८ जखर २४ | (१९६६)<br>पोटपत्र | श. १५९९ श्रावण व. १२<br>इ. १६७७ आगस्ट १४ |

अजदि. ठाणें सा कोरेगांव— मोक. शेटे महा. व रया मौ. चिमणगांव

पंताजीपंत वाकेनिवीस, व येसाजी मल्हार सुमे. यांचे कागदाप्रमाणें चिमणगांवचें जोतिश व कुळकर्ण विसाजी चिंतामण याचे दुमाला करणें. यानतरावे लायणी हरकत केली होती.

| | | |
|---|---|---|
| ऑर्म ११४-६<br>पृ. ४७ इ. | (१९६७)<br>मुंबई-सुरत | श. १५९९ भाद्र. शु. ६<br>इ. १६७७ आगस्ट २४ |

**शिवाजी** उत्तर कर्नाटकांत असून त्यानें जिंजी, तंजावर, पिलकुंडा आदिकरून मजबूत किल्ले घेऊन मुसलमानांचा मोठा पराजय केला. **श्रीरंगपट्टणाहून** त्यानें मोठी लूट नेली असें म्हणतात. परत येत असतांना वाटेंत बिदूर (बेदनूर) घेऊन कानडाहि आपल्या नवीन जिंकलेल्या मुलखाला जोडण्याचा त्याचा विचार आहे. शिवाजी परत येत असतांना त्याचा आम्ही कौल घेऊंच. परंतु मध्यंतरीं आम्च्या गैरहजेरींतील कारभारी मंडळाचे कौल मागण्यासाठीं इसम पाठविला आहे.

फॅ. रे. फो. सें. जॉर्ज　　(१९६८)　　श. १५९९ भाद्रपद शु.
भा. १८ पृ. ४२ इ.　　फोर्ट सें. जॉर्ज-मुंबई　　इ. १६७७ आगस्ट २४

**शीरखानाला** स्थानभ्रष्ट केल्यावर आणि कावेरीच्या अलीकडील **एकोजी** सर्व उघडा प्रांत हिरावून घेतल्यानंतर शिवाजी अधिक कांहीं करूं शकला नाहीं. **वेल** आणि **अर्णी** अजून टिकाव धरून आहेत. आणि दीर्घकाल गेल्याशिवाय ते इतक्य पडण्याचा संभव नाहीं. मध्यंतरीं **एकोजी** हा मदुरानायक, म्हैसूरनायक-आणि रानांत लोक यांची मदत मिळविण्याच्या खटपटींत असल्यामुळें **शिवाजीला** तो उद्योग बर पुरेल. **गोवळकोंडेकरांनीं** मनांत आणल्यास शिवाजी असा अडचणींत असता आला तें त्याच्या या नवीन जिंकलेल्या मुलखांतून सहज काढून लावूं शकतील. परंतु स्वस्थ आहेत. कारण, तसें करावें तर प्रांत हस्तगत होत नाहीं म्हणून मुलूख लुटण्य च्या संधीची शिवाजी वाटच पहात आहे तीच त्याला दिल्यासारखी होईल; आणि आपल्याच घरांत आपल्या हातानें अग्नि आणून भरल्याची तऱ्हा होईल. अशी त्या (गोवळ० च्या) ब्राह्मण सल्लागारांना भीती वाटते.

फॅ. रे. फो. सें. जॉर्ज　　(१९६९)　　श. १५९९ भाद्र. शु. ८
भा. २७ पृ. २०-२१ इ.　　गोवळकोंडा-ग० लॅंग्‌हॉर्न　　इ. १६७७ आगस्ट २६

गोवळकोंड्याचा वकील वीर राघवय्याचें पत्रः-दिलीलखान आणि बहादरखान यां **गुलबर्गा** किल्ला घेतला. **बहलोलखान** त्याच्या सैन्याला मिळून आतां त्याचें सै **गोवळ०**शीं लढण्याकरितां त्या किल्ल्याजवळ सज्ज होऊन राहिलें आहे. मोगल जा अदिलशहा या उभयतांचा शत्रू **शिवाजी राजा** याला गोवळ०नीं बोलावून आपल्य मुलखांतून त्याला कर्नाटकांत जाऊं दिलें. तरी आतां त्याला धरून मोगलांच्या हवाल करावें. तसेंच हल्लीं गोवळ०च्या नोकरींत असलेला **शेख मिनाजू** ह्यानें मोगलांच नोकरी करण्याच्या अटीवर मोगलांकडून पुष्कळ रकमा घेतल्या आहेत, त्यालाहि मोग लांच्या हवालीं करावें. नाहींतर युद्धाला तयार व्हावें, असें गोवळ०स त्यांनीं कळवि आहे. विजापूरच्या हद्दीवरील आपल्या लष्करानें सावध रहावें असा अलमपन्हानें [ कुतुब शहानें ] त्याला हुकूम दिला आहे; म्हणून तो तेथेंच राहिला आहे. त्यानें आपल्या स लष्कर व सरदार यांना असें लिहिलें आहे कीं, जरी मोगलांनीं त्यांना कितीहि मोठ्य रकमा देण्याचें वचन दिलें तरी [ फितूर न होतां ] मोगलाशीं कोणत्याना कोणत्या मार्गा तह घडवून आणावा.

ओ. कॉ. भा. ३७　　(१९७०)　　श. १५९९ भाद्र. शु. १
नं. ४२७० इ.　　सुरत-कंपनी　　इ. १६७७ ऑगस्ट ३१

**शिवाजीचें** बहुतेक सैन्य दख्खन व कर्नाटक देशाकडे गेलें असल्यामुळें य

बाजूला शांतता अनुभविण्याचें सुख आम्हांला लाभलें आहे. त्याचे सेनापती **मोरो** आणि **अण्णाजी** पंडित हे येथून ४० कोसांच्या आंतच **रायरी, साल्हेर** इत्यादि प्रबळ किल्ल्यांत शिबंदीचा उत्तम बंदोबस्त करून राहिले आहेत. आणखी कांहीं [ सेनापती ] येथून जवळच २० कोसांवर **गणदेवीला** असून तेथून ते सर्व प्रांतावर ताबा चालवितात आणि वाटेल ती सामुग्री मिळवितात.

श्री. सं. ले. १७, १८ } (१९७१) { श. १५९९ भाद्र. व. २
सु. १०७८ रजब १५ } { इ. १६७७ सप्टें. ३

दत्ताजी त्रिमल — महादाजी सामराज, वेंकाजीरुद्र, सुभेदार व कारकून माहालनिहाये अनुक्रमें तरफ सातारा व तपे कोले.

शिवाजी राजे श्रीरामदासांना भेटण्याकरतां शिवतरी गेले. व श्री रघुनाथ देवास ११ गांवें इनामें दिलीं. ते गाऊ देवाचे नांवें लिहोन त्या गांवांचे उत्पन्न देवाचा प्रसाद म्हणोन राजगृहीं जमा करणें असें समर्थांनीं सांगितलें. पण ह्या गांवच्या ११।११ बिघ्यांचें इनाम समर्थांकडे अखेर चालू केलें; बाकीचे दिवाणांत घेतले. त्याच्या सनदा दिवाकर गोसावी यांजपाशीं दिल्या. याखेरीज इदिलशाही इनाम चालत आला असेल तोहि चालविणें.

श्री. सं. ले. १९ } (१९७२) { श. १५९९ भाद्र. व २
सु. १०७८ रजब १५ } { इ. १६७७ सप्टें. ३

दत्ताजीत्रिमल — वेंकाजीरुद्र, सुभेदार. व कारकून महाला निहाये ता. कोले.

चाफल येथे श्रीरघुनाथ देवालय आहे. **रा. छ. स्वामी ( शिवाजी राजे )** देवाचे भेटीस आले होते. ते वेळीं स्वामी समर्थांनीं रा. राजियास आज्ञा केली त्यावरून जाऊलीचे सुभेवरी मोईन करून रामनवमी उत्साहास दिली ११ होन १५० टके खुर्दा इत्यादि. समयानसार जटाधारी जोगी येऊन पीडा करतील तरी करूं न देणें. जागाजागाची सिंहासनें येऊन यात्रा समारंभ चाले ऐसे करणें. खासा ( वेंकाजी ) जाऊन संरक्षण करणें व १२१ ब्राह्मणास टकसाली ४ रुके दक्षणा देणें.

फॅ. रे. फो. सें. जॉर्ज } (१९७३) { श. १५९९ आश्वीन शु. ३
मा. २७ पृ. २२–२३ इ. } गोवळकोंडा–फो. जॉर्ज. { इ. १६७७ सप्टें. १९

वीर राघवय्याचें पत्रः–दिलीलखान आणि बहादरखान यांनीं **गुलबर्गा** किल्ला घेतल्याचें मोंगल बादशहाला कळविलें. त्यावर बादशहाचें असें उत्तर आलें कीं, ' हा किल्ला फकिरांचा असून विजापूरकरांच्या हद्दींतील आहे. विजापूरकर आमचे साहाय्यक असतांना त्यांनीं हा किल्ला गोवळ॰ना कसा घेऊं दिला ? एवढ्यानें माझें समाधान होणार नाहीं. तर, गोवळ॰नीं विजापूरचा शत्रु **शिवाजी राजा** याला आपल्या देशांतून जाऊं

-देण्यांत मोठा गुन्हा केला आहे. त्याबद्दल १ कोटी रुपये आणि १० हजार घोडे देण्यास त्यांना भाग पाडावें.' दिलीलखान व बहादरखान यानीं गोवळ०शीं या बाबतींत बोलणें काढून २ कोटी रु. व २० ह. घोड्यांची मागणी केली. ती नाकारतांच १ कोटी रु. व १० ह. घोडे त्यांनीं मागितले. परंतु कुतुबशहा फक्त ५ लाख द्यावयास तयार झाला. हें पाहून बहलोलखान व हे दोघे एकत्र होऊन आपलीं सैन्यें त्रिविनिको जवळ घेऊन आले.

गोवळकोंडेकरांना ही बातमी लागून त्यांनींहि सिद्दी मसाउद, सैद मखतुम, दूलशास, स[र]ज्राखान वगैरे सरलष्कर, सरखेल आणि कर्नाटकांतील कांहीं फौज एकत्र जमविली. मोंगलांचे ४५ ह. स्वार आणि बहलोलखानाचें सैन्य कुतुबशहावर हल्ला करणार असें कळतांच कुतुबशाहीचे वीस तीस ह. स्वार त्यांच्यावर चालून गेले. थोडा वेळ युद्ध होऊन बहलोलखानाचे स्वार माघार खाऊं लागल्या वेळीं दिलेलखान कुमकेला आल्यामुळें वेळ सांवरली. आणि उभय सैन्यें स्वस्थानीं परतलीं. गोवळ-कोंड्याचे थोडे लोक जखमी झाले व त्यांचा जय झाला. मोंगलांचे ५०० घोडे मेले आणि त्यांचा पराजय झाला. मोंगल बहलोलाचे ५।६ मोठे सेनापती मरण पावले. अलमपन्हाला [कुतुबशहाला] ही बातमी कळल्यावर त्यानें इकडे येण्याकरितां पुष्कळ स्वार पाठविले आहेत. मादण्णाला तिकडे जाण्याबद्दल सांगितलें असतां त्यानें सोडवणूक करून घेऊन पलपेल येंगाणाला पाठविलें. शिवाय त्यानें मिर्झा संगीर, गुडचारुलो, शेख मिनाजू वगैरे मोठे सरदार तिकडे पाठविले आहेत. आतां कुतुबशहाचें मोंगल-विजापुरकरांशीं मोठें युद्ध होईल आणि पूर्वीप्रमाणेंच त्याला पुनः जय मिळेल असें लोक बोलतात. गोवळकोंड्याच्या वतीनें तहाचेंहि बोलणें चालू आहे. बहादरखानानें गोवळकोंड्याकडून लांच घेतला असून सुलतानानें प्रथम थोडें लढावें असा त्यानें सल्ला दिला आहे. नंतर तो तह घडवून आणील. गोवळकोंड्याच्या किल्यावर सर्व प्रकारची सामुग्री त्वरेनें भरून ठेवीत आहेत. गेल्या युद्धांत काय झालें तें सुलतानाला समजावें म्हणून रक्तानें भरलेले कपड्यांचे [Clousts ? clouts] तीन उंट लादून सेनापतीनें त्याच्याकडे पाठविले आहेत.

| | | |
|---|---|---|
| श्री. सं. ले. २०<br>सु. १०७८ साबान ३ | (१९७४) | श. १५९९ आश्वीन शु. ५<br>इ. १६७७ सप्टें. २१ |

मोरो त्रिमल प्रधान—गोपाल रायाजी दोरी व दोक प्रांत जावली.

श्रीसमर्थ शिष्य वे. दिवाकर गोसावी याचा मठ सगगाऊ पा कारवी येथें आहे. तेथें वे.च्या गुराची वणी न घेणें, बागास आजार न देणें.

फॅ. रे. फो. सें. जॉर्ज } मा. २७ पृ. २३ इ. } (१९७५) शिवाजी–ग. लॅंगॉर्न { श. १५९९ आश्विन शु. ६ { इ. १६७७ सप्टें. २२

मीं कर्नाटकांत आल्यापासून अनेक किल्ले जिंकले. कित्येक किल्ल्यांत मला नवीन बांधकामें करावयाचीं आहेत. मोठया तोफांचे गाडे कसे करावे आणि सुरुंग कसे लावावे हें जाणणारीं माणसें तुमच्याकडे असतील तर आम्हांला अशा लोकांची आणि विशेषतः सुरुंग लावून दगडी भिंती उडविणाऱ्या कमवी लोकांची जरूरी आहे. गोव्याहून व वेंगुर्ल्याहून आलेले सर्व लोक कामामध्यें खपून जाऊन जेव्हां त्यांच्याकडे आणखी माणसांबद्दल मीं विचारणा केली तेव्हां ते सर्व **चिनापट्टण** व **पुलीकत**कडे गेल्याचें त्यांनीं सांगितलें. तेव्हां आपल्या तिकडे चौकशी करून सुमारें २०।२५ किंवा निदान १०।१५ सुरंगे लोक मिळतील तेवढे पाठवावे. त्यांना चांगला तनखा देऊन माझ्या अनेक किल्ल्यांवर त्यांना काम देईन व आपले उपकार स्मरीन.

फॅ. रे. फो. सें. जॉर्ज, भा. २७ } पृ. २८-९ (३) इ. } (१९७६) फो. जॉर्ज–गोवळकोंडा { श. १५९९ आश्वीन शु. ६ { इ. १६७७ सप्टें. २२

ग. लॅंगॉर्न—राजे अलमपन्हा व मादण्णाः—आपलें फर्मान आणि तश्रीफ पावलीं. सत्कारानें घेतलीं. **शिवाजी**च्या मुलखांत पश्चिम किनाऱ्यावर आमच्या वखारी आहेत. तेथील अनुभवावरून **शिवाजी जिंजी**च्या प्रांतांत आल्यापासून आम्हांला भीती वाटते. म्हणून त्याच्या हालचालींवर नजर राखण्याकरितां आमचे ब्राह्मण आम्हीं पाठविले. त्यांना आपला सेवक मादण्णा ॲंटिया पांडे यानें वाईट तऱ्हेनें वागवून कैद करण्याची धमकी दिल्यामुळें, उगाच वाद वाढवूं नये म्हणून ते परत आले. त्यामुळें नजर ठेवणें अशक्य होऊन आमची मालमत्ता धोक्यांत पडली आहे. तरी आपल्या सेवकांना जरूर ते हुकूम द्यावे. आमचे करार व आमची शांत वृत्ति लक्षांत घेऊन आम्हांला न्यायानें वागवावें अशी विनंति आहे.

डाग रजिस्टर १६७७ } पृ. ३१९२ इ. ऑक्टो. २ न्यू. } (१९७७) कॉरोमांडेलकडील खबर { श. १५९९ आश्वीन शु. ६ { इ. १६७७ सप्टें. २२

प्रसिद्ध मराठा लुटारू **शिवाजी**, १२ हजार स्वार घेऊन **वेंगुर्ल्याकडील** घाटाच्या बाजूकडून, गेल्या मार्चांत, गोवळकोंड्याच्या राज्यांत येऊन दाखल झाला. तो ४ मार्च ( १४ न्यू.) रोजीं सुलतानाच्या भेटीस गेला. त्यावेळीं त्याचा चांगला सत्कार झाला. आणि पुष्कळसें द्रव्य आणि कांहीं सैन्य बरोबर देऊन **कर्नाटक** आणि **जिंजी**चा मुलूख सुलतानाकरितां जिंकून घेण्यासाठीं त्याची रवानगी झाली. त्यानें हा मुलूख फार त्वरेनें जिंकून घेतला व **शेरखान** लोदीचें सर्वस्व हरण करून त्याला पार धाळून लाविलें. आतां तो खान **आरियालोर** नांवाच्या किल्ल्यांत आहे. तेथें तो लवकरच [illegible]

हातीं लागेल. शिवाजी म्हैसूरच्या प्रदेशांत, तंजावर, मदूरा इत्यादि मोठ्या शहरांपासून जवळच आहे. आणि विजापुरांत अंतस्थ यादवी माजून राहिल्यामुळें या सर्व मुलखाचें स्वामित्व त्याला लवकरच मिळेल त्याला यांत शंका नाहीं. नंतर तो गोवळकोंड्याच्या सुलतानाच्या इच्छेप्रमाणें कांहींच करणार नाहीं. त्याला गोड भाषा बोलून तो इह्रीं फसवीत आहे. तंजावरचा इह्रींच्या अधिकारी एकोजी याच्याशीं आपला बाप शहाजी याच्या वारसाच्या बाबतींत इह्रीं त्याचा तटा चालू आहे. गोवळकोंडें व इतरत्र आमच्या कंपनीच्या लोकांशीं शिवाजी चांगल्या तऱ्हेनें वागतो. त्यानें आपली सदिच्छा प्रकट करण्याकरितां आमच्याकडून कांहीं खरेदीहि केली.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. फो. सें. जॉर्ज, भा. २७ पृ. २९ (३) इ. | (१९७८) फो. जॉर्ज-वीर राघवय्या | श. १५९९ आश्विन शु. ११ इ. १६७७ सप्टें. २७ |

१६ जूनचें पत्र फर्मान व तर्थाफ पोंचलीं. दिवाणाचा [ मादण्णाचा] शिवाजी. बरोबरचा हस्तक मदनांत पंतलु यानें [ आमच्या वकिलाला ] वाईट रीतीनें वागविल्याबद्दल आणि दुसरा ब्राम्हण पेदेला लिंगाप्पा याच्याबद्दलहि तक्रारपत्र सुलतान व मादण्णा या उभयतांना लिहिलें आहे. पत्रांच्या नकला सोबत आहेत. योग्य खटपट करावी.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. सुरत भा. ४ पृ. ८५-८६ इ. | (१९७९) स्वालीं कन्सल्टेशन. | श. १५९९ आश्वीन व. १ इ. १६७७ आक्टो. १ |

धरणगांवच्या ऑरटेमचें १९ सेप्टेंबरचें पत्र आलें. त्यांतील बातमीः-' या भागांतील मुख्य अंमलदार बहादुरखान याला बादशहाकडून तांतडीचें बोलावणें आल्यामुळें, तो तिकडे गेल्यावर इकडे कारभारांत पुष्कळच फरक होईल असें लोक बोलतात. अलीकडे राजे व कोळी लोकांनीं लुटीची सुरवात केल्यामुळें रस्ते सुरक्षित नाहींत म्हणून आम्हीं बांधाबांधी करावयास लागलों आहों.' बहादुरखानाला इकडची व्यवस्था करून जाईपर्यंत थोडासा वेळ लागेल तेवढ्यांत धरणगांवचा काफिला सुरतेजवळ येऊन पोंचेल अशी खात्री वाटते. करितां विमा उतरू नये असें ठरलें.

| | | |
|---|---|---|
| सा. ले. ३९५ सु. १०७८ साबान १५ | (१९८०) | श. १५९९ आश्वीन व. ३ इ. १६७७ आक्टो. ३ |

हणमंतराव घराडे-तिमाजी हडेराव देसाई सा कुंदगोळ.

या सालीं सा मजा. आमचे मोकासा जाला. सालगुदस्त सिवाजीचे फितरतीकरितां रयतलोक बहुत खराब जाले त्यावर सैद सुलतान यानें धुंद मांडून विलायतीं नागवून धुर्ळीस मिळविलें.

फॅ. रे. फो. सें. जॉर्ज } (१९८१) { श. १५९९ आश्विन व. ३
मा. १ पृ. १७ (४) इ. } फो. सें. जॉर्ज कन्सल्टेशन { इ. १६७७ ऑक्टो. ३

**शिवाजीचे** दोन जासूद त्यांचें तारीख २२ [सप्टें.] चें पत्र घेऊन आले. त्यांत त्यानें एंजिनिअर्स मागितले. परंतु त्याला शिष्टाचार संभाळून नकार दिला. कारण, एंजीनिअर्स पुरविल्यास **शिवाजी** प्रबळ होऊन शिवाय गोवळकर व मोगल, यांचें शत्रुत्व पत्करावें लागेल. शिवाजीचे गुप्त हेर सर्वत्र पसरले आहेत व तो स्वतः सैन्य घेऊन येथून दोन दिवसांच्या मुक्कामावर आला आहे. तेव्हां रक्षणाकरितां शिबंदी वाढवून तटबंदीचें काम जोरांत पुरें केलें पाहिजे. म्हणजे मग शिवाजीसारख्या अनिष्ट शेजाऱ्याचें किंवा विरोधी दिवाणाचें भय बाळगावें लागणार नाहीं [ डायरी मा. १ पृ. १२३ ].

श्री. सं. ले. २१, २२ } (१९८२) { श. १५९९ आश्वीन व. ११
सु. १०७८ साबान २४ } { इ. १६७७ आक्टो. १२

अनाजी दत्तो

वेकाजी रुद्र सुभेदार व कार. ता कोले व माहादजी सामराज सुभा सातारा

श्री ( समर्थ ) स्वामीनीं दिवाकर गोसावी बरोबर सांगोन पाठविल्यावरून सुभे मारी चाफळच्या श्रीरघुनाथ देवाचे इनाम ११ गावीं ~।॥~ चावर ९१९ बिघे. आहे. सालमारी कुल देशाची मसाती करून धारा देण्याचा तह केला आहे. तरी तुम्ही श्रींचे इनामाची मोजणी अगर पाहणी न करणें. इनाम चालवणें.

श्री. सं. ले. ३३ } (१९८३) { श. १५९९ आश्वीन व. ११
सु. १०७८ साबान २४ } उल्लेख { इ. १६७७ आक्टो. १२

५० टके जमीन मौ नाटोली व कुणदूर ता शिराले येथील, चाफळच्या समर्थ-स्थापित मारुतीच्या उत्सवार्थ देणगी.

श्री. सं. ले. २४ } (१९८४) { श. १५९९ आश्वीन व.१३
सु. १०७८ साबान २६ } { इ. १६७७ आक्टो. १४

दत्ताजी त्रिमल—देश० व लेख० प्रां राजमंडल.

छत्रपतींची सन सीत (श. १५९७) चीं आज्ञा कीं, चाफळच्या माहानवमीसाठीं उत्सवाचें सामान पाठवीत जाणें. तरी माहालोमाहालाहून मोइनप्रमाणें सामान येत जाईल. उत्सव करवणें.

श्री. सं. ले. २३ } (१९८५) { श.१५९९ आश्वीन व.१३
सु. १०७८ साबान २६ } { इ. १६७७ आक्टो. १४

दत्ताजी त्रिमल—बहिरो सिवदेव सुभे. व कार० ता मलकापूर.

श्री रामदासस्वामी गोसावी यानीं मौ कुणतूर येथें हनुमंताची स्थापना केली आहे. तरी देवाचा २५ बिघे इनाम देवाकडे चालविणें.

फॅ. रे. सुरत मा. ८९ } (१९८६) { श. १५९९ कार्तीक शु. २
पृ. ६६-६७ इ. } सुरत-मुंबई { इ. १६७७ आक्टो. १८

माजगांवला सिद्दी **संबूळ** व सिद्दी **कासम** यांच्यात भांडण होऊन, बेटावर उभयतांचे ८।१० घोडे व ८।१० शिपाई मृत्युमुखीं पडले. केग्विन मध्यें पडून त्यानें भांडण सोडविलें. त्यांत त्याचे ३ घोडे मेले. अशा रीतीनें बेटावरील शांततेचा भंग झाला याबद्दल तुम्हीं कासमकडून खुलासा मागवावा. कासमच्या शिपायांना निःशस्त्र करून त्यांना बेट सोडून जाण्यास सांगावें; आणि न ऐकतील तर त्यांना कैद करून रवाना करावें. **सिद्दी संबूळनें गलबतें** ताब्यांत न दिल्यामुळें हा गोंधळ माजला असावा. परंतु ह्या प्रसंगानें, त्यांच्यापासून धोका आहे हें लक्षांत घेऊन, त्यांचें तेथील पावसाळ्यांत रहाणें बंद केल्याशिवाय आम्हीं रहाणार नाहीं.

[ऑर्मे. ११४-६ पृ. ५६ मुंबईहून आक्टो. ९ रोजीं सुरतेला गेलेल्या पत्रांत या दंग्याची सविस्तर हकीकत लिहिली आहे.]

फॅ. रे. मछुलीपट्टम } (१९८७) { श. १५९९ कार्तीक शु. ८
भा. १० पृ. १ इ. } फो. सें. जॉर्ज-मच्छलीपट्टण { इ. १६७७ आक्टो. २३

मोंगल व विजापूरकर यांच्या विरुद्ध **गोवळकोंडेकर** कांहीं प्रगति करूं शकले ही इष्ट बातमी आहे. त्यांना यश यावें अशीच आमची इच्छा आहे. **शिवाजी** अद्याप नवीन जिंकलेल्या मुलखांत आहे. तो, ( गोव० कडून मिळावयाच्या ) एक लक्ष होनांचा वांधा पडल्यामुळें, गोवळकोंड्याकडे पुनः जाणार आहे अशी बातमी आहे. तसें होईल तर या गरीब देशाला कांहीं दिवस सुखाचे लाभतील !

श्री. सं. चा. २५ } (१९८८) { श. १५९९ कार्तीक शु. १२
सु. १०७८ रम १० } { इ. १६७७ आक्टो. २७

मोरो त्रिमल प्रधान— बेंकाजी रुद्र सुबे. व कार. ता कोल:—चाफळ येथील रामनमीचा उत्सव नीट करण्याबद्दल तुम्हास श्रीछत्रपति व दत्ताजी त्रिमल यांची आज्ञा आहे. तुम्ही स्वतः ८।१० रोज जाऊन उत्सव करीत जाणें.

फॅ. रे. फो. सें. जॉर्ज } (१९८९) { श. १५९९ का. शु. १३
भा. २७ पृ. २४-२५ इ. } गोवळकोंडा-फो. जॉर्ज { इ. १६७७ आक्टो. २८

वीर राघवय्याचें पत्रः—सरलष्कर **महमद इब्राहीम**, ३० ह. घोडदळ व इतर

कांहीं सेनापती मिळून गोवळकोंड्यापासून १२ कोसांवर गिंचिनी या नांवाच्या विजापूरच्या हद्दीवरील गांवीं होते. दिलीलखान व बहलोलखान हे गुलबर्गा किल्ल्याच्या अलीकडे दीड कोसावर होते. इतक्यांत अलमपन्हानें मोंगलांशीं लढाई देण्याचा हुकूम दिल्यामुळें त्याचें सैन्य मोंगलांपासून १ कोसांवर मंगलीग येथें युद्धाच्या तयारीनें जमा झालें. हिंडोलशा व आणखी कांहीं सरदार यांनीं पुढें होऊन मोंगल-विजापुरी फौजेशीं कुरापत काढून त्यांना अंगावर घेत घेत गोवळकोंड्याच्या मुख्य फौजेशीं आणिलें. मोंगलांकडील एक सरदार श्रेही [?] हसनखान हा २० इ. स्वारांनिशीं फारच शौर्यानें लढला. पुढें उभय सैन्यें स्वस्थानीं परत गेलीं.

तीन दिवसांनंतर सिदेलोर येंगाणा वगैरे सरदार मोंगलांवर चालून गेले असतां, त्यांनीं थोडा वेळ युद्ध करून, पळण्याचा आविर्भाव दाखवून गोवळकोंडेकरांना अडचणींत गांठलें; आणि त्या वेळींच आणखी मदत आल्यामुळें गोवळ०चे लोक त्यांनीं कापून काढले आणि गांगरून गेलेल्या लोकांचीं नौबत व निशाणें काबीज केलीं. आतां ते सेनापतींना कैद करणार तोंच गोवळ०चा सरलष्कर व त्याचें सैन्य मदतीला धावून आलें. त्यामुळें युद्धाचा रंग पालटला, आणि मोगली सैन्य मागें हटलें. यानंतर झालेल्या चकमकींत कोणालाच विशेष यश मिळालें नाहीं. गोवळकोंड्याचे लोकांनीं मोंगलांच्या व बहलोलखानाच्या मुलखांतून त्यांची सर्व रसद मारून आणिली. तेव्हां अडचणींत सांपडलेल्या शत्रूनें २० तारखेला गोवळकोंड्याच्या गोटावर हल्ला करून मुसलमाणसांची कत्तल करून दाणागोटा नेला. गोवळकोंड्याच्या सरलष्करचा मोड होऊन त्यालाहि हटावें लागलें. विशेषतः सर्व मोठमोठे ब्राह्मण नापत्ता झाले आहेत! आतां पुनः मोगल व बहलोलखान यांशीं हे तोंड देतील किंवा कसें हा प्रश्नच आहे.

खानानें [?] मोंगलांकडे लिहिलेलीं कित्येक पत्रें कुतुबशहाच्या लोकांनीं पकडलीं. यामुळें त्याला कैद करून गोवळकोंड्याच्या किल्ल्यावर बंदोबस्तानें ठेविला आहे. दिवाणाकडून त्याला रोज खर्चाकरितां ५ रु. मिळतात. सरजा अलमखान, हसनखान, हाजीखान, मसाऊदखान वगैरे पठाण सरदार यांच्याजवळ प्रत्येकीं सुमारें २००० स्वार होते. परंतु ते पठाण असल्यामुळें आपल्या सजातीय मोंगलांशीं आणि बहलोलखानाशीं लढत ना. यामुळें दिवाणानें त्यांच्या घरावर पहारे ठेविले आहेत.

| | | |
|---|---|---|
| (से.)फॅ. रे. सुरत<br>मा. १०७ पृ. २७ इ. | (१९९०)<br>मुंबई-सुरत | श. १५९९ कार्तिक शु. १४<br>इ. १६७७ आक्टो. २९ |

हेन्री ऑक्झिंडेनचें पत्रः—उतावीळपणानेंच कारवारचा खलिता मीं उघडून पाहिला. तों त्यांत अपेक्षेप्रमाणें दक्षिणचा व्यापार बुडाल्याची बातमी वाचली. शिवाजीच्या सैन्यानें यंकापूरला वेढा घातला असून गदग व लक्ष्मेश्वर लुटलें. या ठिकाणा-

हूनच आपला बराचसा माल येत असतो. एकूण **राजापुरा**सारखीच कारवारची स्थिति होणार असें दिसतें !

डाग रजिस्टर १६७७ } (१९९१) { श. १५९९ कार्तीक शु.१५
पृ. ३८६–७ इ. नोवें. ९ न्यू. } { इ. १६७७आक्टो. ३०

**शिवाजीनें** विजापूरकरांचा बहुतेक मुलूख आणि तंजावरचा उत्तरेकडील मुलूख काबीज केला असून आपला भाऊ एकोजी राजा याच्याशीं युद्ध करण्याची तयारी चालविली आहे. तेव्हां **नागापट्टणच्या** सुभेदाराचें स्थान स्थिर आहे असें वाटत नाहीं. शिवाजीच्या गोंधळामुळें **तेगना**पट्टणच्या आसपास व्यापार बसला; परंतु सदरस्-पट्टणच्या बाजूला कर्नाटकांत ठीक चालला आहे. **नवा राजा शिवाजी** याच्याकडून **तेगनापट्टण** येथें कंपनीच्या व्यापाराच्या बाबतींत अधिक सवलती मिळण्याची आशा व्यर्थ ठरली. त्यानें पूर्वापार पद्धतीच पुढें चालू ठेविली, याबद्दल समाधान मानून घेण्याचीच अखेरीस पाळी आली आहे.

ओ. कॉ. मा. ३८ } (१९९२) { श. १५९९ कार्तीक व. १
नं. ४२८७ इ. } सुरत–कंपनी { इ. १६७७ आक्टो. ३१

या वर्षी **शिवाजीनें** वरच्या कर्नाटकांतील **जिंजी** व **तंजावर** हीं विजापूरच्या प्रतिनिधींचीं त्या प्रांतांतील मोठीं ठाणीं, काबीज करून मोठें यश संपादन केलें आहे. त्यानें सुप्रसिद्ध **श्रीरंगपट्टण** हें शहर लुटून अपार संपत्ति नेली. अद्यापि तो त्याच भागांत राहिला असून, शरण आलेल्या राजांकडून खंडणी घेऊन, जे नकार देतात त्यांना शासन करितो. तो येत आहे अशी खबर लागतांच मुसलमान लोक बिनबोभाट किल्ला सोडून जातात ! त्याच्या सैन्याची अशी बेसुमार चलती आहे कीं, अगदीं अल्प काळांत विनाविरोध तो **सुरतेपासून कन्याकुमारीपर्यंत**च्या मुलखाचा स्वामी होण्यास वेळ लागणार नाहीं, असेंच सर्वांस वाटतें. त्याचें कांहीं सैन्य फोर्ट सेंट जॉर्जच्या आसपास आलें होतें असें तेथील एजंटकडून कळलें आहे. लवकरच कांहीं अनिष्ट खबर येईल असें वाटतें.

स. पृ. २८ ले. २६ सु. १०७८ } (१९९३) { श. १५९९ कार्तीक व. २
हि. १०८८ रम १५ } { इ. १६७७ नोवें. १

अज सरकार सो——देशक पा पादशापूर

गोकाक येथील अंतो नरसींह यांस हवाल. पा गोकाक यानें विचारलें कीं, गनीम दफे हेऊन पा आपणास काबिजाति किती रोजांत होईल ? त्याने बोलिलें कीं, जमादिलाखरी. ते बात सचोटी आली. तेव्हां भट मजकुरास ४ गावांत मिळून ६ होनांची जमीन इनाम दिली आहे.

डाग रजिस्टर १६७७ } (१९९४) { श. १५९९ कार्तीक व. ८
पृ. ३९५–९६ इ. नोवें. १८ न्यू. } { इ. १६७७ नोवें. ८

कॉरोमंडिलकडील परिस्थिति स्थिरतेची नाहीं. गोवळकोंड्याच्या सुलतानाचें मोंगल बादशहा औरंगजेब व आदिलशहा यांच्याशीं युद्ध जुंपलें आहे. उभयपक्षांतर्फे मोठीं सैन्यें खडीं आहेत. मोंगलांचा वकील गोवळ० कडे गेला असून त्यानें येणें राहिलेली खंडणी व युद्धखर्च मिळून १ कोटी रु.ची मागणी केली ! परंतु गोवळ०नीं ती मान्य केली नाहीं. मच्छलीपट्टणचें २५ संप्टें. चें पत्र आलें. त्यावरुन १५ सप्टेंबर रोजीं उभयपक्षांचें युद्ध होऊन त्यांत मोंगल व विजापूरकर यांच्या संयुक्त सैन्यावर गोवळ० च्या सैन्यानें जय मिळविला असें कळते. परंतु तें खरें वाटत नाहीं. पराजय झाला असल्यास **मोंगलांच्या**तर्फे आणखी सैन्य रणक्षेत्रांत उतरेल आणि सर्व देश ओसाड होऊन व्यापाराचें भयंकर नुकसान होईल.

इकडे दक्षिण देशांत शिवाजीची एकसारखी प्रगतिच होत असून सर्व ठिकाणीं तो किल्ले व तट बांधीत आहे. एवढा मोठा गाजावाजा होऊनहि शेवटीं त्याचा भाऊ **एकोजी, मदुरेचा** नायक वगैरे राजे लोक आणि खुद्द **विजापूरकर** यांची त्याच्यापुढें मात्रा न चालल्यामुळें आतां त्याला विरोध करण्याची गोष्टच कोणीं बोलत नाहीं.

फॅ. रे. सुरत मा. १०७ } (१९९५) { श.१५९९मार्ग.शु. ६ व शु.१५
पृ. २३–२४ इ. } फोर्ट जॉर्ज–सुरत. { इ. १६७७ नोवें. २० व२९

४००० घोडेस्वार घेऊन **शिवाजी विजापूरच्या** किंवा कदाचित् स्वतः-च्या राज्याच्या रोखानें गेला आहे असें ऐकितों. त्याचें बाकीचें सैन्य त्यानें नवजित प्रांतांतच ठेविलें आहे. लवकरच परत येतों, असें सांगून तो गेला आहे. आपलें गेलेलें राज्य परत मिळवावें म्हणून, तसा तो न आल्यास, **एकोजी** आणि त्याचे साथीदार तयारी करीत आहेत. गोवळकोंड्याच्या सैन्याची मोंगल–बहलोलशीं लढाई झाली. तींत गोवळ०चा पराजय झाला. यामुळें थोडें भय वाटतें.

जिंजीकडील मुलखांत ठेविलेला शिवाजीचा भाऊ आणि दुय्यम संतोजी ह्याचें ६००० स्वार व ६००० पदाती एवढें सैन्य, गेले कांहीं दिवस तंजावरच्या **एको-जीशीं** ( ४ ह. स्वार व १० ह. पायदळ ) लढण्यांत गुंतलें होतें. सकाळपासून संध्याकाळपर्यंत युद्ध झालें. त्यांत संतोजीचा पराजय झाला व पाव कोसपर्यंत त्याचा शत्रूनें पाठलाग केल्यामुळें पाऊण कोसपर्यंत तो मागें हटला. छावणींत पोंचल्यावर ह्या पराजयाचे दूरवरचे परिणाम आणि आपली होणारी बदनामी याचा आपल्या बरोबरच्या सरदारांशीं विचार करून त्यांनीं लगेच पोशाख व खोगिरें चढविलीं. निराळ्या वाटांनीं जाऊन, शत्रूचे लोक त्या दिवसाच्या परिश्रमामुळें विश्रांति घेत बेसावधपणें पडले असतां मर

मध्यरात्रीं जाऊन त्यांनीं त्यांची भयंकर कत्तल केली. त्या छाप्यांत त्यांनीं १००० घोडे, ३ मुख्य सेनापती व सर्व तंबू वगैरे सामान मिळविलें. पेंढाऱ्यांनीं त्याशिवाय आणखी १०० घोडे व किरकोळ लूट नेली. बाकींचे एकोजीचे लोक कावेरी पलीकडे **तंजावरास** पळाले. या जयामुळें शिवाजीचा ताबा यापुढें शांततेनें होईल असें वाटतें. मदुरेचा नायक तटस्थ राहिला आहे.

सेन गोवा पृ. १४ } इ. डिसें. १ न्यू. }　　(१९९६)　　{ श. १५९९ मार्ग. शु. ७ { इ. १६७७ नोवें. २१

गोव्याच्या गव्हर्नरानें शिवाजीचा वकील **पितांबर** शेणवी याला गोव्यांत येण्यास परवाना पाठविला.

फॅ. रे. सुरत मा. १०७ } पृ. ९ इ. }　　(१९९७) राजापूर-मुंबई.　　{ श. १५९९ मार्ग. शु. १५ { इ. १६७७ नोवें. २९

**अण्णाजी पंडिताची** आमची नुकतीच भेट झाली होती. त्या वेळीं बक्षीस व भरपाईबद्दल बोलण्यास आम्हीं चुकलों नाहीं. दोन्ही बाबतींत त्याची तयारी दिसली. परंतु, आम्हीं सुपारी दिवाण-किंमतीनें खरेदी करून, फर्मानाप्रमाणें त्याची अर्धी किंमत रोखीनें यावी व राहिलेली बक्षीस घ्यावी, असें तो म्हणाला. बाजार भावानें माल घेऊं असें आम्हीं म्हणून रोख पैशाऐवजीं आमच्या मालापैकीं वाटेल तें घ्या, म्हणून सांगतांच त्यानें **डचांनीं** त्याला वेंगुर्ल्याला दिलेल्या भावानें तांबें मागितलें. नंतर तो एकदम पन्हाळ्याला गेल्यामुळें आम्हीं त्याच्याशीं पुरता ठराव केला नाहीं. तो परत आल्यावर त्याच्याकडून सुपारी घेतां येईल तितकी घेऊं.

फॅ. रे. सुरत } मा. १०७ पृ. ४३ इ. }　　(१९९८) राजापूर-सुरत　　{ श. १५९९ मार्ग. व. ९ { इ. १६७७ डिसें. ८

ह्या प्रांतांत बातमी आजपर्यंत अशीच आहे कीं, **नवाब** मरण पावला व त्याचें सर्व सैन्य नाश पावलें; **दिलेलखानाचीहि** तशीच बिकट परिस्थिति आहे. त्यांच्या सैन्यांतून एकालाहि जिवानिशीं जाऊं न देण्याचा दक्खन्यांचा निश्चय आहे. शिवाजी मेला असावा किंवा त्याचीहि तशीच कष्टप्रद स्थिति असावी. ४००० घोडे स्वार घेऊन त्यानें हुबळी लुटली आणि तो ह्या बाजूला येणार होता, वगैरे सगळी बातमी खोटी होती. कारण, सर्व देशभर दत्ताजी पंडीतच शिवाजीच्या नांवानें धुमाकूळ घालीत फिरत असतो; असें आतां कळलें आहे.

फॅ. रे. मसुली० } मा. १० पृ.? इ. }　　(१९९९) फो. सें. जॉर्ज-मच्छलीपट्टण　　{ श. १५९९ मार्ग. व. १२ { इ. १६७७ डिसें. १०

**गोवळकोंडेकरांचा पराजय** झाला या बातमीनें तुम्हांला भय उत्पन्न होणें साहजिक आहे. परंतु आमच्या बाजूला त्याच युद्धाची हकीकत उलट सांगण्यांत आली आहे.

फॅ. रे. सुरत }
मा. १०७ पृ. ३६ इ. }
(२०००)
कारवार-सुरत.
{ श. १५९९ मार्ग. व. १४
{ इ. १६७७ डिसें. १३

बहलोलखान व दख्खनी लोकांचा तह घाटत असून, **बहलोलखानाच्या** वतीनें हकीम शमशा या नांवाचा वकील कलमें ठरविण्याकरितां गेला आहे असें कळतें. लवकरच तह होऊन ते सर्व मिळून **शिवाजीचा बंदोबस्त** न करतील तर आमचा व्यापार मरभराटीस येण्याची मुळींच आशा नको.

[सि] हुबळीचा सुभेदार 'कंपनीचा माल व लोक आपल्या किल्ल्यांत आणून ठेवा. त्याचें शिवाजीपासून रक्षण करीन' असें म्हणतो. शिवाजीचें सैन्य आसपास घिरट्या घालीत असून वसुलाची चौथाई मागण्याकरितां त्याचा एक वकील सुभेदाराकडे आला होता. परंतु त्याला त्यानें नकार दिला. आतां किल्ल्याचें रक्षण करण्याकरितां त्याच्याजवळ द्रव्य नसल्यामुळें कंपनीच्या मालावर त्याचा डोळा असेल असा संशय येऊन त्याच्यावर विश्वास टाकतां येत नाहीं. परंतु अडचणींतून अन्य मार्ग काढतां येईना म्हणून आमच्यापैकीं दोघांना किल्ल्यांत पाठविलें आहेत.

सा. ले. ३०३ }
श. }
(२००१)
{ श. १५९९ पौष शु. १०
{ इ. १६७७ डिसें. २३

श्रीपतिरावराजे जवार—सोनभट धर्माधिकारी नासिकः—आपलें तीर्थ पौरोहित्य तुम्हांस दिधलें असे. श. १५९३मध्यें पट करून दिला होता तो गनीम मोरोपंत नासकास आला त्या धामधुमेंत हारपला.

सेनगोंवा, पृ. १४ }
इ. जाने. १० न्यू. }
(२००२)
**चौथची मागणी** (पोर्तु.)
{ श. १५९९ पौष व. २
{ इ. १६७७ डिसें. ३१

**गोव्याचा व्हाइसरॉय** पेद्रद आलमेद—**शिवाजी**.

आपला वकील **पीतांबर शेणवी** यानें मला एक खलिता दिला. त्यावरून असें दिसतें कीं, माजी व्हाइसरायांच्या नांवें आपण पत्रें पाठविलीं होतीं; पण कामामुळें त्यांच्याकडून उत्तर गेलें नाहीं. याकरितां हा पत्रव्यवहार शोधून काढण्यास मीं सांगितलें असून त्यांतील प्रश्नांचीं उत्तरें मी देणार आहें. त्यानंतर आपल्या वकिलानें आणून दिलेल्या आपल्या पत्रावरून माझ्या आगमनाबद्दल आपण व्यक्त केलेलें समाधान, आपणास मिळत असलेल्या यशाचें आनंददायक वर्तमान व या दोन राज्यांतील दोस्तीचे संबंध कायम राहण्याविषयींची इच्छा हीं समजून आलीं. " वसई व दमणकडील मुलूख आतां आमच्या ताब्यांत आल्यामुळें तेथील चौथिया राजास पोर्तुगीज अंमलदाराकडून जो चौथ पूर्वी देण्यांत येत होता तो चौथ आतां आम्हांस ( = शिवाजीस ) देण्याविषयीं वसई व दमण येथील किल्ल्यांच्या कप्तानांना लिहिण्यांत

यावें, असें आपल्या पत्रांत झटले आहे. परतु मी नुकताच येथें आलों असून यासंबंधींची माहिती सदर कप्तानांकडून मागवीत आहे. तूर्त उत्तरादाखल मी असें सुचवितों कीं, मी नेमून देईन त्या आमच्या वकिलाशीं बोलण्यासाठीं आपण एक अधिकृत वकील पाठवावा. म्हणजे हा चौथ ज्या कराराप्रमाणें देण्यांत येत होता, त्या कराराचीं कलमें तपासून प्रकरण निकालांत काढतां येईल. एकंदरींत पोर्तुगीजांच्या शत्रुत्वापेक्षां त्याची मैत्री आपणास अधिक फायदेशीर होईल असें मी सुचवितों.

[ पृ. १५ ] पोर्तुगीज व्हाइसराय, कोंदद अझुमार यानें ( १ ) **अनाजी दत्तो** सुरनिवीस सुभेदार प्रांत कोंकण यांच्या नांवें व ( २ ) **मोरोपंत पेशवे** व प्रधान यांच्या नांवें अशीं दोन पत्रें चौथच्या मागणीबाबत व डिचोलीचा सुभेदार गिरमाजी पंडित याच्या नांवें आणखी कांहीं किरकोळ प्रकरणीं पत्रें पाठविलीं.

| | | |
|---|---|---|
| सेन-गोवा पृ. १६।१७<br>इ. १५ जाने. न्यू. | (२००३)<br>**चौथची मागणी.** (पोतु.) | श. १५९९ पौष व. ७<br>इ. १६७८ जाने. ५ |

गोव्याचा व्हाइसराय—**शिवाजीः**—आपल्या पत्रांचीं उत्तरें मी **पीतांबर शेणवी** याच्या हातीं दिलींच आहेत; पण **मी पोर्तुगालमध्यें होतो तेथेंच आपला लौकिक ऐकला** होता आणि आमच्या बादशहांनींहि मोठ्या उत्सुकतेनें मला वजाविलें होतें, यामुळें आपले आभार मानण्यासाठीं मीं हें पत्र मुद्दाम लिहीत आहे. चौथ प्रकरणीं चौल व वसई येथील सुभेदारांनीं ताबडतोब माहिती पाठवावी असें लिहिलें आहे वगैरे मजकूर आपले वकील आपणांस सांगतीलच. त्या पत्रांतून मी आमच्या सुभेदारांना असें लिहिलें आहे कीं "महाराजांच्या सुभेदाराशीं स्नेहाचे संबंध ठेवा व त्यांच्या मुलखांत दंगा व दरवडे घालणाऱ्या कोळ्यांना व चोऱ्या-च्या लोकांना आपल्या मुलखांत आश्रय देऊं नका." तरी आपणहि आपल्या सुभेदारांना पत्र लिहून आमच्या कप्तानांशीं त्यांनी सलोख्याचे संबंध ठेवावे असें कळवावें; म्हणजे वितुष्टाचें कारण राहणार नाहीं.

| | | |
|---|---|---|
| सा ले. १३१<br>सु. १०७८ जिल्काद २४ | (२००४)<br>सी. | श. १५९९ पौष व. १०<br>इ. १६७८ जाने. ८ |

त्रिंबक गोपाळ सुभे. व कार. पा। पुणें–चजाजी नागनाथ हवालदार गणो गवाजी तर्वाव याचा मौ। वेहरवडे येथील इनाम पूर्वीप्रो चालविणें.

| | | |
|---|---|---|
| सा. ले. १२४<br>सु १०७८ जिल्काद ३० | (२००५) | श. १५९९ माघ शु. २<br>इ. १६७८ जाने. १४ |

माहादाजी अनंत सरसुबेदार—त्रिंबक गोपाळ सुभे. व कार. पर. पुणें महादेव मुद्गल पुरंदरे याचा इनाम वगैरे पूर्वीप्रो चालविणें.

फॅ. रे. संकीर्ण सा. ४ }
पृ. २७ इ. }
(२००६)
मुंबई–कंपनी
{ श. १५९९ माघ शु. ३
{ इ. १६७८ जाने. १५

**शिवाजीला** त्याच्या स्वाऱ्यांत एकसारखे जय मिळत आहेत.

ऑर्म ११४–७ पृ. ३–राजा **शिवाजीसारख्या** व्यापाराच्या महाशत्रूच्या ताब्यांत समोरचा किनारा आहे तोंपर्यंत **मुंबई** बेटाचा व्यापार असाच खालावलेला रहाणार. आणि आम्हांला **अत्यंत वाईट वाटतें** तें अशाकरितां कीं त्याचे अधिकाराला कोठेंच खो घसेल असें चिन्ह दिसत नाहीं [!]. कारण, हिंदुस्तानच्या व दख्खनच्या अशा दोन्ही राजांशीं युद्धें करून एकसारखा तो यशस्वी होतो हा मोठा चमत्कार आहे. हा चमत्कार पुढें तसाच चालू रहाणार अशी फार भीती वाटत आहे.... (दि) तथापि तंबाखूवरील जकातीचें मोठें उत्पन्न पाहून येथें पुष्कळ लोक येतात असा समज होण्याचा संभव आहे. परंतु खेदाची गोष्ट अशी कीं, हे सर्व लोक म्हणजे **मुसलमान व पोर्तुगीज ह्यांच्या जुलमामुळें** बेटावर आलेले हलक्या दर्जाचे लोक आहेत.

ओ. कॉ. मा. ३८ }
नं. ४३१४ इ. }
(२००७)
मुंबई–कंपनी
{ श. १५९९ माघ शु. ४
{ इ. १६७८ जाने. १६

आपली **जगज्जेता म्हणून प्रसिद्धी** व्हावी अशा महत्त्वाकांक्षेनें प्रेरित होऊन, **शिवाजी** कोंकणांतील अत्यंत दुर्गम किल्ला जो **रायरी** तेथून निघून गेल्या पावसाळ्या-नंतर, २० ह. स्वार व ४० ह. पदाती घेऊन **कर्नाटकावर** गेला. त्या बाजूला, तेलं-गणांतील **जिंजी व तंजावर** हे दोन मोठे किल्ले आहेत. तेथील व्यापारी बहुत सधन आहेत. **स्पेनमध्यें सीझर** ज्याप्रमाणें आला, त्यानें पाहिलें आणि जिंकलें, तद्वत् तेथें **शिवाजीचा** पराक्रम होऊन तेथून त्याला अमर्याद संपत्ति मिळाली; आणि त्यामुळें पुढील युद्धाचा यशस्वी कार्यक्रम पुरा करण्यास त्याला साधनें प्राप्त झालीं. तो हल्लीं **बंका व पूर** [?] या दुसऱ्या दोन दुर्गम किल्ल्यांवर हल्ले करीत आहे. ( **अलेक्झांडर धि ग्रेट** इतकाच त्याचा या बाबतींत हातखंडा आहे. ) कारण, पूर्वी **जयसिंगाला** दिलेले **२३ दुर्गम किल्ले** त्यानें आपल्या पक्ष्यांप्रमाणें चपल स्वारांच्या साहाय्यानें ( त्यांना तो आपले पक्षी, पांखरें असेंच म्हणतो ), **मोंगलांपासून** आठ महिन्यांच्या आंत परत घेतले. *बंका व पूर घेतल्यावर त्याच्या नजीकच असलेली दख्खनच्या राजाची राजधानी* **विजापूर** ह्या किल्ल्यावर तो स्वारी करणार आहे. तो घेतल्यावर मग थेट **दिल्लीवर** चाल करून जाऊन औरंगजेबाला तेथें कोंडून टाकीपर्यंत तलवार म्यानांत न घालण्याची त्यानें देवीजवळ प्रतिज्ञा केली आहे असें म्हणतात. मोरोपंतानें त्र्यंबक, नाशीक व मोंगलाईतील इतर शहरें लुटलीं. त्यामुळें त्याच्या खजिन्यांत पुष्कळच भर पडली...[ दि ] बादशहाचा मानलेला भाऊ (Fostel Brother) **बहादरखान** शिवाजीशीं लढत होता. त्यानें लांच खाऊन शिवाजीवर मुळींच शस्त्र न धरल्यामुळें ४ महिन्यांपूर्वी

औरंगजेबानें त्याला बोलावून नेलें. आणि त्याच्या पदव्या व खजिना इत्यादि काढून घेऊन त्याला मक्केला लावून दिलें. त्याच्या बदला **दिलेरखान** नांवाच्या पठाण उमरावाला पाठविण्यांत आलें आहे. त्यानें आपला जातवाला विजापूरचा संरक्षक **बहलोलखान** याच्याशीं ऐक्य केलें; तथापि **दक्षिणी हे अधिक चांगलें शिपाई व स्वार** असल्यामुळें त्यांनीं त्याचा पराजय केला.

फॅ. रे. सुरत
मा. १०७ पृ. ४७ इ. } (२००८) कारवार- सुरत { श. १५९९ माघ शु. ४ इ. १६७८ जाने. १६

**सर्जेखान** व **बहलोलखान** यांची कलबुर्ग्याला लढाई झाली त्यावेळीं झालेल्या जखमांमुळें बहलोलखान मेला अशी बातमी आहे. दक्षिणी पक्षाचे लोक **विजापुरास** आल्याचीहि बातमी आहे. परंतु निश्चित कांहीं सांगतां येत नाहीं. [ से. ] एक महिन्यापूर्वी **अण्णाजी पंडितानें** पाठविलेला **विसाजी फोंडदेव** या नांवाचा वाईट इसम सुभेदार होऊन आला आहे. त्यानें आम्हाला भेट देऊन न्यायानें वागण्याचें वचन दिलें. परंतु आम्हांला त्याबद्दल शंका वाटते.

फॅ. रे. सुरत
मा. ८९ पृ. २६ इ. } (२००९) सुरत-कंपनी { श. १५९९ माघ शु. ९ इ. १६७८ जाने. २१

**रामनगर** आणि **पिंडोल** येथील [ सुरतेपासून २ दिवसांच्या मुकामावर ] शिवाजीचें सैन्य केव्हां **सुरतेवर** चालून येईल याचा नियम नाहीं. सुरतेचा नवा सुभेदार जुन्या सुभेदाराप्रमाणें **गुप्त रीतीनें कांहीं देऊन** अविरोध राखण्याचें साफ नाकारतो. यामुळें लोक भीत आहेत....**राजापूरची वखार** देशांतील युद्धाच्या गोंधळामुळें किफायतशीर झाली नाहीं. दक्षिण्यांशीं झालेल्या युद्धांत बहलोलखान मेला व त्याच्या सैन्याची धुळधाण झाली. दिलेरखानाची अवस्था कष्टप्रद आहे. शिवाजी सर्वत्र निर्धास्तपणें वावरतो. त्याचा एक सेनापती **दत्ताजी पंडीत** हुबळीच्या आसपास लुटालूट करीत फिरत आहे. शिवाजीच्या कर्जफेडींत मिळणारी सुपारी व नारळ फार कुजके असतात. प्रेसि. रोल्ट येईल तेव्हां ती वखार बंद करण्याचा विचार केला पाहिजे. [ से. पृ. २९–३० तारीख सदर ]-शिवाजी मोठ्या पितळेच्या तोफा मागत आहे. परंतु कर्ज फेडीचे पैसे देण्याचे बाबतींत त्याची दिरंगाई पाहतां मागणीचा विचार करावा असें नाहीं. दुसरें कोणी गिऱ्हाईक मिळाल्यास पाहूं.

डाग राजि. इ. १६७८
पृ. ५४ फेब्रु. १ न्यू. } (२०१०) { श. १५९९ माघ शु. १० इ. १६७८ जाने. २२

अखेर विजयी दरोडेखोर ( robber ) **शिवाजी** यानें आपला भाऊ एकोजी राजे ( जो नागापट्टणजवळील मुलखाचा कांहीं दिवस स्वामी होता ) त्यास रणांगणांतून

पूर्णपणें हाकलून देऊन तंजावर शहरांत कोंडलें. सीरखान लोदी यासहि तो थोड्याच दिवसांत जिंकून घेईल असें वाटतें; आणि येथील राजांची आपसांतील भांडणें व दुसरे अंतर्गत घोटाळे यामुळें मदुरेचा प्रदेशहि त्याला जिंकावयास अवघड जाणार नाहीं.

[ पृ. ५३ ] म्हातारा नवाब शाइस्तेखान यास अलमगीरानें दक्षिणेस जाऊन बंडखोर (दरोडेखोर) शिवाजी याविरुद्ध युद्ध सुरु करण्याविषयीं हुकूम केला आहे असें येथील लोक बोलतात.

फॅ. रे. सुरत भा. १०७ } (२०११) { श. १५९९ माघ शु. ११
पृ. ६१ इ. } कारवार-सुरत. { इ. १६७८ जाने. २३

दक्षिणी [ पक्षाच्या ] लोकांनीं विजापूर आपल्या ताब्यांत घेतल्यामुळें व्यापार खुला होईल व मरमराटीस येईल अशी आशा वाटते.

राम. अं. ६५-६६ } (२०१२) { श. १५९९ माघ व. १२
हि. १०८६ जिल्हेज २५ } { इ. १६७८ फेब्रु. ८

रा. जयेसिंगजी राजे—रघुनाथ विठल व विश्वनाथ तिमण सेडगे

तुम्हास वर्षासन रु. १२ केले असेती. तरी श्रीस अभिषेक करणें. आणि वरशासन हुजूर येऊन घेऊन जाणें.

ओ. कॉ. भा. ३८ } (२०१३) { श. १५९९ फाल्गुन शु. ३
नं. ४३१४ इ. } मुंबई-कंपनी. { इ. १६७८ फेब्रु. १४

दक्षिणी [ पक्षाच्या ] लोकांचा एका किल्याला वेढा पडला असतां त्यांत बहलोलखान मृत्यु पावला अशी बातमी राजापूरच्या पत्रांत आहे. डोळे मिटण्यापूर्वी अगदीं थोडा वेळ त्यानें आपले दोन पुत्र सर्जेखानाच्या हातांत दिले. आणि त्यानेंहि पूर्वीचें वैर विसरून त्यांचा स्वीकार केला. बहलोलच्या दफनाची बातमी विजापुरास येऊन पोंचली नाहीं तोंच जमशेदखानानें शहर व किल्ला सिद्दी मसाऊदच्या हवालीं केला. सिद्दी मसाऊद व सर्जेखान असे मोंगल सेनापती दिलेलखान याला मिळून ८० ह. घोडदळानिशीं शिवाजीवर त्याचा निःपात करण्याच्या उद्देशानें चालून जाणार आहेत. परंतु शिवाजी दुसरा सेर्टोरिअस किंवा युद्धकौशल्यामुळें प्रति-हॅनिबॉलच आहे हें प्रसिद्ध आहे; आणि आतांच बातमी अशी आली आहे कीं, गोवळकोंडेकर, [विजापुरांतील] दक्षिणीपक्ष आणि शिवाजी या त्रिवर्गांनीं मिळून मोंगलांविरुद्ध एकजूट करून दिलेलखानाला दख्खनमधून हांकून

काढण्याचें ठरविलें आहे. **शिवाजी** पिछाडीकडून १० ह. स्वार त्याच्यावर पाठविणार आहे; आणि त्यानेंच म्हणून आपल्या राजकारणाच्या जोरावर दक्षिणीपक्ष आणि गोवळकोंडेकर यांना आपल्या स्वतःच्या विरुद्ध **दिलेलखानाशीं** एकी करण्यापासून परावृत्त केलें. [इतर कोणालाहि ही गोष्ट साध्य झाली नसती.] असें म्हटलें पाहिजे.

फॅ. रे. सुरत
मा. ८९ पृ. ५७ इ.

(२०१४)
सुरत-राजापूर

श. १५९९ फाल्गुन शु. ५
इ. १६७८ फेब्रु. १५

राजाबरोबर झालेला करार मोडून आणि अथणी वगैरे लुटून शिवाजीच्या लोकांनीं आम्हांला फार वाईट रीतीनें वागविल्यामुळें त्यांच्या सरळ वागण्याबद्दल आम्हीं निराश झालों आहों. तुम्हीं अण्णाजीशीं स्पष्टपणें बोलाच. तो सर्व व्यवस्थित देत असेल तर ठीक आहे, नाहींतर आम्ही वखार काढून घेणार. तुम्हीं निघून येण्याची तयारी ठेवा... तुमच्याकडील परिस्थितीमुळें तुमच्याकडे कांहींच माल मागविण्याची सोय राहिली नाहीं. तरी काटकसरीनें रहा.

फॅ. रे. मुंबई
मा. २ पृ. २४ इ.

(२०१५)
मुंबई कन्सल्टेशन

श. १५९९ फाल्गुन शु. ९
इ. १६७८ फेब्रु. १९

रिव्हेंज गलबत दक्षिणेकडे जाणार आहे असें कळलें तेव्हां, त्याच्या कप्तानानें दाभोळकडे जाणारीं **शिवाजी**करितां मीठ भरलेलीं सहा गलबतें, सिद्दी कासमच्या हल्ल्यापासून सांभाळून न्यावीं. अशी विनंती नारायण शेणव्यानें डेप्यु० प्रेसि०ला केली. यामुळें मोंगलांना दुखविण्यासारखें होणार असल्यामुळें डे० प्रेसिडेंट ही विनंती मान्य करण्यास तयार होईना. परंतु इसमांची मदत करण्याची तयारी शिवाजीच्या अधिकाऱ्यांना दिसून यावी एवढ्याचकरितां कॅप्टन मिचिनला असा हुकूम देण्यांत आला कीं, त्यानें शिवाजीचीं गलबतें बरोबर न्यावीं. मार्गांत कोणीं त्यांना धरण्याचा प्रयत्न केल्यास हीं आपल्या बेटावरील आहेत असें सांगून पहावें. याउप्पर कोणी जबरदस्तीनें पकडूं लागेल तर तोंडी प्रतिकार करावा. परंतु तोफा डागणें अगर अन्य तऱ्हेनें शत्रुत्वानें वागणें हे प्रकार **सिद्दी कासम** *किंवा त्याचें आरमार यांच्याविरुद्ध करूं नयेत.*

फॅ. रे. मुंबई
मा. ८ पृ. १५ इ.

(२०१६)
मुंबई-कॅप्टन मिचिन

श. १५९९ फाल्गुन शु. ९
इ. १६७८ फेब्रु. २०

ह्या बेटाचा रहिवासी व व्यापारी **नारायण** शेणवी यानें शिवाजीपासून ६ गलबतें खरेदी करून तीं मिठानें भरून पाठविण्याचें योजिलें आहे.... पूर्वी तीं **शिवाजीचीं** होतीं म्हणून कोणी त्यांस पकडील तर तुम्हीं त्यांना बरोबर घेऊन रक्षण करावें. प्रथम हीं गलबतें आपल्या बेटावरील आहेत वगैरे सांगून कांहीं उपयोग न होईल तर मग

बादशहाच्या नांवानें प्रतिकार करून 'यापुढें तुमच्या पकडण्यामुळें आमच्या व्यापारी गलबतांचें होणारें नुकसान तुम्हांला भरून द्यावें लागेल अशी तोंडी ताकीद द्यावी. परंतु कोणत्याहि प्रकारचा सशस्त्र प्रतिकार करूं नये.

फॅ. रे. सुरत }
भा. १०७ पृ. ४९ इ. } (२०१७) मुंबई-सुरत (?) { श. १५९९ फाल्गून शु. १०
{ इ. १६७८ फेब्रु. २१

दक्षिण्यांविरुद्धच्या लढाईंत मोंगलांचा सेनापती असलेला **दिलेरखान**, शिवाजीनें थोड्याच दिवसांपूर्वी लुटलेल्या **नासिकत्रिंबकपर्यंत** आला. परंतु दक्षिणी वजिरांशीं झालेल्या युद्धांत त्याच्या सैन्याचा इतका मोड झाला कीं, शिवाजी त्यास कःपदार्थ समजून, **विजापूर व भागानगर येथील राजांना मिळून**, पूर्वी विजापूरच्या राज्यांतले कांहीं किल्ले आतां मोंगलांच्या ताब्यांत आहेत ते सोडविण्याचा विचार करीत आहे. याबद्दल खरें कांहींच सांगतां येत नाहीं.

फॅ. रे. सुरत }
भा. १०७ पृ. ७१ इ. } (२०१८) कारवार-सुरत { श. १५९९ फाल्गून व. १
{ इ. १६७८ फेब्रु. २७

हुबळीहून नुकतीच बातमी अशी आली कीं, दक्षिणी पक्षाच्या वतीनें **विजापूरचा** ताबा **सिद्दीमुर्शीदच्या** [मसाऊद?] हातीं आहे. परंतु निश्चित कांहीं सांगता येत नाहीं.

फॅ. रे. सुरत }
भा. १०७ पृ. ६० इ. } (२०१९) राजापूर-सुरत { श. १५९९ फाल्गून व. २
{ इ. १६७८ फेब्रु. २८

**शिवाजीचे** देण्यापैकीं बरेंच यावयाचें असून, त्याच्या मोबदला **सुपारी** घेण्याची परवानगी तुम्हीं दिल्यास, तें वसूल होईल असें वाटतें. कारण, ह्या हिंदू लोकांच्या हातांतून रोख पैसा काढणें अत्यंत कठीण असून, सुपारीशिवाय इतर माल बहुतेक मिळण्यासारखा नाहींच.

इकडील राजकीय परिस्थितीविषयीं पक्की बातमी म्हटली म्हणजे **नबाब मरण पावला** ही होय. **दिलेरखान** परत गेला. ५०००० घोडेस्वारांचें दक्षिणी सैन्य **सर्जेखान व सिद्दी मसाऊद** यांच्या नेतृत्वाखालीं विजापुरावर चालून आलें. नबाबाचा गुलाम **जेमसीरखान** याजपाशीं त्यांनीं शहराचा ताबा मागितला. त्यानें गेल्या नवचंद्र रोजीं ताबा देण्याचें कबूल केलें. त्यांनी या प्रवेशाच्या गंभीर प्रसंगीं, आपला नेता म्हणून हजर रहाण्यासाठीं **शिवाजीला** बोलाविलें आहे. नाहींतर खर्चासाठीं त्यानें ८० लक्ष होन पाठवून द्यावे अशी त्यांची मागणी आहे. हल्लीं शिवाजी एका किल्ल्याला वेढा घालण्यांत गुंतला आहे. त्याच्याच लोकांच्या सांगण्यावरून, असें दिसतें कीं, मोंगल

किंवा दक्षिणी यांच्या हातून कधींहि झाला नाहीं असा **मानहानीकारक पराजय** त्याचा त्या ठिकाणीं झाला. ज्यानें आजपर्यंत इतकीं अनेक राज्यें जिंकून घेतलीं तो एका **देसाई स्त्रीचें** पारिपत्य करूं शकला नाहीं ! अशा रीतीनें नबाबाचा मृत्यु, दक्षिणीलोकांच्या एकजुटीचें सामर्थ्य, आणि शिवाजीच्या माग्याला लागलेली ओहोटी या गोष्टी एक समयावच्छेदेंकरून घडून आल्या आहेत. त्या अर्थी व्यापाराला चांगले दिवस येतील असें वाटतें. कारण, या चालू अंदाधुंदीच्या मुळाशीं खरोखर कोणी असतील तर ते **शिवाजी** आणि **नवाब** हेच दोघे होते.

[ से ] **अण्णाजी पन्हाळ्याला** आहे.

सेन गोवा पृ. १८ } (२०२०) { श. १५९९ फाल्गु. व. ४
इ. मार्च १२ न्यू. } { इ. १६७८ मार्च २

पोर्तुगीज अधिकारी—वेंगुर्ल्यांचा **हवालदार तानाजी रामः**—आमच्या खलाशांनीं आपला मचवा अडवून ठेवला आहे तो सोडण्याविषयीं आपण पत्र लिहिलें; त्याबाबत उत्तरीं कळविण्यांत येतें कीं, सदर मचवेवाल्यानें आमचा परवाना काढला नव्हता; यामुळें तो मचवा पकडण्यांत आला. परंतु पोर्तुगीज राज्याचा **शिवाजीराजाशीं** सलोख्याचा संबंध असल्यामुळें तो मचवा सोडण्याचा हुकूम दिला आहे. आमच्या राज्यांत शिवाजी राजाच्या प्रजाजनांना स्नेहानें वागविण्यांत येईल.

सा. ले. २६४ } (२०२१) { श. १५९९
सु. १०७८ } कौल { इ. १६७७

अज दि. खंडो बायेदेऊ हवा व कार. सा अथणी–ता महामाद व रया का अथणी महाराजसाहेब रा व पंत यांचा उल्लेख व का अथणीची पेठ मामुरी करण्याचें काम.

श्री सां. चा. २६ } (२०२२) { श. १५९९
श. ? } { इ. १६७७

दत्ताजी त्रिमल—दिवाकर गोसावी

छत्रपती स्वामी कर्नाटकांतून स्वारी करून सज्जन गडी दर्शनास गेलें तेथें विनंती केली " श्रीनीं पूर्वी चीरवाडीचे मुकामीं सिवथर प्रांति असतां मध्यें महानदी महापूर आणि अकस्मात् रात्री पलंगापाशीं येऊन चमत्काररूपें दर्शन दिलें. दुसरें दिवशीं सुंदरमठी भेटी झाली. आशीर्वाद व देशप्राप्तीचे चीन्ह सुचविले. चाफळ येथील देवस्थानास गाउ मुकासे द्यावे म्हणून दूरदूर देशी गांवाची नांवें सांगितली. चाफळचे देवालय उकलून कर्नाटक रीतीची इमारत करावयाची आज्ञा मागितली तें राहविली. मग सज्जनगडी मठ बांधण्याची आज्ञा मागितली. ते कार्य चाली लाविले. श्रीचे पूजेस चाफळा सनिध अकरा गांव इनाम दिलें. ते पावलें म्हणोन प्रसादार्थ परत दिलें. ऐसियास आणिक ११ गांव

१२१ खंडी धान्य व ११०० होन ऐसे चालवावें ऐसा निश्चय केला. श्री रामदास स्वामी तो उदासीन स्थिती. परंतु त्यांची आज्ञा पूर्वीच आहे कीं देवाचा उत्सव उत्तरोत्तर वृद्धीते पावेल. पूर्वी संकल्प केल्याप्रमाणें राज्याभिषेक प्रसंगींचे अलंकार व अकरा मणाची स्वयंपाक-पात्रें पाठविली ती श्रीस समर्पणें ........ व उत्सव चालविण्याबद्दल श्री छत्रपति स्वामीची पूर्वींची आज्ञा आहे. तरी तेणेंप्रमाणें करणें.

| | | |
|---|---|---|
| श्री. वि. ले. ११<br>? | (२०२३)<br>फा. सी. | श. १५९९<br>इ. १६७७ |

जयसिंगजी राजे–राजो पंडित.

रघुनाथ व विश्वनाथभट हे आपले वेरूळचे तीर्थपुरोहित आहेत.

| | | |
|---|---|---|
| हि. रे. मा. ११<br>पृ. ९० फसली ? | (२०२४)<br>दारवा परगणा, देशमुखांचें वेतन. | श. १५९९—१६००<br>इ. १६७७ |

परगण्यांतील ११३ गांवें ब्राह्मण, रजपूत, मराठे व मुसलमान जातींच्या ८ देश-मुखांत विभागून दिलीं होतीं. सर्वांत मिळून १,५८,२९७ टक्के वांटून दिले.

| | | |
|---|---|---|
| हिस्टॉ. मिसलेनी<br>जेस्विट लेटर्स, पृ. १७ इ. | (२०२५)<br>जेस्विटांचा वृत्तांत. | श. १५९९–१६००<br>इ. १६७८ |

तंजावरांत अनेक क्रांत्या झाल्यामुळें प्रजेला अनिष्ट परिणाम भोगावे लागले आहेत. मदुरेचा मांडलीक व रामनदाचा सेतुपती मारव यानें अरण्याच्या बाजूनें तंजावरावर अनेक हल्ले चढविले. एकोजीचें मुख्य सामर्थ्य घोडदळांत असे. आणि अशा अरण्यांत घोडदळ निकामी असल्यामुळें मारवानें वारंवार हल्ले करून [ इ. १६८३ चें प ] एकोजीच्या राज्याचा कांहीं भाग जिंकला.

[पृ. १९]–ह्या अधिकाऱ्याचा [एकोजीचा] अमल त्याच्या भावापेक्षां पुष्कळ बरा वाटतो. कारण जुलूम करतांना प्रजा जगावी अशी तरी तो काळजी घेतो.

| | | | |
|---|---|---|---|
| लेटरबुक भा. ५<br>पृ. ५२९, ५३४ इ. | (२०२६)<br>कंपनी–सुरत | श. १६०० चैत्र<br>इ. १६७८ मार्च | ३ |

शिवाजीनें, दहा हजार होन द्यावयाचे ते केवळ कंपनीच्या ... भरपाईबद्दल द्यावयाचे, कीं सर्व इंग्रजांच्या नुकसान भरपाईबद्दल द्यावयाचे हें कळवा. जर ते सर्वांच्या नुकसानीबद्दल असतील तर प्रत्येक व्यक्तीचें व नुकसान किती तें तपशीलवार कळवून त्या बाबतींत झालेला वसूल, त

सर्च, व झालेली नक्की जमा वगैरे कळवावें. म्हणजे निरनिराळ्या लोकांचें देणें प्रमाणांत देऊन टाकूं.........

२० मार्च ( १६७७ ) च्या पत्रांत शिवाजीचें सैन्य जवळ आल्यामुळें भीती वाटल्याचें तुम्हीं लिहिलें. परंतु ७ एप्रीलच्या पत्रांत त्याबद्दल कांहींच लिहिलें नाहीं हें कसें ?

फॅ. रे. सुरत मा. ८९ पृ. ७० इ. | (२०२७) सुरत (स्वाली)-कंपनी. | श. १६०० चैत्र शु. ६ इ. १६७८ मार्च १८

राजापूर, कारवार आणि कालिकत येथील वखारींची परिस्थिति बरीच अस्थिरतेची आहे. पहिल्या दोहोंवर दख्खनमधील यादवीचा आणि शिवाजीच्या त्रासाचा परिणाम झाला. आणि झामोरीनच्या हाताखालील राजे व सुभेदार यांच्या दुर्वर्तनामुळें कालिकतला पुष्कळच जाच झाला. योग्य वेळीं ही स्थिति दुरुस्त करण्याची काळजी घेतां येणें शक्य नसेल तर तेथून आपल्या नोकरांना काढून घ्यावे हेंच उत्तम.

(से) फॅ. रे. सुरत मा. १०७ पृ. ७३ इ. | (२०२८) मुंबई-सुरत | श. १६०० चैत्र शु. १५ इ. १६७८ मार्च २८

सिद्दी आरमारासह दंडाराजपूरपर्यंत आला असून येथेंच पावसांत राहून त्रास देण्याची त्याची इच्छा दिसते. आमचा विरोध असतांनाहि तो येथें रहाण्याचा हुकूम मिळवितो असाच अनुभव येतो. तेव्हां आपल्याकडून उलट हुकूम आला नाहीं तर आम्हीं त्याला नकार देणार नाहीं. परंतु आमच्या सुरक्षिततेच्या दृष्टीनें त्यानें बरेंच सैन्य कमी करावें असा आग्रह धरूं.

[ऑर्म ११४--७ पृ. १७]--सिद्दी संबूळच्या दोन नोकरांचीं मुलेंमाणसें दंडाराजपुरीच्या सिद्दीच्या हातून सोडविण्याच्या खटपटींत आम्ही आहों. सदर इसम संबूळचे नोकर नसून किल्ल्याचे नायकवाडी आहेत व त्यांच्या सेवेची किल्ल्याला जरूरी आहे; असें दंडाचा सिद्दी माजी गवर्नराला सांगत असे [पृ. १९]. वल्लभ गंगादास नांवाचा व्यापारी शिवाजी राजाचा बातमीदार आहे अशा संशयावरून सुरतेच्या सुभेदारानें पकडला आहे. त्याच्याकडून आमचें येणें आहे, करितां त्याचीं सुपारीचीं २ गलबतें पकडावीं. येथून तीं त्याच्या ज्या भावानें पाठविलीं. त्याला आम्हीं कैद केलें आहे.

फॅ. रे. सुरत मा. ८९ पृ. ७२ इ. | (२०२९) सुरत-मुंबई. | श. १६०० चैत्र व. ३ इ. १६७८ मार्च ३१

सुरतेचा सुभेदार महमद बेग यानें सिद्दी कासमला मुंबईंत राहूं देण्याबद्दल विनंति केली आहे. ह्या मार्गातील कंपनीचे हितसंबंध लक्षांत घेतां प्रयत्न करूनहि त्याला नकार देणें आम्हाला अशक्य झालें.

फॅ. रे. सुरत भा. १०७ } (२०३०) { श. १६०० चैत्र व. ७
पृ. ८० इ. } राजापूर-सुरत { इ. १६७८ एप्रील ३

विजापूरचा किल्ला दक्षिण्यांच्या ताब्यांत आहे. **सिद्दी मसाऊदनें** एक विलक्षण युक्ति करून तो घेतला. नबाबाच्या मृत्यूनंतर किल्ला हातांत राखणें थोडें जड जाऊं लागल्यामुळें जमशीरखानानें ६ लाख होन घेऊन तो **शिवाजीला** देण्याचें कबूल केल्याची बातमी ऐकून, सिद्दी मसाऊदखानानें आजाराची बतावणी करून नंतर आपण मेल्याचेंहि जाहीर करविलें. पुढें आपल्या प्रेताच्या पेटीबरोबर कांहीं सैन्य अदोनीकडे, पाठवून दिल्यावर राहिलेल्या ४००० सैन्याकडून जमशीरखानाकडे नोकरीबद्दल विनंति करविली. 'आपला धनी मेल्यामुळें निराश्रित झालों' असें सांगणाऱ्या या लोकांवर विश्वास ठेवून जमशीरखानानें त्यांना किल्ल्यावर घेतलें. पुढें दोनच दिवसांत ह्या लोकांनीं खानाला गिरफदार करून दरवाजे उघडले आणि सिद्दी जीवंत शहरांत शिरला. **शिवाजीला** [तिकडे जातांना] रस्त्यांतच ही खबर लागल्यामुळें तो परतला. थोडेच दिवसांत तो **पन्हाळ्यावर** येईल अशी अपेक्षा आहे.

**सर्जेखान** मध्यंतरीं पुढें काय करावें याबद्दल **कुतुबशहाचा** सल्ला घेण्याकरितां गेला होता. इतक्यांत अशा रीतीनें किल्ला घेतल्याची बातमी कुतुबशहाच्या कानीं जाऊन त्यानें युद्धखर्चाकरितां कर्जाऊ दिलेल्या १ कोटी होनांची दक्षिण्यांना सूट दिली ! आतां **शिवाजीला** कोंकणांतच येनकेनप्रकारेण दाबून ठेवण्याच्या इराद्यानें तो स्वतः शिवाजीवर जाऊं इच्छितो.

पिसु. शिवा. पृ. ५० टीप २ } (२०३१) { श. १६०० चैत्र व. ७
इ. एप्रील १३ न्यू. } { इ. १६७८ एप्रील ३

गोव्याचा गव्हर्नर——दों मनवेल लोब द सिल्व्हेर.

गावखंडीबद्दल जुझेफ दे मेल यानें सांगितलें आहे कीं, दोन वर्षांची खंडणी दिली असून चालू सालची खंडणी तेवढी द्यावयाची आहे. तरी पैसे जमविल्यावर **मोरो त्रिमळ प्रधान** किंवा शिवाजीचे सुभेदार यांना कळवावें कीं, **सायबानच्या** [?] किल्यांत येऊन त्यांनीं पैसे घ्यावे. शिवाजीच्या लोकांनीं परस्पर खंडणी घेण्यापेक्षां आपण जर आपल्या लोकांकडून खंडणी वसूल करून शिवाजीस दिली तर तें चांगलें.

(से.) फॅ. रे. सुरत } (२०३२) { श. १६०० चैत्र व. ९
भा. ८९ पृ. ७९ इ. } सुरत-राजापूर { इ. १६७८ एप्रील ५

रोख पैसा मिळत नसेल तर त्यांतल्या त्यांत वसोर्शानें भाव ठरवून शिवाजीकडून सुपारी घ्यावी.

ताजाकलम— या सोबत **राजाच्या वहींतून**, सोनगांव व अथणी येथून

कंपनी व तिचे नोकर लोक यांच्यापासून **शिवाजीनें लुटलेल्या मालाच्या यादीची नक्कल** पाठविली आहे. तीवरून व तुमच्या पुस्तकांवरून तुम्हीं नुकसान-भरपाईबद्दल मागणी करा.

खं. २१ ले. ६७ } (२०३३) { श. १६०० चैत्र व. ११
श. } { इ. १६७८ एप्रील ७

मल्हारी गोस्वामी सदावर्ती इनामदार मौ. नाडोली यींही वे. विश्वनाथभट्ट गिजरे वास्तव्य कऱ्हाड यांस नाडोली येथील ३ रुके जमीन इनाम दिली आहे.

डाग रजिस्टर १६७८ } (२०३४) { श. १६०० वैशाख शु. १
पृ. १४९ इ. एप्रील २२ न्यू. } नागापट्ट.-बटे. [१३फेब्रु.] { इ. १६७८ एप्रील १२

तंजावरकडे तांदुळाचें उत्पन्न साधारण आलें, परंतु शिवाजीच्या व मदुरेच्या सैन्यांनीं तंजावरकडील मुलखांत शिरून फार नासाडी केली. संकटांत सांपडलेल्या व हताश झालेल्या एकोजी राजाशीं तह करण्याकरितां जात असतां वाटेंत मदुरेच्या लोकांकडून बरीच मोठी रकम वसूल करण्याकरतां तो लुचा शिवाजी येथें थांबला होता.

डाग रजि. १६७८ } (२०३५) { श. १६०० वैशाख शु. २
पृ. १५० इ. एप्रील २३ न्यू. } { इ. १६७८ एप्रील १३

पालियाकटच्या गव्हर्नराचें २१ जानेवारीचें पत्रः-दक्षिणेकडील बाजूस शिवाजीनें मदुरेच्या नायकाशीं तह केला असें दिसतें. परंतु आमच्या व्यापाराघाटींत मार, फायदाचें व हिताचें असें फारसें निष्पन्न झालें नाहीं.

(से.) फॅ. रे. सुरत } (२०३६) { श. १६०० वैशाख शु. ९
भा. १०७ पृ. ८१ इ. } मुंबई-सुरत { इ. १६७८ एप्रील २०

मुंबईहून मोंगलांनीं ४ पितळी तोफा घेतल्या.

फॅ. रे. सुरत } (२०३७) { श. १६०० वैशाख शु. १३
भा. ८९ पृ. ९२ इ. } सुरत-राजापूर { इ. १६७८ एप्रील २४

आम्हांला आतां शिवाजीच्या अंमलदाराचा क्षुद्रपणा कळला असून यापुढें त्यांच्या गोड थापांना भुलण्याची आमची इच्छा नाहीं. योग्य अपेक्षा पुऱ्या होत नसतील तर आम्ही तुमची वखारच तेथून उठवूं. गेल्या पत्रांत सुपारी घेण्याची तुम्हांला मालकीक दिली होती. त्या बाबतींत तुम्हीं कांहीं केलेंच असेल. बक्षिसाच्या रकमेबद्दलहि सुपारी घेण्यास आमची हरकत नाहीं. शक्य तोंपर्यंत गोडी व पांढरी सुपारी मिळवा चिकणी घेऊं नये. कारण चिकणी तेथल्यापेक्षां इकडेच अधिक स्वस्त मिळते.

(से) फॅ. रे. सुरत भा. १०७ } (२०३८) { श. १६०० वैशाख व. १०
पृ. ९१-९२ इ. } कारवार-सुरत { इ. १६७८ मे ५

उद्दाम आणि जुलमी वर्तनामुळें राजापूरच्या व्यापारी लोकांनीं तेथील सुभ्यावरून घालवून लावलेला **विसाजी कोंडदेव** सुभेदार होऊन इकडे आला आहे. तो आमचे पूर्वापार हक्कांवर जुलमानें गदा आणावयास पहातो. परंतु आम्ही त्याचें कांहीं चालूं देणार नाहीं. **हुबळीचा** सुभेदार **अंतू पंडित** आणि मुख्य व्यापारी किंवा महाजन (Manhar ?) असे उभयतां फारच त्रास देतात. **शिवाजीशीं** हुबळी विलायतेबद्दल **चौथ देण्याचा** त्यानें तह केला आहे तो देण्याकरितां आणि नगररक्षणार्थ त्याला सैन्य ठेवावें लागतें त्याच्या खर्चाकरितां म्हणून त्यानें **श्रीमंतांवर** बसविलेल्या **करा**पैकीं आम्हीं ५०० होन दिले नाहींत; म्हणून त्यानें आमची वखार फोडून पात्र हिरा कापड नेऊन त्याचा लिलांव मांडला. अशा जुलमाबद्दल विजापुरास आम्ही तक्रार एका बनियामार्फत करीत आहोंत.

अशी उडती बातमी आली आहे कीं, शिवाजी **पन्हाळयावर** असल्यामुळें त्याच्यावर स्वारी करण्याकरितां विजापुराहून एक दक्षिणी पक्षाचें सैन्य निघालें आहे. सेनापती कोण आहे तें कळलें नाहीं.

सेन गोवा पृ. १९ } (२०३९) { श. १६०० ज्येष्ठ शु. ३
इ. मे २३ न्यू. } पोर्तु. अधिकारी-**पितांबर शेणवी** { इ. १६७८ मे १३

आपल्या जहाजाची सुटका होण्याविषयीं आपण लिहिलें. त्या बाबतींत आपणांस हें माहीत असलें पाहिजे कीं, हिंदी महासागरांत पोर्तुगीजांचा परवाना घेतल्यावांचून कोणत्याहि जहाजास संचार करतां येणार नाहीं.

फॅ. रे. सुरत भा. १०७ } (२०४०) { श. १६०० ज्येष्ठ व. १
पृ. १०४ इ. } फो. सें. जॉर्ज-सुरत { इ. १६७८ मे २७

**शिवाजी** स्वदेशांत गेल्याला बरेच दिवस झाले. तिकडे परत गेल्यावर मोंगल सेनापती **दिलेरखान** याच्याशीं त्याला बऱ्याच लढाया घाव्या लागल्या. या भागांत त्यानें जिंकलेला मुलुख त्याच्या लोकांच्या अमलाखालीं शांततेंत आहे. त्याचा भाऊ **एकोजी** यानें ३ लक्ष होन रोख हातांत दिल्यामुळें **शिवाजीनें** त्याला कांहीं मुलुख परत देऊन त्याच्याशीं पक्का तह केला.

फॅ. रे. सुरत भा. ८९ } (२०४१) { श. १६०० ज्येष्ठ व. ६
पृ. १०४ इ. } सुरत-कारवार { इ. १६७८ मे ३१

**कारवारला** शिवाजीच्या अंमलदारांचा त्रास होतो व हुबळीला **विजापुरी**

अमलदारांचा त्रास होतो. विशेषतः हुबळीचा वखार फोडण्याचा प्रकार अकल्पित असाच वाटतो. तरी वखार मोडून हुकूम जाईल तेव्हां निघण्याची तयारी ठेवा.

खं. १५ ले. ४४४ } (२०४२) { श. १६०० ज्येष्ठ व. ९
सु. १०७९ हि. १०८८ } कतबा फा. मु. { इ. १६७८ जून ३

मोक. व रया मौ. सावरदरी पर. चाकण— साहेबाचे बंदगीस

साहेबांचे हुकुमाप्रमाणें सावरदरीची मामुरी करणेकरितां जमाबंदी मुशकश केली. याप्रमाणें उगवणी करूं.

शि. प्र. पृ. ८५ } (२०४३) { श. १६०१ ज्येष्ठ व. १४
सु. १०७९ रबर २७ } खुर्दखत. फा. मु. व सी. { इ. १६७८ जून ८

अजर. शर्जाखान—वजा. हुदे. व मोक. मौ. नंदस्वर सर. कोकटनूर

यादव गौडा फर्जंद जखगौडा देसाई पर. तेरदल याचा वडील भाई कृष्ण गौडा देसाई देसगत करीत असता **शिवाजी** राजे याचे सुबेदार गंगाजी महादेऊ यानें तमदडी गावास अजार दिधले. यावरी देसाई गनिमावरि पडला व फौत जाला. तेव्हां यादवगौडा यास नंदेस्वर येथें १ चावर जमीन इनाम दिली आहे. ती चालविणें.

फॅ. रे. सुरत भा. १०७ } (२०४४) { श. १६०० आषाढ शु. ५
पृ. १०९ इ. } कारवार-सुरत { इ. १६७८ जून १४

पावसाळा संपतांच **शिवाजीवर** स्वारी करण्याच्या तयारीनें २५, ३० ह. स्वार घेऊन **सर्जेखान** विजापुरास सज्ज होऊन राहिला आहे. नुकताच राजापूरच्या आमच्या दोस्तांना भेट देऊन तेथून **शिवाजी पन्हाळ्याला** गेला अशी बातमी आहे.

(से) फॅ. रे. सुरत भा. १०७ } (२०४५) { श. १६०० आषाढ शु. १०
पृ. ९८-९९ इ. } मुंबई-सुरत { इ. १६७८ जून १९

**सिद्दीला** *मुंबईत ठेवल्यामुळें* ***शिवाजी*** *बराच नाखूष झाला आहे. त्याच्या*-पासून बचाव करण्याकरितां माजगांव येथें व वेटांत येण्याच्या सर्व रस्त्यांवर आम्हांला मजबूत पहारे ठेवावे लागतात (ऑर्म ११४-७ पृ. २४).

फॅ. रे. सुरत भा. १०७ } (२०४६) { श. १६०० आषाढ शु. ११
पृ. १११ इ. } राजापूर-सुरत { इ. १६७८ जून २०

**सर्जेखानानें अथणी व रायबाग** येथून शिवाजीचे लोकांना हाकून लावून उभय ठिकाणीं आपलें सैन्य ठेविलें.

फॅ. रे. सुरत } (२०४७) { श. १६०० आषाढ व. ६
भा. १०७ पृ. ११८ इ. } कारवार-सुरत { इ. १६७८ जून २९

सर्व प्रकारच्या व्यापारांत पुढारलेल्या दख्खनची सुस्थिति उध्वस्त करणारा महा-बंडखोर **शिवाजी** एकदा आपल्या किल्ल्यांत जाऊन बसावा किंवा **विजापूर**ला सज्ज होणाऱ्या दक्षिणी सैन्याकडून पुरता मोडला जावा असें आम्हांला मनापासून वाटतें ! ( परंतु तें कसें होणार ? ) आपलें नाजूक कातडें भिजूं नये म्हणून हे घरांत बसून राहिले आहेत ! तर **आमचे महाराज** मजेंत त्यांच्या राज्यांतील वन्याच आणि उत्तम भागांत संचार करून सर्वत्र नाश, दरोडा, लूट करून, सगळीकडे मुलूख ओसाड आणि बेचिराख करून टाकीत आहेत ! !

[सि]—शिवाजीच्या जाळपोळीमुळें व लुटीमुळें खरेदीकरितां पैसा वगैरे देतां येत नाहीं. त्यानें सुलगुंद, लक्ष्मीश्वर, गदग इत्यादि महत्त्वाच्या पेठाच उध्वस्त केल्या.

सेन गोवा पृ. १९ } (२०४८) { श. १६०० आषा. कार्ती.
? } { इ. १६७८ जून-आक्टो.

पोर्तुगीज कमिशनर सांद—**शिवाजी** राजे.

आपलें पत्र पोंचून आपली प्रकृती चांगली असल्याचें वृत्त समजून आनंद झाला. दोनहि संस्थानांतील स्नेहसंबंध कायम रहावा अशी आपल्याप्रमाणें माझीहि इच्छा आहे. आमच्या ( पोर्तुगीजांच्या ) राज्यांतील कांहीं दंगेखोर आपल्या राज्यांत जाऊन चोऱ्या वगैरे करतात असें आपल्या पत्रांत लिहिण्यांत आलें. तरी हा अनिष्ट प्रकार बंद पडावा म्हणून मी किती कसोशीनें खटपट करतों हें डिचोलीच्या सुभेदारांना माहीत आहे; आणि असे दंग्याचे प्रकार मला मंजूर असून माझ्या परवानगीनें होतात असें म्हणणें योग्य नाहीं. कप्तानांच्या हलगर्जीपणामुळें असे प्रकार क्वचित् घडतात हें खरें. अशा दंगेखोरांना पकडून त्यांच्या साथीदारांचीं नांवें समजून घ्यावीं व त्यांनाहि पकडावें; असें मीं त्यांना कित्येकवेळां लिहिलें आहे. पितांबर शेणवी मरण पावल्यानंतर वकिलाच्या जागीं आपण कोणाची नेमणूक केली नसल्यामुळे अडचण पडते. तरी ही नेमणूक करावी.

डाग रजि. १६७८ } (२०४९) { श. १६०० आषाढ व. ९
पृ. ३६७ इ. १२ जुलै न्यू. } { इ. १६७८ जुलै २

मच्छलिपट्टणकडील एका पत्रांतील मजकूर—त्या भयंकर बंडखोर शिवाजीचें सैन्य औरंगाबादेपासून सुरतेजवळच एके ठिकाणीं येऊन पोंहोचलें व ज्या ज्या मुलखांतून तें सैन्य गेलें त्या त्या मुलखांतून त्यानें चौथाई वसूल केली. मोंगल बादशहा व विजापूरचा राजा यांनीं, त्याच्या विरुद्ध युद्ध करण्यास व जितका शक्य आहे तितका त्याचा नाश करण्यास, एकत्र व्हावयाचें ठरविलें होतें.

सेन गोवा पृ. १७ } (२०५०) { श. १६०० आषाढ व. ९
इ. १२ जुलै न्यू. } { इ. १६७८ जुलै २

पोर्तुगीजांचा कमिशनर-मराठ्यांचा वकील **पितांबर शेणवी.**

चौथ प्रकरणीं चौलकडून माहिती मागविली आहे असें माजी गव्हर्नरांनीं आपणास कळविलें होतें; पण सदर गव्हर्नर निघून गेल्यामुळें कप्तानाकडून वेळेवर माहिती आली नाहीं; आणि हें राज्य कोणत्याहि शेजारच्या राज्याचें मांडलीक नाहीं हें कळवितां आलें नाहीं. पण शिवाजीराजे यांच्याशीं स्नेहसंबंध राखण्याची इच्छा असल्यामुळें कप्तानाकडून आलेल्या माहितीकडे मी लक्ष देत नाहीं. पण त्या माहितीवरून असें दिसतें कीं, चौथिया राजाचे प्रजाजन दमण परगण्यांतील कांहीं गांवच्या लोकांना दंगा व चोऱ्या करून त्रास देत असत; तो त्रास चुकविण्यासाठीं या गांवकऱ्यांनीं पोर्तुगीज गव्हर्नरास न कळवितां आपल्याच जबाबदारीवर चौथिया राजाशीं कांहीं खंडणीची बोली केली होती. त्या बोलीवरून पुढें कांहीं अटी वगैरे ठरून करार झाला. आणि आतां तें राज्य शिवाजीराजे यांच्या ताब्यांत गेलें आहे असें समजल्यामुळें चौथिया राजाला जी चौथाई देण्यांत येत होती ती आतां शिवाजीराजे यांना देण्यांत येईल. तरी शिवाजीराजे यांजकडून बोलणें करण्यास माणसें यावीं.

(से) फॅ. रे. सुरत भा. १०७ } (२०५१) { श. १६०० आषाढ व. १०
पृ. ११९ इ. } कारवार-सुरत { इ. १६७८ जुलै ३

**शिवाजीच्या** भीतीनें इकडे कोणी पैचाहि माल घेण्यास तयार नाहीं.

(से) फॅ. रे. सुरत भा. १०७ } (२०५२) { श. १६०० आषाढ व. ३०
पृ. १२४ इ. } फो. सें. जॉर्ज-सुरत, { इ. १६७८ जुलै ८

मादण्णाच्या मतें कुतुबशहानें **गोवळकोंडा** सोडणें धोक्याचें असल्यामुळें मच्छलीपट्टणचा त्याचा दौरा रद्द झाला.

फॅ. रे. सुरत भा. ८९ } (२०५३) { श. १६०० श्रावण शु. ४
पृ. ११२ इ. } सुरत-राजापूर. { इ. १६७८ जुलै १२

तुमचे २३ मेचे पत्रांत लिहिल्यावरून **शिवाजी** राजापूरला आल्यावेळीं तुम्हीं त्याला अर्ज केला हें कळलें. तुमच्या मागण्यांवर त्यानें केलेलें उत्तर अगदीं असमाधानकारक आहे. अण्णाजीचा त्यानें हवाला दिला याचा अर्थ हा प्रश्न दिरंगाईवर टाकण्याचा त्याचा उद्देश दिसतो असाच आहे. तेव्हां तो खेळण्यावर परत आल्यानंतर त्याच्याकडून अधिक अनुकूल जबाब न मिळेल तर राजापुरास आपल्याला रहावयाचें नाहीं असें बेलाशक सांगा. तरी शक्य तितकी अधिक कर्जाची वसुली करून तयार रहा.

फॅ. रे. मुंबई भा. २
पृ. २५-२६

(२०५४)
मुंबई कन्सल्टेशन.

श. १६०० श्रावण शु. १०
इ. १६७८ जुलै १९

**शिवाजी** राजा **दौलतखानाबरोबर** मोठें सैन्य पाठवून माजगांवला ओढून ठेविलेलीं शिद्दीचीं गलबतें जाळून नाश करण्याचें ठरवीत आहे असें अनेकांकडून कळलें. शिवाजीच्या हालचाली कळविण्याकरितां नारायण शेणवी चौलला जाऊन राहिला होता त्यानें, आणि सिद्दी कासमनें पाठविलेल्या हेरानेंहि तसेंच सांगितल्यामुळें सर्वत्र बंदोबस्त करावा.

फॅ. रे. मुंबई भा. ८ पृ. २६-२७; ता. १६७८ जुलै २० चीं गलबतांच्या कप्तानांना सावधगिरीनें पहारा करण्याबद्दलचीं पत्रें-कॅ. अडर्टन, रिचर्ड केग्विन, एन्डानिअल ह्यूजेस, व ले. फ्रॅन्सिस थोर्प. [ऑर्म ११४-७ पृ. २६.]

फॅ. रे. सुरत भा. १०७
पृ. ११२-१३ इ.

(२०५५)
मुंबई-कपनी

श.१६०० श्रावण शु.१५
इ. १६७८ जुलै २३

**दंडाराजपुरी** घेण्याच्या मार्गांत मुंबईला ( माजगांवास ) राहिलेल्या सिद्दीच्याच आरमाराची फाय ती **शिवाजीला** अडचण वाटत असल्यामुळे, तो तें आरमार जाळण्याचा प्रयत्न करणार आहे अशा एकसारख्या धोक्याच्या बातम्या कित्येक दिवस येत होत्या. कांहीं महिन्यांपूर्वीं आपल्या आरमाराचे कर्णधार **दौलतखान** आणि **दर्यासारंग** यांना बोलावून त्यानें त्यांच्या कर्तृत्वाबद्दल त्यांची स्तुती केली, त्यांचा पुष्कळ मान व गौरव केला आणि त्यांच्यापुढें आपला उद्देश उघड करून सांगितला. इतक्या उदार धन्याची इच्छा मोडणें त्यांना चांगलें न वाटून त्यांनीं आनंदानें ही कामगिरी पत्करली. वल्हवण्याकरितां वगैरे बरेच लोक घेऊन ४००० सैन्यासह ते पलीकडे **पनवेलला** येऊन, हे आतां इकडे येण्याचा प्रयत्न करीत आहेत. त्यांच्याजवळ पाण्याच्या बाजूनें येण्यासाठीं पुरेशा होड्या नसल्यामुळें बहुधा ते साष्टीकडून प्रवेश करितील असें वाटतें. ही बातमी आम्हांला चौलहून नारायण शेणव्याकडून व सिद्दीच्या हेराकडून कळली.

इतका **चलाख शत्रू** दारांत असतांना स्तब्ध बसणें बरें नव्हे असें पाहून आम्हीं सर्व गलबतांवर तोफा चढविल्या. सर्व मार्ग रोखण्याकरितां सैन्य बसविलें. माहीमला कॅ. केग्वीनची स्थापना केली व शीवच्या बाजूला नहमी त्यानें टेहळ्ये पाठवावे असें ठरविलें. माहीम व माजगांव यांच्यामध्यें हत्यारबंद गलबतें फिरतीं राखिलीं. किल्यावरहि शिबंदीचा बंदोबस्त केला. आतां परमेश्वरकृपेनें सर्व सुरक्षित राहील अशी कल्पना आहे.

कोणत्याहि प्रकारें **शिवाजी** आमच्यावर रुष्ट झाला म्हणून हें संकट आलें नसून, सिद्दीनें या वर्षी त्याच्या मुलखांत छापे घालून, त्याच्या राज्यांतील ब्राह्मण आदिकरून अनेक लोकांना गुलाम म्हणून पकडून आणिल्यामुळें त्याचा सूड उगविण्याकरितां **शिवाजीनें** हा हल्ला करण्याचें मनांत आणिलें आहे. किनाऱ्यापेक्षां भर आखातांत रहाणें

आरमाराला अधिक सुरक्षितपणाचे असल्यामुळें आम्हीं सिद्दीला गलबतें फाडून नेण्याची शिफारस केली. परंतु मागील बाकी थकल्यामुळें खलाशी कामाला तयार होतना. तेव्हां आम्हीं त्याला २००० रु. चालू देण्याच्या फेडीकरितां दिले व त्याचें आरमार हालविण्यास मदत केली. शिवाजीला आतां पाण्यांत हल्ला करितां येणार नाहीं व बेटावरील शांततेचा भंग होणार नाहीं हा ह्यामुळें फायदा होईल.

यावरून आम्हीं पूर्वीच तर्क केल्याप्रमाणें सर्व घडून आलें असून, बादशहाला मान किंवा इतर कांहीं फळ ( चाकरी करून ) न मिळवून देणारें हें आरमार बंदरांत ठेवून घेतल्यामुळे आतां व पूर्वी किती तरी त्रास व खर्च करावा लागला आहे.

या गोष्टी निर्भयपणें सुरतेचा सुभेदार व तेथील बडे लोक यांच्या कानावर घातल्यास दरसाल हें आरमार सुरतेला बोलावण्याची व्यवस्था होईल आणि ही चोरांची टोळी-हा सिद्दी त्यांतलाच आहे!—सुरक्षित रहावी म्हणून करावी लागणारी लढाईची दगदग मिटेल. ( मात्र हें सांगण्याचें ) काम कोणा बनियाच्या हातून खास होणार नाहीं. ते आमच्या इंग्लंडच्या राजाला राजा म्हणायला तयार नाहींत ! त्याच्या बद्दल बोलतांना ते **जमीनदार** म्हणजे एक **देसाई** असा त्याचा उल्लेख करितात. (हेन्री ऑक्झिंडेननें हें अनेक वेळीं ऐकिलें आहे. )

ऑर्मे ११४-७ पृ. २९, मस्कतच्या **इमामानें पोर्तु०** विरुद्ध एकादें आरमार पाठविल्यास त्याला मुंबईंत ठावठिकाण मिळेल किंवा कसें याबद्दल त्यानें विचारलें आहे.

पृ. ३०—वरील मजकूर लिहिल्यानंतर बातमी आली कीं **दौलतखान** सैन्य घेऊन कल्याण-भिवंडीला आला. तेथून त्यानें **पोर्तु०**च्या मुलखांतून मुंबईकडे जाण्यास रस्ता मागितला. परंतु त्यांनीं **नकार दिला** एवढेंच नव्हे तर ठाण्याकडील **रस्ते** सैन्य ठेवून **बंद केले.**

| | | |
|---|---|---|
| (स्त.) फॅ. रे. सुरत<br>भा. ९० पृ २४ इ. | (२०५६)<br>माजगांव-सुरत | श. १६०० श्रावण व. १<br>इ. १६७८ जुलै २४ |

मुंबईच्या सैन्याचा कॅप्टन ॲडर्टन याचें पत्रः—पोर्तु०नीं **दौलतखानाचा** समाचार घेतला हें बरें झालें. ही बातमी खरी असेल तर दौलतखानाचा उद्देश सिद्धीस खास जाणार नाहीं.

| | | |
|---|---|---|
| ऑर्मे ११४-७<br>पृ. ३१ इ. | (२०५७)<br>मुंबई-बॉर्ड व कॅ. केग्विन | श. १६०० श्रावण व. १<br>इ. १६७८ जुलै २४ |

ठाण्याहून आज सकाळीं आलेल्या एका बनियाकडून असें समजलें कीं, **शिवाजीचें** सैन्य कल्याण व उळवें ( Culwah ) यांचे नजीक कित्येक ठिकाणीं येऊन राहिल्यामुळें **पोर्तु०ना** दहशत बाटून त्यांचा बसईचा मुख्य अधिकारी मोठें सैन्य

घेऊन ठाण्याकडे आला आहे. तरी तुम्हीं गैरसावध राहूं नये. **शिवाजी** पुढें येऊन सिद्दीचे आरमाराचा नाश करण्याचा प्रयत्न करील असें दिसतें. **पोर्तुर्गीनीं** आपल्या प्रांतांतून जाण्यास बंदी केल्यामुळेंच त्याची संपादणी करण्याकरितां वसईचा अधिकारी एवढी तयारी करून आला आहे. परंतु त्यामुळें शत्रूनें चिडून जाऊन पोर्तु०च्या २।३ वाड्या जाळल्या.

(से) फॅ. रे. सुरत भा. ९० } (२०५८) { श. १६०० श्रावण व. २
पृ. २९६. } माजगांव-सुरत { इ. १६७८ जुलै २५

हुकुमाप्रमाणें सिद्दीला २००० रुपये दिले. तथापि त्यांनून नोकरांची थकलेली बाकी न देतांना तो नाचरंगच करवितो.

ऑर्मे ११४-७ } (२०५९) { श. १६०० श्रावण व.४
पृ. ३१ इ. } मुंबई-हंटर फ्रिगेटचा कॅप्टन { इ. १६७८ जुलै २७

तुम्हांला सशस्त्र माणसांनीं भरलेल्या होड्या दिसल्या, किंवा नदींत कोठेंहि पोहून येणारे इसम दिसले तर त्यांच्याशीं लढाई करा आणि त्यांना बेटावर कोठेंहि उतरूं देऊं नका.

(से) फॅ. रे. सुरत भा. १०७ } (२०६०) { श. १६०० श्रावण व. ६
पृ. ११६ इ. } सुरत-मुंबई { इ. १६७८ जुलै २९

सिद्दीनें आपलें सगळें आरमार पाण्यांत लोटून किल्ल्याखालीं आणून ठेविलें आहे. **दौलतखान** अद्यापि आसपास सैन्य घेऊन घिरट्या घालीत असतो. परंतु आतां त्याला पुढें येण्याला कांहींच सबब न राहिल्यामुळें बहुधा तो येणार नाहीं. मात्र आम्हीं शिवाजीचा शत्रू जो सिद्दी त्याला आश्रय दिल्यामुळें **शिवाजीनें आमच्याशींच युद्ध** देण्याचें ठरविलें तर गोष्ट निराळी. लवकरच त्याला तसा निश्चय करावा लागेल असें आम्हांला वाटतें.

ता. क.—[ स्थानिक सुभेदारांशीं कंपनीच्या नोकरांनीं व्यवहार केल्यामुळें झालेला घोटाळा ]—चौलच्या सुभेदारापासून पेटीट व वल्लभ मेहता अशा दोघांनीं सुपारी व नारळ खरेदी केले. खरेदीच्या किंमतीपैकीं १२००० रु. अजून द्यावयाचे आहेत. ह्या व्यवहारांतील पेटीटच्या हातचीं दोन पत्रें सुभेदाराचे हातांत आहेत. तेव्हां कंपनी व खाजगी व्यक्ति यांत भेद न करितां त्यानें डे०गव्हर्नरकडे बाकीची मागणी केली आहे. एकदोनदां पत्रें पाठविलीं. परंतु आतां त्याला धीर न निघून तो कंपनीचीं गलबतें धरण्याचा प्रयत्न करील. परवां कल्याण-भिवंडीला गिरिधरदासाला पकडण्याकरितां त्यानें ५० लोक पाठविले. तेव्हां **चौलचा व्यापार बंद न होईल** अशी कांहीं तजवीज केली पाहिजे. कारण चौलचें महत्व आम्हांला फार आहे.

फॅ. रे. सुरत भा. ८९ } (२०६१) { श. १६०० श्रावण व. १२
पृ. ११४ इ. } सुरत-मुंबई. { इ. १६७८ आगस्ट ५

शिवाजीच्या इकडच्या धोक्याची सूचना मिळून तुम्हीं केलेला बंदोबस्त यशस्वी होईल यांत शंका नाहीं. तथापि या धाडसी राजाच्या हालचाली फारच गुप्तपणें आणि अचानक होत असल्यामुळें विशेष काळजी घेणें जरूर आहे अशी आमची शिफारस आहे.

फॅ. रे. सुरत भा. ८९ } (२०६२) { श. १६०० भाद्रपद शु. ६
पृ. ११६-७ इ. } सुरत-कारवार. { इ. १६७८ आगस्ट १३

**कारवारची** परिस्थिति दुरुस्त होण्याची आशा नाहीं. म्हणून पूर्वीच कळविल्या-प्रमाणें शक्य तितकी बाकी वसूल करणें व असलेला माल खपवून व्यवहार मोकळा करणें या मार्गाला लागा; आणि हें होत नसेल तर खजिना व मालहि कारवारकडे पाठवा. हुबळीच्या लोभी सुभेदारावर विश्वास ठेवण्याची आतां सोय नाहीं.

फॅ. रे. सुरत भा. ८९ } (२०६३) { श. १६०० भाद्रपद शु. ६
पृ. ११८ इ. } सुरत-राजापूर. { इ. १६७८ आगस्ट १३

घांटावरील रॉबिन्सनचा (व्यापारी दृष्टीचा) प्रवास यशस्वी झालेला ऐकून आम्हांला आनंदच वाटेल. परंतु त्याच सरकारच्या अमलाखालीं असलेल्या कारवारच्या आमच्या मित्रांकडून, हुबळीच्या आसपास शिवाजीच्या अमलदारांचा जुलूम होत असल्यामुळें कापडाचा एक तुकडाहि मिळण्याची आशा नाहीं. हें पाहिलें म्हणजे रॉबिन्सला यश कित-पत येईल याची शंकाच वाटते. तरी मोठ्या प्रमाणावर पैसा मालांत घालणें खात्रीनें यशस्वी न वाटल्यास आमच्यावर आणखी हुब्बा देऊं नका.

ऑर्मे ११४-७ } (२०६४) { श. १६०० भाद्रपद शु. ९
पृ. ३४ इ. } मुंबई-सुरत { इ. १६७८ आगस्ट १६

ह्या बेटावर स्वारी करण्याकरितां शिवाजीनें बाहेर काढलेलें सैन्य आतां **सुरतेवर** गेलें आहे असें ऐकितों.

डाग रजिस्टर १६७८ } (२०६५) { श. १६०० भाद्रपद शु. ११
पृ. ४५९ इ. आगस्ट २८ न्यू. } सीलोनकडील पत्र { इ. १६७८ आगस्ट १८

भटक्या दरोडेखोर **शिवाजी** ह्यानें आपला भाऊ **एकोजी** आणि **मदुरेचे** लोक ह्यांच्याशीं तह केला आहे. एकोजीकडे तंजावरचा मुलूख कायम राहिला. व शिवाजीनें ३ लाख पार्डो घेऊन आपला ह्या प्रांतावरील हक्क सोडून दिला. नंतर शिवाजी आपलें सर्व सैन्य जिकडे होतें त्या वेल्लूरकडे परत गेला. कित्येकांच्या मतें तंजावरकडील लहान

मोठे सर्व लोक, **व्यंकोजी व्यसनी व जुलमी असल्यामुळें** त्याचा द्वेष करीत होते. म्हणून तंजावरच्या गादीवरून **व्यंकोजीला** दूर करण्याचाच त्याचा विचार होता. शिवाय त्यानें प्रथम आपली दृष्टी किनाऱ्यालगतच्या बंदरांकडेच वळविली असेंहि दिसून आलें.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. सुरत मा. १०७ पृ. १३८ इ. | (२०६६) हुबळी-सुरत. | श. १६०० माद्रपद शु. १२. इ. १६७८ आगस्ट १९ |

**जमशीरखान** ३००० स्वारांनिशीं **बंकापूरच्या** रोखें येत आहे. दररोज आणखी सैन्याची भरती करीतच आहे. कारण **शिवाजीशीं युद्ध** देण्याचा त्याचा विचार आहे. हुबळीचा अधिकारी सलीमखान २०० ( ० ! ) स्वारांसह १० दिवसांत हुबळीला येईल. दक्षिणी लोकांचें विजापूरला पक्कें ठाणें बसलें आहे. तथापि कोणाला यश येईल हें सांगतां येत नाहीं. शिवाजीचे १५०० स्वार या भागांत आहेत. आणखी तितकेच अधिक तो जमवीत आहे. दिवाळी झाल्यावर युद्ध होईल.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. सुरत मा. १०७ पृ. १३५-३७ इ. | (२०६७) कारवार-सुरत | श. १६०० माद्र. व. ३ इ. १६७८ आगष्ट २४ |

येथील सुभेदाराशीं मित्रत्व जोडल्यापासून शिवाजीच्या अमलदारांनीं पैशांकरितां गिधाडांसारखीं आमचीं आंतडीं फाडण्याचे वगैरे उद्योग केले नाहींत......घांटावर मात्र ( हुबळीच्या ) सुभेदाराचा जुलूम कमी झाला नाहीं. शिवाजीनें **शहर लुटूं नये** म्हणून त्याच्या **सुभेदाराला देण्याच्या हेतूनें** पूर्वी कापड नेलें होतें तें परत करून आमचा सराफ आणि दलाल यांच्याकडून त्यानें एकंदर ७७५ होन उकळले. विजापूरकडे शिष्टाई करण्याकरितां **शामदासाला** पाठविलें होतें. त्याचीं दोन पत्रें आलीं त्यांवरून तेथील यादवीमुळें, आणि राजाच्या बालवयामुळें **कारभाराला कोणीच धनी राहिला नाहीं**. यामुळें, सर्वच विनाशाच्या मार्गाला लागल्यासारखें दिसत आहे. तेव्हां तिकडूनहि कांहीं आशा नाहीं म्हणून आम्हीं म्हणतों त्याप्रमाणे वासिलोर मधील मरहूम वहलोलखानाचीं दोन गलबतें पकडावीं व हुबळींत थोडासा माल राहिला आहे तो विकून धारवाडच्या नाईकवाडीच्या (Nuckphery) बोलावण्याप्रमाणें तेथें आश्रयार्थ जाऊन रहावें. अथवा वरदेश सर्वच सोडून त्यांनीं कारवारला येऊन रहावें. असें केल्यास विजापूरला ही बातमी कळून पाहिजे तशीं फर्मानें मिळतील व भरपाईची मापा चालू होईल असें वाटतें. शामदासाच्या दोन्ही पत्रांत राजापूरचे आमचे दोस्त मोंव्हॉथ आम्हीं हुबळीला विकतों त्यापेक्षां खुद्द विजापुरांत स्वस्ताईनें विकतात, ही **नामुष्कीची कहाणी** लिहून आली आहे ती पहावी. तरी वारकाईनें तपास करून आम्हांपैकीं कोणाला तरी बंदी करावी. ही तक्रार आज प्रथमच येत नसून मागचीं

पत्रें काढून पाहिल्यास पूर्वीच केलेली दिसून येईल. एकाच भागाकडे अशा दोन वखारी सुखानें नांदावयाच्या नाहींत.

(से) फॅ. रे. सुरत
मा. १०७ पृ. १२८ इ. } (२०६८) मुंबई-सुरत { श. १६०० भाद्रपद व.६ इ. १६७८ आगष्ट २७

सिद्दीच्या आरमारावर हल्ला करण्याकरितां **दौलतखान** आला. तें पाहून **पोर्तु० लोकांनीं** ठाण्याच्या ( Ranna ? ) खाडींत ४० सशस्त्र मचवे ठेवून बंदोबस्त केला. आम्हींहि जमीन किंवा पाणी या दोन्ही बाजूंनीं येणाऱ्या हल्ल्याच्या प्रतिकाराची तयारी केली. यामुळें नामोहरम होऊन दौलतखान स्वस्थानीं परत गेला. ह्या अपयशामुळें **राजानें** त्याला नोकरीवरून दूर केलें. आणि भिवंडीच्या सुभेदारानें या स्वारीला मर दिल्यामुळें त्याला कडक शासन केलें असें ऐकण्यांत आलें आहे. आतां आपला तोफखाना घेऊन तो स्वतः खुद्द **मुंबईवर हल्ला करणार.** त्यानें एक मान्याची टेकडी पाहून किल्यावर नेमका गोळा येईल असा तोफखाना लाविला आहे. परिणाम काय होतो इकडे आमचें लक्ष आहेच. परंतु मुंबई घेण्याकरितां त्यानें योग्य मार्गाचें अवलंबन केलें आहे हें खास.

फॅ. रे. सुरत
मा. १०७ पृ. १४४ इ. } (२०६९) अथणी-सुरत { श. १६०० भाद्र. व. १० इ. १६७८ आगष्ट ३१

इकडील नाना तऱ्हांच्या बातम्यांमधून एक निश्चित ध्वनि असा निघतो कीं, एक-दोन महिन्यांत **दक्षिणी** लोक **शिवाजीवर** स्वारी करितील. **सर्जाखान** व **सिद्दी मसाऊदचा पुत्र** असे दोघेहि त्याच बाजूला प्रस्थान काढून राहिले आहेत. दोघांपैकीं कोणीं सरसुभा व्हावें अशाबद्दल वाद निघाल्यामुळें त्यांचें काम थबकलें. एकदां यावर एकवाक्यता झाली म्हणजे यांचें १५,००० घोडदळ व कर्नाटकच्या बाजूला असलेलें **जमशीरखानाचें** १०।१२ ह. घोडदळ व त्याशिवाय दोघांच्या बरोबरचें पायदळ असें एक होऊन शिवाजीवर येईल. **मोंगलांचेंहि** बरेंच सैन्य त्यांच्या कुमकेला येणार आहे. [से]—दिवाळीला काय तो बार उडेल.

फॅ. रे. सुरत मा. ८९
पृ. १२५ इ. } (२०७०) सुरत-मुंबई { श. १६०० आश्विन शु. १ इ. १६७८ सप्टें. ७

शिवाजीच्या हल्ल्यापासून तुमचा इतका चांगला बचाव झाला याबद्दल आम्हांला आनंद वाटतो. यापुढें तुम्हांला असा त्रास पुनः होऊं नये म्हणून सिद्दीचे आरमारानें मुंबईला राहूं नये अशी खटपट करूं.

ओ. फॉ. मा. ३९ नं. ४४९७; सप्टेंबर २४ सुरत-कंपनी-या खटपटींत यश येऊन यापुढें सुभेदार आम्हांला आरमार ठेवून घेण्याबद्दल गळ घालणार नाहीं असें वाटतें.

[सि]—पृ. १२६--चौलच्या सुभेदाराच्या देण्याच्या प्रकरणीं चांगला निकाल झाला नाहीं तर शिवाजीच्या मुलखांत आपली नाचक्की होईल.

(से) फॅ. रे. सुरत मा. १०७ } (२०७१) { श. १६०० आश्वीन शु. ६
पृ. १४५ इ. } राजापूर-सुरत. { इ. १६७८ सप्टें. १२

**शिवाजीनें** आपल्या सर्व फौजा **पन्हाळ्यावर** एकत्र होण्याबद्दल हुकूम दिले असून तो तेथें त्यांना भेटण्याकरितां येणार आहे.

सा. ले. ६४ } (२०७२) { श. १६०० आश्वीन शु. १२.
सु. १०७९ साबान १० } { इ. १६७८ सप्टें. १७

त्रिंबक गोपाळ सुभे. पा पुणें-तह्सीलदार मौ. चांबिली.

तुजला शंकराजी निळकंठराऊ याचे इनामतीपैकीं तह्सील करावया पाठविले. यैसियास रा. छत्रपती स्वामीचें पत्र ये तोपावेतो रा. पंतसचीव स्वामीनी पैके तोकूब करविले आहेती. तरी तह्सील न करणें.

फॅ. रे. सुरत मा. ८९ } (२०७३) { श. १६०० आश्वीन व. ४
पृ. १३३ इ. } सुरत-कंपनी. { इ. १६७८ सप्टें. २४

शिवाजीचे कांहीं लोक मुसलमानांच्या हातीं सांपडले असतां त्यांना फार अपमानानें वागविल्यामुळें शिवाजी चिडून गेला. व त्याबद्दल सूड घेण्याकरितां सुरतेचा समूळ नाश करण्याचें त्यानें ठरविलें आहे. ह्यामुळें त्याची सुरतेला एकसारखी भीती वाटते.......

श्री. सं. चा. २७ } (२०७४) { श. १६०० कार्तीक शु. ३
श. सु. १०७९ रम १ } { इ. १६७८ आक्टो. ८

जनार्दन नारायण--रामचंद्रभट वास्तव्य श्री माभलेस्वर.

श्री शकराच्या पूजेस प्रतिवर्षी १२ होन मोईन केली आहे. देत जाऊं. आमचे तीर्थपुरोहितपण वंशपरंपरा तुम्हास दिघलें आहे.

फॅ. रे. सुरत मा. ८९ } (२०७५) { श. १६०० कार्तीक शु. १४
पृ. १४१ इ. } सुरत-मुंबई. { इ. १६७८ आक्टो. १८

विजापुराकडे कारवारच्या वतीनें शामदासानें केलेल्या शिष्टाईचा कांहींच फायदा झाला नाहीं. आतां यापुढें कोणालाच पाठवूं नका. नबाबाची २ गलबतें निघतील

त्यांची आम्हांला माहिती कळवा. आणि त्यांना पास देऊं नका. आम्हीं तीं पकडून कांहीं हातास लागतें काय पाहूं.

फॅ. रे. सुरत भा. ८९ } (२०७६) { श. १६०० कार्तीक शु. १४
पृ. १४२-३ इ. } सुरत-राजापूर. { इ. १६७८ आक्टो. १८

पहिल्या फर्मानांतील अर्थाप्रमाणेंच बक्षीस देण्यास अण्णाजी तयार आहे हें समजलें. परंतु मि. चाइल्ड प्रथम राजापुरास गेला त्यावेळीं राजाकडून मिळालेल्या दुसऱ्या फर्मानानें पहिल्या फर्मानांतील हें कलम रद्द झालें आहे. त्याअन्वयें आम्हांला सुपारी बाजारभावानें मिळावयाची असून आम्हीं पैसा मुळींच द्यावयाचा नाहीं असें ठरलें होतें. तेव्हां तशी मागणी करून तीवर तुम्हीं जोर द्यावा. तसें त्यांना कबूल नसेल तर आपल्याला वाईट रीतीनें वागविल्यामुळें राजापुराहून आपल्याला निघून येण्याबद्दल हुकूम मिळाल्याचें बेलाशक सांगा.

(खे) फॅ. रे. सुरत भा. १०७ } (२०७७) { श. १६०० कार्तिक व. ५
पृ. १५६-७ इ. } मुंबई-सुरत { इ. १६७८ ऑक्टो. २५

इतके दिवस आम्हो ज्या गोष्टीला भीत होतों तीच शेवटीं घडून आली. चौलचा सुभेदार रायरीहून परत येतांना त्याच्या अधिकारात अधिक शुम्यांची वाढ झाली. व त्यानें लांकूड, सर्पण, भात इत्यादि आवश्यक माल आणण्याकरितां निरनिराळ्या बंदरांत गेलेलीं मुंबईचीं सुमारें १५।२० गलबतें पकडल्यामुळें बरेचसे व्यापारी 'याला कांहीं उपाय न सांपडल्यास आपलें सर्वस्वी नुकसान होतें' अशी तक्रार करीत आहे. या भानगडींत १५।२० हजारांचा माल जम झाला आहे. माजी डे. गव्हर्नर व वढ्ढन मेहता यांच्याकडून येणें आहे तें वसूल करण्याकरितां हा प्रकार केला व 'यापुढें कोणताच माल मुंबई बेटाला आमच्याकडून पुरविला जाणार नाहीं' असें तो म्हणतो. याविषयीं त्याच्याकडे डे० गव्हर्नरनें पत्र पाठविलें आहे. त्याचें २।३ दिवसांत नीट उत्तर आलें तर ठीक आहे. नाहींतर आपण प्रतिकार केला पाहिजे. शिवाजीच्या लोकांचा स्वभाव 'मऊ सांपडलें कीं कोंपरानें खणावें' असा आहे. म्हणून सामोपचारानें न जमल्यास, पुढच्या उन्हाळ्यांत नागोठण्याच्या खाडींत होड्यांवरून पुष्कळसें सैन्य पाठवून आपलीं गलबतें जबरदस्तीनें आणावीं असें आम्हीं ठरविलें आहे. तीं गलबतें उथळ खाडींत आणि विशेष बंदोबस्ताशिवाय ठेविलीं असल्यामुळें ही गोष्ट सहज करतां येईल. आमच्या हत्यारांची त्यांना भीती वाटत असल्यामुळें तेथें कांहीं रक्षक असलेच तर ते आमचें सैन्य जवळ जाताच पळूनहि जातील. ही गोष्ट साध्य झाल्यानंतर पुनः ते पूर्वीप्रमाणें मित्रत्व ठेवितील यांत आम्हांला संशय नाहीं. कारण आम्हीं थोडा निदींके कानाडोळा केला तर आजपर्यंत आम्हीं आमच्या सोईकरितां त्याच्यापासून ज्या समोरच्या किनाऱ्याचें रक्षण केलें तो किनारा लगेच तो उध्वस्त करून टाकील याची

त्यांना जाणीव आहे. आणि तीमुळेंच त्या भागांतील मुसलमान आणि जातीचे मेहेतर लोक यांनी वरील प्रकारानंतर आपलीं घरेंदारें सोडून देऊन सुभेदाराकडे अशी तक्रार केली आहे कीं, 'तुमचा असाच क्रम चालू रहाणार असेल तर आमच्या देशाचा पार नाश होऊन राजाच्या जमातीचें उत्पन्न साफ बुडेल.' यामुळें सुभेदार ताळ्यावर येईल असें वाटतें. जरी तो फारच हेकेखोर असला तथापि वरील मेहेतराच्या देण्याबद्दल योग्य न्याय होण्याची खटपट केली जाईल असें आम्हीं वचन दिल्यास आमचें ऐकेल असें वाटतें. [ऑर्मे ११४-७ पृ. ४७.]

डाग रजिस्टर १६७८ } (२०७८) { श. १६०० कार्तीक व. ११
पृ. ६४२ इ. नोव्हें. १० न्यू. } { इ. १६७८ ऑक्टो. ३१

नागापट्टणहून ऑक्टोबर (११ न्यू.) पत्र आलें. त्यांत एकोजी राजाला तंजावरचा ताबा संथपणें उपभोगावयास मिळाला असें लिहिलें आहे. त्याचें स्वतःचें सामर्थ्य व त्याच्या भावाचें (प्रसिद्ध) नांव यामुळें मदुरा नायक त्याच्यावर शस्त्र धरीत नाहीं. परंतु जर या व्यवस्थेंत बदल करण्याकरितां शिवाजी परतून पुनः येईल तर विजापूरचे लोक व म्हैसूरचे नायक शिवाजीवर हल्ला करण्यास टपून बसले आहेत. गोवळकोंडेकरांचेहि विचार तसेच आहेत.

(से) फॅ. रे. सुरत } (२०७९) { श. १६०० कार्तीक व. १२
भा. ८९ पृ. १५६-७ इ. } सुरत-मुंबई { इ. १६७८ नोव्हें. १

मुंबईची सर्व आयात शिवाजीच्या मुलखांवर अवलंबून असल्यामुळें चौलचा सुभेदार किंवा शिवाजीचे लोक यांच्याशीं बिघाड करूं नये.

खं. १५ ले. १४२ } (२०८०) { श. १६०० कार्तिक व. १४
सु. १०७९ रम २७ } { इ. १६७८ नोव्हें. ३

रा. संभाजी राजे——अनाजीपंत सचीव

सदानंद गोसावी याचा नींबमधील इनाम सांप्रत मना केला आहे. चालता केला पाहिजे म्हणतो. हा मामला आम्हास दखल नाहीं. तुम्हांस कळेल ते पारिपत्य केलें पाहिजे.

(से.) फॅ. रे. सुरत } (२०८१) { श. १६०० मार्गशीर्ष शु. २
भा. १०७ पृ. १६९-७० इ. } राजापूर-सुरत. { इ. १६७८ नोव्हें. ६

दर्यासारंग व त्याचा मुलगा यांना राजाच्या हुकमानें अटक होऊन त्यांची सर्व मालमत्ता जप्त झाली. त्यांच्या नांवावर कंपनीचें कांहीं येणें आहे तें बुडालेंच म्हणावयाचें. येथील सुभेदार व अण्णाजी या उभयतांकडे त्याबद्दल लिहिलें आहे. अण्णाजीकडे बक्षिसाबद्दलहि पत्र पाठविलें होतें त्याच्याहि उत्तराची वाट पहात आहों.

दहा दिवसांपूर्वी **शिवाजीचें** जमसीरखानाशीं मोठें युद्ध झालें. त्यांत शिवाजीचे २' इ. घोडे व ४१५ इ. पायदळ मारलें जाऊन त्याचें फार नुकसान झालें. आतां इकडे बरे दिवस येतील अशी आशा आहे.

पिसुर्लें. शिवाजी. इ. नोव्हें. १७ न्यू. (२०८२) श. १६०० मार्ग. शु. ३ इ. १६७८ नोव्हें. ७

गोवा कमिशनर सॅदे—शिवाजी

पोर्तुगीज आरमारानें पकडलेलीं मराठ्यांचीं जहाजें: कानडा व पोर्तु.लोक यांचें शत्रुत्व असतां हीं गलबतें कानड्यांतील बंदराशीं व्यापार करीत होतीं. तीं पकडल्यामुळें दिसून येणारे अमित्रत्वाबद्दल आपण तक्रार केली आहे. त्यास आपल्या सुभेदारांनीं या बाबतींत जाणून बुजून आपला गैरसमज करून दिला आहे. कारण, त्यांच्या मनांतून आपला व आमचा सलोखा आहे तो बिघडावा असें वाटतें.[ री. व्हि. १ पृ. १८ ]

(से) फॅ. रे. सुरत भा. १०७ पृ, १७१-४ इ. (२०८३) मुंबई--सुरत. श. १६०० मार्ग. शु. ४ इ. १६७८ नोव्हें. ८

निश्चय केल्याप्रमाणें **नागोठाण्याहून** फक्त ४ वगळून बाकीचीं **गलबतें** कं० निकल्सनें पळवून आणिलीं. एकाहि प्राणाची हानी झाल्याशिवाय ही गोष्ट साधतां आली. सुभेदाराकडून पत्र आलें होतें त्याचें भाषांतर सोबत पाठविलें आहे. आतां त्याचा वकील येईल त्याला वल्लभदासाबद्दल खुलासेवार उत्तर दिलें पाहिजे. नाहींतर सर्पणाशिवाय आमचें फारच अडेल. आतां वैर अधिक वाढू नये म्हणून वल्लभदासाला लवकरच पाठवून द्यावें. तो येऊन पोंचतांच ( देण्याबद्दल ) उलगडा करण्याचें वचन आम्हीं दिलें आहे. त्यामुळें त्याचें समाधान होईल असें वाटतें. **दंडाराजापूर** ४ महिन्यांत **घेऊन देण्याचें** या सुभेदारानें **राजाला** वचन दिलें असल्यामुळें, सिद्दीला मुंबई बंदरांत आम्हीं राहूं देतों यासंबंधविरुद्ध त्याचा बराच कटाक्ष आहे. हें त्याच्या पत्रावरून दिसून येईल. त्याला राहूं देणें, किनाऱ्यावर ओढून घेणें, सामानभरती करून वाटेल तेव्हां जाऊं देणें हें सर्व **आंतरराष्ट्रीय कायद्याच्या विरुद्ध** आहे असें आम्हांला देखील वाटतें. आणि लवकरच ह्या गोष्टी बंद झाल्या नाहींत तर ( शिवाजीशीं ) वैर उत्पन्न होणें अपरिहार्य आहे. तसें झालें आणि कोणा एकाद्या पाश्चात्य राष्ट्रानें शिवाजीशीं संगनमत केलें तर मुंबईचा नाश होण्यास वेळ लागणार नाहीं.

इतकें पत्र लिहून झाल्यावर आम्हीं गलबतें जबरदस्तीनें पळवून आणूं नयेत वगैरे मजकुराचें तुमचें पत्र [लि.२०७९] पोंचलें. आम्हीं गलबतें न आणिलीं तरीहि तो सुभेदार तसेंच वागणार. कारण त्याला कोणत्याहि प्रकारानें वागण्याचे शिवाजीचे हुकूम

नधन तो आपल्याच अधिकारांत तसा वागत आहे. राजापुरापर्यंत त्याची हुकमत चालत असून इकडे गलबतें पकडलीं त्याच वेळीं राजापुरास असलेला इंग्रजांचा सर्व माल पकडण्याचा त्यानें हुकूम दिला होता. परंतु त्याला न जुमानतां आम्हीं आमच्या राष्ट्राच्या गौरवाकरितां हें धाडस केलें. वहूम मेहताकडून आपण हिशेबाचा निकाल करूं शकलों तर सर्व कांहीं सुरळीत होईल. आमचीं गलबतें आम्हीं सोडवून आणिलीं याबद्दल त्यांनाच कौतुक वाटतें. कल्याण-भिवंडीच्या सुभेदारानें आमचें अभिनंदन करून आपला मुलूख आम्हांला मोकळा ठेवण्याचें वचन दिलें आहे. आम्हांला त्यांच्याकडून सर्पण व भात यांची फारच जरूर असते. पण उलट त्यांना आमच्या पैशाचीहि जरूरी आहेच. चौलच्या सुभेदाराच्या देण्याचा कांहीं निकाल होऊं शकल्यास एक महिन्याचे आंत सर्व संबंध सुरळीत होतील असें वाटतें. [ ऑर्मे ११४-७ पृ. ५१ वर हेंच पत्र १९ नोव्हें.चें म्हणून अवतरिलें आहे.]

पृ. १७५--१७६ चौल ते राजापुरपर्यंतच्या मुलखाचा सरसुभेदार बहिरोपंत याचें डेप्युटी ग०च्या पत्रास मराठींत उत्तर आलें. त्याचें भाषांतर: —

तुमच्या बेटावरील मुसलमान व्यापाऱ्यांच्या गलबतांबद्दल तुम्हीं विचारलें. त्यास नेहमीं येथून सर्पण नेण्याकरितां तुमचीं गलबतें येतात तशीं नागोठण्यालाहि हीं गलबतें आल्यावेळीं तेथील अधिकाऱ्यांनीं तीं पकडलीं व त्याबद्दल मला कळविलें. त्याबद्दल मला असें कळवावयाचें आहे कीं, इंग्रज व शिवाजी यांचा सलोखा चालतो या सबबीखालीं आमच्याकडून जाणारें सर्पण, धान्य इत्यादि सर्व मालाचा फायदा **आमचा शत्रु सिद्दी** यास राजरोसपणें मिळावा हें चमत्कारिक वाटतें. सदर सिद्दी आमच्या देशांत लुटालूट करून लोकांना पकडून नेऊन आम्हांला फार त्रास देतो. त्याच्याशीं युद्ध करण्याकरितां **शिवाजी**-राजानें मला या भागाचा सुभेदार नेमिलें आहे. दौलतखानाच्या आरमाराशीं सहकार्य करण्याकरितां५०००लोक तुमच्या बेटावर पाठविण्याचा माझा विचार होता;आणि सिद्दीला ज्याप्रमाणें तुम्हीं आश्रय देतां त्याप्रमाणेंच दौलतखानालाहि तुमच्या किल्ल्याखालीं आश्रय मिळावयास कांहीं हरकत नव्हती. **पोर्तु**०नीं देखील **इंग्रजांसारखी** सिद्दीला सामुग्री पुरवून किंवा त्याचें रक्षण करून **मदत केली नाहीं** हें मला तुमच्या नजरेस आणणें भाग आहे. सिद्दीला तुमच्या तेथें आश्रय मिळाल्यानें आमच्या मुलखाला त्रास देणें त्याला सुलभ जातें. तरी तुम्हीं त्याला यापुढें आश्रय देतां कामा नये. या मुद्यावर तुमचें उत्तर येईल तें **राजे यांजकडे** व अण्णाजीपंताकडे पाठवून देईन. त्याप्रमाणें ते सिद्दीला तुमच्या बेटांतून काढून लावण्याबद्दल काय तो विचार करतील.

वहूम मेहताला आम्हीं ओळखीत नसून मि. पेटीट आमच्या देण्याला जबाबदार आहे. कारण आमचा असा शिरस्ता आहे कीं, एखादा सुभेदारानें किंवा हवालदारानें खरेदीविक्रीबद्दल एखादा करार केल्यास त्याच्यामागून येणारा अधिकारी त्याला जबाबदार असतो. तुम्हीं

पेटीट्चे मागून नेमले गेल्यामुळें तुम्हीं भरपाई कराल यांत मला संशय नाहीं. प्रताप-जीला पैशांबद्दल बोलणें करण्याकरितां पाठविलें तेव्हां सदर गृहस्थ ऑमेझला असल्यामुळें तिकडे पत्र लिहिलें आहे असें तुम्हीं सांगितलें. ऑमेझ व सुरत हें कांहीं मला समजत नाहीं; व मला त्यांच्याशीं कांहीं करावयाचें नाहीं; मला एक मुंबई माहित आहे. आणि तुम्हीं पेटीट्चे मागून अधिकारावर आल्यामुळें माझा पैसा मुंबईत आहे. आणि तो तुम्हीं दिला पाहिजे. लवकर पाठवावा. कारण **शिवाजी**राजांकडे तो त्वरेनें पाठविणें आहे. [१ नोव्हेंबर १६७८].

फॅ. रे. सुरत भा. १०७ }
पृ. १७९ इ. } (२०८४) कारवार–सुरत. { श. १६०० मार्ग. शु. ९ { इ. १६७८ नोवें. १२

८००० स्वार व २० तोफा घेऊन जमशीरखान **वंकापूरच्या** किल्ल्याजवळ आहे. परंतु **पन्हाळ्यावर शिवाजी** १५००० स्वार व २०००० पायदळ घेऊन तयार आहे; त्याच्याशीं युद्ध देण्याची त्याला छाती होत नाहीं. विजापुराहून ३० ह. स्वार घेऊन सर्जाखान येण्याची तो वाट पहात आहे. या उन्हाळ्यांत इकडील सर्व युद्धांचा शेवट होईल अशी आशा आहे.

ऑर्म ११४–७ }
पृ. ५४ इ. } (२०८५) मुंबई–सुरत { श. १६०० मार्ग. शु. १४ { इ. १६७८ नोवें. १७

चौलच्या सुभेदाराकडून कृतकर्माबद्दल पश्चात्ताप प्रदर्शित करणारें पत्र आलें. त्यांतच या बेटावरील लोकांना पूर्वीप्रमाणेंच त्याच्या अमलाखालील प्रदेशांत येण्याजाण्याची त्यानें मोकळीक दिली आहे असा मजकूर आहे.

ऑर्म ११४–७ }
पृ. ६० इ. } (२०८६) मुंबई—सुरत. { श. १६०० पौष शु. १ { इ. १६७८ डिसें. ४

आम्ही त्यांचे शत्रु अरब लोक यांस धान्यसामग्री पुरवितों अशा सबबीवर पोर्तु॰ लोक आपल्या मुलखांतून कोणताच माल इकडे येऊं देत नाहींत.

चौलच्या सुभेदारानें आमच्या व्यापाऱ्यांनीं त्याच्या बंदरांत पूर्ववत् व्यापार करावा अशी विनंती केली आहे. आणि त्यांचे परवाने [Seguroes] स्वतःच्या सहीशिक्यानिशीं पाठवून दिले आहेत. यावरून वल्लभ मेहतानें आपलें काम नीट केलें तर आमच्यांतील मतभेद लगेच नाहींसा होईल असें वाटतें.

ऑर्म ११४-७ }
पृ. ६४ इ. } (२०८७) मुंबई–सुरत { श. १६०० पौष व. १ { इ. १६७८ डिसें. १८

सिद्दी कासमला सुरतेहून आलेला हुकूम असा आहे कीं, दुसरे गलबतावरून पैसा येण्याची वाट पाहून तो आल्यावर सर्व कर्ज फेडून मग तुम्हीं जावें.

शिवाजीच्या सैन्यानें जमीन व पाणी या दोन्ही बाजूंनीं दंडाराजपुरला वेढा घातला असून सिद्दीजवळ पैसा नसल्यामुळें तेथील लोकांना कुमक करण्याकरितां त्याला येथून हालताच येत नाहीं.

पृ. ६५तारीख ?—समोरचा किनारा शिवाजीच्या ताब्यांत असल्यामुळें येथून जाण्यायेण्याचे मार्ग सुरक्षित नाहींत. करितां हिरेवाले व्यापारी येथें रहावयास तयार होत नाहींत.

प्रदीप सेन १९ } (२०८८) { श. १६०० पौष व. १४
इ. १६७९ जाने. ११ न्यू. } गोवा—शिवाजी. { इ. १६७९ जाने. १

शिवाजीचे प्रधान व अधिकारी पोर्तुगीजांचे शत्रूंना गुप्तपणें साहाय्य करितात असा संशय व्यक्त केला आहे. [ री. व्हि. १ पृ. २४]

ओ. कॉ. मा. ३९ } (२०८९) { श. १६०० माघ व. ५
नं. ४५६३ इ. } सुरत—कंपनी. { इ. १६७९ जाने. २१

**शिवाजीच्या भीतीमुळें** माल स्वालीलाच ठेवून मागणी येईल त्याप्रमाणें सुरतेला आणवून दिला जातो......शिवाजीच्या अंमलदारांची राजापूरच्या बाबतींतील आमच्याशीं वागणूक समाधानकारक नाहीं.......शिवाजीच्या मुलखांतील राजापूरची वखार बंद करून टाकीत आहोंत. व पुढें **शिवाजीच्या** ताब्यांतील मुलूख तरुण आदिलशहाच्या ताब्यांत गेल्यास व्यापार पुनः भरभराटीस येईल अशा आशेवर वखार चालू ठेवीत आहों. पुढें मागें परिस्थिति निवळल्यावर कारवारची दुय्यम वखार म्हणून **राजापूरचीहि** वखार चालू करतां येईल.

फॅ. रे. सुरत मा. ४ } (२०९०) { श. १६०० माघ व. ७
पृ. ७-८ इ. } स्वाली कन्सल्टेशन. { इ. १६७९ जाने. २४

'शिवाजीकडून किल्ले जिंकून घेण्याच्या कामीं इंग्रजांची मदत मागण्याकरितां आदिलशहाकडून फर्मान आल्यास आपण कसें वागावें ?' अशी कारवारहून विचारणा आली. 'त्यांनीं कोणाचाहि पक्ष न घेतां उभयतांशीं आणि विशेषतः विद्यमान सत्ताधाऱ्यांशीं सामोपचारानें वागावें' असें त्यांना लिहिण्याचें ठरलें.

[सि]—येत्या मार्चमध्यें हुकूम होईल त्या गलबतानें येण्याबद्दल राजापूरच्या लोकांना कळवावें.

खं. १७ ले. १७ } (२०९१) { श. १६०० फाल्गुन शु. ११
रा. ५ } { इ. १६७९ फेब्रु. ११

राजा **शिव छत्रपति** —कोनेर रुद्र देशा० प्रां मावळ.

विठोजी सिलमकर यास गुंजण मावळांत इसाफत व इवर्षंकीं जे चालिले आहे ते व शिवपट्टणाखाले गोमाजी नाइकास जे आहे ते पूर्वीप्रो चालविणें. लेखनालंकार.

ओ. कॉ. मा. ३९ } (२०९२) { श. १६०० फाल्गुन व. २
नं. ४५७७ इ. } सुरत--कंपनी. { इ. १६७९ फेब्रु. १७

बादशहाचा ज्येष्ठ पुत्र मोठें सैन्य घेऊन बऱ्हाणपूरच्या व औरंगाबादच्या बाजूनें **शिवाजीला** आळा घालण्याकरितां आला आहे. यामुळें शिवाजीच्या हुलीपासून आमची कांहीं काल मुक्तता झाली आहे. दख्खनमध्येंहि आदिलशाही सेनापतींनीं त्याच्या-वर मोठा विजय मिळविला आहे. पण सर्वांत त्याची मनःशांति अधिक ढळविणारी जी गोष्ट घडली, ती त्याचा ज्येष्ठ पुत्र [ संभाजी ] त्याच्यावर नाखूष होऊन बादशाही सरदार **दिलेरखान याच्याकडे पळून गेला** असून, तो मुसलमान होऊं इच्छितो, ही होय.

[ दि ]—जसवतसिंग मेला. त्याची संपत्ति लुबाडण्याकरितां बादशहानें मोठें सैन्य जमारल्यामुळें व्यापाराचे मार्ग बंद झाले आहेत.

खं. १८ ले, २२ } (२०९३) { श, १६००
सु. १०७९ } { इ. १६७८-७९

अजर० रा. **शिवाजीराजे**— देसमु० व मोक० व कुळ० व रया का मावळ.

मोरो विठल हेनप देसकु. का मावळ यानीं सांगितलें, का मावळ आपली मिरास चालत आली आहे. माहाराजसाहेबासी निजामशाहा यानीं प्रा मा मोकासा दिधला ते वख्ती आपलेया वडिली पुण्याहून गुपचुप गुमास्ते पाठविले. रयतीस बदसलुख केला म्हणून त्यास दूर करून नामाजी लोंडा पाठविला. पुढें निजामशाही गुदरोन गेली. एदिल-शाई मुरारी जगदेव एऊन पुणा जाळून भुलेस्वर येथें शहर वसविलें. एदिलशाहींतून माहाराज साहेबास मावळ व मंबाजीराजे यांस सांडस असे मोकासे दिधले. त्यास नामा-जीनें बेइमानी केली. आपण साहेबासी हकीकत जाहीर केली तो निळो सोनदेऊ मजमू-दार त्यांनीं आपाजी बिन नामाजीची पाठी राखिली. रुजू होऊं देत नाहींत. तरी साहेबीं ताकीद दिली पाहिजे. तरी मोरो विठलास त्याचा हकलाजिमा देत जाणें.

खं. १५ ले. ३४० } (२०९४) { श. १६००
सु. १०७९ } कौलनामा म. मु. व सी. { इ. १६७८–७९

रा० अनाजी दत्तो.

ता देसमु० देशकु० व मोक० पाटेल व रया० ता रोहिडखोरे

तुह्मी कौल मागितला व हकीकत सांगितली. तरी गावाचे गाव फिरून जमीनीची प्रत ठरवून पिकाचा अंदाज करावा. व त्याप्रमाणें धारा बांधून घावा. एकंदर देश लावणीस येईल असें करावें.

आठल्ये संग्रह } (२०९५) { श. १६००
? } शिवाजी राजे-एकोजी राजे { इ. १६७८-९

श्रियासह चिरंजीव अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री माहाराज **एकोजी राजे** प्रती राजश्री **शिवाजी राजे** आशीर्वाद एथील क्षेम जाणोन तुम्हीं स्वकीय कुशल लेखन केले पाहिजे विशेष. तुम्ही पत्र पाठविले तें उत्तम समयीं पावले. मजमूचा व्यापार दीक्षिताचा त्याचा यावा. राजश्री गंगाधरपंतास सेवेसी देतील. त्याचे हाते कार्यभाग घ्यावा म्हणून पूर्वी लिहिले होते. त्याचे उत्तर लिहिले कीं, बहुत बरें राजश्री गंगाधरपंतास अवश्य एथें पाठवून दिधले पाहिजे म्हणून. तरी हे तुमचे पत्र बहुता दिवसा आले. राजश्री रघुनाथ पंडित कर्नाटकांत ठेविले आहेती. त्याचे कार्यावरी फडी आम्हापाशीं मनुष्य पाहिजे. राजश्री जनार्दनपंतासहि स्वतंत्र दर्बारीचे कार्य सांगितलें आहे. त्याकरितां राजश्री गंगाधरपंतहि आम्हाच पाशीं पाहिजेत ऐसे जाले. त्यास आम्हीं आपणापाशीं ठेविले आहे. याउपरी राजश्री जनार्दनपंताचे दुसरे पुत्र राजश्री श्रीनिवासपंत आहेती तेहि शाहाणे आहेती. त्याला तुमचे सेवेसी थावे. धाकटे आहेती तोवरी कार्यभागास एक मुतालीक शाहाणा ठेवून कार्यभाग चालवावा ऐसा निश्चयें आम्ही यासी केला आहे. तरी मजमूचे कार्य श्रीनिवासपंताचे नांवें करून आम्हास प्रश्नोत्तर व त्यासहि एक पत्र ऐसें पाठवून देणें. म्हणजे त्याला मुतालीक सहवर्तमान तुम्हापाशीं पाठवून देऊन. सेवा करितील. कार्यभाग तुमचा नीटनेटका करून संतोष उपजवितील. कैलासवासी स्वामी व दीक्षिताचा ऋणानुबंध विशेष. तैसेच तुह्मींहि त्याचे संततीचे चालवितां ऐसे कीर्तीस्कर व श्रेयस्कर आणि आमचाहि संतोष आहे. बहुत लिहिणें तरी तुम्ही सर्वज्ञ असा 'मर्यादेयं राजते.' [ हें पत्र सुवर्णरेखांकित आहे. ]

फॅ. रे. मुंबई मा. ८ } (२०९६) { श. १६०१ चैत्र शु. ७
पृ. १३ इ. } मुंबई-सुरत { इ. १६७९ मार्च ८

नारायण शेणव्याचा हिशेब सोबत पाठविला आहे. **शिवाजीनें** दिलें काय आणि त्याच्याकडून काय येणें राहिलें आहे हें त्यावरून समजेल. त्याच्याकडून अधिक मिळेल तेवढें वसूल करण्याचा हुकूम आम्हीं त्याला देऊंच.

सेन गोवा पृ. २१ } (२०९७) { श. १६०१ चैत्र शु. ९
इ. मार्च २० न्यू. } { इ. १६७९ मार्च १०

पोर्तुगीज कमिशनर--**शिवाजी राजे**

[या पत्रांत प्रारंभीं मराठ्यांच्या आरमारानें पोर्तुगीजांचीं कांहीं जहाजें धरल्याचा मजकूर आहे.] गणू चटी (गणेश शेटी ?) याच्या हस्तें आपण पाठविलेलें पत्र पोंचलें.

दमण प्रांतांतील कांहीं गावकरी चौथिया राजास जो चौथ देत असत तो आपणास देण्यांत यावा, असें आपण पत्रांत मागणी केली आहे. आपला वकील पीतांबर शेणवी यानें मार्जी व्हाइसरायाबरोबर या बाबतींत बोलणें केलें होतें व तो गेल्यानंतर माझ्या अमदानींत या प्रकरणाचा निकाल लावण्यासाठीं आपल्या तर्फेचा मनुष्य यावा असें सुचविलें होतें. कारण, ही रकम दमण प्रांतांतील कांहीं गांवकऱ्यांनीं विशिष्ट अटीवर देण्याचें कबूल केलें होतें व या अटी दोनहि पक्षांकडून पाळल्या जावयाच्या आहेत; मात्र या बाबतींत या गांवकऱ्यांना बोलणे करण्यास परवानगी देण्यापलीकडे पोर्तुगीज सरकारास अधिक भाग घेतां येत नाहीं. ही सर्व हकीकत मीं मागल्या पत्रांत कळविलीच होती व आतां पुनः त्याची नक्कल पाठविली आहे त्यावरूनहि कळून येईल. अशी वस्तुस्थिती असतां दोन्ही राज्यांत सलोखा असून आमचें निशाण घेऊन जाणारीं जहाजें त्यांवरील मालासह संखेश्वर नदीवर गेलीं असतां आपल्या लोकांनीं पकडलीं ही त्यांनीं चूक केली आहे. मीं या बाबतींत आपणास पत्र लिहिलें पण आपणास चुकीची माहिती मिळून आपण (मलतें) उत्तर पाठविलें. आमचीं जहाजें तुमच्या बंदरांत शिरलीं हें म्हणणें खोटें आहे; कारण, समुद्रांत अरबांचीं जहाजें वावरत होतीं त्या ठिकाणीं तुमची सत्ता नव्हती किंवा पोर्तुगीज व अरब या लोकांवरहि तुमची सत्ता नाहीं.

श्री. सं. चा. २८ }
रा. ५ सु. १०७९ सफर १५ } (२०९८) { श. १६०१ चैत्र व. १ { इ. १६७९ मार्च १८

**मोरेश्वर** पंडितराय—मानजीपंत देशा॰री व लें॰ प्रां॰ करहाड

चाफळ येथील रघुनाथ गणेश अग्निहोत्री यांस परम योग्य व अग्निहोत्री म्हणून १ खंडी जोंधळे व ४ गाईपर्यंतचा कर माफ दिला आहे. आदा करीत जाणें.

फॅ. रे. मुंबई }
भा. ८ पृ. १५ इ. } (२०९९) मुंबई–सुरत { श. १६०१ चैत्र व. ९ { इ. १६७९ मार्च १०

शहाजादा दक्षिणेंत येऊन २ महिने झाले. आणि शिवाजीचा मुलगा **संभाजी** त्याच्याकडे पळून गेला. परंतु **शिवाजी** पन्हाळ्यामध्यें ठाणें धरून बसला असून मोंगल व आदिलशहा या दोघांनाहि तो मोजीत नाहीं किंवा यांपैकीं कोणीहि त्याच्यावर चालून जात नाहीं.

सं. २० ले. १५८ रा. श. ५ }
सु. १०७९ सफर २५ } (२१००) { श. १६०१ चैत्र व. ११ { इ. १६७९ मार्च २८

मोरेश्वर पंडितराय—येसाजी मल्हार देशाधिकारी व लेखक पर॰ वाई

नरसोमटाचे (चिन्नाव) नातलग यांस जमीनीऐवजीं ३ खंडी गला व दर एकास ४ व्यालेल्या गाईपर्यंतचा करभार माफ असे.

फॅ. रे. मुंबई
मा. ८ पृ. १८ इ.

(२१०१)
मुंबई--सुरत

श. १६०१ वैशाख शु. ४
इ. १६७९ एप्रील ४

**शिवाजीचें** सैन्य जवळ आल्यामुळें **दमणच्या** पोर्तु०लोकांना भय वाटलें. कारण त्या सैन्यानें बासल (Brasall बलसाड ?) इत्यादि अनेक जागीं जाळपोळ केली... **विजापूरचे** जवळील **शहापूर शिवाजीनें** स्वतः जाऊन लुटलें. विजापूर शहर मोंगलांच्या हातीं गेल्यास आपला टिकाव लागणार नाहीं हें जाणून तें जिंकण्याचा त्याचा मोठा इरादा असल्यामुळें, तो त्या शहरांत प्रवेशच करणार होता.

ऑ. कॉ. मा. ४०
नं. ४५९५ इ.

(२१०२)
सुरत--कंपनी

श. १६०१ वैशाख शु.५
इ. १६७९ एप्रिल ५

नुकतीच **शिवाजीची** फार भीती वाटली. परंतु त्याचें फक्त छोटेंच सैन्य आल्याचें मागाहून कळून आलें. जवळचीं एक दोनच खेडीं जाळून व लुटून तें परत फिरलें.

डाग रजिस्टर १६७९
पृ. १३४ इ. एप्रील १५ न्यू.

(२१०३)

श. १६०१ वैशाख शु. ५
इ. १६७९ एप्रील ५

कोचीनच्या पत्रांत अशी हकीकत आली आहे कीं, गोवा शहराकडील प्रांतांतून **शिवाजीला** विजापूरकरांनीं जबरदस्तीनें काढून लाविल्यावर त्यानें 'आपण स्वतः व आपले अनुयायी यांना खिस्तीधर्म स्वीकारण्याकरितां गोव्यामध्यें येऊं द्यावें' अशी तेथील पोर्तु० व्हाइसरॉयला विनंती केली. परंतु ती त्यानें अमान्य केल्यामुळें 'तुम्ही खुशीनें आम्हांला धर्माची दीक्षा देत नसाल तर आम्हीं जबरदस्तीनें गोव्यांत प्रवेश करूं' अशी शिवाजीनें त्याला धमकी दिली. परंतु तिचाहि कांहीं उपयोग झाला नाहीं.

फॅ. रे. मुंबई भा १९
पृ. २०-२१ इ.

(२१०४)
राजापूर-मुंबई

श. १६०१ वैशाख व. ३
इ. १६७९ एप्रील १९

१४ एप्रीलला कॅपटन आणि मीं स्वतः सुभेदाराला भेटून मराठ्यांच्या अन्यायाच्या वर्तनामुळें आम्हीं राजापूर सोडून जात आहों असें सांगितलें. 'राजानें तुमच्या सर्व मागण्या कबूल केल्या आहेत. व पावसाळा संपण्याच्या पूर्वीच आपण त्या सर्व पुऱ्या करूं' असें तो सांगूं लागला. परंतु त्यामुळें कमून न जातां आमचा निश्चय झाल्याचें आम्हीं सांगतांच त्यानें राजापूर सोडून जाण्यास **आम्हांस बंदी** केली. आम्हीं सामान वगैरे हालविण्याचें चालूच ठेविलें. इतक्यांत हवालदार व शहरांतील सर्व व्यापारी बंदरावर येऊन त्यांनीं आम्हांला किनारा सोडून जाण्याच्या कामीं कोणींहि मदत करूं नये अशी शिवाजीच्या नांवें द्वाही (Dury) दिली.

राम. सं ७४ ले. २ } (२१०५) { श. १६०१ वैशाख व. ७
रा. श. ५ } नकल, आज्ञापत्र { इ. १६७९ एप्रील २२

छत्रपती —**शिवाजी** त्रिंबक गोपाल देशी व देशक प्रा पुणें.

रा. वासुदेव गोसावी बा मठ मौजे कन्हेरी ता निरथडी हे पनाळियास येऊन स्वामीचा भाग्योदय सांगितला. तरी मांदगंदवी मठ येथे बिघे ४, कन्हेरीस बिघे ७ असे पाटस्थळ बिघे ११ दिले. ते गोसावी सुखरूप असेत तोंवरी चालविणें.

गो. इ. सा. ले. २३ } (२१०६) { श. १६०१ अ. ज्येष्ठ शु. ५
सु. १०७९ रुखर ३ } { इ. १६७९ मे ४

मोरेश्वर पंडितराऊ— धर्माजी नागनाथ देशाधि. व ले. प्रांत फोंडा.

मौ० कुकडिये तपे अंत्रुज येथें सातपा व रामजोसी यास वृत्ती होती ते अमानत जाली. त्याबद्दल त्यास तांदूळ ५ मण व ४ व्यालेल्या गाईंचा करमार माफ केला असे.

गो. इ. सा. ले. ५ रा. ५ } (२१०७) { श. १६०१ अ. ज्येष्ठ शु. ५
सु. १०७९ रखर ३ } { इ. १६७९ मे ४

मोरेश्वर पडितराऊ—धर्माजी नागनाथ देशाधि. व लेखक प्रांत फोंडा

अनंतभट बिन फट जोसी याची सरजोतिषी राजगृही जमा जाली त्याबद्दल त्यास तांदुळ १ खंडी ५ मण व व्यालेल्या गाई १-८ चा करमार माफ या गोष्टी दिल्या आहेत.

डाग रजिस्टर १६७९ } (२१०८) { श. १६०१ अ.-ज्येष्ठ शु. ११
पृ. २०५ इ. मे २१ न्यू. } { इ. १६७९ मे ११

मच्छलीपट्टणचें पत्रः—औरंगजेबाचा पुत्र शहाजादा **सुलतान मुअज्झम** ससैन्य **औरंगाबादच्या** नजीक आला. गोवळकोंड्याच्या राजानें, त्याचें अभिनंदन करण्याकरितां व विजापूरचा [?] सेनापती दिलीलखान त्याच्यावर चालून येत होता त्याच्यापासून स्वतःचें सरक्षण करण्याची विनंति करण्याकरितां, एक वकील मोठा नजराणा घेऊन त्याच्याकडे पाठविला. दिलीरखान जबरीनें मोठी खंडणी वसूल करणार होता, त्यांपैकीं ७ लाख गिल्डर अजून वसूल व्हावयाचे होते. आणि जरी तो ( बाहेर ) धिटाईनें वागत असे तरी त्याच्या गैरहजेरींत विजापुरांत सर्वच बाबतींत उलटापालट झाली आहे. **सिद्दी मसाऊद** व **सैद मखटो(दू)म** हे दरबारांतील प्रमुख मुत्सद्दी असून, त्यांपैकीं प्रत्येक जण विजापूरचें सर्व राज्य दुसऱ्याच्या हातीं देण्यास तयार होता. सिद्दीच्या मनांत सर्व राज्य मोंगलांच्या हवालीं करण्याचें होतें; परंतु मखदूम ते दरोडेखोर **शिवाजीला** देऊं पहात होता. खुद्द विजापूरच्या विस्तीर्ण राज्यांत जिकडे तिकडे खून, दरोडे, लूट व खंडण्या यांच्याशिवाय कांहींहि ऐकूं येत नव्हतें.

फॅ. रे. मुंबई
भा. ८ पृ. २० इ.

(२१०९)
मुंबई–सुरत

श. १६०१ अ. ज्येष्ठ व. १
इ. १६७९ मे १६

राजापूरच्या वखारवाल्यांना न घेतांच रिव्हेंज गलबत परत आलें. कारण, **शिवाजी**च्या अधिकाऱ्यांचे मनांत आपल्या कह्यांतच आम्हांला ठेवून घ्यावयाचें असल्यामुळें [ आमचे वखारवाल्यांना त्यांनीं सोडिलें नाहीं ].

फॅ. रे. मुंबई
भा. ८ पृ. २१ इ.

(२११०)
मुंबई–सुरत

श. १६०१ अ ज्येष्ठ व. ६
इ. १६७९ मे २१

**संभाजी राजा** आणि दख्खनचें सैन्य यांनीं मिळून **पन्हाळा** किल्याला वेढा घातला असून पावसाळ्यांत ते त्याच किल्लयाखालीं छावणी करणार आहेत; दीर्घकालपर्यंत वेढा चालू ठेवून किल्ला हस्तगत करण्याचा त्यांचा विचार आहे.

फॅ. रे. सुरत
भा. ४ पृ. ४०–४१ इ.

(२१११)
सुरत कन्सल्टेशन

श. १६०१ अ. ज्येष्ठ व. ८
इ. १६७९ मे २३

१९ एप्रीलच्या टॉमस मिचेल व रॉबर्ट रीड यांच्या पत्रावरून राजापूरचा सुभेदार त्यांना तेथून निघूं देत नाहीं वगैरे कळलें. यामध्यें स्वतः या दोन वखारवाल्यांचाहि हात असावा असें वाटतें. परंतु आतां पुढील पावसाळ्यापर्यंत त्यांना तेथें राहूं देणें भागच आहे. त्यानंतर आपलीं युरोपांतील गलबतें आल्यावर जरूर तर अधिक कडक व परिणामकारक उपाय अमलांत आणिल्याशिवाय राहूं नये.

स. पृ. ८४(५८)
जु. २२ रुखर २४

(२११२)
फर्मान, औरंगजेब बादशहाचें

श. १६०१ अ. ज्येष्ठ व. ११
इ. १६७९ मे २५

मुसमात राजीजी व हालीमजी यांची एरंडोल येथील त्यांच्या आज्यानें खरेदी केलेली ९ औत जमीन त्यांजकडे चालवावी. पैकीं शंमर बिघे बादशहानीं मीर अहमदखान यास दिली आहे. ती यांजकडे चालविणें.

खं. २० ले. २४७
मु. १०८० जवल ३

(२११३)

श. १६०१।१६०२ ज्येष्ठ शु.४।५
इ. १६७९ जून २।१६८० मे २२

अनाजी दत्तो

त्र्यंबक गोपाळ सुभे० व कार० सुभा पुणें मौ० मोरगांव येथें, माहादाजी गोसावी यांचा इनाम आहे. तो त्यांच्या मुलगा सिवाजी याजकडे पूर्वीप्रमाणें चालूं ठेवणें.

डाग रजिस्टर १६७९
पृ. २६० इ. जून १६ न्यू.

(२११४)

श. १६०१ ज्येष्ठ शु. ८
इ. १६७९ जून ६

...शिवाय गेले पुष्कळ दिवस दरोडेखोर शिवाजीराजाच्या सैन्यामुळें **सुरतेच्या** आसपास सर्वत्र सुरक्षितपणा नाहींसा झाला होता. परंतु इ. १६७४ मध्यें शिवाजीनें जिंकून

घेतलेल्या **रामनगर** किल्ल्याची मजबुती करून व तेथें रसद इत्यादि पोंचवून तें (शिवाजीचें सैन्य) आतां निघून गेलें आहे.

सा. ले. १६७ | सु. १०८० जवल २७ — (२११५) — श. १६०१ ज्येष्ठ व. १४ | इ. १६७९ जून २६

अज. दि. ठाणे तर्फ कन्हेपठार पर. पुणें.

ता मोक. मौ. मोरगाव तर्फ मज.

मौ. मज.रीं सिवाजी गोसावी यांचे पिते माहादाजी गोसावी याचा इनाम आहे.. त्रिंबकपंत सुभेदार यांचीं सनदहि आहे. तरी तो इनाम सिवाजी गोसावी याजकडे चालविणें.

फॅ. रे. मुंबई मा. ८ | पृ. २५ इ. — (२११६) मुंबई-सुरत — श. १६०१ श्रावण शु. २ | इ. १६७९ जुलै २९

**दिलेरखान** व **संभाजी** यांनीं, पावसाळा संपतांच **विजापूरच्या** वजिरांना शिवाजीवर चालून जाण्यासाठीं आपल्याला मिळण्यास भाग पाडून, **पन्हाळ्याखालीं** युद्ध देण्याची जोराची तयारी चालविली आहे. **शिवाजी राजानें** आपल्या सरहद्दीवर १२००० घोडेस्वार आणून ठेविले आहेत. पावसाळा संपतांच उभयपक्षीं हालचालींना सुरवात होईल. **सुंदा** व **विदनोरच्या** राजांमध्यें जोराच्या लढाया होऊन जमशेत[शीर]-खानाच्या मदतीनें सुंदाराजाला जय मिळाला. त्यामुळें झालेल्या **तहानें** वेदनूरच्या राणीला शिरसी व शिर्रे हे दोन किल्ले व कारवारच्या दक्षिणेकडील मिरजनचें बंदर सुंदा राजाला द्यावें लागलें.

सा. ले. ३६५ | श. सं. रजब २७ — (२११७) कर्जकतबा — श. १६०१ श्रावण व. १४ | इ. १६७९ आगस्ट २४

होनपा बिन गगपा——सिवपा मुचेर्डा

आम्ही स्वामियापासी घेतले होनु ·।· मुदतीसी पावते करूं.

फॅ. रे. मुंबई मा. ८ | पृ. २८ इ. — (२११८) मुंबई-सुरत — श. १६०१ भाद्रपद शु. १ | इ. १६७९ आगस्ट २७

पोर्तु० व हिंदु लोकांच्या पत्रांवरून, ह्या (मुंबई) बंदराच्या तोंडाशीं असलेल्या आमच्या मालकीच्या **हेन्ड्री** **केन्द्री** **[उंदेरी खांदेरी]** बेटावर, **शिवाजी** राजा किल्ला बांधण्याचा बेत करीत आहे असें कळलें. अशा समर्थ आणि लोभी राजाला इतकें महत्त्वाचें स्थल विरोधाशिवाय हस्तगत करू देणें हें राजकारणाचे दृष्टीनें हीनपणाचें होणार आहे. त्या ठिकाणीं नेहमीं वरखालीं फेऱ्या घालण्याकरितां एक छोटें आरमार ठेवून मुंबई बेटाचें व नजीकच्या मुलखाचें दळणवळण बंद करणें एवढाच या हालचालीचा उद्देश असला

पाहिजे. आणि ह्या उद्देशाच्या सिद्धयर्थ त्यानें चौलजवळ माणसें व मालमसाला यांची सिद्धता केली आहे. एकदां त्याला हा किल्ला बांधूं दिला म्हणजे मग त्याच्या हातून तो घेणें मुष्किलीचें होऊन बसेल. परंतु आतांच तें बेट आमच्याच मालकीचें असल्याबद्दल जोरानें प्रतिपादन केल्यास व त्याला विरोध करण्याचा निश्चय दाखविल्यास तो आपल्या बेतापासून परावृत्त होईल.

फॅ. रे. मुंबई भा. २ पृ. ५ (४) इ. (२११९) मुंबई कन्सल्टेशन {श. १६०१ भाद्रपद शु. ७ इ. १६७९ सप्टें. २

थळ (Tull) हून खांदेरीउंदेरीला माणसें व मालमसाला पाठविण्याच्या कामीं शिवाजीच्या अधिकाऱ्यांनीं फक्त एकदोन होड्याच लाविलेल्या असल्यामुळें, त्यांना अडथळा करण्यास थोडीं माणसें पुरेशीं आहेत. तेव्हां एन्साईन ह्यूजेस ह्यानें तीन शिबाडें घेऊन हें काम करावें.

फॅ. रे. मुंबई, भा. ८ पृ. ३१, सप्टेंबर ३, वरील ह्यूजेस यास हुकूमः— शिवाजीनें खांदेरीउंदेरीला पुष्कळ लोक उतरवून त्या बेटाचा ताबा घेतला आहे. तेथून त्याला कोणीं काढून लावूं नये म्हणून तेथें तटबंदी करण्याच्या इरादानें आपल्या किनाऱ्यावरून प्रत्यहीं तो माणसें व माल आणवितो...... हें बेट आपल्या राजाचें आहे. असें सांगून येतील त्या होड्या परत फिरवाव्या. पहिल्यानें शत्रूनें शस्त्र उचलल्याशिवाय तुह्मीं जबरदस्ती करूं नये. वारंवार त्यांचे बेत, गलबतांची संख्या वगैरे तपशील लिहावा. हवा वादळी पडल्यास वाऱ्याच्या दिशेचा विचार करून चौल बंदरांत किंवा मुंबईंत शिरावें.

फॅ. रे. सुरत भा. ४ पृ. ६३-६४ इ. (२१२०) सुरत कन्सल्टेशन. {श. १६०१ भाद्रपद शु. ९ इ. १६७९ सप्टें. ४

काल मुंबईचें पत्र आलें. मुंबईकरांनीं खांदेरीउंदेरीविषयीं हुकुम मागविला आहे. ही गोष्ट अत्यंत महत्त्वाची असून शिवाजीचा हा बेत मोठा धोका उत्पन्न करणारा आहे. करितां खां०उं०च्या अत्युच्च भागावर इंग्रजांचें निशाण लावून शक्य झाल्यास तेथें संरक्षणाकरितां शिपाई ठेवावे. हंटर बोट बेटाच्या आसपास फिरती ठेवावी. शिवाजीच्या लोकांना ' हें बेट इंग्लंडच्या राजाचें आहे. तेव्हां येथें किल्ला बांधून शत्रुत्व करण्याची जबाबदारी तुमच्यावर आहे,' असें सामोपचारानें सांगावें. चौलच्या व इतर अधिकाऱ्यांना असेंच कळवावें. त्याशिवाय स्थानिक डे० प्रेसि०ला वगैरे सुचतील ते उपाय करावे व आमच्याकडे कळवावें.

फॅ. रे. मुंबई भा. १९ पृ. ३३ ता. ५ सप्टेंबर; मुंबईच्या २९ आगस्टच्या पत्रास सुरतेहून वरील मजकुराचें उत्तर.

फॅ. रे. मुंबई मा. ८ } (२१२१) { श. १६०१ भाद्रपद शु. १'
पृ. ३४ इ. } मुंबई-सुरत. { इ. १६७९ सप्टेंबर ६

डे० प्रेसि० आजारी आहे. खादेरीउंदेरी अगदीं बंदराच्या तोंडाशीं असल मुळें शिवाजीचें तेथें ठाणें बसल्यास येणारें जाणारें प्रत्येक गलबत त्याच्याक लुटलें जाण्याचा धोका आहे. गेल्या महिन्याच्या अखेरीस मिया नाईक (म नाक ] नांवाचा भंडारी १५० लोक व ४ तोफा घेऊन त्या बेटावर आला अस त्याला बेट सोडून जाण्याबद्दल आम्हीं सांगितलें. त्यानें संथपणें, शिवाजीच्या हुक शिवाय आपल्याला जातां येत नाहीं असें उलट कळविलें. याबद्दल थोडा विचार क प्रत्यक्ष त्याला कांहीं दमदाटी न देतां किनाऱ्याशीं त्याचें दळणवळण तोडण्याकां ३ शिबाडें पाठविलीं. आम्हीं कोणत्याहि प्रकारें आपला हक्क सांगण्यांत कसूर कै असें शिवाजीला म्हणण्यास जागा राहू नये एवढ्याचकरितां आम्हीं ही खबरदारी घेत आहे. आमच्या या वर्तनाच्या बाबतींत शेजाऱ्यांचें समाधान करण्याकरितां आम दुभाष्याला चौलच्या सुभेदाराकडे पाठविलें आहे.

फॅ. रे. मुंबई मा. १९ } (२१२२) { श. १६०१ भाद्रपद शु.
पृ. २९-३० इ. } सूजेस, खादेरी-मुंबई. { इ. १६७९ सप्टें. ६

४ तारखेला सकाळीं ८ वाजतां आम्ही येऊन पोंचलों. दोन तासांनीं किनाऱ्या कडून दोन होडया आल्या. त्यांना उतरण्याची आम्हीं बंदी केली. त्यांत माणसें हो माल काय होता तें कळलें नाहीं. पोर्तु० किंवा सिद्दी यांपैकीं इकडे कोणीच आले नस बेटावरचीं अशी एकहि होडी नाहीं. तेथें फक्त सुमारें ४०० लोक आहेत. त्यांपै बहुतेक काबुकरी ( cabucares कामकरी ? ) आहेत. बेटावर चढण्यासारख्या जा आहेत त्या सर्व दगड मातीची १ यार्ड उंचीची भिंत बांधून त्यांनीं बंद केल्या आहे अशाच भिंती बांधून दरीच्या तेथें त्यांनीं ४।६तोफा ठेविल्या आहेत.काल नारायण शेण यानें [कोंकण-] किनाऱ्यावर येऊन असें सांगितलें कीं, 'काल रात्रीं येथील हवालदार शिवाजीकडे तुमच्या शिबाडांची बातमी कळविली आहे.'

फॅ. रे. मुंबई मा. १९ } (२१२३) { श. १६०१ भाद्रपद शु.
पृ. ३१ इ. } सूजेस-मुंबई { इ. १६७९ सप्टें. ९

ह्या तीन दिवसांत किनाऱ्याकडून एकहि होडी आली नाहीं. आमच्या शि बांतील तोफाएवढ्याच त्यांच्या तोफा दिसतात. आतां बेटावर तोफांचे गाडे तयार ह आहेत. आम्हीं वारंवार त्यांना चिचकवितों. यामुळें त्यांच्या कामांत पुष्कळच अ थळा होतो.

फॅ. रे. मुंबई मा. ८ } (२१२४) { श. १६०१ भाद्रपद शु. १५
पृ. ३५ इ. } मुंबई-ह्यूजेस. { इ. १६७९ सप्टें. १०

तुमचीं दोन पत्रें पावलीं......सिद्दीचीं कांहीं गलबतें आल्यास तीं इकडे येऊन येथून परवानगी घेऊन जात तोंपर्यंत, त्यांना शिवाजीच्या लोकांच्या मानगडींत पडूं देऊं नये.

फॅ. रे. मुंबई मा. ८ } (२१२५) { श.१६०१ भाद्रपद शु. १५
पृ. ३६ इ. } मुंबई-कॅ० मिंचिन्. { इ. १६७९ सप्टें. १०

तुह्मी तेथें आहांत तेवढ्या मुदतींत शिवाजीचें आरमार त्या बाजूला आलें तर खांदेरीच्या लोकांना मदत करण्यास किंवा रसद पोंचविण्याला त्याला सवड देऊं नका..

फॅ. रे. मुंबई मा. ८ } (२१२६) { श. १६०१ भाद्रपद व. २
पृ. ३२ इ. } मुंबई-ह्यूजेस { इ. १६७९ सप्टें. ११

शिवाजीचा आरमारी-सेनापती दौलतखान कांहीं गुराबा व ८।१० शिडाचीं तारवें घेऊन तुमच्या रोखें येत आहे असें कळतें. तरी त्याचें आरमार येतांना दिसतांच शिडें उभारून एकदम बंदरांत परत यावें.

सदर मा. २ पृ. ६, मुंबई कन्सल्टेशन ता. १२ सप्टें:—रिव्हेंज गलबत शिवाजीच्या मदतीला पाठवावें.

सदर मा. ९ पृ. ३३, मुंबई-सुरत. ता. १२ सप्टें:—परस्पराचे वकील नेहमीं प्रमाणेंच (खांदेरीप्रकरणीं) बढाईची भाषा बोलतात.

सा. ले. १४५ } (२१२७) { श. १६०१ भाद्रपद व.५
रा. ६ } आज्ञापत्र म. मु. व सी. { इ. १६७९ सप्टें. १४

क्ष. कु. श्री. राजा शिव छत्रपति

त्र्यंबक गोपाल देशाधि० तर्फ पुणा.

तुलापुरकर ब्राह्मणास पुरातन इनाम भूमी आहेत. स्वामीच्याहि सनदा आहेत. तरी त्यांचें इनाम पूर्वीप्रमाणें त्यांजकडे चालविणें. खलेल न करणें.

फॅ. रे. सुरत मा. ४ } (२१२८) { श. १६०१ भाद्रपद वद्य ६
पृ. ६९-७० इ. } स्वाली कन्सल्टेशन { इ. १६७९ सप्टें. १५

खांदेरी प्रकरणीं मुंबईचे [६ तारखेचें] पत्र ३ [१३ ?] तारखेला पोचलें. सामोपचाराचे उपाय संपले आणि दौलतखान आरमार घेऊन आला तर मग रिव्हेंज व हंटर हीं गलबतें सज्ज करून उघड शत्रुत्व पत्करून त्यांचा सशस्त्र प्रतिकार करावा. [या मजकुराचें मुंबईस पत्र २० तारखेला गेलें. फॅ. रे. मुंबई मा. १९ पृ. ४१]

आलें. लगेच मीं माझ्या होड्या सज्ज करून त्यांच्या मदतीला पाठविल्या; परंतु त्या जाऊन पोंचण्यापूर्वीच दोन शिबाडें परत फिरलेलीं दिसलीं. व थोड्याच वेळांत सार्जंट नॅशकडून यॉर्पचें शिबाड व स्वतः तो आणि दोन तीन इंग्रज नाश पावल्याचें कळलें....बेटाजवळ होड्या ठेवून आम्हीं पूर्ववत् नजर ठेवीत आहोंत. आमचें त्यांच्या स्वाधीन झालेलें शिबाड त्यांनीं नेऊं नये अशीहि खटपट केली आहे. बेटावर जॉर्ज कोल वगैरे आमच्या लोकांना कैद करून ठेविलें आहे.

फॅ. रे. मुंबई मा. १९ पृ. ३६-३७ इ. (२१३२) कॅ. मिंचिन-मुंबई श. १६०१ भाद्रपद व. ११ इ. १६७९ सेप्टें. २०

मीं स्वतः अगदीं बेटाजवळ राहिलों आहें. दुसरें राहिलेलें शिबाड खांदेरीच्या आखाताच्या बाजूला रवाना केलें. परंतु तोफांचा मारा करून बेटावरचे लोक त्याला जवळ येऊं देत नाहींत. मी एकदां बेटावर मारा केला तेव्हां त्यांच्या तोफा बंद पडल्या आणि आमचें शिबाड घेऊन जाण्यास शक्य तो अडथळा करण्याकरितां व किनाऱ्याच्या होड्या थांबविण्याकरितां मीं सार्जंट जाईल्सला नेमिलें आहे. परंतु त्याच्या गफलतीमुळें आज सकाळीं त्यांच्या किनाऱ्याहून दोन होड्या येऊन परत गेल्या. मीं वेळीं सूण करूनहि त्यानें त्याचा कांहींच उपयोग केला नाहीं....आमचें शिबाडहि आतां त्यांनीं किनाऱ्यावर ओढून त्याची डोलकाठी वगैरे सर्व कांहीं काढून घेतलें आहे. हवा थोडी खराब असल्यामळें मी थोडा दूर सरकलों आहे. आमची बातमीदार होडी माजगांवची असल्यामळें बहुधा ती तिकडेच गेली असावी.

फॅ. रे. मुंबई मा. १९ पृ. ३७-३८ इ. (२१३३) कॅ० मिंचिन-मुंबई श. १६०१ भाद्रपद व. १३ इ. १६७९ सप्टें. २२

आतांपर्यंत त्यांच्यापैकीं कोणींहि हातीं न सांपडल्यामुळें आमच्या कैद्यांची हालहवाल कांहींच कळली नाहीं. आज एक होडी अगदीं हातांत आलेली गेली. **खांदेरी बेटावरील लोकांना आमच्या हातून कांहीं इजा होण्याचा संभव दिसत नाहीं.** कारण, आम्हीं जवळ येतांच ते खडकांत लपून दिसेनासे होतात ! केवळ *त्यांच्या भिती पाडून खुलास खून शेतां देत नाहींत. यामुळें उलट आमचेंच नुकसान* ज्यास्त होणार. रात्रंदिवस झटून ते आपलें काम करीत आहेत. आपला हुकूम आल्यास कृष्णपक्ष संपल्यावर मीं पूर्वीप्रमाणेंच त्यांच्या मुख्य तटासमोर ठाणें धरून रहातों.

फॅ. रे. मुंबई मा. १९ पृ. ३९-४० इ. (२१३४) कॅ. मिंचिन-मुंबई. श. १६०१ आश्वीन शु. २ इ. १६७९ सप्टें. २६

आपलें २५ चें पत्र मिळालें. शत्रूची एकहि होडी आली नसतांना अनेक होड्या आल्याची गैरखबर आपल्याला कोणीं दिल्याबद्दल मला खेद होतो. गेल्या मंगळवारीं

त्यांच्या दोन होड्यांचा आमच्या शिबाडानें पाठलाग केला. परंतु त्या हलक्या असल्यामुळें त्यांच्या तावडींतून निसटल्या. लगेच एक लहान बोट आम्हीं पाठलागास पाठविली. तिनें त्या दोन्हीं होड्यांचा किनाऱ्यापर्यंत पाठलाग करून त्यांच्यावरील एका माणसाला ठार केलें व दोघांना खालीं पाडलें. इतक्यांत रानांतून भराभर माणसें बाहेर येऊन त्यांनीं आमच्या लोकांना काढून लाविलें. आमचे कांहीं लोक आजारी झाले आहेत. आम्हीं बेटापासून इतके जवळ आहों कीं, त्यांच्या गस्तीचा आवाज आम्हांला सहज ऐकूं येतो. **शिवाजीचें आरमार** आज येईल, उद्यां येईल अशी अपेक्षा धरून आहोंत. त्यांच्या तोफा मारून काढण्याकरितां जर कदाचित् मीं आखातांत शिरलोंच तर शिवाजीच्या आरमाराकडून आंत कोंडला जाऊन मला बाहेर पडण्यास मार्गच रहाणार नाहीं ! म्हणून आतां शिबाडाचें रक्षण करतां यावें, अशा सोईनें मीं खुला राहिलों आहे.

फॅ. रे. मुंबई मा. २ } (२१३५) { श. १६०१ आश्वीन शु. ५
पृ. ७–८ इ. } मुंबई कन्सल्टेशन { इ. १६७९ सप्टें. २९

**शिवाजीचें आरमार** येण्याची नक्की बातमी आली; पण सुरतेहून कांहींच हुकूम आला नाहीं. तेव्हां भरपूर सैन्याच्या अभावीं शिवाजीच्या समोरून आपल्या लोकांना पळून जावें लागणें नामुष्कीचें होईल हें लक्षांत घेऊन आपल्या लोकांनीं आधींच १ आक्टोबरला बंदरांत परत यावें.......

इतक्यांत प्रेसिडेंटचे सुरतेहून युद्ध करण्याबद्दल स्पष्टपणें हुकूम आल्यामुळें गलबतें व शिबाडें चांगल्या तऱ्हेनें सज्ज करण्यासाठीं बोलवावीं; इतरहि शक्य तितकीं सज्ज करून शिवाजीच्या आरमाराशीं तोंड देण्यास पाठवावीं. आणि या मध्यंतरींच्या काळांत खांदेरीच्या कामावर एक मचवा पाठवावा.

सदर पृ. ८,९ **आक्टोबर**, मुंबई कन्सल्टेशनः—सुरतेच्या पत्राप्रमाणें दोन गुराबा भाड्यानें घेऊन तयार कराव्या. व **रिचर्ड केग्विन** याला रिव्हेंज व सर्व गलबतें यांचा मुख्य अधिकारी नेमावा. कारण तो सेंथ वृत्तीचा व धोरणी असून इंग्लंडांत त्यानें समुद्रावरील लढाया प्रत्यक्ष पाहिलेल्या आहेत.

फॅ. रे. मुंबई मा. ८ } (२१३६) { श. १६०१ आश्वीन शु. १२
पृ. ४१ इ. } मुंबई–सुरत { इ. १६७९ आक्टो. ६

उद्यां केग्विनच्या नेतृत्वाखालीं सुमारें २०० शिपाई खांदेरीला वेढा देण्याकरितां निघतील. आमचीं कित्येक गलबतें व्यापाराकरितां बाहेर गेल्यामुळें दोन गुराबा भाड्यानें घेतल्या. १० दिवसांनीं इंटर येऊन पोंचल्यावर त्यांना सोडून देऊं. बेटाला पक्का वेढा पडल्यास **पाण्याचा तुटवडा** पडून तेथील लोक शरण येतील. मुद्दाबर इतकें सैन्य पाठविल्यामुळें मुंबईंत फक्त ५० शिपाईच राहिले आहेत. करितां आणखी ५० शिपाई ठेवणें जरूर आहे.

फॅ. रे. मुंबई भा. ८ } (२१३७) { श. १६०१ आश्वीन शु. १३
पृ. ४१-४२ इ. } मुंबई-कॅ० केग्विन. { इ. १६७९ आक्टोबर ७

तुमच्या ताब्यांत रिव्हेंज फ्रिगेट, २ गुराबा, ३ शिबाडें, व २ मचवे अशीं ८ गलबतें व अंमलदार वगळून १८८ शिपाई दिले आहेत. तुम्हीं खांदेरीला वेढा घालून किनाऱ्याशीं त्या बेटाचें दळणवळण तोडावें. तुम्हांस पाठविण्याचें मुख्य कारण असें आहे कीं, दौलतखानाचें २० गुराबांचें आरमार त्या बेटाच्या मदतीकरितां येत असल्याची बातमी आहे. तें तुम्हांला दिसल्यावर एक लहान बोट पाठवून **दौलतखानाला** आपल्या हक्कांची जाणीव करून द्यावी. आणि तसें कांहीं नच जमल्यास धैर्यानें युद्ध करावें. तो तुमच्याशीं युद्ध न देतांच मध्यें खाडींत आडवा येऊन राहील तर तुम्हींहि नांगर उचलून त्याच्याबरोबर राहून त्याला मुंबई बेटावर उतरूं देऊं नये.

फॅ. रे. मुंबई भा. २ } (२१३८) { श. १६०१ आश्वीन व. ४
पृ. ९-१० इ. } मुंबई कन्सल्टेशन. { इ. १६७९ आक्टोबर १३

नवीन डे० गव्हर्नरनें चार्ज घेतला व पूर्वीचा डे० ग० हेन्री ऑक्सिंडेन इत्यादि लोकांचें मंडळ भरवून मुंबई बेटाच्या सुरक्षिततेबद्दल विचार झाला. **पोर्तु० नीं** आपल्या मुलखांतून मराठ्यांना येऊं देण्याचें नाकारल्यामुळें या बेटाला विशेष धोका नाहीं. परंतु खाडीमधील पुष्कळ लहान लहान बोटींचा शत्रूला कांहीं उपयोग होऊं शकेल म्हणून दोन शिबाडें भाड्यानें घेऊन बंदोबस्त करावा.

सदर भा. ८ पृ. ४४, मुंबई-सुरत, ता. १३ आक्टो:—समोरच्या किनाऱ्यावर शिवाजीचें सैन्य आल्याची बातमी असल्यामळें येथें भेदरून गेलेल्या लोकांच्या आश्वासनार्थ दोन शिबाडें भाड्यानें घेऊन बंदोबस्त केला आहे.

मास्टर डायरी भा. २ } (२१३९) { श. १६०१ आश्वीन व. ४
पृ. २६३ इ. } हुगळी कन्सल्टेशन. { इ. १६७९ आक्टोबर १३

सुलतान **मुअज्झम** व शिवाजीचा मुलगा **संभाजी कटक**कडे येणार असल्याची बातमी खरी ठरल्यास एकदम बेसावधपणें त्यांच्या हातीं सांपडूं नये म्हणून **बालासोर**च्या वखारवाल्यांनीं इंग्लंडच्या गलबतावर माल भरून सुरक्षित ठेवावा.

फॅ. रे. मुंबई, भा. २ } (२१४०) { श. १६०१ आश्वीन व. ८
पृ. १०-११ इ. } मुंबई कन्सल्टेशन. { इ. १६७९ आक्टोबर १६

गेल्या ११ तारखेला, इतके दिवस शिवाजी राजाचा वकील म्हणून आमच्या चांगला परिचयाचा झालेला **सुंदरजी परभू** इतक्या कमी लवाजम्यानिशीं आला कीं, त्याला हेर म्हणूनच आम्हीं कैद करून ठेविला आहे. त्याला विचारलें असतां तो समाधानकारक उत्तरें देऊं शकत नाहीं. म्हणून त्याच्यावर कडक नजर ठेवावी. राजाकडील

त्यांच्या दोन होड्यांचा आमच्या शिबाडानें पाठलाग केला. परंतु त्या हलक्या असल्यामुळें त्यांच्या तावडींतून निसटल्या. लगेच एक लहान बोट आम्हीं पाठलागास पाठविली. तिनें त्या दोन्हीं होड्यांचा किनाऱ्यापर्यंत पाठलाग करून त्यांच्यावरील एका माणसाला ठार केलें व दोघांना खालीं पाडलें. इतक्यांत रानांतून भराभर माणसें बाहेर येऊन त्यांनीं आमच्या लोकांना काढून लाविलें. आमचे कांहीं लोक आजारी झाले आहेत. आम्हीं बेटापासून इतके जवळ आहों कीं, त्यांच्या गस्तीचा आवाज आम्हांला सहज ऐकूं येतो. **शिवाजीचें आरमार** आज येईल, उद्यां येईल अशी अपेक्षा धरून आहोंत. त्यांच्या तोफा मारून काढण्याकरितां जर कदाचित् मीं आखातांत शिरलोंच तर शिवाजीच्या आरमाराकडून आंत कोंडला जाऊन मला बाहेर पडण्यास मार्गच रहाणार नाहीं ! म्हणून आतां शिबाडाचें रक्षण करतां यावें, अशा सोईनें मीं खुला राहिलों आहे.

फॅ. रे. मुंबई भा. २ } (२१३५) { श. १६०१ आश्विन शु. ५
पृ. ७–८ इ. } मुंबई कन्सल्टेशन { इ. १६७९ सप्टें. २९

**शिवाजीचें आरमार** येण्याची नक्की बातमी आली; पण सुरतेहून कांहींच हुकूम आला नाहीं. तेव्हां भरपूर सैन्याच्या अभावीं शिवाजीच्या समोरून आपल्या लोकांना पळून जावें लागणें नामुष्कीचें होईल हें लक्षांत घेऊन आपल्या लोकांनीं आधींच १ आक्टोबरला बंदरांत परत यावें.......

इतक्यांत प्रेसिडेंटचें सुरतेहून युद्ध करण्याबद्दल स्पष्टपणें हुकूम आल्यामुळें गलबतें व शिबाडें चांगल्या तऱ्हेनें सज्ज करण्यासाठीं बोलवावीं; इतरहि शक्य तितकीं सज्ज करून शिवाजीच्या आरमाराशीं तोंड देण्यास पाठवावीं. आणि या मध्यंतरींच्या काळांत खांदेरीच्या कामावर एक मचवा पाठवावा.

सदर पृ. ८,९ **आक्टोबर**, मुंबई कन्सल्टेशनः—सुरतेच्या पत्राप्रमाणें दोन गुराबा भाड्यानें घेऊन तयार कराव्या. व **रिचर्ड केग्विन** याला रिव्हेंज व सर्व गलबतें यांचा मुख्य अधिकारी नेमावा. कारण तो संथ वृत्तीचा व धोरणी असून इंग्लंडांत त्यानें समुद्रावरील लढाया प्रत्यक्ष पाहिलेल्या आहेत.

फॅ. रे. मुंबई भा. ८ } (२१३६) { श. १६०१ आश्वीन शु. १२
पृ. ४१ इ. } मुंबई–सुरत { इ. १६७९ आक्टो. ६

उद्यां केग्विनच्या नेतृत्वाखालीं सुमारें २०० शिपाई खांदेरीला वेढा देण्याकरितां निघतील. आमचीं कित्येक गलबतें व्यापाराकरितां बाहेर गेल्यामुळें दोन गुराबा भाड्यानें घेतल्या. १० दिवसांनीं इंटर येऊन पोंचल्यावर त्यांना सोडून देऊं. बेटाला पक्का वेढा पडल्यास **पाण्याचा तुटवडा** पडून तेथील लोक शरण येतील. युद्धावर इतकें सैन्य पाठविल्यामुळें मुंबईंत फक्त ५० शिपाईच राहिले आहेत. करितां आणखी ५० शिपाई ठेवणें जरूर आहे.

युद्धास तोंड लागून आमचें नुकसान काय झालें याबद्दल कांहीं वर्दी आली नाहीं. तथापि, कॅ० केग्विनला कुमक करण्याची तयारी करावी; व मुंबईंतील कांहीं सैन्य पाठवावें लागेल त्याचीहि जागा भरून काढण्याकरितां नवी भरती करावी.

ओ. कॉ. मा. ४० } (२१४४) { श. १६०१ आश्विन व. ९
नं. ४६६५ इ. } कॅ० केग्विन–मुंबई { इ. १६७९ आक्टोबर १८

नागांवच्या खाडींतून बाहेर पडून आमच्या समोर थळपर्यंत शिवाजीचें आरमार वल्हवीत आलें. सकाळीं सुमारें ७ वाजतां युद्धाला सुरवात झाली. आमचें आरमार एकत्र राहूं शकलें नाहीं. आणि थोडी पांगापांग व पळापळी झाली. शेवटीं रिव्हेंजवरच त्यांच्या २४ गुराबा व पुष्कळच गलबतें जमून आलीं. तीं अगदीं जवळ येऊन होड्यांत बसून चढाई करण्यास येईपर्यंत आपला दारुगोळा राखून ठेवून आम्हीं त्यांच्यावर एकदम मारा केल्यामुळें, अर्ध्या तासांत त्यांचा मोड झाला. पुढें त्यांचा पाठलाग करून आम्हीं त्यांना नागांवांत कोंडून टाकलें. आमच्यापैकीं कांहीं लोकांनीं चौलकडे व दुसरीकडे पळ काढण्यास सुरवात केली होती ! पण आतां त्यांना बोलल्यावर त्यांनीं यापुढें धिटाईनें तोंड देण्याचें कबूल केलें आहे. आमच्या पांच होड्या त्यांच्या हातीं सांपडल्या. एकादी आगीची होडी तयार केल्यास रात्रीं त्यांचीं गलबतें जाळतां येतील ! उद्यां त्यांचें आरमार पुनः आल्यास त्यांच्याशीं मी निश्चयानें लढेन. तुम्हींहि कुमक पाठवीत असालच. खांदेरी बेटावर त्यांना आजपर्यंत फार थोडी सामग्री मिळाली आहे. युद्धामध्यें आमच्या कांहीं बंदुका फुटल्या. त्याबद्दल दुसऱ्या पाहिजे आहेत. व पाण्याच्या बरोबरीनें आमच्याकरितां सर्पणाचीहि तजवीज झाली पाहिजे.

ओ. कॉ. मा. ४० } (२१४५) { श. १६०१ आश्विन व. १०
नं. ४६६६ इ. } मुंबई–सुरत { इ. १६७९ आक्टोबर १९

कालच्या युद्धाची हकीकत...कुमक देण्याकरितां १ गलबत व २ शिबाडें तयार करून कॅ० अडर्टनच्या अधिकाराखालीं पाठविलीं आहेत. अडर्टनला नव्यानें नोकरींत घेणें भाग आहे. हंटर तुमच्याकडे वर गेल्यास शक्य तितक्या लवकर खालीं पाठवून द्या. तुमचें हॉयहि पाठवा.

फॅ. रे. मुंबई मा. २ } (२१४६) { श. १६०१ आश्विन व. ११
पृ. १२–१३ इ. } मुंबई कन्सलटेशन { इ. १६७९ आक्टोबर २०

शिवाजीच्या मुलखांतून एक मालाची होडी आणि पळत्तें एक गलबत असीं बंदरांत आलेलीं शत्रूचीं म्हणून पकडून ठेवावीं. सैन्यांत वाढ करावी. समोरच्या किनाऱ्यावर मोठें सैन्य उभारून मुंबई बेटांत शिरकाव करण्याचा शिवाजीच्या अमलदारांचा बेत आहे. तरी कारंजा, ट्रॉम्बे इत्यादि ठिकाणीं लहान होड्या ठेवून पहारा करावा.

बातमी आपल्याला मिळावी म्हणून तीन चार गरीब ब्राह्मणांना हलक्या पगारावर गुप्त हेर म्हणून नेमावें. त्यांनीं दर ३।४ दिवसांनीं बेटावर येऊन मिळालेली बातमी आणून पुरवावी.

फॅ. रे. मुंबई भा. ८ } (२१४१) { श. १६०१ आश्वीन व. ८
पृ. ४७ इ. } मुंबई–कॅ० केग्विन. { इ. १६७९ आक्टोबर १६

तुमचें काळच्या तारखेचें **दौलतखानाचें** आरमार आल्याबद्दलचें पत्र आलें...

सदर पृ. ४८; ता. १७ आक्टोबरः – **दौलतखानाचीं गलबतें खांदेरीला मदत देऊं शकलीं** यामुळें मन अस्वस्थ होतें. तीं फार लहान आहेत तेव्हां तीं करणार ती मदतहि अल्पच असेल, हें खरें आहे. परंतु बंदोबस्त हा केलाच पाहिजे. शत्रूचीं गलबतें पुष्कळ असलीं तरी तुमचें सामर्थ्य अधिक आहे आणि त्यांचीं गलबतें कमसंख्य व पर्यटणसामर्थ्यांत बरींच हीन दर्जाचीं आहेत. यामुळें आम्हांला त्यांची क्षिती वाटत नाहीं. तथापि लक्ष ठेवून तुम्हीं एकाददुसरें त्यांचें गलबत पकडलें तर ते कसे क्षुद्र आहेत हें तुमच्या लोकांच्या नजरेस येऊन त्यांचें समाधान वाटेल. तुम्हांला पाण्याचा पुरवठा केला जाईल. काय लागेल तें मागत चला.

(से.) फॅ. रे. सुरत भा. १०८ } (२१४२) { श. १६०१ आश्वीन व. ८
पृ. ३७ इ. } राजापूर--सुरत. { इ. १६७९ आक्टो. १६

**शिवाजीनें** दक्षिणी लोकांशीं तह केला असून तो आपलें सगळें सैन्य घेऊन कोठेंसा निघून गेला आहे. कांहीं दिवसांपूर्वी दिलेरखान, सर्जेखान व **संभाजी राजा** यांनीं **अथणी** लुटली. पुढें त्यांनीं तें शहर जाळून कांहीं लोक कैदहि केले. या शेवटच्या बाबतींत सर्जेखान व संभाजी यांचें मत अनुकूल नव्हतें. कैदी सोडावे असा त्यांचा विचार पडला आणि दिलेरखानाशीं मतभेद होऊन त्या दोघांना विजापुराकडे पळून जावें लागलें. त्यानंतर संभाजीराजा **कोल्हापूरकडे** ३०० घोडे व १०० पायदळ घेऊन आला आहे. इकडे येण्यांत त्याचा हेतु काय आहे तें कळलें नाहीं परंतु आपल्या बापानें [ **शिवाजीनें** ] बोलाविल्यामुळें तो आला आहे अशी लोकांची समजूत आहे.

फॅ. रे. मुंबई भा. २ } (२१४३) { श. १६०१ आश्वीन व.
पृ. ११-१२ इ. } मुंबई कन्सल्टेशन. { इ. १६७९ आक्टोबर १८

आज सकाळीं ४०।५० गुराबा व गलबतें मिळून बनलेलें **शिवाजीचें** आरमार **नागांवच्या खाडींतून** बाहेर पडलें. व एकसारख्या फेरी झालीतच सा... चाराचें बोलणें करण्यास वेळ न देतांच आमच्या गलबतांजवळ येऊन ठेपलें.

फॅ. रे. मुंबई (२१५०) श. १६०१ आश्वी. व. १३
मा. ८ पृ. ५४-५५ इ. मुंबई-कॅ. केग्विन इ. १६७९ आक्टो. २२

मुंबईवर चढाई करून येण्याकरितां बरेचसें शिवाजीचें सैन्य शहाबाद (sobago ?)-ला येऊन राहिलें आहे असें ऐकिलें. येथील (मुंबई) बेटाचा बंदोबस्त करावयाचा तर (बहुतेक सर्व सैन्य तुमच्याकडेच दिल्यामुळें) तुम्हीं २ शिबाडें पाठवितां काय तें विचार करून पहा. परंतु, तें शक्य नसल्यास प्रसंग पडतांच आम्हीं बेटावर तोफा डागण्यास हुकूम देऊं. त्यावेळीं मात्र त्या पाहतांच किंवा ऐकतांच तुम्ही मदतीची आवश्यकता जाणून सर्व गलबतें घेऊन बेटाकडे यावें.

फॅ. रे. मुंबई (२१५१) श. १६०१ आश्वीन व. १४
मा. १९ पृ. ५७-५८ इ. रिव्हेंज-मुंबई. इ. १६७९ आक्टो. २३

आपल्या पत्राप्रमाणें आम्हीं शिबाडें देऊं शकत नाहीं. परंतु उलट आम्हांलाच कांहीं लहान होडया मिळाल्या तर पाहिजे आहेत. आम्हीं इतकी काळजी घेऊनहि गेल्या रात्रीं १२ गलव्हेते त्यांनीं बेटांत नेलीं! एक होडी परत जातांना दिसली तिचा लगेच एका मचव्यानें पाठलाग करून किनाऱ्यापर्यंत जाऊन तेथें चकमक करून शत्रूचे कित्येक लोक मारले. काल दक्षिणेकडून ३७ गलबतें किंवा होडया येऊन नागांवच्या नदींत शिरल्या. आपल्या तोफांच्या खुणेकडे आम्हीं काळजीपूर्वक लक्ष ठेवूं.

फॅ. रे. मुंबई (२१५२) श. १६०१ आश्वीन व. ३०
मा. १९ पृ. ६४ इ. सुरत-मुंबई इ. १६७९ आक्टो. २४

सैन्याची यादी पाहून या खांदेरी प्रकरणांत मर्यादेबाहेर खर्च होणार असें दिसतें. तरी किती दिवसांत हें युद्ध संपेल याबद्दलचा आपला अंदाज काय आहे व यशाची आशा कितपत आहे वगैरे तपशीलवार कळवावें.

फॅ. रे. मुंबई (२१५३) श. १६०१ आश्वीन व. ३०
मा. १९ पृ. ५८ इ. रिव्हेंज-मुंबई इ. १६७९ आक्टोबर २४

खांदेरी बेटावर गेलेल्या होडया आम्हीं तेथेंच जबरदस्तीनें ठेवविल्या आहेत. काल रात्रीं त्यांनीं बाहेर पडण्याचा प्रयत्न केला. परंतु आम्हीं त्यांना जाऊं दिलें नाहीं.

फॅ. रे. सुरत मा. ४ (२१५४) श. १६०१ कार्तीक शु. १
पृ. ८२-८४ इ. सुरत कन्सल्टेशन इ. १६७९ आक्टो. २५

मुंबईच्या १९ तारखेच्या पत्रांतील युद्धाची हकीकत, यश व नुकसान...आमचे थोडेच लोक जाया होत असले तथापि आमचें अल्प मनुष्यबळ लक्षांत घेतां आम्हीं शिवाजीशीं फार वेळ टक्कर देऊं शकूं असें आम्हांला वाटत नाहीं.

शिवाय चिडून जाऊन खुद्द मुंबई बेटावरच तो सैन्य घेऊन उतरला तर आम्हांला सरक्षण करितां येईल किंवा कसें याची शंकाच आहे. पाऊस चालू होतांच आम्हांला आमचीं गलबतें परत न्यावीं लागतील. त्या वेळीं त्यानें काम पुढें चालू केल्यास कंपनीला कळवून त्यांच्या आज्ञेनेंच पुढील बंदोबस्त करावा लागेल. करितां (१) मुंबईकरांनीं शहाजोगपणें **अंग काढून घेण्याकरितां** सामोपचाराचें बोलणें लावण्याचा विचार करावा. परंतु यांत कांहीं अडचण वाटत असेल तर (२) वसईच्या **पोतु०** कॅ. जनरलकडे **मदतीकरितां विनंति करावी.** तेंहि न जमेल तर (३) लवकरच येथून निघालेल्या **सिद्दीच्या आरमाराचा** होईल तो **उपयोग करून पहावा.** हळूहळू त्याला पुढें घालून आपण माघार घ्यावी व कंपनीचा खर्च वांचवावा. २१३ दिवसांत इंटर गलबत पाठवितों. [ याच मजकुराचें सुरत-मुंबई पत्र फॅ. रे. मुंबई भा. १९ पृ. ६५, ता. २८ ऑक्टोबर ].

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. मुंबई भा. ८<br>पृ. ५७-५८ इ. | (२१५५)<br>मुंबई-कॅ. केग्विन | श. १६०१ कार्तीक शु. १<br>इ. १६७९ ऑक्टो. २५ |

तुम्हीं खांदेरीकडून शत्रूच्या होड्या जाऊं दिल्या नाहींत हें फार चांगलें काम केलें. परंतु तुमच्यावर अचानक हल्ला होऊं नये याबद्दल जपा. आमच्या हेरांकडून आम्हांला कळलें आहे त्यावरून शत्रूचें आरमार असलें धाडस करील असें वाटत नाहीं. कारण, त्यांना परवां चांगलाच धक्का बसला. चकमकींत त्यांचे सुमारें ६०० लोक मेले असून आतां ते आपले लोक सुरक्षिततेकरितां **राजापुरास पाठविण्याच्या विचारांत** आहेत ! त्यांनीं नागांवची खाडी सोडावी हें आमच्या सोईचें नाहीं. स्वतःला धोक्यांत घातल्याशिवाय त्यांच्यावर कारवाई करण्यास ती जागा फारच सोईची आहे. पण तुम्हीं नागांववर लक्ष ठेवून ते बाहेर जाऊं लागलेच तर तोफांची सलामी दिल्याशिवाय त्यांना सोडूं नका.

ताज्या बातमीप्रमाणें तांदुळानें भरलेल्या ९ गुराबा नागांव नदीच्या मुखाशीं पडल्या आहेत. त्याशिवाय थोडे लोक असलेल्या अशा १२ इतर गुराबा आहेत. मग आणखी ७।८ होड्यांशिवाय तेथें कांहींच नाहीं.

| | | |
|---|---|---|
| डाग रजिस्टर १६७९<br>पृ. ४९९ इ. नोवें. ४ न्यू. | (२१५६) | श. १६०१ कार्तीक शु. १<br>इ. १६७९ आक्टोबर २५ |

मच्छलीपट्टणचें पत्रः—हिंदुस्तान, विजापूर व आसपासचा मुलूख यांतील गोंधळ पूर्ववत् चालूच आहे. **मोंगलांनीं** विजापूरचें राज्य हस्तगत करून, **गोंवळकोंड्याकडून** बाकी राहिलेल्या खंडणीबद्दल सोन्याचीं ४० मोठीं पिंपें, मुअज्झमकरितां गोंवळकोंड्याची राजकन्या आणि शिवाय हिरेजडीत सलकडीं जोड इत्यादिकांची मागणी करण्याकरितां गोंवळकोंड्या [illegible]

सुमारें १ मैल घेराचें असून मुंबई बेटापासून २ लीग व किनाऱ्यापासून १½ लीग अंतरावर आहे. पोर्तु०नीं पूर्वी तेथें तटबंदी करण्याचा प्रयत्न करून तेथें पाणी लागेना म्हणून तो सोडून दिला. तेथें कोणालाहि ठाणें करूं देणें मुंबईच्या व्यापाराला विघातक आहे असें समजून आम्हीं शिवाजीला विरोध केला. परंतु त्यांत आम्हांला **यावें तसें यश आलें नाहीं**. रात्रीं अंधारांतून किनाऱ्यावरून तेथें गलबतें येऊन आंतील लोकांस मदत देतात. अशी मदत त्यांना पुरेशी देतां येणार नाहीं हें खरें आहे. तथापि एक मोठी आपत्ती अशी आहे कीं, उन्हाळ्यांत आम्हीं यांचा बदोबस्त करूं शकलों नाहीं तर, पावसांत आम्हीं आमचीं गलबतें परत बोलाविल्यावर ते उघडीप पाहून चुना वगैरे मसाला नेऊन सर्व्हेबरला किल्ला व पाण्याच्या टांक्या तयार करतील; आणि आतां चाललेली सगळी खटपट फुकट जाईल. करितां एकादें युरोपीय गलबत ३।४ दिवसांकरितां पाठविल्यास या प्रकरणाचा तत्काल व आपल्याला अनुकूल असा निकाल लागेल.

फॅ. रे. मुंबई भा. १९ पृ. ६१ इ. | (२१६२) कॅ. केग्विन-मुंबई | श. १६०१ कार्तीक शु. ३ इ. १६७९ ऑक्टोबर २७

काल रात्रीं नागांवच्या मुखाशीं दबा धरून आमचीं गलबतें ठेविलीं. परंतु कांहींच हातास लागलें नाहीं. आज दक्षिणेकडून आलेल्या १९ लहान होड्या नागांव नदींत शिरल्या.

फॅ. रे. मुंबई भा. ८ पृ. ५८ इ. | (२१६३) मुंबई-कॅ. केग्विन | श. १६०१ कार्तीक शु. ३ इ. १६७९ आक्टो. २७

*दररोज शत्रु बेटाला मदत पोंचवितो हें वाचून आम्हांला खेद होतो. आम्हीं तुमच्याकडे अधिक सैन्य पाठविलें त्याचा उपयोग होऊन ही मदत बद होईल असें आम्हांला वाटलें होतें.*

फॅ. रे. मुंबई भा. १९ पृ. ६२ इ. | (२१६४) केग्विन-मुंबई. | श. १६०१ कार्तीक शु. ४ इ. १६७९ आक्टो. २८

कितीहि काळजी घेतली तरी आज रात्रीं १६।१७ होडया बेटांत गेल्या ! ह्या लहान होडया आमची नजर चुकवून बेटांवरील दिव्यांच्या खालून चटकन जातात.

सदर [पृ. ६२-६३] तारीख ३० आक्टोबरः—हवा वाईट होती. यामुळें आमचें थोडें नुकसान झालें. त्यांचेंहि बरेंच नुकसान झालें असावें. त्या रात्रीं आम्हीं शिबाडें व मचवे नागांव खाडीच्या मुखाशीं शत्रूच्या गलबतांना अडविण्याकरितां पाठविणार होतों. परंतु ते अद्याप आलेच नाहींत.

सदर पृ. ६३ ता. ३१ आक्टोः—त्या होडया अद्यापि बेटावरच आहेत. आज

रात्रीं त्यांच्याकरितां दबा धरून राहून त्या आम्हीं पकडूं. गुराबा अद्यापि नागांवच्या खाडींतच आहेत.

सदर पृ. ६४; ता. वरील: —तुमच्या आज्ञेप्रमाणें हेक्टर गुराब परत पाठविली आहे. पाणी पाठवा नाहीं तर आम्हांला तुटवडा पडेल. तुमचीं गलबतें आलीं तर बेटाची चकडबंदी अधिक चांगली करितां येईल.

फॅ. रे. सुरत मा. ४ } (२१६५) { श. १०६१ कार्तिक शु. ७
पृ. ८६-८८ इ. } सुरत कन्सलटेशन. { इ. १६७९ आक्टो. ३१

मुंबईच्या मानगडींनीं आम्हांला काळजी उत्पन्न केली आहे. नुकतेंच डे० प्रेसि०चें [ २२ तारखेचें ] जनरल लेटर आलें. त्यांत खांदेरीच्या आमच्या हालचालीमुळें चिडून शिवाजीनें ४००० लोक मुंबईवर हल्ला करण्याकरितां सज्ज केले इत्यादि बातमी लिहून आली....मुंबईचे लोक घाबरून गेले आहेत. त्यांना आधार देण्यासाठीं सैन्य ठेविलें पाहिजे. म्हणजे खर्चहि वाढणार. यामुळेंच इतक्या जवळच्या व समर्थ शत्रूचा प्रतिकार करण्याच्या बाबतींतील **आमचा असमर्थपणा उघडपणें दिसून आला. म्हणून शिवाजीकडून** नुकतेंच राजापूरच्या मुक्कामाहून सामोपचाराचें पत्र आलें आहे त्याचा फायदा घेऊन त्याला सामोपचारानेंच उत्तर लिहावें. 'खांदेरीसारख्या क्षुद्र व राजाच्या दर्जाला न शोभणाऱ्या बेटावर तटबंदी करण्याचा व्यर्थ आग्रह धरून आम्हांला तुमच्या अधिकाऱ्यांनीं त्रास दिला, अशी त्याच्याकडे तक्रार करावी. आमचा त्या जागेवर हक्क असला तरी गतगोष्टी विसरून जाऊन मुंबईकरांकडे वकील पाठवून हें प्रकरण मिटतें घ्यावें, ह्याबद्दल आम्हीं मुंबईकरांस लिहिलें आहे.' इत्यादि लिहावें. या बाबतींत मुद्दाम इसम पाठविणें बरें, कीं चौलच्या सुभेदारामार्फत बोलणें करावें हें बरें, याचा विचार करण्याबद्दल डे० गवर्नरनें आपल्या कौन्सिलशीं विचारविनिमय करावा. शिवाजीला पत्र लिहितांना डे० गवर्नरनें आपल्या कारकीर्दीच्या आरंभींच मतभेद झाला याबद्दल खेद दाखवून कायमच्या मित्रत्वाची इच्छा प्रदर्शित करावी; आणि यापुढें मग त्याच्या कडून येणें असलेला पैसा, त्याच्या मुलखांतून दळणवळणाचें स्वातंत्र्य, कैद्यांची सुटका वगैरे अवश्य ते विषय आणावा. शेवटीं खांदेरीचाहि उल्लेख करावा. डे० गवर्नरनें किल्ल्याचा बुरुज मजबूत करण्याची शिफारस केली. परंतु येणाऱ्या खर्चाचा तपशील कळेपर्यंत त्याचा विचार लांबणीवर ठेवण्यात आला. मुंबईकरांच्या मागणीप्रमाणें न्यू इंग्लंड गलबत खांदेरीजवळ ठेवावें, म्हणजे निकाल त्वरेनें होईल असें आहे. परंतु तें गलबत लवकर सज्ज होत नाहीं व ह्या बाजूला शिवाजीचें भय नाहींसें झालें नाहीं, याकरितां कॅ० कुक व गोल्ड्सबरो यांनींच तिकडे दिसें. पर्यंत राहून मुंबईकरांना योग्य ती मदत द्यावी असें त्यांना हुकूम पाठवावे.

फॅ. रे. मुंबई मा. १९ (२१६६) श. १६०१ कार्तीक शु. ८
पृ. ६६-६७ इ. केग्विन-मुंबई. इ. १६७९ नोवेंबर १

चंद्र खालीजाईपर्यंत आमच्या नागांवच्या तोंडाशीं ठेवावयाच्या होडया किनाऱ्यावरून पाहिल्या जाण्याच्या भीतीनें निघू शकल्या नाहींत. शत्रूच्या होडयाहि त्याच वेळीं किनाऱ्याकडे निघाल्या. परंतु त्यांचीं वल्हीं आमच्यापेक्षां अधिक त्वरेचीं असल्यामुळें त्या सहज निसटून नागांव खाडींत शिरल्या. तेथील कित्येक गुराबांनीं आमच्या होडयांवर तोफा डागल्या. परंतु आमचें कांहीं नुकसान झालें नाहीं. अशा रीतीनें आमचा बेत फसला. आतां आज रात्रीं आम्हीं बेटावर मदत येऊं न देण्याची शिकस्त करणार आहों. परंतु त्यांच्या छोटया **सरपट्या होड्या आम्हांला आश्चर्यकारक रीतीनें चकवितात.** तशाच चलाख होडया आमच्याजवळ असल्या पाहिजेत.

सदर मा. ८ पृ. ६१, **ता. १ नोवें**, मुंबई-केग्विनः—आज सकाळीं तोफांचे आवाज ऐकले ते कशाचे होते ?

सदर मा. १९ पृ. ६७, **ता. २ नोवें.** केग्विन-मुंबई—आज रात्रीं बेटावरच्या होडयांना आम्हीं हालूं दिलें नाहीं. रात्रीं नागांवच्या मुखाशीं पूर्वरात्रींप्रमाणें आम्हीं येऊं अशा अपेक्षेनें १२ गुराबा त्यांनीं ठेविल्या होत्या. त्या सकाळीं फिरून आंत गेल्या.

सदर, पृ. ६७-६८ **ता. ३ नोवें.** केग्विन-मुंबई: — सकाळीं गलव्हेतांवर व बेटावर त्यांच्या व आमच्यांत गोळागोळी झाली. लढाई होते असें पाहून गुराबा बाहेर आल्या. परंतु आमचे मचवे व शिबाडें आमच्याकडे आलीं व आम्हीं शत्रूजवळ जाऊं शकलों नाहीं, व युद्धास तोंड लागलें नाहीं. **त्यांचीं गलबतें फार चलाख** व आमच्या होडया खराब आहेत. ३ माणसांची एक होडी पकडली. ते, आपण मुंबईचे आहोंत असें म्हणतात. कैदी म्हणून पाठविले आहेत. तपास करावा.

फॅ. रे. मुंबई मा. १९ (२१६७) श. १६०१ कार्तीक शु. १०.
पृ. ७२-४ इ. सुरत-मुंबई इ. १६७९ नोवेंबर ३

तुमच्या २२ तारखेच्या पत्रांत दौलतखानाच्या झालेल्या नुकसानीबद्दल वाचलें. त्यामुळें बेट हस्तगत होण्याचें दूर राहून शिवाजी मात्र चिडून जाऊन तटबंदी त्वरित करून खुद्द मुंबईवर हल्ला करण्याचा विचार करील. तेव्हां, असल्या समर्थ शत्रूशीं युद्ध करण्यास आपलें असमर्थत्व आणि **वादांतील बेटावरील आपला हक्क तितका जोराचा आहे किंवा कसें याबद्दलची शंका** [ for a place *not unquestionable*, whither we have a real right to it or noe ] आणि देशांतील लोकांशीं भांडण करण्याबद्दल व खर्च वाढविण्याबद्दल कंपनीची अनिच्छा व सूचना यांचा चांगला विचार करून पहातां शिवाजीशीं चालू झालेलें भांडण शक्य तितक्या

लवकर मिटवावें असा आम्हीं निश्चय केला आहे; व शिवाजीचें पत्र आणि त्याला धावयाच्या उत्तराच्या नकला तुमच्याकडे पाठविल्या आहेत; आणि तहाचें बोलणें करण्याकरितां डे० गवर्नरलाच नेमिलें आहे. चौलच्या सुभेदारामार्फत बोलणें करावें किंवा कसें याचा मुंबईच्या कौन्सिलनें विचार करावा. डे० ग०च्या पत्रांत याबयाचे विषयांत [मागीलप्रमाणेंच], चालू युद्धांतील घेतलेलें शिबाड, गुराब व कैदी यांबद्दल उल्लेख असावा. परंतु ज्या विधानाच्या योगानें बेटावरील त्याचा हक्क, तटबंदीचा किंवा ताबा राखण्याचा अधिकार मान्य केल्यासारखें होईल असें कांहीं लिहूं नये.

**शिवाजी**च्या मुलखांत नाश किंवा त्याच्या आरमाराची जाळपोळ करण्यास आमची संमति नाहीं. कोणीं आधीं आमच्यावर हल्ला केलाच तर आम्हीं फक्त प्रतिकार करतों ही आपली न्याय्य बाजू राजा व जग यांच्यापुढें राहिली पाहिजे.

लंडन गलबत पाठवितां येत नाहीं. पोर्तु०प्रमाणेंच सिद्दीच्याहि मनांत आम्हांला एकट्यालाच लढावयास लावून आपला फायदा करून घ्यावा असें आहे. तेव्हां **शिवाजीशींच सलोखाकरून** या दोघांना फायदा न घेऊं देण्यांत आपलें हित आहे.

फॅ. रे. सुरत, भा. ४ पृ. ८८–८९, ता. ३ नोव्हें. सुरतहून कॅ० गोल्डसबरो व कुक यांनीं आपलीं जहाजें घेऊन, मुंबईचे लोक शिवाजीला भेदरून गेले आहेत, त्यांच्या आश्वासनाकरितां ७ डिसें. पर्यंत तेथें रहावें असे हुकूम.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. मुंबई भा. ८ पृ. ६१ इ. | (२१६८) मुंबई-केग्विन | श. १६०१ कार्तीक शु. ११ इ. १६७९ नोव्हेंबर ४ |

तुमच्याकडील वर्तमान समाधानकारक नसून खर्च मात्र वाढत आहे. मत्यहीं **आशेची निराशाच होत आहे.** *आतां नॅर्मेंव व ह्यूजेस ह्यांच्याबरोबर हंटर फ्रिगेट* पाठवीत आहों. त्यांनीं लहान जहाजांचें नेतृत्व घ्यावें व अधिक यश मिळवून दाखवावें. पृ. ६२—कॅ. नॅर्मेव्हला नेमणुकीचा हुकूम.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. मुंबई भा. १९ इ. | (२१६९) केग्विन-मुंबई | श. १६०१ कार्तीक शु. १२ इ. १६७९ नोव्हेंबर ५ |

पृ. ६८— ठाण्याला ३ जखमी लोक घेऊन जाणारी बोट अचानक आढळली. आमच्या नावा व त्यांच्या गुरावा यांची चकमक झाली. आतां ते जवळ आले असून वारा पडला आहे. वारा चालू झालाच तर आम्हीं लढूं. कांहीं केलें तरी ते आमच्यापासून गोळीच्या टप्प्यांत येत नाहींत.

पृ. ६८–६९. ४ तारखेला त्यांच्या गुराबा व गलबतें रात्रीं किनाऱ्याच्या बाजूनें बाहेर आलीं. गलबतें बेटाच्या उत्तरेकडे व गुराबा दक्षिणेकडे वळलीं. आमच्या होड्यांनीं

बेटाच्या गोळीच्या टप्प्यापर्यंत गलबतांचा पाठलाग केला. पण आम्हांला एकहि पकडतां आलें नाहीं. वारा पडल्यामुळें रिव्हेंज व फॉर्चून दोघांच्याहि पाठलागांतून गुराबा वांचल्या.

५ तारखेस गलबतांना घेऊन जाण्याकरितां गुराबा उत्तरेकडे किनाऱ्यानेंच आल्या. आमचीं शिबाडें व मचवे त्यांच्याशीं झुंजले. परंतु थोडयाच वेळांत ते विनाप्रतिकार नागांव-मध्ये शिरले. अशा रीतीनें दोन्ही वेळीं दुर्दैवानें हात दाखविला ! आतां हंटर आल्यामुळें खाडीच्या तोंडाचे ठाव घेऊन तेथें शत्रूच्या आरमाराला कोंडून धरण्याचा बेत करीत आहोंत. ते आमच्याशीं लढाई कधींच देणार नाहींत.

पृ. ७०-७१ ता. ७ नोव्हें. नागांवच्या नदीच्या तोंडाशीं ६ तारखेला ५ वाजतां आम्हीं येऊन पोंचलों. आम्हीं बाहेरून व होडया आतल्या बाजूला आहेत. ओहोटी त्वरेनें येते तेव्हां होडया बाहेर याव्या व जमिनीवर कोरडया पडूं नयेत म्हणून आम्हांला एकदम सटकावें लागतें. आतां खाडींतून होडया किंवा गुराबा बाहेर येऊन बेटाला मदत पोंचवूं शकणार नाहींत. मात्र थळचा बंदोबस्त करण्यास आम्हांस गलबतें लागतील. आम्हीं चौलजवळ असल्यामुळें पाणी स्वतःच मिळवूं.... त्यांचीं गलबतें भरतीच्या वेळीं तोंडाशीं येऊन परत गेलीं.

पृ. ७५, ता. १३ नोव्हें. खांदेरीला परत आल्यापासून शत्रूची कांहींच खबर लागली नाहीं.

फॅ. रे. मुंबई मा. १९ } पृ. ७४ इ. } (२१७०) सुरत-मुंबई { श. १६०१ कार्तीक शु. १५ { इ. १६७९ नोव्हेंबर ७

हंटर बरोबर सविस्तर पत्र पाठविलें आहेच. शिवाजीचे लोक बेटाला कुमक पाठवितात. आणि तटबंदीहि करितात व त्यांना तुम्हीं अडथळा करूं शकत नाहीं हें पाहिलें म्हणजे **शिवाजीशीं तडजोड करावी** असेंच आम्हांला पुनः लिहावयाचें आहे. बेटावर भडिमार करण्याची तुमची इच्छा आहे त्यास दोन युरोपीय गलबतें तुम्हांला दिलीं आहेत. त्यांच्याकडून शक्य तें करून घ्यावें. आपलें पराकाष्ठेचें सामर्थ्य खर्च करून अपयश आलेंच तर शिवाजी आपलें बोलणें धुडकावून व वर चिडून जाऊन खुद्द मुंबई-वरहि प्रयत्न करील. अशा वेळीं मुंबईचें चांगलें रक्षण तुमच्या हातून होईल किंवा कसें याचा विचार करावा.

श्री. सं. चा. ३१ } सु. १०८० सवाल १४ } (२१७१) { श. १६०१ कार्तीक व. २ { इ. १६७९ नोव्हेंबर ९

अनाजी दत्तो— भानजी गोपाळ सुभे. व कार. प्रांत कन्हाड.

पूर्वीप्रमाणें स्वतः जाऊन चाफळचा नेहेमीं प्रों महोत्सव होये तें करणें.

फॅ. रे. मुंबई } (२१७२) { श. १६०१ कार्तीक व. ३
भा. १९ पृ. ७१ इ. } केग्विन, नागांव-मुंबई. { इ. १६७९ नोव्हेंबर १०

नागांव सोडून खांदेरीला परत जाण्याचा हुकूम पोंचला. मोठ्या कष्टानें आम्ही परत फिरलों. सिद्दी आल्यावर त्याचें शक्य त्याप्रकारें स्वागत केलें जाईल. आतांच्या इतकी सुंदर चकडबंदी कधींच झाली नव्हती. त्यांनीं आम्ही तेथें असेपर्यंत बाहेर येण्याची आशाच सोडून देऊन किनाऱ्यावर आम्हीं घुसूं नये म्हणून गुराबांतील तोफा काढून त्या किनाऱ्यावर चढविल्या होत्या.८ तारखेला त्यांनीं आमच्यावर निष्फळ गोळीबार केला. शत्रूनें संशयानें पकडलेल्या दोन होड्या सोडून देण्याबद्दल चौलच्या सुभेदाराची विनंति आम्हीं मान्य केली. त्या होड्यांकडून असें समजलें कीं, आमचीं गलबतें तोंडाशीं आहेत तोंपर्यंत शत्रूचें आरमार बाहेर पडणारच नाहीं.

सदर भा. ८ पृ. ६२, ता. सदर, मुंबई-केग्विनः--' नागांवहून हालून खांदेरी-जवळ येण्याबद्दल हुकूम. सिद्दी येत आहे त्याला नीट वागवावें.' या पत्राला हें वरील उत्तर आहे.

फॅ. रे. मुंबई } (२१७३) { श. १६०१ कार्तीक व. ९
भा. १९ इ. } केग्विन, हे. के.—मुंबई { इ. १६७९ नोव्हेंबर १६

पृ. ७५-६ सिद्दी सुमारें ३ वाजतां बेटासमोंवतीं फिरून आला. ' बेटाची मजबुती विशेष नसून वर फक्त ३०० शिपाई व २०० बेगारी आहेत तेव्हां आपण बेटावर एकदम हल्ला करणार ' असें तो म्हणाला. उभयतांच्या गलबतांची रचना परस्परांना अपायकारक न होण्याच्या दृष्टीनें कशी करावी हें ठरविण्याकरितां त्यानें मला बोलाविलें. परंतु तुमच्याकडून उत्तर मिळावें म्हणून सोमवारची मुदत मीं दिली आहे.

डाग रजिस्टर १६७९ } (२१७४) { श. १६०१ कार्तीक व. ९
पृ. ५४० इ. नोवें. २६ न्यू. } { इ. १६७९ नोव्हेंबर १६

कॉरोमांडिलचीं पत्रें:--खंडणीबद्दल जबरदस्त धमकी मोंगलांनीं गोवळकोंड्याला दिली आहे. शहाजादा मुअझ्झमचें एक आणि दिलीलखानाचें दुसरें अशीं दोन प्रबळ सैन्यें गोवळकोंड्याच्या विरुद्ध उतरलीं आहेत असें कळतें. परंतु मोठें सैन्य घेऊन खेळ खेळणारा शिवाजी एकदां हाला तर दुसऱ्यानें दुसऱ्यालाच सपाटा लगावण्याचा उद्योग पुनः सुरू करीत असल्यामुळें त्याला भिऊन ह्या सर्व धमक्या वितळून जातील. असें वाटतें !

फॅ. रे. मुंबई } (२१७५) { श. १६०१ कार्तीक व. १०.
भा. ८ पृ. ६३-६६ इ. } मुंबई-सुरत { इ. १६७९ नोव्हेंबर १७

आमची होप्ह नांवाची गुराब शत्रूच्या हातीं सांपडली. तीवर ६ रांगा शिपाई,

अंमलदार, वगैरे होते. त्यांत २० जण युरोपीय होते. त्यांची भरती होणें अशक्य आहे. शिवाय तीवरील तोफा आतां खांदेरीवरून आमच्यावरच रोखल्या जात आहेत! याचा विचार करून दुसऱ्या गुराबा अशाच हातीं लागूं नयेत म्हणून मदतीकरितां दुसरीं शिबाडें व एक तिरकटी तारूं पाठविलें.

ह्या प्रकरणाचा निकाल करण्याबद्दल तुमचे विचार कळले. आम्हींच बोलणें लाव-ण्याकरितां इसम पाठविला, तर खांदेरी न सोडतां मध्यंतरींच्या काळांत तो तटबंदी पुरी करून तेथेंच तो जबरदस्त होऊन बसेल; मुंबईच्या व्यापाराला व वसतीला त्रासदायक होईल; आणि मुंबई बेट या त्रासामुळें ओसाड पडेल.

पोर्तु०नीं सर्व तऱ्हेनें आपल्याशीं मित्रत्व दाखवून शिवाजीला त्याच्या मुलखांतून जाण्यास बंदी करून, स्वतः बंदोबस्त करून शिवाय आमचीं शिबाडें, मचवा बंदोबस्ता-करितां आपल्या हद्दींत राखून व लागेल ती सामुग्री विपुल व स्वस्ताईनें देऊन आम्हांला मदत केली आहे. गोव्याहून खांदेरी प्रकरणीं आम्हांला साहाय्य देण्याकरितां मोठें सैन्य येत आहे असेंहि ते म्हणतात. परंतु तें विश्वसनीय वाटत नाहीं. सिद्दीचा शक्य तो उपयोग करून घेऊं. परतु त्याच्यावर तितका विश्वास ठेवितां येईल असें वाटत नाहीं. थोडा पत्रव्यवहार व बोलणें झालें त्यावरून बंदराच्या किनाऱ्याला असलेल्या शिवाजीच्या मुलखाची लूट अद्यापपर्यंत त्याला करावयास मिळाली नाहीं; ती मिळावी असा त्याचा इरादा दिसतो. त्यापासून आपण त्याला परावृत्त केलें पाहिजे. खांदेरीवरील लोकांना गेले ८ दिवसांत कांहींच सामुग्री मिळूं शकली नाहीं. १० दिवसांत ते पके टेकीस येतील. याचा फायदा घेऊन सर्व निकाल आपल्या हातून व्हावा अशीच सिद्दीची इच्छा आहे. अशा रीतीनें हें प्रकरण बादशहाच्या हवालीं केल्याने आतांच आमची खर्चांतून सुटका होईल हें खरें. परंतु झालेला खर्च व घेतलेले कैदी या बाबतींत कांहींच भरपाई मिळणार नाहीं. बरें, आतां तो आमच्यावर चिडला आहे त्यापेक्षां अधिक चिडणें शक्यच नाहीं. तेव्हां हें काम असेंच पुढें चालवून एकदां सोक्षमोक्ष करण्याची परवानगी मिळेल, व त्याच्या किनाऱ्यावर नाहीं तरी खांदेरीवरच जोराचा प्रयत्न आम्हांला करतां येईल तर सर्व प्रक-रण सन्मानानें मिटेल. नाहींतर अनिष्ट परिणाम होऊन मुंबई बेटाचे रक्षणांत अमर्याद खर्च करावा लागून रहिवासी भेदरून बेट सोडून जातील. तरी आमचीं २२ व २७ चीं पत्रें पाहून आम्हां सर्वांना अभिमानास्पद असा हुकूम यावा.... ५ तारखेला युद्ध झालें. त्यांत आमच्याकडील फक्त ५ लोक जखमी झाले. एकाचा फक्त हात तुटला. चौलहून असें कळलें कीं, त्यांचे १०० लोक मेले व १०० जखमी झाले. आमच्या लहान होड्यांनींहि त्यांना चांगलाच हात दाखविल्यामुळें ते आतां आमच्या वाटेस पुनः जाणार नाहींत.

आमचीं गलबतें बाहेर आहेत तोंपर्यंत त्यांना तटबंदीच्या कामीं अडचळा कर-

'ण्याची आम्हांला आशा वाटत आहे असेंच या पत्रांत आम्हीं लिहिलें आहे. पूर्ण सामर्थ्य वापरावयाचें नसेल तर शिवाजीकडून कांहींच हातास लागणार नाहीं. समुद्रावर तो प्रबळ नाहीं. आमच्या मुंबई बेटाचा आम्हीं पक्का बंदोबस्त केला आहे व किल्ल्यावरून -खूण करतांच, प्रसंग पडलाच तर आमचीं गलबतें आम्हीं बोलावूं शकूं; अशा रीतीनें आम्ही पक्के सुरक्षित आहोंच.

फॅ. रे. मुंबई } (२१७६) { श. १६०१ कार्तीक व. १०
मा. ८ पृ. ६७ इ. } मुंबई-केग्विन { इ. १६७९ नोव्हेंबर १७

आज तोफांचे आवाज ऐकले. बहुधा ते बेटावरील असावे. सिद्दीचीं गलबतें किनाऱ्याजवळ जातील तेव्हां त्यांचें काय चालतें इकडे लक्ष न देतां, प्रसंगीं सावध रहावें अशा बेतानें आपली गलबतें जुटीनें ठेवा. कालांतरानें सामग्रीच्या तुटवड्यामुळें त्यांचे हाल चालू झाले म्हणजे सिद्दीच्या ताब्यांत जाण्यापेक्षां ते तुमच्याच स्वाधीन होतील. अशी खूण त्यांच्याकडून होतांच मुख्य सुभेदाराच्या नांवचें पत्र आम्हीं दिलें आहे तें घेऊन कोणाला तरी पाठवून, '५०।६० मुख्य इसमांना ओलीस देत असाल तर गलबतावर पाठवावें. नंतर आम्हीं बेटावर जाऊन तावा घेऊं' असें कळवावें. १२ रांगा घेऊन बेटावर जावें; व लगेच आमचें निशाण बेटावर चढवावें; आणि तेथील लोकांना निःशस्त्र करून आपल्या गलबतांवर पाठवावें. सिद्दीनें गलबतावर बोलाविल्यास कसें वागावें हें आधीं लिहिलेंच आहे [!].

ओ. कॉ. मा. ४० } (२१७७) { श. १६०१ कार्तीक व. ११
नं. ४६७५ इ. } सुरत-कंपनी { इ. १६७९ नोव्हेंबर १८

गेल्या मार्चांत राजापूरच्या वखारवाल्यांना घेऊन येण्याकरितां रिव्हेंज गलबत पाठविलें असतां तेथील सुभेदारानें त्यांना येऊं दिलें नाहीं. त्यांना किंवा कारवारच्या वखारवाल्यांना (शिवाजीनें कैद न केल्यास) त्यांस आणण्याची दुसरी कांहीं युक्ति केली पाहिजे. परंतु शिवाजीचा व आमचा नुकताच विवाद झाल्यामुळें काय होईल याची चिंता लागली आहे. [पुढें हेन्द्रीकेन्द्री प्रकरण दिलें आहे.] तुमच्या हुकमाच्या अभावीं विलायतच्या गलबतां करवीं हल्ला करणें वगैरे कांहींच शक्य झालें नाहीं. मात्र विरोध करण्यामध्यें व शिवाजीपासून-मुंबई बेटाचें रक्षण करण्यामध्यें तुमच्या आज्ञेबाहेर पुष्कळ खर्च होत आहे. तरी नक्की हुकूम त्वरेनें पाठवा. नाहींतर सर्वच कांहीं नाश पावेल.

फॅ. रे. मुंबई } (२१७८) { श. १६०१ कार्तीक व. ११
मा. १९ इ. } केग्विन-मुंबई { इ. १६७९ नोव्हेंबर १८

पृ. ७६-७७-१७ तारखेला तुम्हीं ऐकलेल्या तोफा म्हणजे बेटाजवळ वरवा करून

राहिलेल्या सिद्दीनें बेटावर मारलेले निष्फळ बायबार होत ! बेटावरील शरण-चिठ्ठीची आम्ही मार्गप्रतीक्षा करीत आहों. तसाच सिद्दीहि वाट पहात असून जबरदस्तीनें तो आमच्या यशांत वाटेकरी होणार असें दिसतें. तरी सिद्दीशीं लढून त्याला बेटावर उतरूं देऊं नये कीं काय तें कळवावें. त्याचा नाखुदा येऊन बेटावर तोफा कशा लावाव्या याबद्दल सांगत असतां 'मी दोन धन्यांचा नोकर असल्यामुळें मजला तुम्ही तसें सांगूं शकणार नाहीं' असें मीं त्याला सांगितलें. सिद्दीच्या सेनापतीनें व खुद्द सिद्दीनेंहि त्यांच्या गलबतावर मला बोलाविलें. पण तुम्हांला वाईट वाटेल म्हणून मी अजून त्यांच्याकडे गेलों नाहीं.

पृ. ७७-**ता. १९ नोव्हें**:—आज सकाळीं शिवाजीचें आरमार आलें व त्यानें इंग्रजांचे निशाण फडकविणाऱ्या एका शिबाडाचा पाठलाग केला. सिद्दीचीं गलब्हेटें त्या बाजूला गेलीं. परंतु त्या पूर्वींच तें नागाव नदींत शिरलें. सिद्दी व बेटावरील लोक आपसांत निष्कारणच गोळागोळी करितात. वास्तविक आम्ही बेटाला अधिक जवळ राहिलों आहोंत. तरी आमचा कांहींच युद्धप्रसंग होत नाहीं !

पृ. ७७-७८. **ता. २० नोव्हें**:—आज विशेष कांहींच झालें नाहीं. प्रसंग पडतांच त्यांच्या शरणचिठ्ठीचा स्वीकार करण्याच्या तयारीनें आम्ही पहारा करीत आहों.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. मुंबई मा. ८<br>पृ. ६८ इ. | (२१७९)<br>मुंबई-केग्विन. | श. १६०१ कार्तीक व. १३<br>इ. १६७९ नोव्हें. २१ |

**सिद्दी**बद्दल पत्र पोंचलें. **तो आला नसता तर बरें झालें असतें** असें वाटतें. परतु त्याच्याशीं आपण सलोखा ठेविला पाहिजे. आम्हांला कांहीं त्रास न देण्याची बहुधा तो सावधगिरी घेईलच. परंतु आमच्या गलबतांवर, किंवा तें बेट आमच्या ताब्यांत आल्यावर त्यावर तोफा मारून किंवा अन्य मार्गानें तो शत्रुत्व दाखवील तर सामोपचाराचे मार्ग थकल्यावर तुह्मी बेलाशक आत्मसंरक्षण करावें; असें तुम्हांला कळवून ठेवणें भाग आहे. सोबत हे० के०च्या सुभेदाराकरितां पत्र दिलें आहे हें प्रसंगीं त्याला पोंचवावें. बेट ताब्यांत दिलें तर ते आपल्यासच देतील. करितां गुप्तपणें सर्वांचं तावा घ्यावा. आमचें निशाण दाखविणाऱ्या शिबाडाचा शत्रूनें पाठलाग केला त्याचें काय झालें ? तुह्मीं त्याच्या बचावाकरितां कांहींच कसें केलें नाहीं ? आज दोनप्रहरीं इतक्या बऱ्याच तोफा कसल्या झाल्या ?

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. मुंबई मा. १९<br>पृ. ७८-७९ इ. | (२१८०)<br>केग्विन-मुंबई. | श. १६०१ कार्तीक व. १३<br>इ. १६७९ नोव्हेंबर २१ |

आज सकाळीं ६ वाजतां शिवाजीच्या लोकांनीं पांढरा बावटा उभारला. आम्हीं एक मचवा जवळ पाठविला पण त्याला उत्तर मिळालें नाहीं. पाठवावयाचें पत्र आपल्या कडून आलें नसल्यामुळें आम्हीं आपसांत मनुष्य पाठवावा किंवा कसें याचा विचार केला.-

इतक्यांत तुमच्याकडून पत्र हातीं आलें. परंतु बेटावरून पक्कें चिन्ह कांहींच नसल्या-मुळें आम्ही थांबलों. पुनः मचवा पाठविला तरी तेंच तादस्थ्य दिसून आलें. कांहीं झालें तरी आमची होडी किंवा माणसें आम्हीं धोक्यांत घालणार नाहीं. त्यांच्या मनांत आलेंच तर आमच्याकडे पाठविण्याजोगी त्यांच्याकडे होडी आहे असें दिसतें. काल ती कशी आंत शिरली हें समजत नाहीं, पण पूर्वी ती तेथें नव्हती. सिद्दीनें काल मला बोलावणें करून बेटावरून गुराबा किंवा शिबाड तयार करून ते जातील असें कळविलें. परंतु आमच्या ताब्यांतून कोणी निसटणें शक्य नाहीं अशी माझी खात्री आहे. शिवाजीच्या आरमारानें पाठलाग केला तें शिबाड स्पष्टपणें त्याच्या हातून निसटलेलें आम्हीं पाहिलें; म्हणून हाललों नाहीं. नाहींतर खासच मदतीकरितां धावून गेलों असतों. तें पुढें कोठें गेलें हें आम्हांला माहीत नाहीं. तोफांचा गोळीबार बेट व सिद्दी यांच्यामध्यें होतो. तो एक करमणुकीचा प्रकार आहे असें त्याचा नाखवा मला सांगत होता,...सिद्दीनें तह कर-ण्याकरितां माणसें पाठविल्याचें कळलें. आम्हींहि आमचेंकडून प्रयत्न करण्याचें ठरवून एक गलबत, एक डच मन व एक पोर्तु० असे पाठविले. ‘ किनाऱ्यावर येऊन हातांत पाणी घेऊन शपथ घेतल्यास आपण तुम्हांला इजा करणार नाहीं ’ असें शत्रुपक्षाकडून सांग-ण्यांत आलें. ‘ शरण आल्यास आम्हीं तुम्हांला चांगलें वागवून इतरांपासून तुमचें रक्षण करूं ’ असें आमच्याकडून सांगण्यांत आलें. ‘असें असून बारा महिने झाले तरी आम्ही बेट ताब्यांत देणार नाहीं. परंतु पत्र किंवा दुसरी कांहीं गोष्ट बोलावयाची असेल तर उत्तर-प्रत्युत्तराकरितां परवल देऊं ’ असें त्यांनीं सांगितलें. अर्थात् आम्हीं पत्र न देतां तुमच्या हुकमाची वाट पहात आहों.

डाग रजि. १६७९ } (२१८१) { श. १६०१ कार्तिक व. १३
पु. ५५४ इ. डिसें. १ न्यू. } { इ. १६७९ नोव्हें. २१

मध्यंतरीं दक्षिण कॉरोमंडेल किनाऱ्यावरील ओजरपलम [ ? ] नांवाचा महत्त्वाचा किल्ला शिवाजीनें घेतल्यामुळें तंजावरचा सर्व प्रांत त्याच्या ताब्यांत आला आहे. एकोजी राजा शिवाजीचा सावत्र भाऊ असून स्वतः सुस्थित होता; असें असतांनाहि अरिआलूर प्रांत हा अत्यंत उघडा असल्यामुळें तो शिवाजीला कांही-चाहि विरोध करूं शकला नाहीं. हुकतेंच ट्रिमेलवास येथील कंपनीची वखार व घरें यांच्यावर हल्ला करून तीं लुटण्याचा त्याच्या एका सेनापतीचा विचार होता. परंतु आमचे लोक अंशतः आधींच सावध झाले होते. त्यांनीं आपल्या ठिकाणीं बंदोबस्तानें राहून गोळीबार केल्यामुळें त्याचे कित्येक लोक मेले व जखमी झाले. यामुळें शेवटीं कंपनीच्या लोकांना आपल्या मालासह नागापट्टणला जाऊं देण्यास तो तयार झाला.

आणखी अशी बातमी आली कीं, मोंगल सेनापति दिलीरखान आपलें सैन्य घेऊन भिवरा ओलांडून विजापुरावर चाल करून तेथून ८१९ मैलांवरील एका ठिकाणीं आला.

शिवाजीहि विजापूरच्या जवळच पश्चिमेस निम्या अंतरावर होता. त्याच्याबरोबर १०।१२ ह. स्वार होते. तो मदत देण्याकरितां विजापुरास ( लगेच ) गेला व त्याबद्दल त्याला तेथील दरबारनें दरसाल २००,० गिल्डरांचें उत्पन्न मंजूर केलें. कोर्टर वेंकट्टी नांवाचा एक प्रधान विजापूरची सलतनत मोंगलांच्या हस्तगत व्हावी याकरितां खटपट करतांना आढळून आल्यामुळें, त्याचा शिरच्छेद करण्यांत आला; व त्याची सर्व संपत्ति शिपाई लोकांत वाटून दिली. त्यामुळें सैन्याचा उत्साह वाढून मोंगलांची त्यांना क्षिती वाटेनाशी झाली. **शिवाजी**कडून मदत मिळण्याच्या आशेनें **गोवळकोंड्याच्या** सुलतानालाहि उत्तेजन येऊन, अगोदर तो मोंगलांना फार भीत होता त्याच्या ऐवजीं, आतां बाकी राहिलेली खंडणी देण्याचा आपला विचार नाहीं व कांहीं झालें तरी यापुढें आपण ती देणार नाहीं; असा त्यानें मुअज्झमला जबाब दिला आहे.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. मुंबई मा. १९<br>पृ. ७९ इ. | (२१८२)<br>केम्बिन-मुंबई. | श. १६०१ कार्तिक व. १४<br>इ. १६७९ नोवें. २२ |

काल रात्रीं बेटावर एक होडी आली. तिनें आम्हां सर्वांनाच चकविलें. व आमच्या मचव्यानें केलेला पाठलाग निरुपयोगी ठरला. सिद्दी वारंवार आम्हांला बोलावतो. तो गोळीबार करतो तसा आम्ही करीत नाहीं व आमच्यावरहि मराठे गोळ्या झाडीत नाहींत याचें त्याला आश्चर्य वाटतें. त्यांनीं किती लोक मारले असें विचारतां, ' मुळींच नाहीं ' असेंच ते उत्तर देतात !

पृ. ८० ता. २६ नोवें:—आम्हीं आपल्या हुकमाप्रमाणें एकेकजण सिद्दीच्या गलबतांवर जात राहू.

पृ. ८०-८१ ता. सदर:—सिद्दीनें पकडलेल्या एका इसमाकडून, सामुग्रीनें भरलेल्या नागांवच्या ८ होड्या बेटावर नेण्याकरितां दौलतखान नागांवच्या बाहेर येऊन आमच्याशीं युद्ध करणार आहे, असें कळलें. सिद्दी 'या होड्यांचा पाठलाग करून बेटावर चढाई करून बेट घेईन' असें म्हणतो. बेटांतील चारी विहिरी कोरड्या झाल्या आहेत; असें त्याच्या सांगण्यावरून समजतें. त्याच्याजवळ ६ खंडी दारू व १००० गोळे, १२ मोठ्या तोफा, ५६० शिपाई, २०० बंदूकवाले व ३०० तरवारवाले आहेत. किनाऱ्यावरील सुभेदार त्यांना मजूर पुरविण्यास तयार नाहीं. तेथील शिपाई शरण येण्यास तयार आहेत; परंतु शिवाजी त्यांचीं व त्यांच्या बायकामाणसांचीं डोकीं कापील असा त्याचा निरोप आल्यामुळें ते लोक भितात. बेट घेण्यास आम्हीं मदत करावी असें सिद्दीचें म्हणणें आहे. जर या माणसाचें म्हणणें खरें असेल तर लवकरच रसदेच्या तुटवड्यामुळें तेथें बंड होईल. तेथें तांदूळ व मीठ यांशिवाय खाण्यास कांहींच राहिलें नाहीं. सिद्दीनें अचाटी मारल्यास सर्व कांहीं त्यालाच मिळेल. सुरतेहून माणसें येण्याची तो वाट पहात आहे. काल त्याला

एक गलबत येऊन मिळालें. परंतु आम्हींच अघाडी मारून एकदांचा सोक्षमोक्ष करून टाकूं या. आतांची वेळ गमावल्यास फिरून ती संधी परत येणार नाहीं.

पृ. ८१, ता. २७ नोव्हें:--सिद्दीनें बेट व किनारा यांच्या मध्यभागीं स्वतंत्र हालचाली चालू केल्या. गेल्या २ दिवस त्यांनीं आम्हांला भेट दिली नाहीं. बेटावर तटबंदी अद्याप चालू आहे. पाण्याची होडी गमावली याबद्दल खेद वाटतो.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. सुरत मा. १०८<br>पृ. ७६ इ. | (२१८३)<br>कारवार-सुरत. | श. १६०१ मार्ग. शु. १<br>इ. १६७९ नोव्हें. २४ |

शिवाजीशीं वैर सुरू झालें याचा आम्हांला खेद होतो. अद्यापपर्यंत त्यामुळें त्रास झालेला नाहीं. परंतु वैर अधिक तीव्र झाल्यास आमच्या रक्षणाकरितां उपयोगी पडावी म्हणून मुंबईहून टोपशांची १ रांग पाठवावी. शिवाजीनें या प्रांतांत अण्णाजीचा भाऊ सोमाजी पंडित हा अंकोला, कारवार, सिवेश्वर, फोंडा इत्यादि किल्ल्यांवरून ३० एक तोफा काढून पन्हाळ्यावर नेण्याकरितां पाठविला आहे. मजूर, रेडे वगैरे लावून त्या पन्हाळ्याकडे ओढीत नेल्या जातील. **शिवाजी** सर्व कोंकण दक्षिण्यांच्या हवालीं करीत आहे; अशी सर्वांची समजूत झाली आहे.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. मुंबई मा. ८<br>पृ. ६९ इ. | (२१८४)<br>मुंबई-केंबिन. | श. १६०१ मार्ग. शु. ३<br>इ. १६७९ नोव्हें. २६ |

सिद्दीशीं कुरापत काढूं नये. शिवाजीच्या लोकांकडूनच ह्या भांडणाचा शेवट करणारीं पत्रें येतील अशी प्रत्येक तासाला आम्हीं अपेक्षा करीत आहों. म्हणून खांदेरीला अधिक प्रयत्न करण्याचें कारण नाहीं.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. मुंबई मा. ८<br>पृ. ७०-१ इ. | (२१८५)<br>मुंबई-सुरत | श. १६०१ मार्ग. शु. ६<br>इ. १६७९ नोव्हें. २९ |

गेल्या १५ तारखेला तुम्हांला पत्र पाठविलें त्याच वेळीं पेशव्यानें आम्हाला पत्र पाठविलें. ता. १७ रोजीं सकाळीं आम्हांला पोंचलें. लगेच संध्याकाळीं प्रत्युत्तर सिद्दीच्या बेटावरील कारवाईबद्दल सविस्तर लिहून त्वरेनें पाठविलें. 'सिद्दी एकसारखा तोफांचा भडिमार करीत आहे; ही त्याच्या (मराठ्यांच्या) राज्यावर मोठी आपत्ती आहे हें समजून व सर्वांचें होणारें नुकसान वांचविण्याकरितां जर कोणाला पाठवून हे० के०च्या लोकांनीं बेट आमच्या (इंग्र०) हवालीं करावें असें [पेशव्यानें] त्यांना कळविलें तर 'आम्हीं तें सिद्दीपासून बचावून त्याच्या तेथील लोकांची काळजी घेऊं. आणि राजाला ती गोष्ट पसंत नच पडली तर सिद्दी परत फिरल्यावर आम्ही आमचे लोक काढून घेऊन पूर्ववत् तें निर्जन रहावें म्हणून सोडूनहि देऊं.' इत्यादि त्याला लिहिलें. पुढें २३ तारखेला 'बेंगाला मर्चंट' हें गलबत आलें. पेशव्याचें अनुकूल उत्तर आल्यास तें उपयोगीं पडेल

म्हणून त्याला ठेवून घेतलें. परंतु २७ तारखेला अगदींच अनपेक्षित असें त्याचें उत्तर आलें. कारण, आम्हीं शांततेचे चहाते आहोंत म्हणून सामोपचारानें बोलतों हें त्यांना खरें न वाटतां आमची लंगडी बाजूच त्याच्यादृष्टीसमोर उभी रहाते. आतां कालच पेशवा व राजा या दोघांनाहि पत्रें लिहिलीं आहेत. त्यांत यश आलें तर आमचा युद्धाचा एवढा खर्च तरी वांचेल! दरमहा या युद्धामुळें सुमारें ५००० झेराफिन्स इतका जादा खर्च होईल असा अंदाज आहे. तरी आळसांत दिवस काढून शत्रूकडून हीं करून घेण्यापेक्षां आम्हीं आमचें आरमार परत बोलवावें काय हें कळवावें. सिद्दीला आम्हीं बेटावर तोफा डागीत नाहीं आणि त्याला शिवाजीचा मुलूख लुटूं देत नाहीं म्हणून वैषम्य वाटत आहे. ह्यांपैकीं दुसरी बाब तर स्पष्टपणें अन्यायाची असून त्यामुळें शिवाजी आमच्यावर अधिकच चिडेल. सिद्दी आमच्याशीं भरपूर स्नेहाचा आव आणितो व खांदेरीवर हल्ला करण्याचा फारच आग्रह करितो. आपण आपल्याकरितां कांहीं करीत नसून यापुढें ( आम्हांला त्रासदायक होणाऱ्या ) कोणालाच तेथें सुखानें रहातां येऊं नये असें करण्याबद्दल तो बोलतो.

२२ तारखेला मराठ्यांनीं पांढरा बावटा चढविला. तेव्हां सिद्दीनें त्यांच्याकडे एक होडी पाठविली. परंतु तिच्यावरील लोकांशीं सरळ न बोलतां बेटावरील लोकांनीं त्यांना शिव्याच दिल्या. एवढें झाल्यावर आम्हीं त्या चिन्हाचा अर्थ काय म्हणून विचारण्याकरितां होडी पाठविली. तेव्हां ते सामोपचारानें बोलले. 'पांढरा बावटा हा किनाऱ्यावरील लोकांकरितां खूण असून बेट तान्यांत देण्याचा आपला विचार नाहीं. परंतु डे० ग०चें मायनाकच्या नांवाचें पत्र घेऊन येणाऱ्यांस आपण सुखानें येण्याजाण्यास परवानगी देऊं' वगैरे त्यांच्याकडून कळलें. मायनाक स्वतः डे० गव०ला पत्र लिहिणार होता, इत्यादिहि ते बोलले. पुढें कांहींच समजलें नाहीं. बेट शरण आलें तर सिद्दी त्रास देईल असें वाटतें. आमच्यावर त्यानें हल्ला केलाच तर आम्हांला स्वतःचें संरक्षण केलेंच पाहिजे. परंतु शक्य तोंपर्यंत आम्हीं बिघाड घडवून आणणार नाहीं. तरी आम्हांला अनेक गोष्टींबद्दल हुकूम पाहिजेत, ते सविस्तर धावे. कारण पुनः उत्तर मागवावयाचें म्हणजे निदान २० दिवस जातात.

शिवाजी येथून ५ दिवसांच्या मुक्कामावर पट्टागड नांवाच्या जागीं आहे. विजापुरास दिलेरखानानें त्याचा पुरता मोड करून त्याचे २००० घोडे व कित्येक कैदी पकडल्यामुळें आपलें बहुतेक सैन्य त्याच बाजूला सोडून देऊन फक्त ५०० स्वार घेऊन स्वसंरक्षणार्थ तो इकडे पळून आला आहे. तो इतका जवळ आल्यामुळें आपल्या व आमच्या पत्रांचीं उत्तरें आतां लवकरच येतील. पेशवा तिकडेच गेला आहे. अण्णाजी पंडितहि तिकडेच जाईल असें वाटतें. पेशवा सुरतेकडे येणार होता. परंतु रणमस्तखान नांवाच्या पठाणानें त्याचे २००० लोक मारले व ४०० घोडे पकडले; यामुळें त्यानें तो रोख सोडून दिला.

फॅ. रे. सुरत भा. ४ } (२१८६) { श. १६०१ मार्ग. शु. ११
पृ. ९९–१०० इ. } सुरत कन्सल्टेशन { इ. १६७९ डिसें. ३

मुंबईच्या १५ तारखेच्या जनरल पत्रावरून आमच्या मागच्या पत्राबद्दल डे० ग० नाखूष झाला आहे असें दिसतें. मराठ्यांवर हल्ले करण्याची परवानगी दिल्यास कंपनीला अनुकूल असा कांहीं निकाल लागेल असें ते म्हणतात. त्यावर पुनः विचार करून पहातां तसें केल्यानें आमचें भरून न येणारें नुकसान होईल व त्या बाबतींत कंपनीची संमती मिळण्याची शाश्वती नाहीं. म्हणूनच शिवाजीचा खांदेरीवरील प्रयत्न थांबविण्याचा (१) शिवाजीशीं तह करणें किंवा (२) सिद्दीच्या आरमाराची मदत घेणें, याशिवाय अन्य मार्ग आम्हांला सुचवितां येत नाहीं.

डोन्ह गुरावांतील पकडलेल्या कैद्यांच्या मिठेंवणाच्या वर्तनाबद्दल त्यांचीं नांवें काढून टाकावीं. परंतु त्यांच्या विनंतीला मान देऊन योग्य दिसेल त्या मार्गानें डे. ग.नें त्यांना सामुग्री पाठवावी.

फॅ. रे. मुंबई भा. १९ पृ. ८७-८८ ता. ४ डिसें., सुरत–मुंबईः–याच बाबतींत पत्र. तुमच्या पुढच्या डाकेनें खांदेरी प्रकरणाचा उत्तम निकाल झालेला वाचावयास मिळेल अशी आशा आहे. पेशवा, दौलतखान व सिद्दी यांचीं पत्रें वाचलीं. पूर्वी प्रेसि०नें पाठविलेलें राजाच्या नांवाचें पत्र तुम्हीं थांबवून धरलें हें चांगलें केलें.

फॅ. रे. मुंबई } (२१८७) { श. १६०१ मार्ग. शु.११
भा. १९ इ. } केग्विन–मुंबई. { इ. १६७९ डिसें. ३

पृ. ८२–८३ः–सिद्दीच्या गलबतावर जाऊन थोड्या गप्पा मारल्यावर त्यांनीं पकडलेले कांहीं गुलाम नागांवचे होते असें चौकशीअंतीं कळलें. पाण्याशिवाय तडफडत ठेविला तरीहि शत्रु प्रत्यहीं प्रबळ होत आहे. तरी बेटावर केव्हां जावयाचें असा त्यानें प्रश्न केला. सर्व कांहीं मित्रत्वानें व उभयतांच्या फायद्याचेंच करूं असें मीं म्हणालों. त्याचे ७०० लोक तयार असून तो हल्ल्यास थोडा उतावीळ दिसला. मुंबईला शिवाजीचा ब्राह्मण आल्याची बातमी त्यानें सांगितली. परंतु मला कांहींच माहिती नव्हती. शिवाजीच्या दोन होड्या सिद्दीच्या गलबतांना चकवून निसटल्या. त्यांनीं (आमच्याकडील) एका जहाजाचे कप्तानाचें वगैरे नांव विचारून सांगून आपली सुटका करून घेतली.

पृ. ८५ ता. ६ डिसें.—प्रत्येक दिवशीं सिद्दी व बेटावरील लोक एकमेकांवर गोळे मारीत असतात.

फॅ. रे. मुंबई } (२१८८) { श. १६०१ मार्ग. शु.१२
भा. ८ पृ. ७२ इ. } मुंबई–सुरत { इ. १६७९ डिसें. ४

सिद्दीचीं गलबतें किनाऱ्यावर शिवाजीच्या मुलखांत जाऊन त्यांनीं शिवाजीचीं ४

खेडीं लुटून पुष्कळ कैदी आणिले. आम्हीं काल त्याला लिहिलें परंतु त्याचें अजून उत्तर आलें नाहीं.

काल दौलतखानाच्या दोन नोकरांच्या हातीं शिवाजीचें एक व दौलखानाचें एक अशीं पत्रें आलीं. राजाचें पत्र शिष्टाचारपूर्ण आहे. परंतु खांदेरी उंदेरी सोडण्याचा आपला विचार नसून तटबंदीचें काम तसेंच पुढें चालेल असें त्यांत निक्षून लिहिलें आहे. दौलतखान सिद्दीच्या जाळपोळीबद्दल तक्रार करून आम्हीं त्याला संमति दिली असावी, असा आमच्यावर आरोप करितो. आम्हींहि शक्य तितक्या लवकर हा वाद मिटविण्याच्या इराद्यानें उभयतांना आजच पत्रें लिहीत आहों.

फॅ. रे. सुरत
भा. १०८ पृ. ? इ.
(२१८९)
राजापूर–सुरत
श. १६०१ मार्ग. शु.१४
इ. १६७९ डिसें. ६

नोव्हें. २८ रोजीं अण्णाजी येथून १ मैलावर धोपेश्वर [ Duplejah ? ] च्या दर्शनाला आला असतां त्यानें २० ह. ब्राह्मणांना अन्नसंतर्पण केलें. त्यानंतर आम्हीं तेथील आमचा व्यापार थांबविण्याचें कारण आम्हांस त्यानें विचारलें. सुभेदारानें बंदी केली असें आम्हीं सांगतांच, 'पूर्वी आपण एकदां तसा हुकूम दिला होता. परंतु पुनः विचार करतां बक्षिसाशिवाय इतर बाबतींत तुम्हांला त्रास देऊं नये, असें सुभेदाराला मीं कळविलें आहे. बक्षिसाच्या बाबतींत राजाचाच बंदीहुकूम असल्यामुळे आपण कांहीं करूं शकत नसलों तरी तुमच्या वतीनें मी खटपट करून पाहीन व बहुधा मला यश येईल' असें तो म्हणाला. डेलगाडो मित्रत्वाचें पत्र त्यानें लिहून नारायण शेणव्याला बोलणें करण्याकरितां बोलाविलें असतां तो आला नाहीं तेव्हां आपणच एक मुखत्यार पाठविण्याचा आपला बेत कळवून आमच्यापैकीं एकानें त्याच्याबरोबर जाऊन शिवाजी इंग्रजांशीं मित्रत्व राखण्यास किती उत्सुक आहे हें सांगावें, अशी त्यानें विनंति केली. आम्हीं नोकर आहोंत इत्यादि नानाप्रकार सांगून तो ऐकेना, तेव्हां शेख महमदाला आम्हीं त्याच्याबरोबर दिलें. परंतु तेथून त्याच्या वतीनें कोण जाणार आहे हें अद्याप मला कळलें नाहीं.

फॅ. रे. सुरत
भा. ४ पृ. १०५–६ इ.
(२१९०)
सुरत कन्सल्टेशन
श. १६०१ मार्ग. व. १
इ. १६७९ डिसें. ८

शिवाजीनें धरणगाव, चोपडा व आसपासचीं महत्त्वाचीं गावें लुटल्याची बातमी काल रात्रीं आली. शिवाजीचा सुरतेवर डोळा आहे, या गोष्टीवर सर्वच जण तत्काल विश्वास ठेवण्यास तयार असल्यामुळें भेदरून गेले आहेत. शिवाय हल्लीं शहरांत पुष्कळ रोकड पडून असल्यामुळें त्याला तें आमंत्रणच होय. आमच्या रक्षणाचीहि पुरेशी तरतूद नाहीं. त्यातून खांदेरी प्रकरणापासून शिवाजीनें आमच्यावर चिडून जाण्यास पुरेसें कारण झालें आहे. वगैरे गोष्टी लक्षांत घेतां बचावाची तजवीज करावी. व सर्वत्र पहारे व हेर ठेवून प्रसंग येतांच स्वालीकडे पलायन करण्याची व्यवस्था ठेवावी.

फॅ. रे. मुंबई मा. ८ } (२१९१) { श. १६०१ मार्ग. व. १
पृ. ८३ इ. } मुंबई-सुरत { इ. १६७९ डिसें. ८

आपलें व डे० ग०चें पत्र घेऊन शिवाजीकडे गेलेल्या दोन नोकरांची आम्हीं वाट पहात आहों.

शिदीकडून पत्राचें उत्तर आलें आहे. 'अद्याप पर्यंत इंग्रजांच्या विरोधामुळें आम्हीं असा त्रास देऊं शकलों नाहीं, हें शिवाजीच्या लक्षांत येण्यानें इंग्रजांचेंच हित साधणार आहे' असें त्यानें मखलाशी केली आहे. पत्र घेऊन मिर्झा महमद इवास आला त्यानेंहि आमची समजूत काढण्याचा प्रयत्न केला. खांदेरी-उंदेरी स्वतःकरितां सिद्दी घेत नसून फक्त शिवाजीला तें मिळूं नये एवढीच त्याची खटपट आहे. उभयतांनीं मिळून हल्ला करून तें एकदां घेतल्यावर तें वाटेल तर इंग्रजांच्या हवालीं करण्यास सिद्दी तयार आहे; हा सर्व त्याच्या बोलण्याचा मतलब होता. आम्हींहि चांगली भाषा बोललों. तुमच्या राजाला पाठविलेल्या पत्रांची काय उत्तरें येतात इकडे आमचें लक्ष आहे.

फॅ. रे. मुंबई मा. ८ } (२१९२) { श. १६०१ मार्ग. व. ३
पृ. ८५ इ. } मुंबई-केग्विन { इ. १६७९ डिसें. १०

दौलतखान आरमाराची तयारी करीत आहे अशी आम्हांला नक्की बातमी लागली आहे. परंतु त्याचें उद्दिष्ट कळलें नाहीं. दोन तीन दिवस बाहेर राहून कृष्णपक्ष लागतांच माहीम किंवा दुसऱ्या एकाद्या ठिकाणीं मुंबईंत येण्याचा त्याचा बेत आहे, असें कळतें. पण ही गोष्ट खरी वाटत नाहीं. तथापि तुम्हीं नागांवच्या तोंडाशीं पहारा ठेवा. दौलतखान बाहेर आलाच तर त्याचा नाश करण्यास चुकूं नका. आमचे कैदी घेतले आहेत त्याचा मोबदला करण्याकरितां आम्हांला कैदी मिळावयास पाहिजे होते. जर कदाचित् दौलतखान निसटून गेलाच तर मग माहीमला गस्त घालावी. व तिकडे दौलतखान आल्याबद्दल आम्हीं खूण दिल्याबरोबर सर्वांनीच येऊन त्याचें आरमार बुडवावें. तुमचे इतके कडक पहारे आहेत परंतु त्यांना न जुमानतां बेटावरून दर दोन तीन दिवसांनीं थळकडे दोघांनीं वल्हविलेली होडी जात येत असते तिच्याबद्दल व दौलतखानाचें आरमार बाहेर पडणार आहे ह्याबद्दल शिदीला कळवा.

फॅ. रे. सुरत मा. ४ } (२१९३) { श. १६०१ मार्ग. व. ५
पृ. १०६-७ इ. } सुरत कन्सलटेशन { इ. १६७९ डिसें. १२

फिरून मुंबईकरांचें हल्ला करण्याबद्दल आग्रहाचें पत्र आल्यामुळें पुनः आम्हीं विचार केला; आणि कॅ० गोल्डसबरो व डॅनिएल यांना बोलावून त्यांचाहि सल्ला घेतला. कंपनीनें आमच्यावर घातलेलीं बंधनें, सैन्याची कमाई वगैरे गोष्टी सविस्तर त्यांच्यापुढें मांडल्यावर त्यांनींहि हल्ला करणें अदूरदर्शीपणाचें होईल असा सल्ला दिला. आरमार काढून

घेण्याबद्दलचे हुकूम देण्यापूर्वी, शिवाजीशीं तहाचें बोलणें करण्यांत येणारें यश व खादेरीला मदत करणाऱ्यांना अडथळा करण्याचे बाबतींतील यशापयश याबद्दल त्यांनीं सविस्तर कळविणें जरूर आहे.

फॅ. रे. सुरत मा. १०८ (२१९४) श. १६०१ मार्ग. व. ५
पृ. १ इ. धरणगांव (चुपडा)-सुरत इ. १६७९ डिसें. १२

२५ तारखेच्या पत्रांत शिवाजीच्या सैन्याच्या आगमनाची बातमी कळविली होती. त्याचवेळीं कळविल्याप्रमाणें काफिल्याबद्दल व्यवस्था होऊन तो मोठ्या चमत्कारानें सुरक्षितपणें निघून गेला. दुसऱ्याच दिवशीं काफिला निघाला व तिसऱ्याच दिवशीं शिवाजीचें सैन्य आलें. परंतु कंपनीचा माल व लोक वचावले. सर्व शहर जळालें, तथापि वखार तेवढी वचावली. शिवाजीचें सैन्यांत १२००० स्वार होते. येथें दोन दिवस राहून पुढें ते बऱ्हाणपूरच्या रोखानें गेले. परंतु तेथपर्यंत न जातांच पूर्वेकडे **मलकापूरला** २० ह. स्वारांसह **शिवाजी** होता त्याला मिळावयास गेले. शहाजादा शिवाजीच्या मदतीनें सिंहासन मिळविण्याची खटपट करीत आहे अशा अनेक वातम्या आहेत. या देशाची व आमचीहि परिस्थिती अत्यंत कष्टप्रद आहे. येथील सर्व फौजदार दूर देशीं गेले आहेत. आणि आम्हांला डोंगरांचा आश्रय केल्याशिवाय गत्यंतर राहिलें नाहीं. शहाजाद्याला मिळण्याकरितां दुसरी एक १२००० फौज या बाजूनें येत आहे अशी हूल उठली आहे. **औरंगाबाद आल्ल्यालुटल्याची** ताजी बातमी आली आहे. शहाजादा दिल्लीवर जाण्याचें बोलतो. बऱ्हाणपूर शहर व तेथील व्यापारी ताब्यांत देण्याबद्दल त्यानें तेथील मुख्य खानखानान याला लिहिलें आहे.

फॅ. रे. मुंबई मा. १९ (२१९५) श. १६०१ मार्ग. व. ६
पृ. २-३ (२) इ. सुरत-मुंबई. इ. १६७९ डिसें. १३

शिवाजीशीं तह करण्याच्या बाबतींत किंवा बेटाला मदत मिळण्याला विरोध करण्यामध्यें तुम्हांला यश न आल्यास मग गलबतें परत बोलावण्याचा विचार करूं. मध्यंतरीं सिद्दीशीं सलोखाच ठेवा. नाहींतर येथें आम्हांला त्रास होईल. कारवाऱ्या व इतर सर्वच यार्बाबद्दल शिवाजीकडून समाधानकारक कलमें नच मिळतील तर मग बेट शिवाजीच्या हातीं रहाण्यापेक्षां तें बादशहाच्याच हातीं जावें असा आमचा निश्चय झाला आहे. जोराच्या हड्या बद्दल आणखी दोन तऱ्हांचा विचार आमच्या मारखाच पडला. तरी शिवाजी-पासून कांहीं चांगलें निष्पन्न होत नाहीं अशी तुमची खात्री होतांच मागें पाय काढण्यांचें चांगलें कारण शोधून काढून **सिद्दीला त्याच्याशीं भांडण्यास सोडून द्या.** सिद्दी बंदराच्या किनाऱ्यावरील मुलखांत जाळपोळ करतो व तें योग्य नाहीं, हें पुरेसें योग्य कारण आहेच. **शिवाजीचा** आणि **पेदाव्याचा** पराजय झाला या तुमच्या

बातमीला विरोधक अशी बातमी इकडील आहे; तीच अधिक विश्वसनीय वाटते. कारण, या बाजूला चुपडाधरणगांव लुटणें, बऱ्हाणपूरच्या रोखें दौड करणें वगैरे जबरदस्तीचीं कृत्यें, सुरतेवर तो अचानक येणार, वगैरे बातमी हे उलट बाजूचेच पुरावे आहेत. आमच्याकडेहि विकट परिस्थिति होत आहे.

फॅ. रे. मुंबई मा. १९ पृ. ८९ इ. | (२१९६) केग्विन-मुंबई. | श. १६०१ मार्ग. व. ६ इ. १६७९ डिसें. १३

सिद्दीला नागांवच्या तेथें त्याच्या गुराबा ठेवणें आवडत नाहीं. कालच्या आमच्या बातमीवरून ते बाहेर न येतांना उत्तरेकडे जाण्याचा विचार करीत आहेत. ( मुंबईकडे जाण्याचा ) त्यांचा उद्देश आहे असें आम्हांला वाटत नाहीं. परंतु तुम्हांला संशय असलाच तर सिद्दीसमवेत आम्हीं नागांवांत त्यांना कोंडून ठेवूं. मग वेढ्यालाहि त्यांना मदत देतां येणार नाहीं. याबद्दल आम्हीं तुमचें पत्र आल्याशिवाय सिद्दीजवळ बोलणार नाहीं. नुकताच एक ( शत्रूचा ) पगार आम्हीं पकडला.

फॅ. रे. सुरत मा. १०८ पृ. रहित इ. | (२१९७) राजापूर-सुरत. | श. १६०१ मार्ग. व. ९ इ. १६७९ डिसें. १६

शिवाजी विजापूरकरांशीं तह करून सर्व सैन्यासह कोठें तरी गेला आहे. पुढें आवटो. १६ व ३० चे लेखांतील बातम्याः—

ही मागच्या पत्राची नक्कल आहे. त्यानंतर शिवाजीराजा, हमीदभाऊच्या [ ? ] हाताखालील ४००० घोडयांचा नाश झाल्यामुळें परत आला असें कळलें. राजा आतां पन्हाळ्याकडे निघाला आहे. मोंगल बादशहाकडून २००० घोडदळाची कुमक मिळाल्यामुळें दिलेरखानहि तिकडच्याच रोखानें येत आहे. राजानें पन्हाळ्याला विशेष मजबुती चालविली आहे. कोंकणांतील कित्येक किल्ल्यांच्या तोफा काढून घेऊन त्यांची मजबुती कमी करूनहि त्या पन्हाळ्यावर ठेवीत आहे. शिवाय फ्रेंचांकडून ४० तोफा नवीन घेतल्या असून, येथून त्या नेहमीं घेऊन जात असतात. थोड्याच दिवसांत या त्रासदायक युद्धाचा शेवट लागेल अशी आशा आहे.

फॅ. रे. मुंबई मा. १९ पृ. ९०–९१ इ. | (२१९८) ॲडर्टन–मुंबई. | श. १६०१ मार्ग. व. १० इ. १६७९ डिसें. १७

काल दोन वाजतां, नागांवमधून शिवाजीचीं १६ गलबतें बाहेर जाऊं लागलीं. तेव्हां सिद्दीच्या गलबतांबरोबर तिकडे जावें असा हुकूम आल्यामुळें आम्हीं आमचे मचवे पाठविले, परंतु सिद्दी व आम्ही अर्ध्या वाटेवर जातों तोंच तीं गलबतें नागांवांत पुनः शिरलीं व आम्हीं परत आलों. सिद्दी व हेन्री–केि० यांमध्यें निष्फळ गोळीबार होतो. आखाताच्या ·वा जूनें ते भिंत बांधीत आहेत तीवर २०० लोक काम करितात.

सदर पृ. २ (२)– ता. १९ डिसें:–शत्रूच्या बेटावरील भिंती बऱ्याच उंच झाल्या असून ते त्या कामीं फारच परिश्रम करितात.

सदर पृ. ४ (२)–ता. २१ डिसें:–आज सिद्दींचीं तिरकटीं तारवें व गलिवेटें नागांवाकडून परत येऊन आपल्या ठिकाणीं उभीं राहिलीं.

सदर पृ. ५ (२)–ता. २२ डिसें:— } सिद्दी व बेट यांचा परस्पर वायफळ गोळीबार.
,, ,, ता. २३ डिसें:—
,, ,, ,, २४ डिसें:—
सदर पृ. ६-७ (२)–,, २७,२८,२९ डिसें. ,, ,,
,, ,, ,, ३० डिसें:—बेटावरून पुष्कळ गोळे आले. एकानें एक कुली (कोळी का मजूर ?) मरून पटला व शिवाडाची डोलकाठी मोडली.

फॅ. रे. सुरत भा. ४ पृ. १०७ इ. } (२१९९) सुरत कन्सल्टेशन. { श. १६०१ मार्ग. व. १३ इ. १६७९ डिसें. २०

शिवाजीच्या स्वारीबद्दल अफवा येतच आहेत. तथापि सराफांनीं ५० इ. होनांची मागणी केली आहे. ती पुरवावी व कंपनीच्या मालाचा बदोबस्त करावा.

इ. वृ. १८३४ पृ. २७१ श. } (२२००) { श. १६०१ मार्ग. व. १३ इ. १६७९ डिसें. २०

विठल विस्वनाथ भट (पेशव्यांचे पूर्वज)—वे. चिंतामणभट हिंगणे.

आपले नासीक क्षेत्रीचे तीर्थपुरोहितपण वंशपरंपरा तुम्हास दिधलें असे.

फॅ. रे. सुरत भा. १०८ पृ. १ इ. } (२२०१) मुंबई–सुरत. { श. १६०१ मार्ग. व. ३० इ. १६७९ डिसें. २२

आम्हीं इतक्या वेळां लिहिलें नेंच पुनः न लिहितां तुमचे तहाबद्दल हुकूम पाळूं. खांदेरीउंदेरी मोठ्या चमत्कारानें टिकाव धरून आहे. लवकरच उत्तरेकडील वारा चालू होऊन आमचीं छोटीं गलबतें समुद्रावर टिकणार नाहींत आणि आमचा सर्व खर्च वांया जाईल. शिवाजी व त्याचे अमलदार यांच्याशीं तहाचें बोलणें आम्हीं चालू ठेविलें आहे. दोन दिवसांपूर्वी शिवाजीचें पत्र आलें. चौलचा सुभेदार तहाचें बोलणें करण्यास नेमिला आहे त्याचेंहि दुसरें पत्र आलें. काल सुभेदाराकडे एक पत्र व त्वरेनें निकाल करून खर्चाचा बोजा कमी व्हावा म्हणून एक इसमहि पाठविला. त्याच्याकडून आम्हीं मनुष्य बोलाविला आहे. या बाबतींत आम्हीं शक्य तितकें करूंच. परंतु या मानगडींत खांदेरीउंदेरी शिवाजीच्याच हातीं रहाणार अशी भीती वाटते. मुंबई बेटाचे प्रत्येक रस्त्यावर कडक पहारे ठेविले आहेत. शिवाजीच्या मुलखांतील कैद्यांबद्दल आपले हुकूम पाळूं.

फॅ. रे. मुंबई भा. १९ } (२२०२) { श. १६०१ पौष शु. २
पृ. ८ (२) इ. } सुरत–मुंबई { इ. १६७९ डिसें. २४

आमची आशा होती त्याप्रमाणें **खांदेरी हस्तगत होण्याचा अल्पहि संभव दिसत नाहीं** याबद्दल आम्हांला खेद होतो. आणि या वादाचा कांहीं चांगल्या प्रकारें निकाल लागेल तर बरें असें वाटतें. कारण एकंदाचा हा जादा खर्च संपावा आणि तुम्हांला कंपनीच्या मर्जीप्रमाणें सर्व करितां यावें अशी आमची इच्छा आहे.

फॅ. रे. संकीर्ण भा. ४ } (२२०३) { श. १६०१ पौष शु. ९
पृ. ३६ इ. } मुंबई–कंपनी. { इ. १६७९ डिसें. ३१

परिच्छेद ८–हेन्द्रीकेन्द्री प्रकरणीं कंपनीला पुष्कळच खर्च आला. आम्हीं तें संपविण्याचा प्रयत्न करीत आहोंत. परंतु अद्याप आम्हांला यश आलें नाहीं.

फ्रायर भा. ३ } (२२०४) { श. १६०१
पृ. १६१-६२ इ. } शिवाजीवर टिपणी. { इ. १६७९

औरंगजेबाला सिंहासनावरून काढण्याच्या कटांत भडोचचा सुभेदार सामील झाला आहे....मोंगल बादशहा एकंदरींत युद्धामध्यें कानापर्यंत किंवा डोक्यापर्यंतहि बुडून गेल्यामुळें बऱ्हाणपूरच्या खानाला त्यानें मदतीला बोलाविलें आहे. अशा संधींत **शिवाजी** सुरतेवर व दुसरा एक राजा बऱ्हाणपूरवर चालून येत आहेत. यामुळें भेदरून जाऊन सर्व व्यापारी लोक आपली संपत्ती व कुटुंबें घेऊन पळून जात आहेत. सुरतेचा तट आतां पुरा झाला असताहि पूर्वीचा शिवाजीचा क्रूरपणा लोकांच्या स्मरणांत असल्यामुळें त्यांना त्याचा भरंवसा येत नाहीं. हल्लींचा सुभेदार लढवय्या नसून केवळ राजकारणी वृत्तीचा असल्यामुळें त्यानें लांडग्यापुढें टाकण्याकरितां तुकडा म्हणून बनिया वर्गाकडून खंडणी वसूल केली आहे ! शिवाजीहि या वस्तुस्थितीची माहिती असल्यामुळें आसपासच्या मुलखांत जाळपोळ व लुटालूट करीत खालीं किनाऱ्याकडे उतरला आहे. सुरतेहून शांततेची किंमत म्हणून कांहीं दंड भरला जाईपर्यंत याचा हा क्रम असाच चालेल.

फॅ. रे. सुरत } (२२०५) { श. १६०१ पौष शु. १०
भा. १०८ पृ. ? इ. } मुंबई–सुरत. { इ. १६८०. जाने. १

तुमचें १३ तारखेचें पत्र पोंचलें. आज मितीपर्यंत कांहीं आशाजनक मजकूर लिहितां येण्यासारखा नाहीं. शिवाजीशीं तह करण्याची खटपट एकसारखी चालविली आहे. तीन दिवसांपूर्वी त्याचें एक पूर्वीसारखेंच पत्र चौलच्या सुभेदारामार्फत आलें. सदर सुभेदार तहाची इच्छा प्रदर्शित करून त्याकरितां खटपट करण्याचें वचन देत आहे. बोलणें करण्याकरितां त्याच्याकडून आमच्याकडे येण्यास एक इसम तयार होऊन बसला आहे.

३. कोठूनहि मुंबईस येणारीं अगर तेथून अन्यत्र जाणारीं गलबतें आपण मुंबईचीं असल्याबद्दल तुम्हांला कळविलें, तर त्यांस थांबवून किंवा दुसऱ्या प्रकारानें त्यांना अडथळा करूं नये. अशा गलबतांचें वादळांत सुकाणूं किंवा डोलकाठी मोडली तर तें गलबत किंवा वरील माल न घेतां तुम्हीं तें गलबत व माल या बंदरांत पाठविला पाहिजे.

४. आम्हांला कळविल्याशिवाय आमच्या बंदरांतील टेकडीवर तुम्हीं माणसें उतरवून तुमचें आरमार तेथें आणिलें. त्याची चौकशी करण्याकरितां आमचीं गलबतें गेलीं असतां त्यांची विचारपूस न करितां त्यांच्याशीं तुमचीं गलबतें अन्यायानें लढलीं. म्हणून आजमितीपर्यंत आमचीं मोठीं जहाजें आम्हांला तेथेंच ठेवणें भाग पडलें. त्याकरितां आम्हांला आलेला खर्च तुम्हीं आम्हांला द्यावा.

५. आमचे वखारवाले आमची मर्जी असे तोंपर्यंत वखारीच्या ठिकाणीं व्यापाराकरितां रहातील. त्यांच्या स्वातंत्र्यावर येण्याजाण्याबद्दल (तुम्हीं) कोणतींहि बंधनें घालूं नयेत. आम्हीं बोलावूं तितक्यांना व तेव्हां त्या ठिकाणाहून किनारा सोडून जाण्यास किंवा तद्देशीय लोकांना वखारीची व्यवस्था करण्याकरितां नेमण्यास प्रत्यवाय असूं नये. तसेंच वखारवाले परत आल्यावर त्यांना अप्रतिबंध पूर्ववत् व्यापार करण्याची परवानगी असावी. त्यांच्यावर कोणत्याहि प्रकारचा नोकर लादला जाऊं नये.

६. पूर्वी आपल्यामध्यें लेखी तह झाले तद्वतच हा तह मानला जाईल आणि तुम्हीं महादेवाची शपथ घेतल्यास बदलला जाणार नाहीं. करितां तुम्हीं शिवाजी राजाच्या राहीशिक्क्यानिशीं नवीन लेख त्याच्यावर व त्याच्या वारसांवर बंधनकारक असा तयार करावा. म्हणजे आम्हीं व आमचे मागून येणारे उत्तराधिकारीहि तो मानतील.

फॅ. रे. मुंबई भा. १९ पृ. ११-१२ इ. } (२२०९) कॅ० ॲडर्टन-मुंबई. { श. १६०१ पौष व. ५,७ इ. १६८० जाने. ११व१३

११ जाने:—शत्रूनें हेन्द्री केन्द्री टेकडीच्या शिखरावर ६ ते ८ फुटाची भिंत चुन्यांत बांधून काढली आहे [?]

सिद्दी उंदेरी बेटावर गेला तेव्हां तेथें त्यानें तोफ चढवून थळवर अनेक वेळां मारा केला. परंतु त्याचा कांहींच परिणाम झाला नाहीं. तेथील बेट व सिद्दी यांच्यामध्येंहि पूर्ववत गोळीबार चालू आहे! ...हवा वाईट पडली आहे. त्यामुळें छोट्या होड्या उघड्यावर राहूं शकत नाहींत.

१३ जाने:—एक वाजतां उंदेरीवरील सिद्दीवर हल्ला करण्याच्या इरादानें शिवाजीचीं गलबतें नागांवकडून बाहेर आलीं. उभयपक्षांकडून पुष्कळ तोफा सोडल्या गेल्या. त्यांत सिद्दीचें कांहींच नुकसान झालें नाहीं. शत्रूकडील नुकसानीबद्दल कांहींच वर्तमान कळलें नाहीं. आम्हीं तयारी करून युद्धांत सामील होण्याकरितां जातों तोंच मराठ्यांचीं गलबतें परत गेल्याची बातमी समजली व इतक्यांत नागांवांत ती शिरतांना आम्हांला दिसलीं.

परंतु सिद्दीच्या भीतीमुळें येण्यास धजत नाहीं. तो मद्दीला असून त्याच्याकरितां आम्ही होडी पाठवावी असें तो म्हणतो. तें आम्ही मान्य करून बलून (होडी) व शिपाई पाठविले. यामुळें सिद्दी आसल्यावर पुष्कळ नाखूष होईल. परंतु आम्ही त्याच्याशीं बिघाड करणार नाहीं. खांदेरी मात्र शिवाजीच्याच हातांत रहाणार अशीं चिन्हें दिसत आहेत. [पुढें ऑक्टो. १६ च्या ले.तील बातमी.]

फॅ. रे. मुंबई भा. १९ पृ. ८-१० (२) इ. (२२०६) कॅ० मिंचिन-मुंबई { श. १६०१ पौष ११,१५ व. २. इ. १६८० जाने. २,५,७

**२ जानेः**—उत्तरेकडील वारा सुरू झाल्यामुळें आमच्या छोटया होडया गडबडूं लागल्या व त्यांना हेन्द्री बेटाच्या आश्रयाला ठेवावें लागलें. शिवाजीच्या लोकांनीं थळला पुष्कळ मोठया तोफा आणल्या असून आज त्यांनीं आमच्या होडयांवर गोळे मारले.

**५ जानेः**—काल सिद्दी व बेटवाले यांच्यांत गोळीबार झाला. आज सकाळीं बेटावरून सिद्दीवर तोफा मारल्या गेल्या.

**७ जानेः**—सिद्दी व बेटवाले यांमध्यें तोफांचा मारा.

फॅ. रे. मुंबई मा. २ पृ. १०२ इ. (२२०७) मुंबई कन्सल्टेशन { श. १६०१ पौष शु. ३ इ. १६८० जाने. ८

प्रेसि०च्या आज्ञेप्रमाणें डे० गवर्नर शिवाजीशीं तह करण्याची बरेच दिवस खटपट करीत आहे. आतां आम्हीं आमचीं कलमें कळविण्याकरितां मनुष्य पाठवावा अशी त्यांच्याकडून सूचना आल्यामुळें, आपलीं कलमें ठरवून तीं रामशेणव्याबरोबर सुभेदाराकडे पाठवावीं असें ठरलें.

यापुढें, 'डेप्युटी गव० चाईल्ड व त्याचें कौन्सिल यांनीं शिवाजीराजाच्या अधिकाऱ्यांकडे, शिवाजीकडून मान्यता मिळविण्याकरितां, पाठविलेलीं इंग्रजराष्ट्र व शिवाजी यांच्यामधील तहाचीं कलमें,' दिलीं आहेत. [ले. २२०८ पहा].

ह्या कलमांचें शब्दशः मराठी भाषांतर करून तें राम शेणव्याच्या हातीं **अण्णाजी-पंडीत** व चौलचा सुभेदार यांच्याकडे पाठविलें.

फॅ. रे. सुरत मा. १०८ पृ. ४८ इ. (२२०८) इंग्रज-शिवाजी तह { श. १६०१ पौष शु. ३ इ. १६८० जानेवारी ८

[इंग्रजांनीं सुचविलेलीं कलमें]—

१. कंपनीचें व इतर रहिवाशांचें तुमच्या मुलखांतून येणें आहे तें तावडतोब यावें.

२. कांहीं कारण नसतां तुमच्या लोकांनीं आमच्याशीं भांडण करून आमची एक गुराब, एक शिबाड, एक गुराबाची होडी, त्यांवरील इंग्रज व इतर माणसें आणि हत्यारें तोफा, दारुगोळा, बंदुका, नांगर, शिडें, तरवारी इत्यादि सामान घेतलें. तें सर्व परत करावें.

३. फोटूनहि मुंबईस येणारीं अगर तेथून अन्यत्र जाणारीं गलबतें आपण मुंबईचीं असल्याबद्दल तुम्हांला कळविलें, तर त्यांस थांबवून किंवा दुसऱ्या प्रकारानें त्यांना अडथळा करूं नये. अशा गलबताचें वादळांत सुकाणूं किंवा डोलकाठी मोडली तर तें गलबत किंवा वरील माल न घेतां तुम्हीं तें गलबत व माल ह्या बंदरांत पाठविला पाहिजे.

४. आम्हांला कळविल्याशिवाय आमच्या बंदरांतील टेकडीवर तुम्हीं माणसें उतरवून तुमचें आरमार तेथें आणिलें. त्याची चौकशी करण्याकरितां आमचीं गलबतें गेलीं असतां त्यांची विचारपूस न करितां त्यांच्याशीं तुमचीं गलबतें अन्यायानें लढलीं. म्हणून आजमितीपर्यंत आमचीं मोठीं जहाजें आम्हांला तेथेंच ठेवणें भाग पडलें. त्याकरितां आम्हांला आलेला खर्च तुम्हीं आम्हांला द्यावा.

५. आमचे वखारवाले आमची मर्जी असे तोंपर्यंत वखारीच्या ठिकाणीं व्यापाराकरितां रहातील. त्यांच्या स्वातंत्र्यावर येण्याजाण्याबद्दल (तुम्हीं) कोणतींहि बंधनें घालूं नयेत. आम्हीं बोलावूं तितक्यांना व तेव्हां त्या ठिकाणाहून किनारा सोडून जाण्यास किंवा तद्देशीय लोकांना वखारीची व्यवस्था करण्याकरितां नेमण्यास प्रत्यवाय असूं नये. तसेंच वखारवाले परत आल्यावर त्यांना अप्रतिबंध पूर्ववत् व्यापार करण्याची परवानगी असावी. त्यांच्यावर कोणत्याहि प्रकारचा नोकर लादला जाऊं नये.

६. पूर्वी आपल्यामध्यें लेखी तह झाले तद्वतच हा तह मानला जाईल आणि तुम्हीं महादेवाची शपथ घेतल्यास बदलला जाणार नाहीं. करितां तुम्हीं शिवाजी राजाच्या सही-शिक्क्यानिशीं नवीन लेख त्याच्यावर व त्याच्या वारसांवर बंधनकारक असा तयार करावा. म्हणजे आम्हीं व आमचे मागून येणारे उत्तराधिकारीहि तो मानतील.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. मुंबई<br>भा. ११ पृ. ११-१२ इ. | (२२०९)<br>कॅ० ऑर्डर्न–मुंबई. | श. १६०१ पौष व. ५,७<br>इ. १६८० जाने. ११व१३ |

**११ जानेः**—शत्रूनें हेन्री केन्री टेकडीच्या शिखरावर ६ ते ८ फुटाची भिंत चुन्यांत बांधून काढली आहे [!]

सिद्दी उंदेरी बेटावर गेला तेव्हां तेथें त्यानें तोफ चढवून थळवर अनेक वेळां मारा केला. परंतु त्याचा कांहींच परिणाम झाला नाहीं. तेथील बेट व सिद्दी यांच्यामध्येंहि पूर्ववत गोळीबार चालू आहे! ...हवा वाईट पडली आहे. त्यामुळें छोटया होड्या उघड्यावर राहूं शकत नाहींत.

**१३ जानेः**—एक वाजतां उंदेरीवरील सिद्दीवर हल्ला करण्याच्या इराद्यानें शिवाजीचीं गलबतें नागांवकडून बाहेर आलीं. उभयपक्षांकडून पुष्कळ तोफा सोडल्या गेल्या. त्यांत सिद्दीचें कांहींच नुकसान झालें नाहीं. शत्रूकडील नुकसानीबद्दल कांहींच वर्तमान कळलें नाहीं. आम्हीं तयारी करून युद्धांत सामील होण्याकरितां जातों तोंच मराठ्यांचीं गलबतें परत गेल्याची बातमी समजली व इतक्यांत नागांवांत तीं शिरतांना आम्हांला दिसलीं.

फॅ. रे. सुरत
मा. १०८ पृ. ? इ.

(२२१०)
इंग्रज-शिवाजी तह.

श. १६०१ पौष व. ६
इ. १६८० जाने. १२[?]

[ अण्णाजी पंडिताचें उत्तर ]:—

१ शिवाजीनें कंपनीचें व या राज्यांतील रहिवाशांनी व्यापाऱ्यांचें देणें असेल तें तत्काल देण्याचा हुकूम दिला जाईल.

२……तुम्हीं शिवाजीराजाशीं मित्रत्व ठेवून आपसांत विग्रह करूं नये. तुमच्या मागणीप्रमाणें सर्व तुमच्या स्वाधीन केलें जाईल.

३ [ तुमचें कलम ५ ] मान्य केलें.

४ [ तुमचें कलम ३ ] पूर्वीप्रमाणेंच त्यांना मोकळीक ठेविली जाईल.

५–[तुमचें कलम ६] आमच्याकडून योग्यप्रकारें करार पाळला जाईल,तुम्हींहि पाळावा.

६–वर लिहिल्याप्रमाणें यापुढें आम्हीं सर्व कलमें पाळूं. तरी तुम्हीं खांदेरीहून आपली गलबतें काढून न्यावीं.

सिद्दी कासम तुमच्या जोरावर उंदेरीला येऊन उतरला आहे. तरी त्याच्याशीं सामोपचारानें बोलून तें सोडण्यास सांगावें. तुमचे वखारवाले आमच्या मुलखांत आहेत; त्यांच्या बाबतींत वरील कलमें तंतोतंत पाळूं. परंतु तुम्हीं आमच्या शत्रूंना मुळींच मदत देतां कामा नये. आमच्याशीं मित्रत्व ठेवावें. आणि जर तुमच्याकडून आगळीक झाली तर मग आमच्यावर दोष ठेवूं नये.

अशाच तऱ्हेचें चौलच्या सुभेदाराचेंहि कलमवार मान्यतापत्र आलें आहे. त्यांत शेवटीं 'वर लिहिलेलीं पांच कलमें मीं मान्य करतों व शिवाजीराजाकडून तीं शपथेवर मान्य करून घेईन.' असा मजकूर आहे.

फॅ. रे. सुरत
मा. १०८ पृ. ? इ.

(२२११)
इंग्रज-शिवाजी तह

श. १६०१ पौष व. ६
इ. १६८० जाने. १२[?]

अण्णाजी पंडीत व चौलचा सुभेदार यांकडून [ डे० गव्हर्नरकडे आलेल्या सूचना]:—

१ तुमच्या मदतीनें आलेलें सिद्दीचें आरमार व तुमचेंहि आरमार तुम्हीं काढून नेले पाहिजे.

२ आपण मोंगलांचे नोकर आहोंत असा सबबीवर तें निघून जात नसेल तर तुम्हीं त्यांना कोणत्याहि प्रकारची मदत, दारुगोळा, होडया इत्यादि पुरवूं नये. खांदेरीहून त्यांचें आरमार हालणार नाहीं तोंपर्यंत तुम्हीं हें कलम कसें पाळतां हें पहाण्याकरितां आम्हां मुंबईंत १ दातमांदर व १० माणसें ठेवूं.

३ कर्जदार असे कोणीहि लोक आमच्या मुलखांतून पळून तुमच्याकडे येऊन रहातील त्यांना आमच्या स्वाधीन करावें. परंतु तसा प्रघात नाहीं असें तुमचें म्हणणें असल्यास, अशा लोकांकडून येणें असलेलें कर्ज किंवा इतर त्यांच्यावरील बोजा यांचा व्यवहार तुमच्या न्यायकोर्टांनीं उलगडावा.

४ पाहिल्याच तहांत ठरल्याप्रमाणें नागोठणें किंवा पेण खाडींत आमच्या कोणाहि शत्रूला प्रवेश करूं देऊं नये. आणि आतां आपलें वैर चालू असतांना सिद्दीनें येऊन पुष्कळ कैदी धरून नेले. ते परत करण्यास त्याला सुचवावें. यापुढें कोणत्याहि कारणास्तव त्याला या खाडींत प्रवेश करूं देऊं नये.

५ शिवाजीच्या मुलखांतील रहिवासी खरेदी विक्री व व्यापार करण्याकरितां तुमच्या बेटांत येतील त्यांना चांगल्याप्रकारें वागवावें.

६ सिद्दीच्या नोकरींत असलेल्या दाऊदखानानें आमच्या मुलखांत येऊन आमचें पुष्कळ नुकसान केलें आहे. म्हणून तुम्हीं त्याला बेटावरून काढून लाविलें पाहिजे.

हीं वरील कलमें लिहून [व मान्य करून] पाठवावीं.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. फो. सें. जॉर्ज<br>मा. २८ पृ. ३४ इ. | (२२१२)<br>गोवळकोंडा-मद्रास | श. १६०१ पौष व. ८<br>इ. १६८० जाने. १४ |

(ब्राह्मण वीरराघवय्याचें डे० ग०स पत्र)— मोंगलांचा सेनापती दिलीरखान यानें विजापूरला वेढा घातल्यामुळें त्यांचा कोंडमारा होऊन **शिवाजी राजा** व सिद्दी **मसाऊद** यांनीं कांहीं घोडे व सैन्य इतक्यांची मदत गोवळकोंड्याकडे मागितली. तेथून हि मदत पाठविण्याकरितां सरलष्कर व इतर सेनापती तयार झाले. इतक्यांत मोंगलांचा हेजिब येऊन त्यानें 'तुम्हीं विजापुरास मदत केल्यास मोंगलांचें सैन्य विजापुरांत आहे तेंच पुढें येऊन गोवळकोंड्यावर स्वारी करील,' अशी धमकी दिल्यामुळें गोवळकोंड्याकडील मदत येण्याचें थांबलें. परंतु, त्याच वेळीं गोवळ०नें शिवाजीकडे **गुप्तपणें पैसा** पाठविला व सैन्य उभें करण्यास सांगितलें. शिवाजीनें त्याप्रमाणें विजापूरच्या लोकांना कुमक केल्यामुळें तेथील स्थिति कांहींशी बरी झाली आहे.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. मुंबई मा. १९<br>पृ. १२ इ. | (२२१३)<br>कॅ० ॲडम्स-मुंबई | श. १६०१ पौष व. ८<br>इ १६८० जाने. १४ |

रात्रीं सिद्दीकडून मनुष्य आला. रात्रीं सिद्दीवर मराठ्यांच्या आरमारानें स्वारी केल्यास आमच्या छोट्या होड्या आम्हीं उंदेरीकडे पाठवाव्या असें त्यानें सांगितलें. 'आपण केव्हांहि तयार आहोंत' असें आम्हीं कळविलें. सिद्दीचा उद्योग पूर्ववत् चालू आहे.

फॅ. रे. मुंबई मा. १९ } (२२१४) { श. १६०१ पौष व. ९–माघ शु. ६
पृ. १३–१६ इ. } कॅ० अर्डर्टन–मुंबई { इ. १६८० जाने. १५ ते २७

जाने. १५–सिद्दीकडून परस्परांवर गोळीबार. सिद्दीच्या होड्या खांदेरीपुढें सरकतात.

जाने. १९–काल सकाळीं ७ वाजतां शिवाजीचें आरमार बाहेर दिसलें. आम्हीं होड्या पाठविल्या. त्या पाव मार्ग गेल्या नाहींत तोंच शत्रूचें आरमार आंत शिरलें.

रात्रीं १२ वाजतां २ गलिवेतें दिसलीं. त्यांवर गोळे मारले परंतु तीं निसटलीं. हेन्द्रीकेन्द्रीवर जाण्याकरितां तीं आलीं असावीं. परंतु उघडकीस आल्यामुळें परत पळालीं.

जाने. २१– काल चार वाजतां सिद्दीचें एक केच उंदेरी व थळ यांच्या मधोमध राहून पहारा करण्याकरितां गेलें. सिद्दी उंदेरीला तटबंदी करीत आहे.

जाने २४– हेन्द्रीकेन्द्रीचा दारूभार बंद होऊन आतां उंदेरी व थळ इकडे चालू झाला आहे. थळच्या लोकांनीं देखील मोर्चेबंदी केली आहे. परंतु पुढें कांहींच समजलें नाहीं.

जाने. २७– काल पहाटे शिवाजीच्या आरमारानें उंदेरी काबीज करण्याचा प्रयत्न केला. सिद्दीनें फारच चांगलें तोंड दिलें. शिवाजीचीं सुमारें ३० तरांडीं आलीं होतीं. पुष्कळ गोळागोळी झाली. दौलतखानाचें बरेंच नुकसान झालें असावें. कारण पुढच्या भरतीच्या वेळीं फुटक्या होड्यांचे तुकडे व ८ प्रेतें आम्हीं तरंगतांना पाहिलीं. सिद्दीचे ३ शिपाई मेले व ७ जखमी झाले आमचीं गलबतें ओहोटीमुळें व वाऱ्यामुळें मदत करूं शकलीं नाहींत. पहांटेसच दौलतखानाचीं गलबतें नागांवांत शिरलीं. शत्रूशीं भिडावें म्हणून आम्हीं दोघांनीहि उचल केली. परंतु वारा नव्हता व होता तो प्रतिकूल होता म्हणून जमलें नाहीं.

फॅ. रे. मुंबई मा. २ } (२२१५) { श. १६०१ पौष व. १०
पृ. ३-८ इ. } मुंबई कन्सल्टेशन. { इ. १६८० जाने. १६

राम सेणवी परत येतांना त्याच्याबरोबर, अण्णाजी पंडीत व चौलचा सुभेदार यांनीं सहीशिक्का केलेलीं कलमें व राजाकडून तीं मान्य करण्याबद्दलची त्यांनीं दिलेली हमी व त्यांनीं करारांत नमूद करण्याकरितां पाठविलेल्या आणखी सूचना इत्यादि घेऊन राजाचा हेजीब आला. त्या कलमांचा विचार केला व त्यांचा समावेश करावा असें ठरलें. त्यांच्या सूचना व हे०गं०चीं उत्तरें खालीं नमूद केलीं आहेत.

अण्णाजी पंडीताचें उत्तर व राजाच्या मान्यतेबद्दलची हमी.

शिक्का.

[ येथें ले० २२१० जाने. १२ चें उत्तर. ]

[नंतर]

चौलच्या सुभेदाराचें उत्तर व हमी.

[ येथें लें० २२१० आने.१२ चें उत्तर. ]
अण्णाजी पंडीत व चौलचा सुभेदार यांच्या सूचना व अटी.
[ येथें लें० २२११ आने.१२ चें उत्तर. ]
डे० ग० व कौन्सिलचें अण्णाजी पंडीत व चौलचा सुभेदार
( यांस उत्तर १८ जानेवारी १६८० चें. )

१—[ तुमचें कलम २ ]—युद्धसामुग्री म्हणजे तोफा, गोळे, दारू इत्यादि त्यांना आमच्याकडून मिळणार नाहीं. परंतु त्यांना अन्न व पाणी यांची बंदी आम्ही करणार नाहीं. तुम्हांला जशी या बाबतींत बंदी नाहीं तशी त्यांनाहि नसावी. जसा तुमचा आमचा स्नेह आहे व तुमच्या मुलखांत आमच्या वखारी आहेत तसा मोंगलांचा आमचाहि स्नेह असून त्याच्याहि मुलखांत आमच्या वखारी आहेत.

२—[ तुमचें कलम ३ ]—जेव्हां तुमच्याकडील एकादा रहिवासी या बेटावर पळून येईल तेव्हां तुम्ही आम्हांला कळवावें; आणि नंतर त्याचा विचार आमच्या न्यायकचेरींत होऊन योग्य तो न्याय दिला जाईल. कोणी कर्जफेड करण्यास अगदीं असमर्थ असेल त्याला कर्जफेड करीपर्यंत कैद केली जाईल.

३—[ तुमचें कलम४]—यासद्दल आम्ही अवश्य खटपट करूं.

४—[ ,, कलम५] — पूर्ववत् सर्व प्रकारें कोशीस केली जाईल.

५—[ ,, कलम६] — जो कोणी या बंदरांत राहून तुमच्या मुलखाला अपाय करील त्याला कडक शिक्षा देऊन घालवून दिलें जाईल.

याप्रमाणें खरे करून कलमें तुमच्याकडे पाठविलीं आहेत.

चर्चा होऊन वरीलप्रमाणें कलमें ठरलीं त्याचा मराठींत तर्जुमा करून नेहमींप्रमाणें तीं मंजूर करण्यांत आलीं. आलेल्या हेजिबाबरोबर डे० गव्हर्नरनें पुष्कळ वेळ बोलून त्याची समजूत घातली; व हीं कलमें घेऊन आपला हेजीब त्याच्याबरोबर देऊन त्याला अण्णाजी पंडिताकडे पाठविलें. आणि त्याबरोबरच हेन्रीकेन्रीसमोरील युद्धांत पकडलेलीं गलबतें व कैदी यांचीहि मागणी केली. शक्य तितक्या लवकर उत्तरें आणण्याबद्दलहि सांगितलें. असा वरिता कीं, अनुकूल उत्तरें येतांच गलबतें परत बोलावून चालू खर्च एकदम थांबवितां यावा.

७.

| | | |
|---|---|---|
| ओ. कॉ. भा. ४० | (२२१६) | श. १६०१ माघ शु. ३ |
| नं. ४६९१ इ. | सुरत-कंपनी. | इ. १६८० जाने. २४ |

गेल्या पावसांत राजापूरचे वखारवाले काढून घेण्याबद्दलचा प्रयत्न फसला. त्यानंतर हेन्रीके० प्रकरण उद्भवलें. आतां शिवाजीशीं तह झाल्याशिवाय त्यांना तेथून हालवितां येणार नाहीं......त्याच कारणाकरितां मुंबईंत असलेला दारूगोळा विकून सुरतेला पैसा पाठविण्याच्या व इतर कांहीं बाबतींत आपल्या आज्ञेप्रमाणें

वागतां येत नाहीं. कारण, शिवाजीच्या सैन्याच्या हल्ल्यापासून मुंबई बेटाचें रक्षण प्रथम केलें पाहिजे......शिवाजीनें बऱ्हाणपूरच्या बाजूला धांदल उडवून दिल्यामुळें मालाची विक्री त्वरेनें न होऊन गलबतेंहि भरतां आलीं नाहींत......हेन्द्रीकेन्द्रीच्या बाबतींत आपलें असमर्थत्व जाणून आम्हीं शिवाजीशीं तह करण्याचें ठरविलें आहे. परंतु, शिवाजीसारखा त्रासदायक शेजारी दूर करणें आवश्यक वाटण्याइतकें मुंबई बेटाचें जर आपल्याला महत्त्व असेल तर बेटावरील व्यापार किंवहुना त्यावरील आपली मालकी धोक्यांत येऊं नये म्हणून, तुम्हीं जहाजें, सैन्य व दारूगोळा सेनापती पाठवून द्यावा. नाहींतर आजपर्यंत सर्व केलेलें फुकट जाऊन हातास कांहींच लागणार नाहीं.

[ द्वि ]—१४—सुरतेच्या शिपायांची संख्या बरीच कमी केली. कित्येक वेळां १० पेक्षां जास्त ठेविले नाहींत. हेन्द्रीकेन्द्री प्रकरणामुळें शेवटीं त्यांनाहि पाठवावें लागलें. तुमच्या म्हणण्याप्रमाणें फक्त संकटाच्या वेळीं किंवा शिवाजीचें सैन्य जवळ येतांच लोक ठेवावे हें शक्य नाहीं. शिवाजीपासून इतक्या वारंवार भय उत्पन्न होतें कीं, बहुतेक सततच आत्मरक्षणाची तयारी ठेवावी लागते. कारण, ज्या ठिकाणावर तो हल्ला करितो त्या ठिकाणाला आगमनाची बातमी मिळणें आणि त्याची प्रत्यक्ष झडप येणें यांत तो अंतरच ठेवीत नाहीं. मुंबईहून शिपाई आणवावयास निदान २० दिवस लागतात. परंतु त्याच्या अर्ध्या वेळांतच शिवाजीचें काम पार उलगडून फत्ते होतें.

२९—ठाणा—कारंजा मार्गावरून मोकळीक मिळावी म्हणून पोर्तु०शीं बोलणें करण्यापेक्षां दुसरे परिणामकारक मार्ग स्वीकारले पाहिजेत. कारण हे लोक उद्दाम व घमेंडखोर असून त्यांच्यावर केवळ बोलण्याचा कांहींच परिणाम होणार नाहीं.

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. मुंबई मा. २<br>पृ. ९-१० इ. | (२२१७)<br>मुंबई कन्सल्टेशन. | श. १६०१ माघ शु. ६<br>इ. १६८० जान. २७ |

अण्णाजी व सुभेदार यांचीं उत्तरें घेऊन राम सेणवी आला. झालेल्या बोलण्यावरून व पत्रव्यवहारावरून त्यांचें समाधान झालें. आणि शक्य तितक्या लवकर कैदी सोडण्याचें त्यांनीं वचन दिलें. तसेंच गुराखा वगैरेबद्दल आमच्या मागणीच्या मोबदल्यांत चौलला १०० खंडी सुपारी देण्याचा त्यांनीं हुकूम दिला. मात्र हेन्द्रीकेन्द्रीहून आम्हीं आमचीं गलबतें काढून न्यावीं अशी अट त्यांनीं घातली आहे. सुरतेचे हुकूम, युद्धाची परिस्थिति आणि वाढता खर्च सोसूनहि आपल्या समोर आहेत त्यांपेक्षां अधिक चांगलीं कलमें शिवाजीकडून मिळवितां येत नाहींत ही गोष्ट लक्षांत घेऊन, कॅ० केंडर्टन आदिकरून लोकांना गलबतें घेऊन किल्ल्याकडे येत येण्याचा उद्यां हुकूम द्यावा असें ठरलें.

(से) फॅ. रे. सुरत भा. १०८ पृ. ५२ इ. (२२१८) राजापूर-सुरत. श. १६०१ माघ शु. ८ इ. १६८० जाने. २८

गेल्या १५ तारखेला एवराजीनें [ इंग्रेज ? ] खारेपाटणला कांहीं काम आहे अशा सबबीवर रजा मागितली. तेथें २ दिवस राहून तिसऱ्या दिवशीं तो घोड्यावरून वेंगुर्ल्यास गेला. तेथून पुढें तो गोव्याला गेला. आणि तिकडून मुंबईला जाण्याकरितां त्यानें एक लहान गलबत भाड्यानें ठरविलें. त्याचे काय हेतू असतील ते असोत ! तो गेल्यावर येथील सुभेदारानें आमच्या वखारीची किल्ली आणि बक्षिसाची पोंचलेली सुपारी अशीं मागितलीं. 'सुपारी भरण्याकरितां आम्हांला पुष्कळच खर्च आला आहे. आणि या उप्पर ती घेऊन जावयाची असेल तर वखारींत आहे तिचें वाटेल तें करा ' असें आम्हीं कळविलें. त्यावर त्यानें फक्त माप घेण्याची त्यानें इच्छा दर्शविली; व आम्हीं माप घेऊं दिलें. माप घेणें झाल्यावर दाराला त्यांनीं राजाचें सील केलें. हें सर्व एवराजी गेला त्याचें फळ आहे. आणखी आमच्यावर काय कोसळणार आहे हें देव जाणे. एका अर्थी तो गेला हें चांगलेंच झालें. नाहींतर वनियांनीं रस्त्यांत त्याला दगडांनीं ठार मारला असता. सर्व व्यापारी त्याच्या नांवानें खडे फोडीत आहेत. तो आमचे प्राण घेण्याच्या विचारांत होता यावरून त्याची लुच्चेगिरी तुमच्या ध्यानांत येईल. आम्हीं तेथून यापूर्वीच निघून आलों असतों. परंतु आदल्याच दिवशीं त्याविषयीं त्यानें हवालदाराला खबर दिल्यामुळें हवालदारानें नदीवर आमची पाळत राखण्याकरितां शिपाई पाठविले. एका फ्रेंच नोकरानें हें आम्हांला सांगितल्यामुळें आम्हीं वांचलों. ठरल्याप्रमाणें गेलों असतों तर आम्हीं आज जिवंत राहिलों असतों कीं नाहीं याची शंका आहे. यावरून त्याचा प्रामाणिकपणा किती आहे हें पहावें.

फॅ. रे. सुरत भा. १०८ पृ. ? इ. (२२१९) मुंबई-सुरत श. १६०१ माघ शु. ११ इ. १६८० जाने. ३१

कित्येक दिवस शिवाजीच्या तहाच्या खटपटींत होतों. आतां त्यामध्यें यश आलें आहे. तेव्हां सर्व हकीकत लिहीत आहोंत. उंदेरीवर ३००० सैन्य व १० मोठ्या तोफा यांसह सिद्दीनें ठाणें दिल्यामुळें शिवाजीचे लोक अस्वस्थ झाले. दोनदां दौलतखानानें रात्रीं त्यांच्यावर हल्ला केला. परंतु सिद्दीची सावधगिरी व त्याला मिळालेली चौलची दरोबस्त बातमी यांमुळें त्याचा बेत फसला. २६ तारखेला पहाटेस त्यांच्यामध्यें मोठी लढाई होऊन दौलतखानानें ३ ह. लोक घेऊन ३ ठिकाणांहून हल्ला चढविला. परंतु त्यामध्यें चौलच्या बातमीवरून दौलतखानाचे २०० मृत्यु, १०० जखमी व अनेक गलबतांचा नाश असें बरेंच नुकसान झाल्याचें कळलें. त्यांच्यामध्यें वारंवार तोफांचा मारा होतो. शिवाजीनें थळवरून उंदेरीवर तोफा लाविल्या. परंतु त्याचा मारा लागू झाला नाहीं. उलट सिद्दीच्या तोफांमुळें मात्र किनाऱ्यावर फारच नुकसान होतें. कांहींहि झालें तरी शिवाजी किंवा सिद्दी यांपैकीं

कोणाच्याहि तहावर विश्वसून रहातां येत नसल्यामुळें मुंबईला वाईट-दिवस आहेत एवढें खास. शिवाजीचें सामर्थ्य तुम्हीं जाणतांच. सिद्दीजवळ २ मोठीं जहाजें, ५३ तिरक्टी तारवें, १गलबत व २६ गलिवेटें आहेत. त्याच्याजवळ ७०० शिपाई असून बेटावरील बहुसंख्याक मुसलमान हे त्याच्याशीं भांडण मिटविण्यास आपल्याला निरुपयोगीच आहेत. तरी काय करावें तें सुचवावें. दोघेहि आपापल्यापरी आमच्यावर नाखूषच आहेत. शिवाजीचे इतके लोक मरण्यास व हे० के०चा त्याचा बेत सिद्धीस न जाण्यास आम्हींच कारणीभूत झालों. आम्ही आपलीं गलबतें काढून घेतलीं व सिद्दीच्या मनाप्रमाणें त्याला शिवाजीच्या मुलखावर अत्याचार करूं दिले नाहींत म्हणून सिद्दीहि रंजीसच आहे. दारुगोळा, तोफा, गोलंदाज, ५०।६० बरकंदाज व २० ह० रु० अशा जबरदस्त मागण्या आमच्याकडे सिद्दीच्या आल्या आहेत! २६ ता.पर्यंत त्याला कसा तरी टोलवीत ठेवून शेवटीं त्याला४००० हेरा. दिले. त्यानें दिलेली ५००० रु. चीं सुरतेवरील हुंडी सोबत पाठविली आहे. आतां शिवाजीच्या तहाची हकिकत थोडक्यांत देतों. बोलणें करण्यालाच पुष्कळ वेळ लागून शेवटीं २८ तारखेला गलबतें परत बोलावण्याचा हुकूम दिला. व काठ सगळी येऊन पोंचली. बोटी व कामकऱ्यांना सोमवारीच कामावरून दूर करून खर्च कमी करण्याचा आम्हीं विचार करीत होतों. परंतु तुमचें पत्र येईपर्यंत म्हणजे २६ तारखेपर्यंत थांबण्याचें आम्हीं ठरविलें आहे. तहाबद्दलचे कागदपत्र सर्व पाठविले आहेत. नाश झालेलें शिबाड व गुराब यांचे हिशेबहि पाठविले आहेत. ते सांच्याकडून पुरे मिळणार आहेत.

फॅ. रे. सुरत भा. १०८ } (२२२०) { श. १६०१ माघ शु. १३
पृ. ४९-५० इ. } मुंबई-सुरत { इ. १६८० फेब्रु. २

मागचें पत्र पाठविलें त्याच दिवशीं [३१ जाने.] शिवाजी व सिद्दी यांची मोठी लढाई झाली. युद्ध सुमारें ४ तास चाललें. तेवढ्यांत सिद्दीनें शिवाजीच्या ४ गुराबा, २ गलबतें घेतलीं, ५०० लोक मारले व १६० कैदी केले. सिद्दीचे फक्त ८ मेले; व २० जखमी झाले. काल सिद्दीनें शिवाजीच्या पकडलेल्या ३ गुराबा बंदरांत ओढविल्या. त्याबद्दल त्याच्या नाखवाला बोलावून आम्हीं त्याला बोललों. प्रथम रागारागानें बोलून, तों सिद्दीकडे परत पाठविण्यास तो तयार झाला. परंतु त्याप्रमाणें त्यानें कांहींच केलें नाहीं. या गोष्टींचा शिवाजीच्या तहावर काय परिणाम होईल हें समजत नाहीं. सिद्दीला सर्व सामुग्री आम्ही पुरवितों एवढेंच नव्हे तर त्याच्या सोईकरितां त्याचें सामानहि बंदरांत ठेवितों; याबद्दल शिवाजीला राग येणें साहजिक आहे. हें बंदर मित्रत्वानें सिद्दीशीं वागतें. त्यामुळेंच हा सर्व बखेडा होत आहे. हें बंदर नसतें तर या भागांत सिद्दीची रहाण्याची ताकदच नव्हती. येथून त्याला सर्व सामान मिळतें. पोर्तु० त्याला मधून मधून थोड्या पाण्याशिवाय कांहींच देत नाहींत. परवां सिद्दीनें चौलजवळील शिवाजीचें एक गाव लुटलें. तेव्हां पोर्तु०नीं त्याचें एक गुराब व २ गलिवेटें पकडून ठेविलीं व त्यांतील लोकांना

बद्दल किंवा कैदी यांची बातमी नाहीं. अण्णाजी पंडिताच्या हुकमानें ते किनाऱ्यापर्यंत आले होते. परंतु सिद्दीच्या मुद्यामुळें येऊं शकले नाहींत अशी बातमी आहे.

फॅ. रे. मुंबई मा. १९ }
पृ. १९ इ. }
(२२२३)
सुरत-मुंबई.
{ श. १६०१ फाल्गुन शु. १
{ इ. १६८० फेब्रु. २०

तहाविषयीं समाधान. रिव्हेंज किंवा हंटर पाठवून **राजापूरच्या वखारवाल्यांना आणविण्याची** व्यवस्था करावी. त्यांनीं कर्ज वगैरे केलें असल्यास अडचण पडूं नये म्हणून ३००० रु. पाठवून द्यावे.

फॅ. रे. सुरत मा. १०८ }
पृ. ५२ इ. }
(२२२४)
चोपडा-सुरत.
{ श. १६०१ फाल्गुन शु. ५
{ इ. १६८० फेब्रु. २४

इकडील बातमी परस्पर विरोधी आणि शहाजाद्यासंबंधी अनेक चमत्कारिक गोष्टींनी भरलेली असल्यामुळें लिहिण्यासारखी नाहीं. शिवाजीचें सैन्य, त्याला चौथाई देतील अशा गांवांना मात्र त्रास देत नाहीं. बाकी ह्या भागांत सरसहा त्यानें जाळपोळ केली. **मोरोपंडिताच्या** हाताखालचें सैन्य अद्यापि ह्याच सरहद्दीवर हाताला लागतील ते किल्ले घेण्यांत गुंतलें आहे. **मुल्हेर** घेण्याची त्यांना मोठी खाज ( itching ) असून त्याच्यावर ते दोनतीनदां प्रयत्न करून गेले. परंतु तो फार मजबूत आहे. आणि फितुरीशिवाय त्यांच्या स्वाधीन होणार नाहीं. त्यांनीं **हनमंतगड** ( Hurmunt Ghurr ) आधींच घेतला आहे. त्याचे पुढील बेत कांहींच समजत नाहींत. शहाजाद्याला ते मिळाल्याच्या बातम्या खोट्या आहेत. लवकरच ते कोणीकडे जातात हें समजेल. कांहींच्या मतें सुरतेकडे व कांहींच्या मताप्रमाणें बऱ्हाणपुराकडे ते जातील. शिवाजीच्या सैन्यानें कंपनीचें जें नुकसान केलें त्याचे हिशेब पाठविले आहेत.

फॅ. रे. मुंबई मा. २ }
पृ. १३-१४ इ. }
(२२२५)
मुंबई कन्सलटेशन.
{ श. १६०१ फाल्गुन शु. ६
{ इ. १६८० फेब्रु. २५

गुराबा व शिबाड यांच्या मोबदल्यांत मिळावयाची १०० खंडी सुपारी आणविण्याकरितां चौलला शिबाड पाठवून तें आल्यावर विक्रीची तजवीज करावी.

राजापूरचे वखारवाले आणविण्याकरितां हंटर गलबत पाठवावें.

राजापूरकडे जावयाचीं कित्येक गलबतें मधील मुद्यामुळें अडकून पडलीं होतीं तीं हंटरनें सुरक्षितपणें नेऊन राजापूरला पोंचवावीं.

फॅ. रे. सुरत मा. १०९ }
पृ. ६९ इ. }
(२२२६)
मुंबई-जॉन गेप.
{ श. १६०१ फाल्गुन शु. ८
{ इ. १६८० फेब्रु. २७

राजापूरच्या वखारवाल्यांना प्रेसि०नें पूर्वी बोलाविलें असतां त्यांनीं तो हुकूम न

मानल्यामुळें पुनः त्यांना तशी संधी मिळूं नये म्हणून इकडून दोन इसम राजापुरास पाठविण्याचा त्यांचा हुकूम झाला. त्याप्रमाणें तुम्ही व चार्लस ॲली यांची आम्हीं निवड केली आहे. आमच्या व शिवाजीच्या तहाची तेथील लोकांना अद्याप बातमी कळली नसली तर त्यांना दाखविण्याकरितां राजाच्या सहीचा तांबडा कागद व अण्णाजीपंडिताचें ३०ग०ला पत्र आलें त्याचा पांढरा कागद, असे तुमच्याबरोबर दिले आहेत; ते जपून ठेवावे व आमच्याकडे परत पाठवावे. तेथें गेल्यावर नारळ व सुपारीकरितां तगादा लावून तीं मिळतांच इंटरमध्यें भरा व अथणीची भरपाई व कराराप्रमाणें मिळावयाचें बक्षीस याचा एकसारखा सुभेदाराला तगादा लावा.

सा. ले. ३६७ }
सु. १०८० सफर(?) } (२२२७) ता। { श. १६०१ फाल्गुन शु.९ { इ. १६८० फेब्रु. २८

समस्त माहानाद पेठ अथणी खान साहेब ?

आमचा हेतू कीं, दिलीरखानाच्या तहवेलीकरतां मत्ता सर्व टाकून पागडी समेत जीव घेऊन बाहीर पडलो. अशांत शिवाजी सुभेदार यांनीं घर दुकान देऊन दिलासा केला साच साहेबास मुकासा अर्जानी जाला. साहेबाच्या फत्तेबाजीचेंहि वर्तमान ऐकून खुशीहाल जालो. तरी आतां आमची व्यवस्था लावणें.

(से.) फॅ. रे. सुरत भा. १०८ }
पृ. ७०-७१ इ. } (२२२८) सुरत-राजापूर. { श. १६०१ फा. व.-०२ चैत्र शु. { इ. १६८० मार्च (?)

अथणीच्या भरपाईबद्दल मिळणारी सुपारी निराळी रूण करून बक्षिसाच्या सुपारीपासून वेगळी ठेवण्याची खबरदारी घ्या.

फॅ. रे. सुरत भा. १०८ }
पृ. ६६-६८ इ. } (२२२९) डोम्द गुराब कशी घेतली ? { श. १६०१ फा.व.-०२ चै.शु { इ. १६८० मार्च

हेन्द्रीकेन्द्रीच्या लढाईंत दौलतखानानें ती कशी घेतली तीबद्दल जबाब:—

फ्रान्सिस मोलिवरा, सार्जंट, गुराब डोम्दचा मुख्य:—१८ तारखेला ९ वाजतां दौलतखानाच्या गलबतांनीं आम्हीं सर्वांत मागें असतांना अर्धचंद्राकार रचना करून आमच्यावर जोर केला. गोंधळून सर्व कामकरी वर आले. व जवळ मदत नसल्यामुळें आम्ही शत्रूंच्या हातीं सांपडलों.

ऐझाक क्लार्क व रिटर्न रोपर वगैरे खलाश्यांचे जबाब.

नंतर कॅ. विल्यम मिचिनचा जबाब.

फॅ. रे. सुरत भा. १०८ } (२२३०) { श. १६०१ फाल्गून व. ३
पृ. ५५ इ. } मुंबई व्यापाऱ्यांचा अर्ज. { इ. १६८० मार्च ८ [!]

मुंबईचा डे० गवर्नर चाईल्ड यासः—

पूर्ववत् शिवाजीच्या मुलखांत येथील व्यापाऱ्यांनीं जाऊन सर्व प्रकारची खरेदी करावी, असा आपला जाहीरनामा लागल्यानंतर कर्ज काढून आम्हीं होड्या पाठविल्या. तें कळतांच सिद्दीचा नाखुदा जकातघराशीं आला आणि सर्वांच्या देखत असें म्हणाला कीं 'माझ्या परवानगीशिवाय एकादी होडी किंवा गलबत त्या देशांत व्यापारासाठीं जातां कामा नये. कोणीं ही आज्ञा मोडण्याचें धाडस केलें तर त्याची होडी जप्त होऊन उन्द्रीकुन्द्रीला पाठविली जाईल.' धारवाच्या नदींत आम्हीं पाठविलेलें एक बतेला, मुंबईचें आहे असें कळविलें असतांहि त्यांनीं पकडून लुटलें, एका मुसलमानाला जखमी केलें आणि दुसऱ्याला कैद केलें. यामुळें त्या भागांत व्यापार करणें आतां अशक्य होऊन बसलें आहे. तरी याबद्दल काय ती तजवीज करावी.

फॅ. रे. मुंबई भा. १९ } (२२३१) { श. १६०१ फाल्गून व. ४
पृ. २२ इ. } राजापूर-मुंबई. { इ. १६८० मार्च ९

आम्हीं मार्च १ ला पोंचलों. पत्र जातांच मिचेल येऊन भेटला आणि त्यानें शिवाजीच्या प्रधानांची स्थिति आणि त्यांच्या चांगल्या वर्तनाविषयीं सांगितलें.

दुसऱ्या दिवशीं राजापुरांत जाऊन आमच्या व शिवाजीच्या तहामुळें आम्हीं त्याचें अभिनंदन केलें. त्याला आनंद झाला. परंतु राजाकडून किंवा अण्णाजीपंडिताकडून त्याला त्यासंबंधांत कांहींच कळलें नव्हतें. पत्रें पाहून त्याला व सर्व व्यापाऱ्यांना समाधान झालें.

फॅ. रे. सुरत भा. १०८ } (२२३२) { श. १६०१ फाल्गून व. ४
पृ. ५८-५९ इ. } मुंबई-सुरत. { इ. १६८० मार्च ९

१०० खंडी सुपारी घेऊन शिबाड तुमच्याकडे आतां जाईल. त्याच्याबरोबर पत्र पाठवावयाचें. परंतु मध्यंतरींच जरूर पडली म्हणून हें त्वरित यान पाठविलें आहे.

काल सिद्दी १३ गलिवतें घेऊन पेणच्या खाडींत गेला. तेथें आमच्या बेटावरील एक होडी त्याला दिसली. तिच्यावर तुटून पडून, लुटून एका माणसाला जखमी करून दुसऱ्या एकाला तो घेऊन गेला. सिद्दी आतां बेफाम झाला आहे हें त्याच्या पत्राच्या मायांतरावरून दिसेलच. पेण खाडींत शिवाजीच्या मुलखाला त्यानें उपद्रव दिल्यामुळें शिवाजीनें आमच्या होड्या पकडल्या आहेत. पेण मधल्या अत्याचाराची व्याप्ती शिवाजीच्या अधिकाऱ्याकडून अद्याप कळली नाहीं. परंतु ते त्याबद्दल आम्हांला विचारल्याशिवाय रहाणार नाहींत. अशा प्रकारें सिद्दीचें दुर्वर्तन पुढें चालू राहिल्यास आम्हांला सामग्रीचा तुटवडा येऊन सिद्दीलाहि पुरवठा करतां येणार नाहीं. सुरतेच्या सुभेदाराकडे कांहीं सांगवा व आम्हांला काय तो हुकूम द्या.

सिद्दीसंबूळच्या कारकीर्दीत सरळ मद्दीपासून पेण, नागोठणें, व इबट(?) पर्यंत कां
घालमेल करूं नये असा करार ठरला होता. व मींहि तो अजूनपर्यंत मोडला नाहीं
परंतु तुम्ही हें लक्षांत घ्यावें कीं त्या वेळीं शत्रूनें खांदेरी बेट घेतलें नव्हतें किंवा ते
वसाहतहि केली नव्हती. यामुळें त्याला वेढा घालण्याकरितां या बाजूला आरमार
आजपर्यंत आलें नव्हतें. तर तो करार आतां अमलांत यावा अशी तुम्ही कशी अपेक्ष
करतां हें मला समजत नाहीं. जर शत्रू केन्द्री सोडील तर पहिल्या कराराप्रमाणें किना
जशाचा तसा राखण्याचें आम्ही पाळूं. पण शत्रू केन्द्री मात्र सोडीत नाहीं आणि आम्
पहिला करार पाळावा अशी तुमची इच्छा आहे. हा न्याय कोठला ?

तुम्ही एका गोलंदाजाबद्दल आम्हाला विचारलें आहे. त्यानें काय करावें अ
तुम्हांला वाटतें तें प्रथम कळवा. परंतु जर तुम्हांला त्याची जरूरी असेल आणि पुरेस
त्याच्या लायकीइतका पगार देऊन त्याचें समाधान करितां येत असेल तर त्याला बोल
वणें पाठवा. मीं शत्रूकडून अनेक गोलंदाज मिळविले आहेत आणि शिवाय मजपास
पुष्कळच आहेतहि. तेव्हां असल्या तुमच्या कारवाईनें माझा सूड घेतां येणार नाही
शिवाय माझाच एक तोफवाला तुमच्या नोकरींत आहे. त्याची मजकडे येण्याची इच्छ
असल्यास त्याला रजा देऊन मजकडे पाठवावें.

फॅ. रे. सुरत भा. १०८ } (२२३४) { श. १६०१ फाल्गुन व. १
पृ. ६३ इ. } मुंबई-सुरत. { इ. १६८० मार्च १८

शिवाजी-तहाचीं कलमें तुम्हांला आवडलीं हें वाचून आनंद झाला. १०० खंड
सुपारी तुमच्याकडे पाठविली आहे.......सिद्दीला वास्तविक आमच्या वर्तनाबद्दल तक्
करण्यास जागा नाहीं. आमचीं गलबतें आम्हीं काढून घेऊन शिवाजीशीं तह केला यामुं
मात्र तो फार नाखूष झाला आहे.

फॅ. रे. सुरत भा. १०८ } (२२३५) { श. १६०१ फाल्गुन व. १
पृ. ८० इ. } कारवार-सुरत. { इ. १६८० मार्च १८

इकडील खबर अशी आहे कीं, विजापुरी सैन्याचा सर्जाखानाला मुख्य सैना
पती केलें असून, मोंगलांचे १५००० घोडेस्वार मदतीला घेऊन, शिवाजीपासू
अनेक स्थळें परत घेण्याकरितां तो येत आहे. मेस्करकोटामध्यें त्यां
१२००० स्वार आहेत. ते या बंदरांकडे [ जिंकण्यासाठीं] येतील अशी आम्हांला आश
आहे. कोपळला व इतर किल्ल्यांना पक्का वेढा घातला आहे.

इ. सं. } (२२३६) { श. १६०१ (?)
} नक्कल { इ. १६८० जाने.

श्रियासह चिरंजीव अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री माहाराज व्यंकोजं

राजे यासी प्रती **सिवाजी राजे** आशीर्वाद येथील कुशल जाणून स्वकुशल लेखन करणे. उपरी तुम्ही पत्र पाठविले ते पावले. तुमचे कुशल कळोन संतोष वाटला. असेच क्षणक्षण आपले कुशल लेखन करून पाठवीत जाणे. विशेष ए प्रांतीचे वर्तमान; दिलेलखान विजापूरची पातशाही कमकुवत देखोन जोरावरी धरून विजापूर ध्यावे या मतलबें विजापुरावरा चाल केली. भीमा नदी उतरून शहरानजीक एऊन मिळला. हे वर्तमान खान अलीशान मसऊदखान यांनी आम्हास लिहिले की, गनीमे जोरावरी बहुत धरली आहे. एऊन मदत केली पाहिजे. त्यावरून आम्ही तेच क्षणी स्वार होऊन मजली दर मजली पनाळियास आलो. सारी कूल जमेती जमा करून खासा लष्करानिशी विजापुरा सन्निध गेलो. विचारे पाहता गनीम कट्टा; त्याहीमध्ये पठाण जाती, हट्टी, याशी हुन्नरेच करून खजील होऊन नामोहरम होय तो हुन्नर करावा. म्हणून ऐशी तजवीज केली की, त्याचे मुलकात फौजाचा पैसावा करून ओढा लावावा. त्यावरून दिलेलखानास ती गावाचे अंतरे सोडून भीमा नदी उतरून तहद जालनापूर पावेतो मुलूख ताख्ततराज करीत चाललो. जालनापुरास जाऊन चार दिवस मुकाम करून पेठ मारिली. बहुत मालमत्ता (हाती) लागली. जालनापुरास म्हणजे औरंगाबादेहून चार गावें ते जागा शहाजादा असता त्याचा हिसाब न धरिता पेठ लुटली. सोनें रुपे हत्ती घोडे याखेरीज मत्ता बहुत सांपडली. ती घेऊन पठा-गड तरकास स्वार होऊन कूच करून एता, मध्ये रणमस्तखान व आसफखान व जावीतखान असेच आणीक पांचसात उमराऊ आठ दहा हजार स्वारानशी आले. त्यास शाहाबाजीच्या हुन्नरे जैशी तंबी करून ये तैशी तंबी करून घोडे व हत्ती पाडाव करून पटियास आलो. मागती लष्कर मुलकांत धुंदी करावयास पाठविलें; व राजश्री मोरोपंत प्रधान यास बागलाण व खानदेश प्रांती सत्तावीस किल्ले मोगलांचे आहेत ते व मुलूख कबज करावयास पाठविले. आणि आम्ही पटियास मुक्काम केला. तो खांन अलीशानाची किताबती आली की, तुम्ही कितेक गनिमाचे मुलकांत स्वारी करून खराब केला ओढा लाविला. परंतु या जागाहून गनीम उखळत नाहीं. बहुतच बळ धरून कोटानजीक मिडला आहे. ए समयीं एऊन मदत करून पातशाही राखिली पाहिजे. त्यावरून मागती स्वार होऊन मजली दर मजली पनाळियास आलो कितेक द्रव्याने व सेनेने पहिले साह्राय केले व मागतीहि द्रव्य मबलग पाविले व सेना गनीमाचे मुलकांत पैसली होती ते बोलावून आणून दिलेलखानावरी पाठविली. त्यानी जाऊन फहीकाबाड मारून कूल सामान बाव धरून आरोखून धरिला. त्याचे मदतीस औरंगाबादेहून रणमस्तखान व बाजे उमराऊ अलीखान घेऊन सात आठ हजार स्वारानिसी येत होते त्यासहि मारीत गर्देस मेळवीत पिटीत औरंगाबाद पावेतो नेले. कितेक शहरें लुटीत देश खराब करीत परतोन येऊन गनिमास घेरोन बैसले. हे वर्तमान व राजश्री मोरोपंत त्या प्रांती पाठविले होते त्यानी अहिवंत किल्ला घेतला. अहिवंत म्हणजे जैसा काही पनाळा; त्याचे बरोबरी समतुल्य आहे. दुसरा नाहवा गड, बागलाणच्या दरम्यान मुलकात आहे; तो कठीण दोहि घेतला. हे दोनी किले नामोशाचे पुरातन अहे-

[१-३

कबज केले. त्या किल्यावरहि बहुत मालमता सापडला व त्याजबरोबर जमेत होती ते मुलकात पाठऊन धामधूम केली. कितेक मुलूक कबज केला. हे वर्तमान व पहिले आम्ही स्वारी केली. जालनापूर मारिले रणमस्तखान नामोहरम केला हे वर्तमान वरचेवर पादशहास बाकीमाहाल जाला. पातशाहि बहुत खजिल होऊन आहादीवर आहादी दिलेलखानास आले. ये जातीने मुलूख खराब करून गड कोट व देश कबज करून वोढा लाविला; आणि लवाजमा भरून वरच्यावरी कहीकवाड मारून गनीम जेर केला. दिलेलखानासहि ऐसे कळोन आले की, येथे राहिल्याने आपली शाही कुल बुडवितील हे पुर्ते जाणून विजापूर सोडून दिवसास कोस दोन कोस मजली करून चालिला. ऐसा गनीम जेरजेर करून खट्टा करून उथळिला व खान अब्दीशानेहि बहुतच चर्त केली. जैसा कोटा राखावयासी शर्थ करून ये तैसी करून कोट राखिला. आम्ही या प्रकारे विजापुरीचे साह्य द्रव्याने व सेनेने करून ज्या उपाये गनीम उखळू ये त्या उपाये उखळून विजापुरीचे आरिष्ट दूर करून विजापूर रक्षिले. ते प्रसंगी खान अबीशानाचा सलुखा जाला. त्या करारनाम्यामधे होसकट व बगळूर व अरणी व चंदाऊर आदीकरून तुमीचे निसबती आम्ही आपणासीच लाऊन घेतली पेशकसी तोफा तुम्ही निराळा घ्यावा (?) सतत निसबती तुम्हासी लागावी ऐसे केले नाही आवघे आम्हीच मान्य केले. तोफा आम्हीच तुम्हादेखील घ्यावा ऐसा तह ते प्रसंगी करून करारयाब करून सला केला. या उपरी दिलेलखान आदवानी कारवळ (कोपळ ?) प्रांताकडे गेला होता. आमचीहि सेना पाठीवरी गेली व आम्ही विजापुरास जातो. कारवळ प्रांताकडे राजश्री जनार्दनपंत ठेविले. त्याणी तिकडे कितेक पुंड पाळेगारानी फिसाहती केली होती त्यास मारून वाढिले व हुसेनखानाचा भाऊ कासीमखान दोन तीन हजार स्वारानिसी आला होता त्यास व त्याचे कबिला व हुसेनखानाचे दोघे लेक असे दस्त केले व हत्ती पाच व घोडे पाचसे पाडाव केले यावेरीज पुंड पाळेगारांचा मुलूक व गड व कोट कबज करून ठाणी बैसविली फत्ते केली. याउपर दिलेलखान सर्जाखान व हुसेनखान येतो हे कळोन हेहि पाच साहा हजार स्वारानिसी गनिमावर गेले. मधे गनीम धारून जिकडे गनीम जाय तिकडे जाऊन जागा जागा गनिमास गोषमाला देऊन तिकडूनहि मारून काढिला. सांप्रत भीमानदी उतरून पेडगावास आपले मुलकात गेला. गनिमास ऐसे केले जे मागता विजापूरची वाट न धरावी ऐसा खट्टा केला; व चिरंजीव राजश्री संभाजीराजे मोगलाईत गेले होते त्यास आणावयाचा उपाय बहुत प्रकारे केला; त्यासहि कळो आले की ये पातशाहीत अगर विजापूरचे अगर भागानगरचे पातशाहीत आपले मनोगतानरूप चालणार नाही. ऐसे जाणोन त्याणी आमचे लिहिण्यावरून स्वार होउन आले. त्याची आमची भेट जाली. घरोब्याचे रीतीने जैसे समाधान करून ये तैसे केले. हे सविस्तर वर्तमान तुम्हास कळावे म्हणोन लिहिले असे. कळले असावे. 'मोर्तबसुद'

माटे सज्जनगड पृ. ९९ }
श. १

(२२३७)

{ श. १६०१
{ इ. १६७९-८०

## शिवाजी-रामदास

चरणरज शिवाजीराजे यानी चरणावरी मस्तक ठेवून विज्ञापना जे, मजवर कृपा करुनु सनाथ केलें. *आज्ञा केली कीं, तुमचा मुख्य धर्म राज्यसाधन करुनु, धर्मस्थापना,* देव ब्राह्मणाची सेवा, प्रजेची पीडा दूर करुन पाळण रक्षण करावें. हें व्रत संपादून त्यांत परमार्थ करावा. तुम्हीं जें मनीं धराल तें श्री सिद्धीस पाववील त्याजवरुन जो जो उद्योग केला व दुष्ट तुरुक लोकांचा नाश करावा; विपुल द्रव्य करुनु राज्यपरंपरा अक्षई चालेल ऐशीं स्थळें दुर्घट करावीं; ऐसें जे जें मनीं धरलें तें तें स्वामींनीं आशीर्वादप्रतापें मनोरथ पूर्ण केलें. या उपरी राज्य संपादिलें. तें चरणीं अर्पण करुनु सर्वकाळ सेवा घडावी ऐसा विचार मनीं आणिला तेव्हां आज्ञा झाली कीं, तुम्हास पूर्वी धर्म सांगितलें तेच करावे. तीच सेवा होय. ऐसे आज्ञापिले. यावरुन निकट वास घडुनु वारंवार दर्शन घडावें श्रीची स्थापना कोठे तरी होउनू सांप्रदाय, शिष्य व भक्ति दिगंत विस्तीर्ण घडावी ऐशी प्रार्थना केली. तेही आसमंतात गिरीगव्हरीं वास करुनु चाफळी श्रींची स्थापना करुनु सांप्रदाय शिष्य दिगंतविस्तीर्णता घडली.

खं. २० ले. १७६ पृ २४० }
सु. १०८०

(२२३८)

{ श. १६०१
{ इ. १६७९

कोन्हेर रंगनाथ सरसु० प्रा कन्हाड-पिलाजी देसमुखीण प्रा वाई

शंकर जोसी व आडकर यामधें घोमचे वृत्तीसंबंध कज्जा आहे. तुम्ही सांगाल त्यास राजी म्हणोन तुम्हाकडे पाठविले आहे.

स. पृ. २८(२७) }
सु. १०८०

(२२३९)
फर्मान

{ श. १६०१
{ इ. १६७९-८०

सां. वि. ले. २०
सन हजार१०८०
(२२४१)
धर्मपत्र-तीर्थपुरोहित मु. व सी.
श. १६०१
इ. १६७९

मताजी बिन नागोजी घाटगे देसमुख का। केलगुण-यादी बिन महादेवभट बेल्लर.

सा. ले. १६६
सु. १०८०
(२२४२)
श. १६०१
इ. १६७९-८०

शंकराजी राम सुबेदार पर० पुणें—मोरो तावीरे मोक० मौ. मोरगौ.

तुम्ही व देवाजी गोसावी निळजेस सेत करीत होता. त्या बाबतींत राहिलेली बाकी देवाजीस न मागतां नेळूजच्या गावकामगारांकडे मागावी.

खं. २० ले. २८०
सु. १०८० रवल ३
(२२४३)
सी.
श. १६०२ चैत्र शु.४
इ. १६८० मार्च २४

गणोराम सुबेदार व कार० सुभा पर० कुडाळ.

जावजी कृष्ण प्रभू हवाल. व कार० पेठ पाटगाव.

पेठ मजकुरी सातपांच वर्षे गलबलियाकारितां नव्हते. हाली श्री बावा येऊन राहिले. यासाठीं पेठ मामूर जाली. बावास तंबाकूचे गादीचें दुकान इनाम दिलें आहे.

फॅ. रे. मुंबई भा.१९
पृ. २२-२३ इ.
(२२४४)
सुरत-मुंबई
श. १६०२ चैत्र शु. ४
इ. १६८० मार्च २४

गेल्या महिन्याच्या १ तारखेचें व चालू महिन्याच्या ९ तारखेचें अशीं तुमचीं दोन्ही पत्रें पोंचलीं. परंतु शिवाजीच्या सैन्याच्या भीतीमुळें खालीकडे मालमत्ता हालविण्याच्या गर्दीत उत्तरें लिहिण्यास सुचलें नाहीं. येथील सुभेदार **शिवाजीशीं** आम्हीं तह केल्यामुळें अगदीं नाखूष झाला आहे. त्याच्याकडे जाऊन सिद्दी व त्याचे लोक यांच्या वर्तनाबद्दल तक्रार करण्यासहि अर्थात् फायदा नाहीं. करितां **सिद्दीला अशी** उघड व सार्वजनिक **सूचना द्या कीं,** 'तो असाच त्रास देण्याचें सोडून देणार नाहीं तर अधिक पैसा किंवा नित्याची सामुग्रीहि न देण्याचा आपल्याला हुकूम झाला आहे.' यापुढें त्याचें असेंच वर्तन चालू राहील तर शिवाजीपेक्षांहि त्याच्याशीं अधिक कडु वर्तन ठेवावें लागून त्याला त्याचा पश्चात्ताप करावा लागेल.

(सें) फॅ. रे. सुरत
भा. १०८ पृ. ७४ इ.
(२२४५)
मुंबई-सुरत
श. १६०२ चैत्र शु. ६
इ. १६८० मार्च २५

मुंबईच्या इंग्रजांचा एक मचवा आपलें राष्ट्रीय निशाण फडकवीत चोलला गेला. त्याच्यावर गोळ्या झाडून व त्याला पकडून सिद्दीनें तो उंदेरीला नेला. खुलासा विचारल्यावर कांहीं झालें तरी बंदरांतून बाहेर पडणाऱ्या प्रत्येक गलबताची आपण अशीच वाट

लावणार असें सिद्दी म्हणाला. आमच्याकडून शत्रूला दारूगोळा पुरविला जाऊं नये म्हणून [?] खबरदारी तो घेणार आहे । आमची नोकरी सोडून जाणारा एक डच इसम त्याच्या-कडे पळाला आहे. एक इंग्रजहि पळाला तो त्यानेंच नोकरींत ठेविला असावा असें वाटतें.

डाग रजिस्टर १६८० } (२२५६) { श. १६०२ चैत्र शु. ११
पृ. १५२ इ. एप्रील ९ न्यू. } { इ. १६८० मार्च ३०

[नागापट्टणचें पत्र ता. ११ फेब्रु.]- एकोजी राजाशीं आमचे संबंध पूर्वी-प्रमाणें आहेत. जमिनीवर सर्वत्र आम्हांला व्यापाराची मोकळीक आहे. मदुरा नायकाशीं वैर उपस्थित झाल्यामुळें ट्रांकिबारचा वेढा उठवून त्याला उत्तरेकडे जावें लागलें. राजा आणि मदुरा नायक यांच्यांतील भांडण अद्याप मिटलें नसून ह्या दोघांमध्यें शिवाजी राजा तोल सांवरून स्वतःचा सहजच फायदा करून घेत असतो. इतरहीर [?] या भांडणांत लक्ष घालून एकोजी विरुद्ध मदुरा नायकाला मदत करण्याचा आव आणितो. यामुळें उभयतांहि तरवारी म्यान करून आहेत [परस्परांत शांततेनें रहातात.].

ओ. कॉ. मा. ४० } (२२५७) { श. १६०२ चैत्र व. ४
नं. ४६९९ इ. } सुरत-कंपनी { इ. १६८० एप्रील ८

डे. ग. चाइल्डच्या खटपटीनें शिवाजीशीं तह पुरा होऊन त्यांतील भरपाईचीं व कैदी परत देण्याचीं कलमें अमलांत आलीं. खांदेरी-उंदेरी हें आपल्या बंदराच्या तोंडा-जवळील बेट मात्र त्याच्याच स्वाधीन ठेवावें लागलें. राजापुराहून वखारवाले आणविण्याची व्यवस्था झालीच आहे. कारवारच्या बाबतींत, मात्र शिवाजीशीं नुकत्याच झालेल्या तहानंतर, इतक्या लवकर ती वखार हालवून त्याला वैषम्य वाटण्यासारखें कृत्य करणें बरें नव्हे असें ठरवून, युरोपांतून गलबतें येत तोंपर्यंत वखार हालविणें रद्द केलें आहे.... शिवाजीच्या सैन्याचा धुमाकूळ, शहाजाद्याचें बंड वगैरे कारणांनीं देशाची राजकीय परिस्थिती, अत्यंत गोंधळाची झाली असल्यामुळें व्यापार, खरेदी किंवा विक्री यांपैकीं कोणतीच गोष्ट समाधानकारक होत नाहीं. पुढच्या हंगामीं येथून जावयाचीं गलबतें कशीं भरावयाचीं याच विवंचनेंत आम्ही आहों.... खांदेरीजवळील उंदेरी बेटावर सिद्दीनें दुसरा किल्ला बांधला. तेथून त्याला हुसकून लावण्याचा मराठ्यांचा प्रयत्न फसल्यामुळें चढून जाऊन सिद्दी त्या मार्गांत व बंदरांत आरलाच अमल चालवूं लागला आहे. येथील सुभेदाराकडे तक्रार करावी; तर तोहि शिवाजीशीं आम्हीं तह केल्यामुळें आमच्यावर गरम झाला आहे. तरी हें वाढणारें संकट दूर करण्याचा कांहीं उपाय करण्याकरितां त्वरेनें हुकूम पा.; नाहींतर आम्हांला आमचें बेट व सर्व उत्तरेकडील व्यापार गमावून बसावें लागेल.

[टि.]-पत्र लिहितांनाच सुरतेला जकात पूर्वीप्रमाणेंच शेकडा ३½ टक्के झाल्याची

खबर आली आहे. आपण आम्हांला योग्य अधिकार दिला असता तर आम्हीं कांहीं तरी करून ही गोष्ट घडूं दिली नसती. आतां तिन्ही राष्ट्रांना ह्या पावसाळ्यांत खालीला जाऊन बसण्याशिवाय दुसरा उपाय दिसत नाहीं. त्यानें कदाचित् जागे होऊन येथील अधिकारी आम्हाला परत बोलावतील !

फॅ. रे. मुंबई भा. १९ पृ. २६ इ. | (२२४८) राजापूर-मुंबई | श. १६०२ चैत्र व. ६ इ. १६८० एप्रील १०

वखारींत असलेली सुपारी गलबतांतून पाठविण्यास सुभेदाराची परवानगी मिळाली आहे. परंतु अद्याप राजा किंवा अण्णाजी पंडित यांच्याकडून माल आमच्या हवालीं करण्याचे हुकूम आले नाहींत. तरी आपल्याकडून ते येण्याची आम्हाला वाट पहाणें भाग आहे. नाहींतर त्या मालाबद्दल सुभेदार आमच्याकडे खुलासा किंवा भरपाई मागेल.

फॅ. रे. सुरत भा. १०८ पृ. ८६ इ. | (२२४९) राजापूर-सुरत | श. १६०२ वैशाख शु. १ इ. १६८० एप्रील १९

**शिवाजी मरण पावला.** त्याच्या मरणामुळें या भागांत पुष्कळच घोटाळा माजेल असें दिसतें. कारण बहुतेक व्यापारी पळून जाण्याच्या तयारींत आहेत. कोणीं एकादा लष्करी (फौजबंद इसम) नजीक आला तर ते तत्काल घोड्यावरून पसार होतील ! **संभाजी राजानें** पन्हाळ्याला आपलें ठाणें केलें असून, त्याच्याकडे असंख्य सैन्य जाऊन मिळत आहे. त्यानें राजापुरास माणसें पाठवून तेथें असलेलें सर्व धान्य अटकवून किल्यावर पाठविण्याबद्दल हुकूम दिले आहेत. इतक्यांतच संभाजी राजाच्या पक्षाकडून हें शहर ताब्यांत घेतलें जाईल असा रंग दिसत आहे. अशा परिस्थितींत आम्हीं काय करावें तें तुम्हींच ठरवावें.

फॅ. रे. सुरत भा. १८८ पृ. ९२ इ. | (२२५०) कारवार-सुरत | श. १६०२ वैशाख शु. ८ इ. १६८० एप्रील २६

**शिवाजी मेला** असून हा प्रांत संभाजीला दिला गेला आहे. संभाजीनें रावजी पंडिताला पाठवून इकडील सर्व सुभेदारांना आपलें हिशेब देण्याकरितां बोलाविलें आहे. ह्या भागांवर **माझेटो** [?] सुभेदार होऊन येईल असें वाटतें. लवकरच व्यापाराला उत्तेजन येईल अशी आशा आहे.

फॅ. रे. मुंबई भा. १९ पृ. २६ इ. | (२२५१) राजापूर-मुंबई | श. १६०२ वैशाख शु. ९ इ. १६८० एप्रील २७

शिवाजी राजाच्या मृत्यूबद्दल तुम्हांला कळलेंच असेल. **संभाजी राजानें** कारभार आपल्या हातीं घेऊन राजपदवीहि मिळविली आहे. सुभेदार, हवालदार इत्यादि सर्व अधिकारी लोकांना त्यानें आपल्याकडे बोलाविलें आहे. कित्येकांना त्यानें कैद केलें व

कित्येकांना कामावरून दूर केलें. त्याचा नवा सुभेदार येथें आला. त्याला आम्हीं जाऊन भेटलों तेव्हां त्यानें मोठ्या प्रेमानें व स्नेहानें आमची भेट घेतली.

सेन गोवा पृ. २२ } (२२५२) { श. १६०२ वैशाख शु. १०
इ. मे ८ न्यू. } { इ. १६८० एप्रील २८

पोर्तुगीज अधिकारी———संभाजी राजे यांचा सुभेदार रायाजी पंडित.

[मराठे व पोर्तुगीज यांच्यांत युद्धाची तयारी चालू होती. इतक्यांत शिवाजी महाराज वारल्याची बातमी आल्यामुळें,]

शिवाजी राजे यांच्या मृत्यूबद्दलचा दुखवटा व दोनहि राज्यांतील स्नेहसंबंध कायम राहण्याची इच्छा या पत्रांत आहे.

फॅ. रे. सुरत भा. १०८ } (२२५३) { श. १६०२ वैशाख शु. १०
पृ. ८४ इ. } मुंबई–सुरत { इ. १६८० एप्रील २८

**शिवाजी राजा मेला** अशी खात्रीलायक माहिती आम्हांला मिळाली आहे. **१२** दिवस आजारी पडून **रक्तातिसारानें** तो मेला असें म्हणतात. त्याला मरून आज **तेवीस दिवस झाले.** यापुढें राजकारणाचा बनाव होईल तो कळवूं. सुर्तेत सर्वत्र शांतता असून **संभाजी राजा** पन्हाळ्यावर आहे.

डाग रजिस्टर १६८० } (२२५४) { श. १६०२ वैशाख शु. १४
पृ. २३१–२ इ. मे १२ न्यू. } { इ. १६८० मे २

सुरतेची बातमी:—आग्रा आणि अहमदाबाद यांचेमध्यें राजपुतांनीं बंड उभारिल्यामुळें स्वतः बादशहा रणक्षेत्रावर आला. जसवंतसिंगाच्या मृत्यूनंतर त्याच्या मुलाला वारस करण्याऐवजीं त्याच्या पुतण्याला बादशहानें राज्य दिल्यामुळें रजपूत खवळून गेले. परंतु बादशहाशीं प्रत्यक्ष लढाई करण्यास असमर्थ असल्यामुळें तो परत गेल्यावर ते दऱ्याखोऱ्यांतून खालीं उतरले. यामुळें आग्रा–अहमदाबाद दरम्यानचे रस्ते धोक्याचे झाले. त्यांतच **शिवाजी** राजाच्या लुटालुटीची भर पडली. त्यानें बऱ्हाणपूरच्या मार्गावरील अनेक खेडीं लुटून आणि जाळपोळ करून मोठी धांदल उडवून दिली. त्यानंतर मोठी शिकार साधण्याकरितां तो सुरतेकडे येईल अशीहि कित्येकांना धास्ती वाटली.

प्रसिद्ध शिवाजीनें चौल आणि मुंबई यांच्या दरम्यान एका बेटाचा ताबा घेऊन तेथें एक मजबूत किल्ला बांधला व ८०० लोक ठेवून त्याच्यावर वसाहत केली. इंग्रजांना यांत आपलें नुकसान आहे असें वाटून त्यांनीं त्याला विरोध केला. परंतु त्यांत **त्यांना यश आलें नाहीं.** चकमकींत २ गोरे, ६ श्वेतवर्णी व ७ हिंदी लोक गमवावे लागले; व त्यांना माघार घ्यावी लागली. या विरोधामुळें शिवाजीला इतका राग आला कीं, त्यानें राजापुरांतील सर्व इंग्रजांना कैद करून त्यांच्या मालाला **मुद्रा करविल्या.**

शिवाजीचा ( नवा,खांदेरीचा ) किल्ला अशा ठिकाणीं बांधला आहे कीं, मुंबईतून जाणारे येणारें कोणतेंहि गलबत त्याच्या तोफांच्या पल्ल्यांतून सुटून जाणार नाहीं. मोंगलांनीं या किल्ल्यावर हल्ला करण्याकरितां आपला आरमारी सेनापती सिद्दी कासम याला पाठविला आहे.

डाग रजिस्टर १६८० } (२२५५) { श. १६०२ वैशाख शु. १४
पृ. २३४-५ इ. मे १२ न्यू. } { इ. १६८० मे २

सुरतेची बातमी:—नागापट्टणचा सुभेदार **एकोजी राजा** यानें टूमलेवास व कारिकल लुटलें. त्याबद्दल कंपनीला अजून भरपाई करून दिली नाहीं. परंतु तो मदुरेच्या नायकाशीं लढण्याची तयारी करीत आहे. द्रव्याची लूट व नाना तऱ्हेचे जबरदस्त कर घेण्याचे प्रकार चालूच आहेत. या सर्वांमुळें तजावर प्रांत असा पिळून निघाला आहे कीं, असेंच पुढें चाललें तर तो कधींच भरभराटीस येणार नाहीं.

फॅ. रे. सुरत } (२२५६) { श. १६०२ वैशाख १५
भा. १०८ पृ. ८८ इ. } मुंबई-सुरत { इ. १६८० मे ३

सिद्दी युद्धांत पकडून आणलेल्या गलबतांचा आमच्या बंदरांत उघड लिलांव करितो. सशस्त्र लोक उतरवून आमच्या पहारेकऱ्यांना अडथळा करितो व सर्व प्रकारें त्रास देतो. शिवाजीच्या लोकांना यामध्यें आमचा वांटा आहे असें वाटणें साहजिक आहे. शिवाजी व सिद्दी या उभयतांशींहि सलोखा राखणें कठीण आहे. येथील गरीब बिचारे रहिवासी या हालांना कंटाळले आहेत...सिद्दी येथेंच राहील तर काय होईल हें समजत नाहीं. **संभाजी राजा** त्याच्या गलबतांवर हल्ला केल्याशिवाय रहाणार नाहीं. आपल्या नात्राची ग्वाही फिरवून तो बापाच्या गादीवर बसला आहे असें कळतें. मोरोपंडीत, अण्णाजीपंडीत वगैरे त्याचे हुकूम घेण्याकरितां पन्हाळ्यास गेले आहेत. **रामराजा रायरीला आहे. तो** तेथेंच रहाणार असून तो किल्ला त्याच्याच ताब्यांत आहे. सर्व सुभेदार व हवालदार संभाजीनें तसेच ठेविले. कांहीं बदल केला नाहीं [!].

डाग रजिस्टर १६८० } (२२५७) { श. १६०२ वैशाख व. ३
पृ. २४४ इ. मे १६ न्यू. } { इ. १६८० मे ६

कॉरोमांडेलकडील हकीकत, ७ व २१ फेब्रु:—

मोंगल बादशहा आणि विजापूरकर यांच्यामध्यें तह होण्याचीं बरींच चिन्हें दिसूं लागलीं. म्हणून औरंगाबादचा व्हाइसरॉय सुलतान मुअज्झम याला त्याचा बाप औरंगजेब याच्याकडून असा हुकूम आला कीं, नबाब कलीलखान [ Chalicluchan ] यानें उभयतांमध्यें मध्यस्थी करावी अशी गोंवळकोंड्याच्या राजाला विनंती करावी. शिवाजी-जवळ असलामुभी व युद्धसामुग्री दोन्हीहि संपुष्टांत आल्याची माहिती लागल्यामुळें सर्वांनीं मिळून **शिवाजीवर हल्ला करावा** असा बेताला बरेच सरदार अनुकूल होते.

परंतु हें करण्यापेक्षां बेळगोंच अधिक सोपें होतें। पृ. २४६–मोंगली सैन्य अद्याप विजापूरच्या किल्ल्यासमोर होतें, असी गोवळकोंड्याहून बातमी आली. मधून मधून चकमकी होतात त्यांत मोगलांचेंच विशेष नुकसान होतें. कारण त्याला रसदीचाच तुटवडा पडतो. शिवाजी ६००० घोडेस्वारांचें धावतें सैन्य घेऊन आसपासचीं खेडीं व शहरें लुटीत असतो. मध्यंतरीं मोगलानें आपलें सैन्य विजापुराहून परत बोलावून, या युद्धांत झालेल्या खर्चाची भरपाई करण्याकरितां आपल्या प्रजेवर मोठा बोजा घातला आहे. त्याचा सेनापती दिलेरखान याला आपण कर्नाटकांतून ३ लाख रुपये मिळवूं असें वाटलें होतें. परंतु त्या भागाच्या सुभेदारानें त्याला 'आपण इतक्या बंदुकीच्या गोळ्या पाठविण्यास तयार आहों' असें कळवून ५०० कापलेल्या नाकांचा हार नजर म्हणून पाठविला. यावरून त्यानें असें दर्शविलें कीं, 'तुम्हीं पुढें आल्यास तुमच्या लोकांची याप्रमाणेंच गत केली जाईल।'

| | | |
|---|---|---|
| फॅ. रे. मुंबई<br>भा. १९ पृ. २९६. | (२२५८)<br>सुरत–मुंबई | श. १६०२ वैशाख व. ४<br>इ. १६८० मे ७ |

शिवाजीच्या मृत्यूबद्दल सर्व बाजूंनीं बातमी येत आहे. तथापि कित्येकांना अजून संशय आहेच. एकादा मोठा प्रयत्न करण्यापूर्वी अशीच बातमी त्याच्याबद्दल पसरविली जाते. तेव्हां अधीक खात्री होईपर्यंत विश्वास येत नाहीं.

फॅ. रे. फो. सें. जॉर्ज मा. २८ पृ. १००-१०१ इ.
(२२६०)
सुरत-फो. सें. जॉर्ज
श. १६०२ ज्येष्ठ शु. ३ इ. १६८० मे २०

शिवाजी मेल्याची विश्वसनीय बातमी आली होती. परंतु आतां ती खोटी आहे असें म्हणत आहेत. **संभाजी राजा**, त्याचा ज्येष्ठ पुत्र, ह्याच्यावर तो फारच रागावला होता. त्याला **पकडण्यासाठीं ही युक्ती** त्यानें केली आहे असें लोकांना वाटतें.

फॅ. रे. सुरत मा. १०८ पृ. ९७ इ.
(२२६१)
मुंबई-सुरत.
श. १६०२ ज्येष्ठ व. १ इ. १६८० जून ३

शिवाजी मेला हें अगदीं खरें असून **संभाजीला बापाच्या सर्वस्वाचा तावा** मिळाला. तो अद्यापि पन्हाळ्याला आहे. त्यानें १००० स्वार सज्ज ठेविले असून त्यांना दोन महिन्यांचा पगार आगाऊ दिला. त्याचे बेत अजून समजले नाहींत. सर्वत्र त्यानें आपले **( नवे ) सुभेदार व अमलदार** नेमिले आहेत. त्याचा धाकटा भाऊ रायरीला सुरक्षित असून त्याला तो दयेनें वागवील असें म्हणतात. अण्णाजीपंडीताचा शिरच्छेद झाला. मोरोपंडितावर मर्जी खप्पा झाली नाहीं. तथापि त्याला अजून विश्वासांत घेतलें नाहीं. देशांत थोडथोडी स्थीरस्थावर होत आहे.

स. पृ. १३५ (२२) रा. श. ७ सु. १०८१ जवल १५
(२२६२)
श. १६०२ ज्येष्ठ व. २ इ. १६८० जून ३

श्री राजा **शंभू छत्रपती**

रा. मानजी गोपाळ देशाधिकारी व देशलेखक प्रांत कराड.

मल्हार गोसावी सदाव्रती यांस मौ० नांदोली तर्फ मारूल प्रा. कन्हाड हा गांव पूर्वीपासून इनाम असतां राजश्री कैलासवासी स्वामींनीं अमानत केला. यावरी स्वामी पन्हाळीहून रायगडावर जातांना कोरटीस गोसावीयासी भेटले.

प्रामाणिक ईश्वरभक्त देखिले. व गांव पूर्ववत् गोसावीयासी दिल्हा. तो चालविणें.

फॅ. रे. सुरत मा. १०८ पृ. १०४ इ.
(२२६३)
राजापूर-सुरत.
श. १६०२ ज्येष्ठ व. ८ इ. १६८० जून १०

आम्हांला आत्यन्यापहून नारळ मिळण्याबद्दल हुकूम झाल्याचें तुम्हांला मागच्या पत्रांत कळविलें होतें. परंतु कारभारांत आलटापालट झाल्यामुळें आलेला नवीन सुभेदार संभाजीच्या हुकमाशिवाय आम्हांला बक्षीस मिळणार नाहीं असें सांगूं लागला. त्यावर संभाजीकडे अर्ज केला. त्याचें उत्तर ' तूर्त मला सवड नाहीं. सवड होतांच हिशेब पाहून निकाल करूं. ' असें, म्हणजे बहुतेक नकार-दर्शकच आलें ! ...पूर्वीच्यापेक्षां कांहीं अधिक नोकर केवळ आत्म-संरक्षणाकरितां म्हणून आम्हांला ठेवावे लागतील. कारण, येथें स्वार व शिपाई यांनीं नेहमीं शहर गजबजलेलें असतें. ते **सर्व संभाजीकडे**

जात आहेत म्हणतात ! ह्या दाणगट लोकांपासून बचाव व्हावा म्हणून एकसारखा आम्हांला पहाराच ठेवावा लागतो.

[ प फॅ. रे. मुंबई मा. १९ पृ. ३३ ता. २२ जून-याच मजकुराचें मुंबईस पत्र. ]

डाग रजिस्टर १६८० पृ. ४२३ जुलै ५ न्यू. } (२२६४) { श. १६०२ आषाढ शु. ९ इ. १६८० जून २५

सुरतेची बातमी, एप्रील ५-पुनः **शिवाजी** २००० स्वार व ३०००शिपाई घेऊन सुरतेपासून ४० कोस किंवा ३० मैल अंतरावर जवळ आला आहे. त्याच्या भीतीनें सुरतेंत लहान मोठ्या सर्व लोकांत पळापळी सुरू झाली. इंग्रजहि बायकामाणसें घेऊन स्वालीकडे पळाले. परंतु ही भीती फार वेळ टिकली नाहीं. कारण शिवाजीचें सैन्य दूर निघून गेलें. त्याची एकसारखी चलती असल्यामुळें पुढें कांहीं बरे दिवस येण्याचा संभव नाहींच. पूर्वोक्त कर हिंदू व युरोपिअन या सर्वांवर बसवावयाचा होता. या बाबतींत असदखानानें बादशहाच्या नांवानें असा कायदा काढला आहे कीं, जर युरोपिअनांना सर्वांबरोबर तो एकदम घावयास नको असेल तर त्यांनीं पूर्वीच्या दराप्रमाणें म्हणजे ३½ टक्केप्रमाणें ६ नोव्हेंबर १६७९ पासून जकात घावी. कंपनीच्या व्यापाऱ्यांना ह्याप्रमाणें कर घावाहि लागला आहे.

फॅ. रे. सुरत मा. १०८ पृ. १०५ इ. } (२२६५) राजापूर-सुरत { श. १६०२ आषाढ शु. १० इ. १६८० जून २६

**संभाजी** आतां **रायरीला** गेला आहे. बक्षिसाच्या करितां त्याच्याकडे पुनः अर्ज करीत आहों. आतां राज्यांत व्यवस्था होऊन त्याला थोडा स्वस्थपणा असल्यामुळें बहुधा आमच्या अडचणी समजून घेण्यास त्याला वेळ होऊन अधिक अनुकूल उत्तर येण्याची आशा आहे.

सदर पृ. १०८, ता. १२ जुलै-**संभाजी रायरीला** आहे. धाकट्या भावाला त्यानें दयेनें वागविलें. **अण्णाजीचें डोकें कापलें नसून** त्याचे फक्त सांखळ्या (बेड्या) घालून हाल चालविले आहेत; अशी चौलच्या सुभेदाराकडील एका लायख माणसाकडून माहिती कळली. देशांत स्थिरता येऊन संभाजी राजा झाल्याचें जाहीर झालें आहे. त्याच्याजवळ आतां २० ह. सैन्य तयार आहे. तो फार मेहनती आणि सावध आहे असें लोक बोलतात.

डाग रजिस्टर १६८० पृ. ५१६ इ. जुलै २६ न्यू. } (२२६६) { श. १६०२ श्रावण शु. १ इ. १६८० जुलै १६

इराण, सुरत इकडील बातमी, **मार्च ते मे**:— वेंगुर्ला व कानडा या

डोंगराळ मुलखांतील युद्धें अद्याप चालू आहेत. शिवाजीचा मुलगा **संभाजी**, आपल्या बापाला सोडून कांहीं वेळपर्यंत मोंगल सैन्याकडे गेला होता, तो आतां आश्वासनावर विश्वसून शिवाजीकडे परत आला आहे. विजापूरचा तरुण राजा [अलीआदिलशहा मृत्यु इ. १६७२] मृत्यु पावल्यामुळें मोंगल आतां विजापूरच्या राजपुत्राला शिवाजीच्या विरुद्ध मदत करणार आहे असें म्हणतात. परंतु त्या नाठाळ गिधाडानें (Prey bird) मोंगलांच्या मुलखांत दूरवर प्रवेश करून, एका प्रसिद्ध शहरांतून अपार संपत्ती लुटून नेली.

डाग रजिस्टर १६८० पृ. ५३८-९ इ. आगस्ट ७ न्यू. } (२२६७) { श. १६०२ श्रावण शु. १२ इ. १६८० जुलै २८

इराण, सीलोन इकडील बातमी, **एप्रील-जून**— विजापूरचा राजा व मोंगल या उभयतांनीं एकदम **शिवाजी**वर हल्ला करण्याबद्दल आपसांत तह केला आहे. आणि ह्या उद्देशानें एक मोठें सैन्य चालूंहि लागलें आहे. शिवाजीच्या ठोकांनीहि **जिंजीच्या** मुलखांत जगी संरक्षक लढाई देण्याची तयारी चालविली आहे. प्रसंग एकंदरींत बिकट दिसतो. कारण, **शिवाजीच्या** मुख्य सेनापतीनें आपलीं बायकामाणसें सुरक्षित रहावीं म्हणून **तंजावरास** पाठविलीं आहेत.

फॅ. रे. सुरत भा. १०८ पृ. ११३ इ. } (२२६८) चोपडा-मुंबई { श. १६०२ श्रावण व. ८ इ. १६८० आगस्ट ७

शिवाजीनें गेल्या वर्षी घेतलेल्या सरहद्दीवरील **हनमंत गडाला** बहादूरखानानें वेढा घातला आहे. किल्लेकरी जोरानें प्रतिकार करीत आहेत.

फॅ. रे. सुरत भा. १०८ पृ. ११६ इ. } (२२६९) मुंबई-सुरत { श. १६०२ भाद्रपद शु. ४ इ. १६८० आगस्ट १८

उंदेरीला मोठी चकमक झडली. एका रात्रीं अंधारांतून **संभाजी राजाचे** २०० लोक गुप्तपणें उंदेरींत प्रवेश करून शिरले. परंतु उजेड नव्हता आणि बेटातील खुणा-खाचा त्यांच्या परिचयाच्या नव्हत्या व शिवाय सिद्दीला त्यांची फार लवकर चाहूल लागल्यामुळें त्यांचा पराजय झाला. सुमारें ८० शिरें बेटावर आणिल्यामुळें संभाजीच्या वकिलाला खेद वाटला. डे. ग.नें तीं शिरें किंवा कैदी बेटावर उतरूं दिले नाहींत. सर्व डोकीं माल्यावर टोंचून किनाऱ्यावर प्रदर्शन करण्याचा सिद्दीचा विचित्र उद्देश आम्हीं सिद्दीस जाऊं दिला नाहीं.

फॅ. रे. सुरत भा. १०८ पृ. १३५ इ. } (२२७०) चोपडा-सुरत { श. १६०२ भाद्रपद शु. ६ इ. १६८० आगस्ट २०

**संभाजी राजा** पावसाळा संपतांच बहादरखानाशीं लढाई देणार असून तसें त्यानें बहादरखानाला कळविलें आहे.

डाग रजिस्टर १६८० } (२२७१) { श. १६०२ भाद्रपद शु. १०
पृ. ५७९ इ. सप्टें. ३ न्यू. } { इ. १६८० आगस्ट २४

कोलंबोकडील बातमी, जून-जुलै:— शिवाजी राजा मरून संभाजीला त्याचें सिंहासन मिळालें असावें असें सर्वत्र बोलतात. आपल्या बापाच्या तत्त्वांप्रमाणेंच संभाजी वागणारा आहे असें लोक म्हणतात. परंतु त्याचा स्वभाव अधिक नरम असून [आपल्या] कंपनीबद्दल त्याच्या मनांत तितका तिटकारा नाहीं.

फॅ. रे. मुंबई मा. १९ } (२२७२) { श. १६०२ भाद्रपद व. २
पृ. ४६-४७ इ. } कारवार-सुरत { इ. १६८० आगस्ट ३१

जगजीवन बजाजी पंडित नांवाचा येथील सुभेदार आम्हांला त्रास देऊं लागला आहे. विशेषतः कर्जाऊ रकमा तो फार मागतो. त्याच्याकडून आधींच पुष्कळ येणें असल्यामुळें व आम्हांला लवकर वखार सोडून जावयाचें असल्यामुळें आम्हीं कर्ज देण्याचें नाकारिलें. त्यामुळें गेल्या २६ तारखेला वखारींत सामुग्री येण्याची बंद करून त्यानें आम्हांला पकडून नेण्याकरितां शिपाई पाठविले. अर्थात् आम्हीं प्रतिकार केला तेव्हां ते लोक पळाले. त्यामुळें रागावून त्यानें आमच्या नोकरांच्या गाई म्हशी धरून विकावयास काढल्या. कांदेरा त्याच्याच हद्दींत आहे तेथील व सर्व बाजूंनीं व्यवहाराला तो अडथळा करितो. तरी संभाजी रायगडला आहे त्याच्याकडे सोयतर्ची पत्रें त्वरेनें पाठवावीं.

फॅ. रे. मुंबई मा. १९ } (२२७३) { श. १६०२ भाद्रपद व. ५
पृ. ४३ इ. } सुरत-मुंबई { इ. १६८० सप्टें. ३

संभाजीराजाकडे मनुष्य पाठविण्याबद्दलचें तुमचें म्हणणें कळलें. आपणांस ३।४ महिन्यांत सिद्दी खांदेरी उंदेरी इत्यादि सर्व प्रकरणीं कंपनीकडून सुस्पष्टाच्या मार्गानें कांहीं हुकूम येतील. तरी तोंपर्यंत थोडा धीर धरून असेंच कांहस्यानें व धोरणानें ह्या गोष्टी

डाग रजिस्टर १६८०
पृ. ६४६-४७ इ. आक्टो. ९ न्यू. } (२२७५) { श. १६०२ आश्वीन व. १
इ. १६८० सप्टेंबर २९

नागापट्टमची बातमी, १४ जुलै—सुप्रसिद्ध दरोडेखोर **शिवाजी** राजा मेल्याबद्दल खात्रीलायक बातमी आली आहे. त्याचा पुत्र संभाजी यानें आपल्या धाकट्या भावाशीं भांडण करून शेवटीं गादी मिळविली. व तो धाकटा भाऊ थोड्याशा जमिनीचा कारभार मिळाला तेवढ्यावर संतुष्ट होऊन राहिला. सेनापती **रघुनाथपंडीत** आपल्या धन्याच्या मृत्यूनंतर लगेच मदुरा प्रांतांतून आपलें सर्व सैन्य काढून घेऊन, पोर्टोनोव्हो व तेगनापट्टण या मार्गानें **जिंजी**कडे गेला. तेथें सरहद्दीवर त्यानें छावणी दिली असून, शिवाजीच्या मृत्यूबद्दल एक अक्षरहि न बोलतां **एकोजीराजाशीं** तोंडी बोलणें करून त्याच्याकडून खंडणीचा मोठा भाग वसूल करून घेतला. ही लबाडी कळल्यावर मागाहून एकोजी राजा अतिशय क्रुद्ध झाला असें म्हणतात.......

तंजावरांतील परिस्थिति वाईट झाली आहे. तेथील प्रजेची कुचबणा होत असून, तंजावरचा त्याग करून. बरेचसे शेतकरी उत्तरेकडे किंवा दक्षिणेकडे जात आहेत.

ऐ. पू. २९ (२९)
सु. १०८१ रम. २८ } (२२७६) { श. १६०२ आश्वीन व. ३०
इ. १६८० आक्टो. १२

अजर० मालोजीराय घोरपडे—वजा० कार० व देसाई पर० केळूर ममदाबाद.

श्रीनिवासभट बिन वेंकटभट सो मुद्गल यांचें इनाम होनगुंद वगैरे गावीं आहे तें त्याजकडे चालविणें.

श्री. सं. ले. ३२
रा. श. ७ } (२२७७)
'अमात्य' आज्ञापत्र मु. व सी. { श. १६०२ कार्तीक शु. ६
इ. १६८० आक्टो. १८

छ. **राजा संभाजी**—मानजी गोपाळ दोंकारी व दोक प्रां. कऱ्हाड.

क० चाफळ येथें **श्रीसमर्थ रामदास** करीत असलेल्या श्रीरामनवमीच्या उत्साहास वार्षिक मोईन बा। सनद रा. दत्ताजी त्रिमल वाकेनवीस माजी (ले. १९७२ प्रमाणें) आहे. १४ सनगे किं. होन ११॥ आहे असें रा. दिवाकर गोसावी जबानी सांगितलें. तेणेंप्रमाणें चालवीत जाणें.

श्री. सं. ले. ३३
रा. श. ७ } (२२७८)
आज्ञापत्र अमात्य मु. व सी. { श. १६०२ कार्तीक शु. ६
इ. १६८० आक्टो. १८

श्री शंभुछत्रपती—जगनाथ वेजाजी दोंकारी व दोंक प्रांत मलकापूर.

रा. रामदास गोसावी याचे इनाम प्रा। मारी आहे. देवार्चन वे. रघुनाथभट वसिष्ट गोत्री याकडे आहे. तरी (ले. १९८२ व २१५८–२१५९ च्या सनदेप्रा।) चालविणें.

श्री. सं. ले. ३४ } (२२७९) { श. १६०२ कार्तीक शु. ६
रा. श. ७ } { इ. १६८० आक्टो. १८.

**छत्रपती**—कासी रंगनाथ देशरी व दोक प्रांत जाउली.

**रामदास गोसावी** यांस अतीतअभ्यागतादिकांकरतां तीर्थ. कै. (शिवाजी) नीं छ २९ जिल्हेज सु. १०७५ (श. १५९७ चैत्र शु. १) स तांदूळ तेल वगैरे सामग्री एक मण ३९॥ शेर व ४॥ टाक दिली. दुमती म्हैस, हरकारा, तेल, फाटी इ. नंदादीपादि खेरीज स्वतंत्र देणें. तरी तसें देऊन धर्मादाऊ लिहीत जाणें.

श्री. सं. ले ३५ } (२२८०) { श. १६०२ कार्तीक शु. ६
रा. श. ७ } { इ. १६८० आक्टो. १८

छत्रपती **संभाजी**— कासी रंगनाथ देशरी व दोक प्रांत जाऊली

रामदास व चाफळचे देव यांस मोईन बा। सनद ती. कै० दरमाहे २५ होन पा। इ. सालाब द प्रो चालविणें.

ओ. कॉ. मा. ४० } (२२८१) { श. १६०२ कार्तीक शु. ६
नं. ४७०५ इ. } सुरत-कंपनी { इ. १६८० आक्टो. १८

शिवाजीचा मृत्यु व **संभाजीला** राज्याधिकार. संभाजीच्या हल्लींच्या कारभारावरून बापापेक्षां हा निराळ्या स्वभावाचा म्हणजे **अधिक नेमस्त आणि सदय** असा दिसतो. तेव्हां आतां कारवारची वखार चालू ठेवण्याबद्दल तुमचा हुकूम असता तर बरें झालें असतें.

शिवाजीशीं दीर्घकाल व मोठ्या खर्चाचीं युद्धें करून **बादशहाचा; खजीना रिकामा** झाल्यामुळें त्याच्या पठाणांनीं व इतर मंत्र्यानें तद्धर्मीय मुसलमानांव्यतिरिक्त इतरांवर **असह्य कर** लादले. तिन्ही युरोपीय राष्ट्रांवर ते घातले. त्याला सर्वांनींच एकमतानें विरोध केल्यामुळें, बादशहाकडून पूर्ववत् जकातीचा दर **३½ टक्के** करण्याचा हुकूम आला असून त्याची कडक अमलबजावणी होत असते. आम्ही त्रिवर्ग त्याबद्दल विचार करीत आहों.

श्री. सं. ले. ३६ } (२२८२) { श. १६०२ कार्तीक शु. ७
रा. श. ७ } { इ. १६८० आक्टो. १९

**छत्रपती संभाजी**

कोनेर रंगनाथ देशरी व दोक सुभा माहुलीनिहाये तर्फ सातारा.

चाफळ कर्यात नाणेघोळ येथील श्रीरघुनाथास माजी वाकेनवीस दत्ताजी त्रिमल याचे सनदेप्रमाणें ( ले. १९७१ ) दर गांवीं ११ बिघे जमीन दिली ती चालविणें.

श्री सं. ले. ३७ (२२८३) श. १६०२ कार्तीक शु. ७
रा. श. ७ इ. १६८० आक्टो. १९

छत्र. **संभाजी**—वासुदेव बाळकृष्ण.

चाफळास कटकांचे शिपाई व इतर लोक यांस ताकीद करून देव व गोसावी यांस हरकोण्हाचा उपद्रव न लागे व यात्रा सुखरूप भरे: तें करणें.

श्री. सं. ले. ३८ (२२८४) श. १६०२ कार्तीक शु. ७.
रा. श. ७ इ. १६८० आक्टो. १९

छत्र. **संभाजी**-मानजी गोपाल देशारी व देशक प्रांत कऱ्हाड.

चाफळ येथील देवास ( ले. १४ प्रमाणें ) उत्पन्न आहे तें चालवणें. व शिंगण-वाडीच्या रयेतास मठास शाकार करावी लागते म्हणून वेटवेगार माफ असून इनामाकरतां लिहिणारादि वेतनासह दिला आहे. तेणेंप्रमाणें चालवणे.

श्री. सं. ले. ५५९-५६० (२२८५) श. १६०२ कार्तीक शु. ७
रा. श. ७ म. मु. व मु. इ. १६८० आक्टो. १९

श्री शंभु छत्रपती—

विनायक उमाजी व येसाजी मल्हारी देशारी व देशक, प्रांत पुणें व वाई.

रा. वासुदेव गोसावी यास कन्हेरीमठ ता नीरथडी येथें कै. **शिवाजी राजे** यांचे सनदेप्रमाणें ( श. १५९३ भ. वै. व १२ व ले. २१०५ ) जमीन कास टके ९ आणि परगणे वाई पैकीं सांडरदेच व पनाला येथें जमीन कुलबाबदेखील दिली असे. ती दुमाले करणें. ( मुद्रा -एपा श्रीशिव राजेंद्र मुख्या मात्यस्य सत्यधुक॥ मुद्रा मोरेश्वर स्यास्तां मद्रा सदागदायिनी।

डाग रजिस्टर १६८० (२२८६) श. १६०२ कार्तीक शु. ११
पृ. ७२४,२९ इ. नोवें. २ न्यू. इ. १६८० आक्टो. २३

पर्लीकटाकर्डाल बातमी एप्रीड-मे, जुले-आगस्ट, सप्टेंबर—सुरतेहून हुगळीकडे असें लिहिण्यांत आलें कीं, बंडखोर रजपुतांचें युद्ध क्षुद्र स्वरूपाचें असून रजपूत डोंगरांत पळून गेले. आणि **औरंगजेब** बादशहाचें सैन्य दुष्काळानें पीडित झाल्यामुळें दिल्लीस परतलें ! तेथें सुलतान अज्जम बापाकडे आला. त्याचें प्रेमानें स्वागत होऊन बंगालच्या नवाब शाहिस्तेखानाच्या जागीं त्याची नेमणूक होईल असें म्हणतात.

गोवळकोंड्याहून असें लिहून आलें आहे कीं, **शिवाजीराजाला** त्याच्या दुसऱ्या बायकोकडून **विषप्रयोग झाला** असावा (?). त्याचा कनिष्ठ पुत्र गादी-वर बसावयाचें घाटत होतें त्याला तुरुंगवास प्राप्त झाला आहे. आतां **शिवाजीचा** ज्येष्ठ पुत्र राज्य करीत आहे. त्याला थोड्या अडचणी आल्या असें नाहीं. यामुळें त्यानें

सेनापती **रघुनाथ पंडीत** यास १२५ ह. पार्डो आणि पोर्टोनोव्हो, नागापट्टण इत्यादि मुलखाचा संपूर्ण करभार दिला आहे. लहानसहान अमलदारांच्या त्यानें बदल्याहि केल्या. शत्रूपासून आपल्या राज्याचें रक्षण करण्याच्या इराद्यानें संभाजीनें ८००० स्वार जादा नोकरीस ठेविले आहेत. कारण मोंगलांचें व विजापूरचें सैन्य घाटांतून स्वारी करणार असल्याबद्दल वदंता होती. [शिवाजीनें ज्या अनेक राजांचा मुलूख जिंकून घेतला होता त्या] अनेक राजांनीं आपला मुलूख त्याच्या वारसापासून परत मिळविण्याची जबरदस्त खटपट केली. [फार तर] शिवाजीच्या पुत्रांना वार्षिक नेमणूक देण्याचा त्यांनीं विचार केला. **आर्हियंत** आणि **साल्हेर** हे दोन किल्ले घेऊन शिवाजीच्या सरहद्दीकडे कायमची पाठ फिरविण्याचा **बहादुरखानानेंहि** बेत केला होता ! औरंगजेबाच्या सैन्याचा पठाणांनीं मोठा पराजय केला......

[पूर्वी झालेल्या] तहानुसारें जिंजी व त्याखालील मुलखावर गोवळकोंड्याच्या सुलतानानें आपला हक्क सांगितला आहे. जरी सेनापती रघुनाथ पंडीत यानें मोठमोठे नजराणे देऊन कुशल वकील गोवळकोंड्याकडे पाठविले आहेत तथापि हा किल्ला आपल्या राज्यांत सामील केल्याशिवाय तो रहाणार नाहीं.

म्हैसूर व मदुरा येथील नायक एकत्र होऊन तंजावरच्या एकोजी राजावर चाल करून जात आहेत. गोवळकोंड्याच्या सुलतानानेंहि आपल्याला साहाय्य करावें म्हणून त्यांनीं खटपट केली; परंतु तितक्यांत **एकोजीनें** मदुरेच्या नायकाचा पराजय केला व त्याला त्याच्या राजधानीच्या किल्ल्यांत (त्रिचनापल्ली) कोंडून टाकलें व तेथें हल्ल्यावर हल्ले चढविले.

शेवटीं एकोजी राजा व मदुरानायक यांचा तह झाला. कोणाचीहि तशी अपेक्षा नसतां, एकोजीनें गेल्या वर्षी ताब्यांत घेतलेला घाटाचा मुलूख मदुरानायकास परत दिला. अशा रीतीनें वैर मिटून शेजारच्या सर्व राजांशीं एकोजीचे शांततेचे संबंध आहेत. आणि तंजावर प्रांतांतील परागंदा झालेले रहिवाशी आतां परत येऊं लागले आहेत,

[मे २८ ची बातमी (७ जून न्यु.)]:—रिजेंटचे [मोंगलांशीं] संबंध बऱ्यांतले आहेत. आणि **जकातीच्या नोंदी सप्टेंबरमध्यें पुऱ्या** व्हावयाच्या असल्यानें [मोंगलांनीं] वाढविलेल्या जकातीमुळें [अद्याप] आम्हांला कांहींच तोशीस लागली नाहीं. मुसलमान जकातदार युरोपीय व्यापाऱ्यांना अनुकूल असल्याचे दिसतात. यामुळें १॥ टक्क्यांची (पूर्ववत् आम्हांला) सवलत देण्याबद्दल दरबाराकडे ते लिहून कळवितील. ह्या मार्गाचा अवलंब करावयाचा तर (फ्रेंच, इंग्लिश व डच अशा) तिघांनीं मिळून सुमारें ५०,००० रुपये खर्च येईल. याकरितां आपसांत वाटाघाट होऊनहि अद्यापि कांहींच ठरलें नाहीं. प्रत्येकजण आपल्याकडे मोठेपणा घेऊं इच्छितो [!]. साधारणपणें इंग्रज हे सर्वांत जुने असल्यामुळें त्यांना [हा मोठेपणा]

घावा असें साहाजिकच वाटतें. परंतु फ्रेंच लोक अभिमानी असल्यामुळें इंग्रजांना मान देण्याची त्यांची तयारी नाहीं.

फॅ. रे. सुरत मा. १०८ } (२२८७) { श. १६०२ कार्तीक शु. १३
पृ. १४६ इ. } राजापूर-सुरत { इ. १६८० आक्टो. २५

आमच्या २६ जूनच्या पत्रांत **संभाजीराजाकडे** बक्षिसाबद्दल पुनः अर्ज पाठविल्याचें कळविलें होतें. २५ तारखेला त्याचें पत्र घेऊन नोकर आले. त्यांत मूळ कराराप्रमाणें सिद्दीच्या बाबतींत इंग्रजांचें वर्तन होत नसल्यामुळें त्यांच्याबद्दल आपल्या मनांत आदर नाहीं. असें तो म्हणतो तेव्हां सिद्दीला घालवून लावीपर्यंत तो आपलें कांहींच काम करणार नाहीं. उलट पूर्वी मिळालेल्याहि बक्षिसाच्या रकमेची तो परत मागणी करील. परंतु सिद्दी बेट सोडून जाईल तर अथणीची लूट वगैरे सर्व बाबतींत पूर्वी शिवाजीच्या वेळेपासून चाललें होतें तसेंच स्नेहानें तो चालवील असें दिसतें.

श्री. सं. ले. ३९ } (२२८८) { श. १६०२ कार्तीक शु. १५
रा. श. ७ } { इ. १६८० आक्टो. २७

छत्रपती **संभाजी** — कोनेर रंगनाथ देशारी व देशक प्रांत सातारा.

सज्जनगडीं रा. रामदास गोसावी व श्रीदेव यांस नैवेद्य इ. करतां फाटे वगैरे देऊन पावती घेणें.

श्री. सं. ले. ४० } (२२८९) { श. १६०२ कार्तीक शु. १५
रा. श. ७ } { इ. १६८० आक्टो. २७

छत्रपती **संभाजी** — कासी रंगनाथ देशारी व देशक प्रांत जाउली.

महाबळेश्वरचें देवालय पंचगंगे सन्निध दिवाकर गोसावी यांनीं बांधून मोहोत्साह बरा चालला आहे. माजी प्रधान मोरोपंत यांणीं मोईन श्रीदेवाच्या मोकाशाचे गांवावर दिली होती. म्हणून ती मिळत नसे. हाली सुभेमारापैकीं देविले आहे. तरी चालविणें.

श्री. सं. ले. ४१ } (२२९०) { श. १६०२ कार्तीक व. १
रा. श. ७ } { इ. १६८० आक्टो. २८

छत्रपती **संभाजी**—कृष्णाजी भास्करः— ( ले. २२८३ प्रमाणें. )

डाग रजिस्टर १६८० } (२२९१) { श. १६०२ कार्तीक व. ३
पृ. ७३९ इ. नोवें. ९ न्यू. } { इ. १६८० आक्टो. ३०

पुलीकताकडील बातमी, सप्टेंबरः - **एकोजी राजानें** मदुरा व तेनवर वगैरे राजांशीं तह केल्यामुळें त्याला त्रिमेलवास, कारकल इत्यादि ठिकाणच्या स्वामी-

त्याबद्दलची वादांत पडलेली रक्कम आमच्या कमांडरनें देऊन त्याला मदत असे दोन हुंडी नजर केले.

फॅ. रे. मुंबई भा. १९ }
पृ. ४८-४९ इ. }
(२२९२)
राजापूर–सुरत.
{श. १६०२ कार्तिक व. ५
{इ. १६८० नोव्हें. १

रायरीला ३ महिने राहून आमचे नोकर संभाजीचें पत्र घेऊन २५ ऑक्टोबरला आले. त्यांत बक्षिसाबद्दल अनुकूल मजकूर आहे. परंतु राजाचा ( सनदशीर ) हुकूम नाहीं. डेप्युटी गव्हर्नर, सिद्दीला मुंबई बंदरांतून काढून लावण्याचें, त्याला पावसांत राहूं न देण्याचें व सामुग्री न पुरविण्याचें कबूल करील तर बक्षीस देईल. नाहींतर संभाजी ह्या तक्रारी मिटविण्याचा अन्य मार्ग पत्करील.

तुमच्या २१ तारखेच्या पत्राप्रमाणें हेंदरमधून आम्हांला निघून येतां येत नाहीं. कारण संभाजीचें सैन्य येथें जवळ असून ह्या बेटावर ( वखारीवर ) तें हल्ला करील अशी भीती वाटते.

फॅ. रे. सुरत भा. १०८ }
पृ. १४६ इ. }
(२२९३)
मुंबई-सुरत.
{श. १६०२ कार्तिक व. ९
{इ. १६८० नोव्हें. ४

राजापुरास राजाचीं सुमारें ५० गलबतें ४-५ हजार सैन्यासह तयार झालीं असून दौलतखान तीं लवकरच उत्तरेकडे घेऊन येईल अशी बातमी आली आहे. सिद्दीला आम्हीं आश्रय दिल्यामुळें राजा संतापून आमच्यावरच हें आरमार पाठवीत असावा असा संभव आहे. आम्हीं सावधपणें रहात आहोंत.

डाग रजिस्टर १६८० }
पृ. ७५३-५४ इ. नोव्हें. १५ न्यू. }
(२२९४)
{श. १६०२ कार्तिक व. १०
{इ. १६८० नोव्हें. ५

पुलीकताकडील बातमी, आक्टोबर:—पोर्टोनोव्होचा व्यापार चांगला चालला असून अजूनहि त्यांत सुधारणा होण्याची आशा वाटते. सेनापती रघुनाथ पंडित यांचें एक लहान गलबत पोर्टोनोव्होहून मलाक्काकडे व्यापाराकरितां जावयाचें आहे. त्याच्यावरील जकात माफ करण्याबद्दल त्यानें आम्हांला विचारिलें आहे.

फॅ. रे. सुरत भा. १०८ }
पृ. १४७ इ. }
(२२९५)
चोपडा–सुरत.
{श. १६०२ कार्तिक व. १४
{इ. १६८० नोव्हें. १०

या भागांत शिवाजीचें [ ? ] सैन्य बाहेर पडल्यामुळें फारच भीती वाटते. एक स्वार व सैन्याची तुकडी सुरतेकडे, दुसरी बऱ्हाणपुराकडे व तिसरी महाराष्ट्रांत ह्या सरहद्दीवरून सरकत सरकत दक्षिणेकडे गेला आहे त्याच्यावर जात आहे.

सदर मा. १० पृ. १ (२), ता. ४ डिसें. सुरत-धरणगांवः—तुमचें २५ नोव्हें. चें पत्र १ तारखेला पोंचलें. बहादरखान सैन्य घेऊन नजीक असल्यामुळें तुमच्या मार्गांत बंदोबस्त बरा आहे हें वाचून बरें वाटलें.

डाग रजिस्टर १६८० पृ. ७६४ इ. नोव्हें. २१ न्यू. (२२९६) श. १६०२ कार्तीक व. ३० इ. १६८० नोव्हें. ११

हुगळीची बातमी २३ आगस्टः— मोंगल बादशहा औरंगजेब ह्यानें आपल्या साम्राज्यांतील परधर्मीयांवर बसविलेला कर नेहमींच चालू आहे. परंतु आमच्या लोकांना अद्यापि या बाबतींत त्रास झाला नाहीं. मात्र सुरतेप्रमाणेंच इकडेहि जकातींमध्यें वाढ होईल असें वाटत होतें. आग्र्याकडील बातमी अशी आहे कीं, सुलतान अकबर बादशाही किल्ला चितोडगड येथून निघून गेला असून त्याचा भाऊ सुलतान अक्षेम [?] तेथें जाण्याकरितां मोठें सैन्य घेऊन रजपुतांशीं युद्ध करण्याकरितां अजमिराहून निघाला आहे. ज्येष्ठ शहाजादा सुलतान मुअज्जम हा बरेच दिवसांपासून औरंगाबाद सोडून उज्जनीस रहात असतो. अशा रीतीनें सर्व शहाजाद्यांना नजरेखालीं ठेवून त्यांना कह्यांत राखण्याचा बादशहाचा हेतू आहे. आपण शरण आल्यानेंहि बादशहाचा राग शांत होत नसून आपला संपूर्ण नाश व्हावा अशीच त्याची इच्छा असल्याचें रजपुतांचे निदर्शनास आल्यामुळें, त्यांनीं धैर्यानें नवीन सैन्य उभारून अनेक वेळां शहराबाहेर पडून मोठे जय मिळविले. राण्याला जिंकण्यांत दिलीरखानाचें कांहींच हित साधावयाचें नसल्यामुळें तो दिरंगाईनेंच युद्ध चालवितो. ह्या कारणानेंहि त्यांचें बरेंच फावतें. आतां बादशहा आपण स्वतः येऊन राण्यावर हल्ला करणाऱ्या सैन्याचें नेतृत्व स्वीकारणार आहे.

डाग रजिस्टर १६८० पृ. ८२३-४ इ. नोव्हें. २३ न्यू (२२९७) श. १६०२ मार्ग. शु. २ इ. १६८० नोव्हें. १३

सुरतेची बातमी, सेप्टेंबर — महंमद अमीनखानाला साम्राज्याचा दिवाण करून अहमदाबादच्या त्याच्या जागीं शहाजादा अकबर याची नेमणूक झाली. परंतु महंमद अमीनखानाला त्यामुळें बरें वाटलें नाहीं.

अखेरीस फ्रेंच, डच व इंग्रज यांच्यावर वाढलेली जकात बसविली गेली. तिन्ही राष्ट्रांनीं दरबाराकडे विनंति अर्ज केला आहे. सुरतच्या सुभेदारानेंहि त्यांच्या अर्जाची शिफारस करून तो मंजूर केल्यास दरबारांतील लोकांना ह्या त्रिवर्गाकडून ३० हजार रु. दरबारखर्चाबद्दल मिळतील असें अभिवचन दिलें आहे. फक्त सुभेदारालाच १० ह. रु. द्यावयाचे आहेत. वाढत्या दरानें जकाती देण्यापेक्षा हें आम्हांला फार सुलभ पडणार आहे.

मोंगल साम्राज्यांतील युद्धें आणि दंगे एकसारखे चालूच आहेत. रजपुतांचा समूळ नाश करण्याचा बादशहाचा पक्का बेत झालेला आहे. आजवर तो नेहमीं अज-

मीरला रहात असल्यामुळें, अहमदाबाद-आग्रा रस्ता कायमचा बंद होऊन व्यापाराचें अतोनात नुकसान झालें. मोंगल बादशहा • औरंगजेब यानें, मुसलमानी धर्मतत्त्वांबद्दल [ Party ? ] कांहीं अवास्तव कल्पना धरून, फलकीं चित्रें व चमत्कारिक वस्तु इत्यादि राजवाड्यांतील पुरातन संग्रह आणि मूर्ति किंवा खोदकाम अशासीं यत्किंचित्‌हि साम्य असणारे सर्व पदार्थ एकत्र करून-आपा येथें कांहीं माहित्यापूर्वी जाहीर रीत्या जाळून टाकले. अशा रीतीनें नाश पावलेल्या वस्तूंची एकंदर किंमत अंदाजें ३ लक्ष रुपये होती असें सर्व म्हणतात.

शिवाजी राजाच्या मृत्यूमुळें मोंगल लोकांना कांहींच फिकीर वाटेनाशी झाली आहे. त्याच्यामागून अधिकारावर येणाऱ्या कोणाहि मानसामध्यें मोंगल साम्राज्याला त्रास देण्याइतकें पुरेसें धैर्य अगर शहाणपण नाहीं; अशी त्यांची पक्की समजूत आहे. व्यापाराच्या दृष्टीनें अशी वस्तुस्थिति कितीहि शुभ्रदायी असली तथापि त्याबद्दल निश्चित असें कांहींच आज सांगतां येत नाहीं.

सा. ले. ३९० } (२२९८) { श. १६०२ मार्ग. शु. ५
रा. ७ } न. { इ. १६८० डिसें. १६

रा. शिव छत्रपति?—धर्माजो नागनाथ मुद्राधा. प्रा कुडाळ मामले फोंडा.

नागोजी नाइक सरदेसाई यांचेकडे मामलेफोंडेचों सरदेशमुखी आहे. हकवतन बिलाकुसूर चालत होते. हली मख्ता खंड ५०० होन देतात. तेणेकरून अवशात चालत नाहीं. येविसीं मल्हार नरजू हरी व नागोजी इंगले याहीं विनंति लिहिली आहे. हली उक्त देसाई गनीमास ( तांत्र ) (अपूर्ण)

सा. ले. ३९१ } (२२९९) { श. १६०२ मार्ग शु. ५
रा. ७ } न. { इ. १६८० डिसें. १६

शिवछत्रपति?—केशो सुभे. प्रां भीमगड मामले फोंडा ( प्रथम सा. ले. ३९० चा मजकूर व पुढें ) नागोजीस त्याची सरदेशमुखीची परंपरा वृत्ती दुमाला केली असे. वंशज विभक्त होतील तर इतरास १२५ होन व वडिलाकडे वृत्ती चालविणें.

फॅ. रे. मुंबई } (२३००) { श. १६०२ मार्ग. व. १३
भा. १९ पृ. १ (३) } सुरत-मुंबई { इ. १६८० डिसें. ८

राजाच्या हितसंबंधांना विरोध येईल अशा रीतीनें सिदीला आमच्याकडून मिळणारा आश्रय व मदत हीं राष्ट्रांच्या कायद्याप्रमाणें समर्थनीय ठरणार नाहींत; हें उघड आहे. परंतु हल्लींच्या परिस्थितींत आम्हांला तो नियम मोडावा लागणार हेंहि तितकेंच स्पष्ट आहे. कांहीहि केलें तरी दोघांपैकीं कोणाचा तरी अस्नेह पत्करणा-

शिवाय गत्यंतर नाहीं. आणि दोघांपैकीं कोणाला राखावयाचें व कोणाला दुखवावयाचें हें ठरविणें फार दुर्घट आहे. परंतु आतां आपलीं गलबतें भरून पाठवावयाची वेळ आल्यामुळें त्यांना कोणाचाहि अडथळा होऊं नये म्हणून तुम्हांला खालील हुकूम देणें भाग पडत आहे.

**संभाजीकडून** आलेल्या मनुष्याला त्याचें धर्मामें महत्व व त्याचा दर्जा यांना शोभेल असें वागवावें. मात्र त्यानें बातमीदाराचें काम करूं नये अशाकरितां त्याच्यावर नजर ठेवावी. परंतु त्याला गैरविश्वास न वाटेल याची खबरदारी घ्यावी. जरा त्याला लवकरच घालवितां आला तर बरें होईल असें आम्हांला वाटतें. तथापि त्याला दिरंगाईवर टोलवीत ठेविल्यानें सिद्दीशीं अगदींच भांडण होण्याचा प्रसंग येत नसेल तर तसाहि त्याला राखून ठेविल्यास चालेल. तात्पर्य, गलबतें भरून जात तोंपर्यंत कोणाहि एकाकडून बांधा उत्पन्न होऊं नये असें वागा. एकदां गलबतें निघून गेल्यावर मग याचा कांहीं निकाल करण्याचा विचार पुढें करतां येईल. मध्यंतरीं सिद्दीला त्याच्या गैरवर्तनाचे दुष्परिणाम समजावून सांगून [संभाजी] राजाला समाधान वाटेल अशा कांहीं अटी त्याच्याकडून लेखी मिळतील तर मिळवाव्या. उदाहरणार्थ, बदराच्या लगत्याच्या मुलखाला सिद्दीनें तोशीस देऊं नये वगैरे. जर हें तो अमान्य करील किंवा एकदां कबूल करून मोडूं पाहील तर, येथील कंपनीच्या व्यवहाराला धोका न येईल अशा रीतीनें त्याला सुचवावें. परंतु आज येथील सुभेदार आमचा खुलासा (सहानुभूतीनें) ऐकण्यास तयार नाहीं. तो तयार झाल्यावर मग वाटेल तर त्यानें (सिद्दीनें) आपल्या तक्रारी सुभेदाराकडे पाठवाव्या अशा रीतीनें त्याला समज देण्यास हरकत नाहीं! [म्हणजे आताच सिद्दीला फार दुखवूं नका!] हेंच पत्र फॅ. रे. सुरत भा. ९० पृ. ५-६ वर डिसें. २८ चें म्हणून दिलें आहे.

डाग रजिस्टर १६८० पृ. ८२०-१ इ. डिसें. २१ न्यू. } (२३०१) { श. १६०२ मार्ग व. ३० इ. १६८० डिसें. ११

मलाक्काची बातमीः—शिवाजीचा सेनापती रघुनाथ पंडीत याचें लहान जहाज गालिपाचे २१९ गठ्ठे घेऊन, पोर्टोनोव्होहून येथें १७ ऑक्टोबरला येऊन पोंचलें.

फॅ. रे. मुंबई भा. १९ पृ. ६ (२) इ. } (२३०२) हुगळी-मुंबई { श. १६०२ पौष शु. २ इ. १६८० डिसें. १३

**शिवाजी** आजपर्यंत इतक्या वेळां मेला आहे कीं विरोधकांना तो अमर आहे असें वाटूं लागलें आहे. त्यानें आपल्या हयातींत नेहमीं ज्या प्रकारानें व ज्या यशानें आपलें (राज्य) चालविलें तितक्या तऱ्हेनें चालविणारा त्याच्यापाठीमागें त्याचा कोणीच लायक वारस नाहीं असें समजतात. तेव्हां आजपर्यंत भरभराटींत असलेल्या त्याच्या कारभाराला उतरती कळा लागली आहे असें अनुमदानें ठरेपर्यंत त्याच्या मृत्यूच्या खबरीवर कोणीच विश्वास ठेवील असें वाटत नाहीं.

विली आहे ! तुमचा मुलूख तो केवढासा ! डच व पोर्तु०नीं मर्दपणानें वागून केव्हांच अघाडी मारली आहे. मुंबई बेट कांहीं तुम्हीं पराक्रमानें मिळविलें नाहीं. (दान म्हणून) करारानें मिळालें; तें तरी तुम्हांला कोठें राखतां येतें ? तुम्हीं मोठे लढाऊ लोक म्हणवून घेऊन आमच्या राजांशीं दोन हात करण्याचा दिमाख कशाला दाखवितां ? तुम्हीं मुकाट्यानें व्यापार करावा आणि आम्हांला भिऊन रहावें. एवढीच तुमची योग्यता !" पण ही बढाई मारणारे लोक आजहि शिवाजीचें नांव ऐकतांच थरकांप होतात ! दोनदां, त्या भयंकर लुटारूच्या तावडींतून हें शहर (सुरत) आम्हीं होतों म्हणूनच वांचलें हें त्यांच्या लक्षांत रहात नाहीं !

इकडे मोंगल हिंदूंवर दुप्पट डोईपट्टी वसूल करून त्यांचीं देवळें सांपडेल तेथें फोडून टाकीत आहे. पूजास्वातंत्र्य नष्ट झाल्यामुळें हिंदु लोक दऱ्याखोऱ्यांतून आणि निर्जन ठिकाणीं जाऊन आपलें भक्तिसुख (चोरून) अनुभवितात.

याच सुमारास १ जून १६८० रोजीं [!] **शिवाजी** निसर्गाचें देणें देता झाला (मृत्यु पावला). त्याचेंच व्रत **संभाजी** पुढें चालवीत असतो. शिवाजीबरोबर अनेक लोकांनीं आपल्याला जाळून घेतलें !

शिवाजीच्या प्रधानांमध्यें कोणाला राजा करावें याबद्दल मतभेद होता. अण्णाजी पंडीत मुख्य प्रधान धाकट्याच्या बाजूचा होता; तर मोरो पंडीत ज्येष्ठ पुत्र संभाजी याचा हक्क पुरस्कृत करीत होता. पुढें संभाजीच महाराजा झाला.

श्री. सं. ले. ४२ } श. 　(२३०८)　{ श. १६०२ / इ १६८०-८१

श्रीसमर्थांनीं सज्जनगडीं असतां चाफळ व परळी येथील श्रीरामचंद्र महोत्सवाची व्यवस्था सांगितली तीं कलमें ३५.

हि. रे. मा. ११ } पृ. ९० ! 　(२३०९) एकहरफी　{ श. १६०२ / इ. १६८०

पापळ परगण्याचा तपशील-यांत गांवांतील जिराईत व बागाईत जमिनीचा वसूल, गांवचराई, इनाम, वगैरेचा तपशील असून औरंगाबाद, बऱ्हाणपूर, एलिचपूर व अकोट येथून परगण्याच्या ठाण्यांचीं अंतरें दिलीं आहेत.

सा. ले. ३६८ }　(२३१०)　{ श. १६०२ / इ. १६८०-८१

जिवाजी कृष्ण मिा तिमाजीकृष्ण--सिवापा मुचेडी व जिवाजी सोमाजी

तुम्ही नाइकापासोन ९०० होन कर्ज घेतले ते नाइकास पावले.

हिस्टॉ. मिसलनी
जेस्विट् लेटर्स, पृ.१९-२० इ. } (२३११) जेस्विट वृत्तांत १६७९-८१ { श. १६०२-३ इ. १६८१

**एकोजीच्या** जुलमामुळें तंजावरची हलाखीची स्थिति आहे. त्यानें देवळांची देखील पूर्वापार चालत आलेली उत्पन्नें जप्त केलीं. 'देवाला भात खावयाचा नसतो. त्याला सुवासिक फुलें मिळालीं म्हणजे पुष्कळ झालें' असें बोलणारा अधिपती इतरांना कसा नागवीत असेल, ती कल्पनाच करावी!

......१६७० [ १६८० ] च्या अखेरीस **शिवाजीच्या** मृत्यूची बातमी आली. ह्या वेळीं ती खरी ठरली! ह्या पूर्वी, आपल्या मृत्यूच्या बातमीमुळें बेसावध झालेल्या मुलखांत चोरी व लुटालूट अनायासानें करतां यावी म्हणून, त्यानें लोकांना फसविण्याकरितां अनेक वेळां असल्या बातम्या पसरविल्या होत्या. सर्व राष्ट्रांमध्यें राज्यकर्ता म्हणून परमेश्वरानें आपल्याला अढळपद दिलें अशी वढाई मारणारा [?] हा जुलमी राजा शेवटीं मृत्यूच्या तावडींत सांपडला.

खं. १८ ले. ६३ } (२३१२) { श. १६०२ इ. १६८०

......नागोजी बिन हिरोजी बद अमल वर्तला. त्यावरून त्यास गुंजवणी अलिकडे पकडून त्याचें डोसकें मारलें. ते वेळेस हारजी शाहाजी माहाराजाकडे चाकरीस होता. पुढें दादो कोंडदेव या प्रांतें येऊन मुलकास कौल दिल्हा. त्यांचा चाकर नावडकर मो धागवडीस कमाविसीस ठेविला होता. त्यानें आपली सीव रेटली. नंतर दादो कोंडदेव सावरदरियास आले. तेथें गोजावा कोम नागोजी हिनें तक्रार नेली. तीस त्यांनीं १२ रुके जमीन देऊन समजावीस केली. त्यावर शिवाजीमहाराज या प्रांतास आले. आपले आजे त्रिंबकजी महाराजांजवळ व मलकोजी पुरंधरास सरनोबतीवर होता. मलकोजी एकदां गांवावर येऊन वाडेसेते वगैरेंची व्यवस्था करीत होता. तो महाराजांचे बोलावण्यावरून रायगडास गेला. पुढें पातशाही गर्दी जाली. मुलूक उज्याड जाला.

खं. १८ ले. २३ } (२३१३) { श. १६०२ इ. १६८०

राघो बलाल—मोरो त्रिमल

मौजे चिखली येथील पाटील, कुणबी व कुळकर्णी यांमध्यें हिसेबाबद्दल भांडण आहे. रा. पंतीं सन सलासांत निवाडा केला असून ते कागद हारपले असें कुणबी म्हणतात. तरी हा निश्चय तुमचे पत्रावरी आला आहे. तरी पत्रीं निवाडा झाला असल्यास तैसें लिहावें म्हणजे त्याप्रमाणें त्यांस वर्तवू. सिवाजी कुळकर्णी व कुणबी आणून पाहतां पैकें निघतात. पण कुलकर्णी पळोन गेला व तो खोटा आहे. कळावें.

ऐ. ७ पृ. ६ } (२३१४=अ) { श. १५०५
महजर { इ. १५८३

ऐनापूर पा रायबाग व तांगडी मामले विजापूर ह्यां गांवच्या हद्दीबद्दल तंटा. तांगडीकरांना धैर्य न झाल्यामुळें दिव्य होतांच ऐनापूरकर खरे आले.

श. १५४२ ज्येष्ठ शु. १२] (१३७=११४ अ) [इ. १६२० जून १

खं. २० ले. २२९ } (२३१५=२०५ अ) { श. १५४५
शु.१०२४ } { इ. १६२३

शमशखान— हुदे. व मो. मौजे मोरगाऊ पा पुणा.
मल्हारभट बिन कृष्णभट भगत मोरया (अपूर्ण)

श. १५४६ ] (४९१ अ) [इ. १६२४

पिसुर्लेकर सं. पोर्तु. } (२३१६=३०२ अ) { श. १५५१ पौष
इ. } { इ. १६२९ डिसेंबर

सध्यां **सुलतान खुर्रम** निजामशहाला साह्य करतो, व त्याच्याविरुद्ध लढाई करीत नाहीं. परंतु मलिक अंबराचा मुलगा **फत्तेखान**–जो तुर्त कैदेंत आहे–त्यास सोडून देण्याविषयीं निजामशहाला आज्ञा करतो. झुररखानाला [?] सोडून देण्याविषयींहि सुलतान खुर्रम निजामशहाला सांगतो.

श. १५६४ ] (५४२=४८० अ) [इ. १६४२

श्री सं. ले. ४२१ } (२३१७=४११ अ) { श. १५५८ भाद्र. व. १०
श. सु. १०३७ रखर २२ } न. { इ. १६३६ सप्टें. १३

खंडो तुलारस, महादीवा माध्यंजन कुल. मौजे बाहे ता वाळवे.
नारो महादेऊ ऋग्वेदी मौ. उरण

मौ. मज.चे कुलकर्णावर कोनेरी गोळक हक्क सांगूं लागला. मुनसफी होऊन आम्हीच मिरासदार ठरलो. आम्ही ५० होन सेरणी कबूल केली. ती देण्यास सामर्थ्य नाहीं. म्हणून तुम्हांस १३५ होनांस निमे कुलकर्ण देऊन वृत्तिभाऊ केलें असे.

श्री सं. ले. ४२२ } (२३१८=४१२ अ) { श. १५५८ आश्वीन शु. २
सु. १०३७ जवल १ } न. { इ. १६३६ सप्टेंबर २१

ले. ४२१ मध्यें दिलेल्या कुळकर्णविक्रीचा महजर.

सां. इ. सा. ले. १३ } (२३१९=५२७ अ) { श. १५६८
१ रवल ५ } { इ. १६४६

विजापूर बादशहा——सिद्दी अमर, दंडाराजपुरी
खेमसावंत सरदेसाई परगणे कुडाळ व महालनिहाये, हे एकनिष्ठ चाकरीचे व तरवार-

बहादर आहेत. त्यानें मोंगलाकडेस ममता न राखावी म्हणजे आपणावर कृपा होईल, हें त्यास कळवून वकील रवाना करणे. त्यास आज्ञा देऊं तसें काम करणें.

श. १५७६ मार्ग. व. ५ ] (१०३९=६८१ अ) [इ. १६५४ डिसें. ८

सां. इ. सा. ले. १४ } (२३२०=७२० अ) { श. १५७८ इ. १६५६

महमद बादशहा——खेमसावंत सरदेसाई प. कुडाळ व महालानिहाये.

तुम्ही वडिलार्जित चाकरीवर आलां, ठीक केलें. कोणते तऱ्हेनें राजा संभाजीशीं ममता राखून मोगल पाजचरोवर मैत्री न ठेवावी. बादशाही मुलखाची आबादानी करुन कुमकेकरितां हुजूर फौजेत येणें. एक हुजार मनुष्य पाठविणें.

श. १५७९ श्रावण ] (७२८=७१० अ) [इ. १६५७ जुले

श. १५८० फाल्गुन शु. २ ](१०४०=७६३ अ) [इ. १६५८ फेब्रु. ३

सां. इ. सा. ले. १५ } ? जिल्काद २१ } (२३२१=७७१ अ) { श. १५८० इ. १६५८-५९

अलि आदिलशहा बिन महमदशहा, विजापूर—खेमसावंत स. दे.

घाटाचे पायाखालील तमाम परगणे इनाम दिले. जमाबंदी करणें. वाजवी वसूल घेणें. आदलखान अमलांत हिंदवींत लिहिल्याप्रमाणें मसुरा वगैरे १३ गावें हक्कासह इनाम दिलीं. घाटावरून फौजा येतील तेव्हां हजर राहाणें. रहदारीस हरकत न होईसा बंदोबस्त करणें.

इ. वृ. १८३७ पृ. ३२८ } ? } (२३२२=८६० अ) { श. १५८३ इ. १६६१

नेताजी राजे व नरहरसिंगजी राजे पालकर—गोपाल शंकर.

मौ. तांदली प्रा करडें हा गांव आपला वतनी असून पिढी दरपिढी चालत आला आहे. पूर्वी अहमदनगरीं पातशाहा होते त्या समयांतला कलसकर मुसलमान होऊन आमच्या वतनाकरतां मांडूं लागला. तेव्हां निवाडा होऊन वतन आमचें हें सावूत झालें. त्याउपरी रा. साहेबाजवळहि मांडण होऊन कळसकर खोटे ठरले. हल्लीहि ते मांडत आहेत. तरी भोगवटा वतनाचा चालत आला आहे हेच आपली सनद, हे गोष्टी आपण ध्यानांत आणून विचार करावा.

श. १५८५ चैत्र शु. ४ ] (९२९=९२३ अ) [इ. १६६३ एप्रील १

श. १५८५ आश्वीन व. २ ](९८४=९५७ अ) [इ. १६६३ आक्टो. ८

रु. ३ ले. १८ } ! } (२३२३=१०३७ अ) { श. १५८६ इ. १६६४-६५

आपला बाप सदूजी मकाजी मयत जाला. भि (सि) व भट बिन तिमणभट अत्रे

आगंतुक हे व मी जोसपण चालवितो. आपण तिघेजण भाऊ पण एकाचेहि लग्न नाहीं. यास्तव जोसपण होनु १४ स तुम्हालाच विकतो; कारण कुलकर्णहि तुम्हीं घेतले आहे.... आपणास त्रिंबकजी राजे भोसले यांचे कारकीर्दीत होन ५ कर्ज होतें; कलांतरानें ते १० देणे झाले. ते देऊन जोतीस खाणें.... महाजन तीन बंधू ह्यांनी सामराज निलकंठ शेजेकर यास विक्त दिधले. तेणेप्रो हर्डी सामराज नीलकंठ याजकडे मौजे म.चे कुलकर्ण व जोतिसीपण दुमाला केले असे.

हि. रे. क. मा. २ पृ. १ } (२३२४ = १०४१ अ)　{ श. १५८६
फरा. सलातीन पृ. }　{ इ. १६६४

### इराण बादशहा—औरंगजेब

आम्हीं असें ऐकलें कीं, बादशहा असमर्थ व असहाय आहे असें समजून हिंदुस्थानांत बऱ्याच ठिकाणीं बंडखोरांनीं बंडाळी माजविली असून त्यांनीं बरींच ठिकाणें ताब्यांत घेतलीं आहेत व त्या राज्यांतील लोकांना ते त्रास देत आहेत. त्यांपैकीं मुख्य शिवा नांवाचा काफीर असून तो आजपर्यंत कोणाला माहीतहि नव्हता. बादशहाच्या कमकुवतपणामुळे त्याला सधी मिळून त्यानें पुष्कळ किल्ले ताब्यांत घेतले. कित्येक शिपायांना मारले व मुलख उजाड केला व आतां तो बादशहाशीं बरोबरीचें नातें सांगू लागला आहे. बादशहा मात्र बापाला कैदेत टाकणें म्हणजे जग जिंकणें असें मानतो. व आपल्या भावांना-गादीचे जे न्याय्य वारस-मारून जादूटोण्यांत गढून राहिला आहे. आजपर्यंत त्यानें विश्वासघात व कपट यांचे खेळ खेळले. पण बंडखोरांना शासन करण्याची वेळ येतांच तो इतका गोंधळला आहे कीं, बंडखोरांना त्याच्या हातून शासन होणें अशक्य आहे. आमच्या कुलव्रतानुसार आम्ही ज्याप्रमाणें आमच्या पूर्वजांनीं हुमायुनास गादी मिळवून देण्याच्या कामीं मदत केली त्याप्रमाणें-हुमायुनाचा वंशज अडचणींत आहे असें पाहून जातीनें सैन्य घेऊन मदत करण्याचें ठरविलें आहे व गरिबांना जुलमी लोकांच्या तावडींतून सोडवून त्यांचा दुवा घ्यावा अशी आमची इच्छा आहे.

हि. रे. क. मा. २ पृ. १२ } (२३२५ = १०४१ आ)　{ श. १५८६
फरा. सला. पृ. } औरंगजेब—इराणचा शहा.　{ इ. १६६४

मुसलमानांना सवलती व काफिरावर जुलूम याशिवाय आमच्या मनांत दुसरें कांहींहि नाहीं. आम्हीं जकात, रहदारी, निगहबानी वगैरे कर व्यापारी, प्रवासी व कलावंत यांना त्रास होत असल्यामुळे खजिन्यास चाट बसत असतांना सुद्धां रहित केले. यामुळें हे लोक आतां दुवा देत आहेत. या त्यांच्या सदिच्छेमुळेंच आमच्या सर्व इच्छा फलद्रूप होऊन द्वेष्टे लोक कालाच्या पोटांत गडप झाले आहेत. उ.-आपले वडिलांनीं आमच्या देशावर स्वारी केली. पण त्यांत निराश होऊन ते अवेळीं मरण पावले. आपलें उद्दट पत्र येतांच असें वाटलें कीं, शूर शिपायांच्या रक्तपाती तलवारींनीं व तीरांनीं त्यास

उत्तर द्यावें. परंतु बालवय व अननुभवित्व यामुळें लिहिलेल्या शब्दांकरितां येवढें घोरकर्म करूं नये. म्हणून आमच्या कृत्यांची हकीकत खालीं देत आहों. दारा शिको नास्तिक होता; शुजाला भावांना मारून बापादेखत गादी बळकाविण्याची इच्छा होती; मुरादबक्ष दारुडा व जुलमी होता; आम्हीं त्या सर्वांना यथायोग्य शासन केलें. वडिलांनीं प्रथम मुलांच्या दुर्गुणाकडे दुर्लक्ष केलें व नंतर मला गादी देऊन आपण बाजूला झाले. शिवाच्या बंडाविषयीं आपणांस असल्या बातम्या मिळाल्या याचें आश्चर्य वाटतें. आपल्या ठिकाणीं बालवयामुळें कदाचित् शहाणपणा नसेल. पण सर्व दरबारांत शहाणपणाचा अभाव व्हावा हें चांगलें नाहीं. आमच्या सैन्यास इराणतुराणचीं सैन्येंहि तोंड देऊं शकत नाहींत तर शिवाची कथा काय? वाटमारे लोक लपून छपून आपला धंदा करीत असल्यास त्यांत विशेष नाहीं. आपण कार्याच्या आदिअंतीं जास्त दूरदर्शीपणा दाखवावा हें अधिक चांगलें. इराणच्या प्रवाशांना त्रास देणाऱ्या फँस ह्याचा नाश करून आपली भेट घ्यावी ही इच्छा आहे.

मॉ. रि. मा. ४७ पृ. ३५ ? | (२३२६ = ११५५ अ) जयसिंग-कुमार रामसिंग (दिल्ली) | श. १५८८ इ. १६६६

[ ' मीं सर्व प्राथमिक आणि कष्टाचें काम करून ठेविलें आहे. आतां मला दख्खनच्या अधिकारावरून काढून घेतल्यानें माझें नांव नालायकीबद्दल विनाकारण बद्दू होऊन, मीं केलेल्या कष्टांचा फायदा मजमागून येणाऱ्या अधिकाऱ्याला फुकटांत मिळेल व त्याचें मात्र नांव होईल ! तेव्हां अजूनपर्यंतच्या विख्यात कामगिरीकडे लक्ष देऊन, मजवर मेहेरबानी होईल अशा तऱ्हेनें मजला दख्खनच्या अधिकारावरून काढूं नये अशी बादशहाला भेटून विनंती कर ' इत्यादि मजकूर लिहिल्यावर—]

माझ्या आयुष्याची आतां 'हत्ती गेला आणि शेंपूट राहिलें' अशी वस्तुस्थिति आहे. माझ्या वृद्धापकाळीं माझी नाचक्की न व्हावी म्हणून मीं माझे पीर व मुर्शीद ( बादशहा ) यांना शरण आलों आहें. माझ्या आयुष्याचे शेवटचे दिवस मला मानहानींत काढावे लागत आहेत ! [हाफ्त अंजु० पृ. १९५]

(२) जयसिंग-कुमार रामसिंग

[ सांकेतिक लिपींतील पत्र ]—मीं लहानमोठी कोणतीहि गोष्ट तुझ्या हिताकडे लक्ष ठेवून करितों. असें असतांना तूं मात्र बादशाही कामगिरीबद्दल महत्त्वाच्या गोष्टी मी लिहितों तेव्हां बेफिकीरीनें स्वाऱ्याशिकारी करीत राहतोस ! तुझ्याकडून पत्रांचीं उत्तरें कधीं वेळेवर येत नाहींत. आणि जेव्हां येतात तेव्हां त्यांत कित्येक मुद्दे तसेच सोडून दिलेले असतात. माझें बापपणाचें नातें जरी यदाकदाचित् तूं विसरलास तरी माझा दरबारांतला मुखत्यार म्हणून तरी तुला माझें काम काळजीपूर्वक केलें पाहिजे. माझ्याकडून एखादें पत्र केव्हां गेलें आणि तें तूं बादशहाला केव्हां सांगितलेंस असा बाद-

तुम्हीच खादला. आम्ही जरी तुम्हाजवळी मागावें तरी बहुत दूर होतों. वन्या बोलें तुम्ही देणार नव्हां. म्हणून तेरा वर्षे सबूरी केली. मनामधे येसा विचार केला कीं, बरें, महाराजांचे पुत्र तेहि आहेत. खाती तोंवरी खात. मालाचे धनीच आहेत. जे समई आम्हाला फावेल ते समई आम्ही वेव्हार सांगोन घेऊन. येसें मनी धरून होतों. येसीयास राजकारणप्रसंगें आम्ही कुतुबशाहाचे भेटीस भागानगरास गेलों. तेथून कर्नाटकांत गेलों. चंजी घेतली. व येलुरतर्फेचा मुलुख घेतला. व सेरखानास झगडियांत मोडून गर्देस मेलविलें. सेरखानाचे हातीं मुलूक होता तेवडाहि घेतला. त्यावरी मजल दरमजल कावेरीतीरास गेलों. तेथून तुम्हाला पत्रें लिहिलीं कीं, रा. गोविंदभट गोो व रा० काकाजीपंत व रा. निलोबा नाईक व रा. रंगोबा नाईक व तिमाजी बक्षीयार राऊ येसे भले लोक आम्हापासी पाठवणे म्हणून तुम्हाला बहुतां रीतीं लिहून पाठविलें त्यावरून तुम्ही सदरहू भले लोक आम्हापासी पाठवून दिल्हे. त्या भले लोकांसी बहुता रीतीं घरोबियाचा वेव्हार सांगोन आमचा अर्धा वांटा आम्हाला वन्या बोलें द्या म्हणोन सांगोन पाठविलें. त्यावराबरी रा. बालंभट गोसावी व रा. कृष्ण ज्योतिसी व कृष्णाजी सेखजी येसे आपले तर्फेनें भले लोक दिल्हे. हे भले लोक तुम्हाजवळी जाऊन बहुतां रीतीं बोलिले कीं, गृहकलह करूं नये; आपला अर्धा वांटा मागतात तो यावा येसे बोलिले. परंतु कपटबुद्धी तुम्ही येसी मनी धरिली कीं, या समयांत आम्ही बहुत थोर राजे जालों आहों. आम्हांसी आपण खासा भेटीस येऊनु हलमल नरमी बहुत दाखवावी आणि आमचा वाटा बुडवावा. तेरा वर्षे सारें राज्य आपणच खादलें; पुढेंहि सारे राज्य आपणच खावें; येसी बुद्धि मनी धरून वाटियाचा निवाडियाची तह न करितां आपण खासाच आमचे भेटीस आलेस. आमची व तुमची भेट जाली. त्याउपरी आम्हीं बहुता रीतीं तुम्हासी बोलिलो कीं, आमचा वाटा अरधा द्या. परंतु, तुम्ही वाटा द्यावा हा विचार मनी धराचना. मग जहर आले कीं तुम्ही धाकटे भाऊ आपण होऊन आमचे भेटीस आलेस आणि तुम्हाला धरावे आणि वाटा मागावा हे गोष्टी थोरपणाचे इज्ततीमध्यें त्याच नव्हे. या निमित्य तुम्हाला चंजाउरास जावयाचा निरोप दिघला. तुम्ही चंजाउरास गेलेसीं याउपेरी गृहकलह वाढऊं नये. वाढलियानें पहिले युगीं पांडव कौरव बहुतबहुत कष्टी जाले ते सारा भारताची कथा मनात आणून गृहकलह वाढविलियांत उभयपक्षी कष्टी होयेजेत. येसें जाणून रा. शामजी नाईक व कोनेरीपंत व शिवाजी शंकर या हातीं मागते बहुता रीतीं सांगोन पाठविलें कीं, तुम्ही व आम्ही वाटे करून घेऊन परस्परें समाधाने राहोन. परंतु, तुम्ही दुर्योधनासारिखी दुष्ट बुधी करून संधी न कराच. युघ्य करावें येसेंच मनी धरिले. येसियास आम्हाला रायेगड प्रांतें बहुत कांहीं कार्य होतें यानिमित्य चि. संताजी राजे व रा. रघुनाथपंत व रा. हंबिरराऊ येसे ते प्रांते ठेउनु आम्ही स्वार होऊन तोरगल प्रांतास आलों. तेथें येसी खबर आइकिली, कीं, तुम्ही तुरुक लोकांच्या बुधीस लागोन आमच्या लोकांसी झगडा करावा येसें मनीं धरून आपली

सारे जमेत मेकवट करून आमच्या लोकांवरी पाठवून दिल्हेत. ते वालगोंडपुरास आले. तुमचे लोक चालोन आल्यावरी तुमच्या आमच्या लोकांत थोर झगडा जाला. तुमचे लोक पराजय पावले. प्रतापजी राजे व भिवजी राजे व शिवाजी दबीर यैसे तिघे धरिले व कितियेक लोक मारिले; कितीयेक लोक पलोन दाणादाण होऊन गेले. यैसा समाचार आइकिला. हें ऐकोन बहुत नवल येसें वाटलें कीं, के० महाराज त्यांचे तुम्ही पुत्र, बहुत थोर लोक, यैसे असोन कांहीं विचार करीत नाही. व धर्माधर्म विचारीत नाहीं. यैसे असतां कस्टी व्हाल याचें नवल काये? तुम्ही म्हणाल कीं, काये विचार करावा? तरी यैसा विचार करावा होता कीं, अधर्मेकडून तेरा वर्षे आपण सारें राज्य खादलें तें खादलें. आतां, अरधा वांटा मागतात तो त्यांचा त्याला द्यावा; आणि आपण सुखें रहावें. यैसा विचार करावा होता. दुसरा विचार करावा होता कीं, श्रीदेवाची व श्रीची कृपा त्यावरी पूर्ण जाली आहे. दुस्ट तुर्कांला ते मारितात. आपल्या सैन्यांतहि तुरुक लोकच असतां जयें कैसा होतों; आणि तुरुक लोक कैसे वाचो पाहातात, हा विचार करावा होता. आणि युध्याचा प्रसंग पाडावा नव्हता. परंतु, दुर्योधनासारखी बुधी धरून युध्य केलें आणि लोक मारविले. जे जाले ते जाले. पुढें तरी हट न करणें. तेरा वर्षे तुम्हीं सारे राज्य खादलें तें खादलें. याउपरी कितेक आमचे आम्ही घेतले असे. अरणी, बेंगलूर, कोल्हार, होसकोट, सिरलकटे व किरकोल जागे व चंजाऊर यैसे जे जागे तुमचे हातीं उरले आहेती ते आमचे लोकांचे हातीं देणें. आणि नकद पैके व जडाव व हाती व घोडे यांचा अरधा वाटा देणें. यैसा विचार करून आम्हासी संधी करणें. तुम्ही यैसा संधी निर्मळपणें केलिया आम्ही आपणापासोन तुम्हाला तुंगभद्रे आलाड पनाळेप्रांते तिन्ही लक्ष होनांची दौलत देऊन; अथवा आम्हाजवळील दौलत तुम्हाला मानेना तरी कुतुबशाहास अर्ज करून त्यापासून तुम्हाला ३ तीन लक्षांची दौलत देवऊनु. यैसे दोन्ही विचार तुम्हाला लिहिले आहेत. या दोन्हीमधील येक मर्जी धरून मान्य करणें. हटाचे हातीं न देणें. आपल्यांत आपण गृहकलह करावा आणि कस्टी व्हावें याचें कांहीं प्रयोजन नाहीं. याउपरी तन्ही आमचा आपला संधी व्हावा यैसी बुधी मर्जी धरून वांटियाचा वेव्हार निर्गमून टाकणें. आणि सुखें असणें. गृहकलह बरा नव्हे. आम्हीं तरी वडीलपणे आजीवरी तुम्हाला सांगितलें; आतांहि सांगतो ऐकाल तरी बरें. तुम्हीच सुख पावाल. नाइकाल तरी तुम्हीच कस्टी व्हाल. आमचें काये चालतें ! बहुत काय लिहिणे 'मर्यादेयं विराजते'

| | | |
|---|---|---|
| से. रे. कॅट्. पृ. १०३ इ.१६७७-७८ | (२३३३ = २०२३ अ) मि. चाइल्ड—मुंबई [ ? ] | श. १५९९ इ. १६७७-७८ |

शिवाजीनें चेंजी चंजावर, पिलमदल ( Pillamdall ) आणि इतर कित्येक किल्ले घेतले.

सा. ले. ३६६
शु. १०८० साबान १५ } (२३३४=२२२० अ) नेमपत्र { श. १६०१ माघ व. १ इ. १६७९ फेब्रु. ६

को अथणीच्यां पेठेबद्दल नियम, देवालयीं समस्त देव बसोन, झाला कीं, एक मूठ मिरें, सुपारी लाम व उगट घेत देत जाणें. नवी जिकीर न करणें. हे नेमउत्तर सोडील तो सिवाचारकुलाचाराविगळा व छपन्न देशाचे दैवाविगळा.

खं. ८ ले. ३७ } (२३३५) हकीकत {

बेदरीं निळोपंत फयाळनिशी करीत होते. त्यांस तपे सोनवळची ठाणेदारी व मजमू दिल्ही. तेव्हां, महाद परभू हा तेथील अदकारी त्यानें, कसाला पडला म्हणून वतन श. १४८५ मध्यें १३ ह. टके घेऊन निळोपंत यास दिलें. पुढें कळोपंत त्रिन नागोजीपंत यास कारकुनीवर ठेवून आपण हुजूर मोसबियास आले. तिकडे ८।१० वर्षे राहणें पडलें. नंतर परत येतांना सरखेती मिळाली. इकडे येतांच कळोपंत व निळोपंत यांचा कलह लागून कळोपताचा नातू मुरार सोमाजी यानें मारेकरी घालून निळोपंताचा पुत्र नारोपंत यास बायकामुलें यांसह मारिले. नारोपताची स्त्री आपलें मूल सोनाजी घेऊन पुण्यास आली. सोनाजी व त्यांचे पुत्र निळोजी हे वतनावर गेले नाहींत. छत्रपतींच्या पदरीं राहिले, पुढें मानजी मुरारीचा व आपला ( रामचंद्र निळकंठ याचा ) वतनाबद्दल तंटा लागून कल्याणीचा सुभेदार जुनदअल्ली याजपुढें गोतासमक्ष निकाल होऊन वतन आमचें खरें असें ठरलें. मादाणे, कुर्कसे इत्यादि गांवें व तेथील मानपान.

(से) फॅ. रे. सुरत
भा. ९०–२ पृ. २८ इ. } (२३३६) सुरत–फो. सें. जॉर्ज { श. १६०३ चैत्र व. २ इ. १६८१ मार्च २६

बादशहानें आमच्यावर चढविलेली १½ टका जकात अजून कमी झाली नाहीं आणि होईल अशी आशाहि वाटत नाहीं. कारण गेलीं कित्येक वर्षे मुसलमानांपासून जकाती घेण्याचें बंद होतें; त्याऐवजीं आतां त्यांपासून शेंकडा २½ टके घेण्यास सुरवात झाल्याचें कळलें. बादशहाला पैशाची मोठी टंचाई भासूं लागल्यामुळें हा उपक्रम त्यानें केला आहे. **शिवाजी** आणि रजपूत या उभयतांशीं दीर्घकाळ युद्धें करावीं लागल्यामुळें त्याचा खजीना रिकामा झाला. त्यातून त्याचा तिसरा पुत्र अकबर बंड करून रजपुतांना मिळाल्यामुळें अनेक तऱ्हेचे गोंधळ माजतील अशी भीती वाटते.

डाग रजिस्टर ११६८
पृ. ३८२ इ. जून २१ न्यू. } (२३३७) { श. १६०३ आषाढ शु. ६ इ. १६८१ जून ११

सद्रंगपट्टणच्या १९ मार्चच्या पत्रात सर्वत्र शांतता असल्याची बातमी आहे. तथापि **शिवाजीचें** सैन्य विजापूर व गावळकोंडा याच्या रोखानें येत आहे त्यापासून

जबरदस्ती किंवा लूट अशा सारखा कांहीं त्रास होण्याचा संभव आहे. याशिवाय लिंगोजी सांगरसोच्या अमलाखालीं सर्व कांहीं ठीक आहे.

(से) फॅ. रे. सुरत } (२३३८) { श. १६०३ आषाढ व. ४
मा. ९०-२ पृ. ४६ इ. | सुरत-मुंबई { इ. १६८१ जून २५

तुमच्या इच्छेप्रमाणें मायकेलच्या पुस्तकांतून उतारा व शिवाजीच्या हिशेबाची नक्कल राजापूरच्या वह्यांतून जशीच्या तशी करून पाठविली आहे. त्याच्या मुळाकडून ह्या सर्व हिशेबाचा उलगडा करण्यांत तुम्हांला यश येवो अशी आमची इच्छा आहे.

(से) फॅ. रे. सुरत } (२३३९) { श. १६०३ माघ व. १०
मा. ९०-३ इ. } सुरत-कंपनी. { इ. १६८२ जाने. २३

[पृ. १३] अनेक अडचणींनंतर सरतेशेवटीं आम्हीं राजापूरची वखार संपूर्णपणें काढून घेतली आहे.

[पृ. १७] *तुमच्या इतर कोणत्याहि कारभारापेक्षां तुमच्या मुंबई बेटाचा आम्हांला फार* भार वाटतो. शिवाजी, मोंगल बादशहा आणि उर्मट पोर्तुगीज हे सर्व दुष्ट लोक शेजारीं असल्यामुळें त्यांच्याशीं शांतता राखणें हें मोठें कठीण काम होऊन बसलें आहे. शिवाजी- (किंवा आतां संभाजी म्हणणें अधिक उचित होईल) शीं खांदेरीउंदेरीच्या बाबतींत उद्भवलेला तंटा हें एक ह्याचें चांगलें उदाहरण आहे. ह्या चकमकींत ले. थॉर्पच्या अविचारी साहसामुळें तो आणि दुसरे बरेच लोक प्राणास मुकले. खांदेरी आणि उंदेरी हीं खडकाळ बेटें त्या वेळेपर्यंत ओसाड असून त्यांचेकडे कोणींहि लक्ष दिलें नव्हतें. त्यांच्या बाबतींत शिवाजी-चा आमचा तंटा कशामुळें आणि कोणत्या मुद्यांवर होता हें तुम्हांला न कळविल्याबद्दल प्रेसिडेंट व कौन्सिल यांवर(आम्हांवर) ठपका ठेवण्यांत आला आहे. परंतु त्यावेळीं किंवा आतांहि, त्याच्या या कृत्याला महत्वाकांक्षा किंवा कांहीं राजकारणी धोरण यांव्यतिरिक्त [ हक्क आदिकरून ] दुसरें कांहीं कारण होतें, याची आम्हांला जाणीव नव्हती किंवा नाहींहि. आणि यामुळें थॉर्पचा मृत्यु आदिकरून झालेल्या नाशाबद्दल आम्हीं दोषास पात्र होत नाहीं. वास्तविक, ह्या थॉर्पे प्रकरणाबाबत मुंबईहून पत्र येईपर्यंत शिवाजीनें ती जागा आपल्या ताब्यांत घेतल्याचेंहि आम्हांला कळलें नव्हतें. त्या वेळचा डेप्युटी गव्हर्नर हेन्री ऑक्सिंडेन, हल्लीं विलायतेंत आहे, तो याबद्दल आपली खात्री करून देईल. यद्यपि आपलीं जहाजें इंग्लंडहून यावयाच्या वेळेलाच हा तंटा उपस्थित झाला आणि त्यांचा या कामीं उपयोग करण्याला, जरी, तीच वेळ फार योग्य अशी होती, तथापि आम्हीं तसा हुकूम देऊं शकलों नाहीं; किंवा 'न्यू लंडन' जहाजावरून जॉन नाइन्ड वगैरे ग० होऊन जाईपर्यंत तशा तऱ्हेची सूचना मुंबईकडूनहि आम्हांला करण्यांत आली नव्हती. [आणि जेव्हां तशी सूचना देण्यांत आली] तेव्हां 'ॲन' व 'बेंगाला' हीं दोन्ही जहाजें

हिंदुस्तानच्या किनाऱ्यानें खालीं रवाना झालीं होतीं. वरें, 'जहाजांनीं त्या बेटांवर मारा केल्यास तें हस्तगत होण्याचा संभव आहे' एवढाच त्यांच्या सूचनेचा इत्यर्थ होता. परंतु असें करणें तितकें सोपें नव्हतें. या ( मोंगल ) बादशहाचें एवढें मोठें आरमार, कीं ज्यामध्यें अनेक मोठीं जहाजें व पुष्कळ सैन्य असलेलीं अनेक लहान गलबतें सज्ज होतीं; तें शिवाजीचें कांहींच नुकसान करूं शकलें नाहीं. किंवा तुमच्या तोफांमुळें त्यांचें किनाऱ्यावरील दळणवळण न थांबतां, सैन्य आणि सामुग्री पुरविण्याचा त्याचा क्रम अप्रतिहत चालूच होता. कारण, तें ठिकाणच अशा जागीं आहे कीं, मोठ्या जहाजांना तेथें जाणें शक्य नव्हतें. आणि लहान होड्यांकडून कार्यभाग करून घ्यावयाचा तर त्यांच्या सोईची उतरण्याची एकच सुरक्षित जागा असून तेथें प्रयत्न करणें [ शत्रूच्या बंदोबस्तामुळें ] धोक्याचें झालें असतें. आणि शिवाय आमच्या सनदेमध्यें अशा प्रसंगांची अंशतः तजवीज केलेली असली तथापि तसें [ युद्ध ] करण्यास आम्हांला भरपूर अधिकार होते असें आम्हांला वाटलें नाहीं. डेप्युटी-कौन्सिल आणि प्रेसिडेंट-कौन्सिल यांच्यामध्यें झालेला २७ ऑगस्ट १६७९ पासून ३१ जानेवारी १६८० रोजीं शिवाजीशीं तह झाल्याची हकीकत आम्हांला कळवीपर्यंतचा, पत्रव्यवहार मागवून आपण वाचला तर, त्या प्रसंगाला योग्य अशा पायऱ्यांनींच आम्हीं उपक्रम केला आणि निष्कारण आपलीं गलबतें तेथें पाठवून तीं मरण्यांत व विलायतेला पाठविण्यांत होणारी निराशा व नुकसान टाळलें; व त्यामुळें इतकें यश मिळालें असेंच आपल्यास वाटेल. यापुढें आपल्याला मुंबई बेटाचा ताबा राखावयाचा असेल आणि त्याचें उत्पन्न व खर्च यांचा मेळ रहावा अशी इच्छा असेल तर शिवाजीचें खांदेरीहून आणि मोंगलांचें उंदेरीहून उच्चाटण केलें पाहिजे. एवढेंच नव्हे, तर पोर्तुगीजहि अधिक चांगले व मित्रत्वानें वागतील असें कांहीं केलें पाहिजे. नाहींतर ती दुर्दैवी आणि अतुलनीय जागा (मुंबई बेट) संकट व धोका यांचें कायमचें स्थान होऊन बसेल.

| | | |
|---|---|---|
| (से) फॅ. रे. सुरत भा. ४-३<br>पृ. ३५ ६. | (२३४०)<br>सुरत कन्सल्टेशन. | श. १६०४ चैत्र व. ५<br>इ. १६८२ एप्रील १७ |

न्यूसिया बी मूसा ( दारूचा मक्तेवाला ) यानें शिवाजीच्या युद्धात ( खांदेरी उंदेरी प्रकरणीं ) आपले उत्पन्नावर अनिष्ट परिणाम झाला अशी तक्रार केली. त्याच्या अर्जाचा विचार झाला.



## सूची

[ नांवापुढील आंकडे लेखांकांचे आहेत. ]

### अ